ओंकार ट्रस्ट

# कल्याणी २००५

परमपूज्य श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर विशेषांक





॥ जयजय परब्रह्म सद्गुरू ॥

## भगवान श्रीकृष्ण



भिकोबा निवास - मुंबई

प. पू. बाबाजी महाराजांनी ही श्रीकृष्ण भगवानांची मूर्ती आपल्या आईसाहेबांना (माँना) त्यांच्या रक्षणार्थ दिली होती. माँची प्रकृति बरी नसल्याचे कळल्यावर त्यांनी माँना लिहिलेल्या पत्रांवरून त्यांची भगवान श्रीकृष्णांवरची श्रद्धा व माँवरील प्रेम लक्षात येतात. दि. ६/६/१९६७ चे माँना लिहलेल्या पत्राचा काही भाग येथे प्रकाशीत केला आहे :

''माँ ना बरं नाही का ? माँ अस्वस्थ असतील का ? कोणी जवळ असेल की नाही ? छे: - असे नाही होणार. तो मुकुंद आपल्या माँना कसे दु:ख देईल ? तो तर माँचा निष्काम व वात्सल्य भाव पाहून त्यांच्या मागे-पुढे रहात असेल ! निश्चितच. माँ, तुझ्या भावभक्तिचे मोठे मोल आहे. तू त्या देवास सांगितलेस तर एका क्षणात सारे रोग बरे होतील. तुझ्या प्रेमाचा भुकेला तो मुकुंद माँ आपल्या घरात खरेच नित्य असतो. सारे तोच बघत असतो. प्रत्यक्ष डॉक्टरांचा दादला व हकिमांचा राजा आहे तो. विकल्प न आणता सरळ घरातल्या माणसास जसे सांगतो असे आर्तभावाने सांग. तो त्वरित सारे बरे करील.''

## श्री दत्तात्रय भगवान, आर्वी (जि. वर्धा)



''माझ्या कुळिचे दैवत । महाराजा अवधूत ॥''

प. पू. बाबाजी महाराजांनी दत्तजयंती निमित्त आपल्या मानलेल्या आईसाहेबांस पाठविलेल्या पत्रांतून (८/१२/१९६५) त्यांचा भगवान श्रीदत्तात्रयावरचा भाव व्यक्त होतो. त्या पत्रातील हा भाव दर्शविणारा भाग येथे दिला आहे :-

''जगातील विपरीत व भ्रांत विचारांना नष्ट करून यथार्थ जीवनदर्शन त्या अवताराद्वारे भूतळी मानवास घडले आहे. धर्माचे विडंबन व मंत्रतंत्राची मात करीत आणि त्याद्वारे घडणारे समाजपतन याच अवताराने पवित्र ज्ञानोत्सर्ग करून जगासमोर उचित जीवनपथ प्रकाशित केला. निकृष्ट मन: प्रवृत्तीत उद्भवलेल्या विनाशक उपासनांचा धि:कार करून शुद्ध वैदिक धर्मोपासना जगास याच अवताराने दिली. जादूटोण्यासारखा भयानक दहशतवादी कल्पना समाजातून दूर हाकून देऊन मानवी जीवनात प्रेम-ज्ञान व भक्ति यांचा सोज्वळ आदर्श स्थिर केला.''





श्री बाबांचे निवासस्थान – मोक्षधाम आश्रम – माचणूर
इथूनच बरसल्या 'दिव्यामृतधारा' !





श्रीसंत बाबामहाराज समाधी मंदिर
मोक्षधाम आश्रम – माचणूर
''भक्तिमंदिराचा गाभारा...''





श्रीबाबांची समाधी !
''विश्वस्थ साक्षी चैतन्या...''





श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर चरण–पादुका
''सद्‌गुरु चरणचि वाटे जीवन ।
नच उरले मज काहीच त्याविण ॥''
–श्री बाबा



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१


'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे – ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७


## विश्वस्त मंडळ : ओंकार ट्रस्ट



|| श्रीराम ||

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी – दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे – सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे –

१) गुजरवाडी – निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२) मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर – मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर – बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर – गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था – १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर – पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे – कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ – ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा – पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा – पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे – चिंचवड १०) मानव्य संस्था – (संस्थापिका – कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. रेणूताई दांडेकर – ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपलं घर (संस्थापक – श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी ''यांनी घडविला महाराष्ट्र'' या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक – श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक – डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य – डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख – ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे – श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण – श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे – श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या - पारितोषिके देत आहे –

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/– ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/– ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/– खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वतः मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करून घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी – श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,

बिबवेवाडी,

पुणे ४११ ०३७.

टेलिफोन क्रमांक : २४२१००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये

नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -

ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१

कलम ८०ग खाली आयकर सवलत




ओंकार ट्रस्ट २००५ चा **"श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे २९. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.


टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** आहे.
(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.


**मुखपृष्ठ संकल्पना**
श्री. अभय व सौ. अंजली पुरंदरे

**प्रोसेसिंग**
**चित्रभारती प्रोसेसर**, सदाशिव पेठ, पुणे.

**अक्षरजुळणी**
प्रतिमा ऑफसेट, पुणे २९.

**छपाई**
प्रतिमा ऑफसेट, पुणे २९. फोन : २५४६०२१६

# वाटचाल २००४-२००५

श्रीसमर्थ रामदासस्वामी व स्वामी विवेकानंद आदी थोर सत्पुरुषांची शिकवण व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा दि. २६.७.१९९१ या शुभदिनी करण्यात आली. संस्था सार्वजनिक न्यास म्हणून नोंदविण्यात आली आहे. संस्थेची मुख्य उद्दिष्टे अशी आहेत -

१) संस्कार वर्ग व बालवाचनालय
२) दवाखाना व प्रसूतिगृह
३) अध्यात्मिक जनजागरण
४) ध्यान धारणा

गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे १ एकर जागा घेतली असून त्या ठिकाणी ऑपरेशन थिएटरसह ६ खाटांचे प्रसूतिगृह 'राधाबाई हर्डीकर प्रसूतिगृह' या नावाने कार्यरत आहे. दररोज दवाखाना चालू आहे. या ग्रामीण भागात वैद्यकीय सेवा उपलब्ध नाही. डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आठ नेत्रचिकीत्सा शिबीरे आयोजित केली होती. गरजूंना मोफत चष्मे व औषधे देण्यात आली. दिनदयाल हॉस्पिटल मार्फत एक कॅन्सर चिकीत्सा शिबीर घेण्यात आले.

सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तीला / संस्थेला १९९७ पासून दरवर्षी 'सौ. वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' देण्यात येतो. मराठी/इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प गेले ५ वर्षे श्री. नानासाहेब लाभे यांच्या मार्गदर्शनाखाली ३५ शाळांतून राबविण्यात आला.

## २००४-२००५ मधील कार्यवृत्त

कल्याणीच्या परमहंस परिव्राजकाचार्य 'श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज' विशेषांकाचे उद्घाटन, भागवताचार्य प. पू. श्री. किशोरजी व्यास यांचे शुभहस्ते करण्यात आले. २००४ सालचा 'सौ. वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' हृदयरोगींसाठी काम करणारे सामाजिक कार्यकर्ते श्री. श्रीकांतजी मुंदडा यांना देण्यात आला.

सुमति बालवन शाळा व मांगडेवाडी जिल्हापरिषद शाळा येथे निबंध स्पर्धा घेण्यात आल्या. कर्वे स्त्रीशिक्षण संस्थेतील निवासी मुलींसाठी भोंडल्याचा कार्यक्रम घेण्यात आला. त्यात १८० मुलींचा सहभाग होता. डॉ. हरि यशवंत कुलकर्णी यांचे ज्ञानेश्वरीतील कर्मयोग या विषयावर प्रवचन झाले. कर्वे स्त्री शिक्षण संस्थेमध्ये सुगम संगीतांच्या स्पर्धा आयोजित करण्यात आल्या. त्यात २० मुलींनी भाग घेतला. गुजरवाडी / निंबाळकरवाडी येथील रहिवाशांसाठी जनरल चेकअपचा कँप डॉ. दीपक परवाले यांचे नेतृत्वाखाली घेण्यात आला. त्यांचेबरोबर पाच डॉक्टर्स सहभागी झाले होते. १०५ रहिवाशांना औषधे देण्यात आली.

कल्याणीच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी स्वरूपानंद विशेषांकाला मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट अध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला.

इंजिनिअरिंग, मेडिकल, आर्किटेक्टला प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थीनींस 'कै. नलिनी विष्णू जोगळेकर' या नावाची रु. ५०००/- ची शिष्यवृत्ती गेली ५ वर्षे देण्यात येत आहे. इ. १० वी च्या मार्च २००४ साली झालेल्या शालांत परीक्षेमध्ये पुण्यातून संस्कृत या विषयामध्ये पहिली आलेली चि. पुजा अरविंद जोशी हिला कै. श्री. का. ल. आठल्ये यांच्या स्मरणार्थ रु.२५०/-ची शिष्यवृत्ती प्रदान करण्यात आली.

ओंकार न्यासाने २ मुले व २ मुली दत्तक घेतली असून त्यांच्या बरोबर २ महिला गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे राहात आहेत. त्यांच्या रहाण्यासाठी १६०० स्क्वे. फुटांचे बांधकाम रुपये सहा लाख खर्च करून पूर्ण करण्यात आले.

शिवभक्तीची पावन पेठ - श्री सिद्धेश्वर मंदिर, श्रीक्षेत्र माचणूर



''भूमिभार सारुनी ज्ञानदीप्ती पावली ।
धर्मवीर प्रसवले सिद्धराम ये स्थळी ॥''



श्री सिद्धेश्वर भगवान - श्रीक्षेत्र माचणूर



श्री रामकृष्ण मंदिर - मोक्षधाम आश्रम - माचणूर
''जय जय रामकृष्ण हरि''



श्री हनुमान मंदिर - मोक्षधाम आश्रम - माचणूर



पुण्यसलिला चंद्रभागा -
श्रीक्षेत्र माचणूर



श्रीबाबामहाराज आर्वीकर श्रीसंत तुकडोजी महाराजांबरोबर



श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर

माचणूरच्या साधना
महोत्सवातील
श्रीबाबांचा गीता पाठ





मोक्षधाम आश्रमातील
प्राचीन स्थान
श्रीकाशीनाथ महाराज
मंदिर ▼

माचणूरच्या साधना
महोत्सवातील
श्रीबाबांचे प्रवचन





श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर





## संपादकीय

जन्माला आल्यापासून मृत्यूपर्यंत माणूस एक सारखी धडपड करीत असतो. ही धडपड कशासाठी चालली आहे ? याचा विचार केला असता असे लक्षात येते की, माणसाला आनंद आणि समाधान पाहिजे असते. मग ती व्यक्ती कोणत्याही वयाची असो. या दोन गोष्टी मिळवण्यासाठी ती प्रयत्नशील असते. त्याचे हे प्रयत्न देहसुख, संसार, मानमरातब, धनदौलत ही ध्येये डोळ्यांसमोर ठेवून केलेले असल्यामुळे त्यातून त्याला तात्पुरता आनंद मिळतो. पण शांती मिळत नाही. परिणामी तो दुःखी व बेचैनच रहातो. ही बेचैनी घालविण्याचा रामबाण उपाय म्हणजे संत सहवास हा आहे. कारण संतांचे जीवन परहितासाठीच असते. त्यांच्या सहवासात आलेल्या सर्वांना ते आपल्यासारखे आत्मनिर्भर बनवितात. सर्वसामान्य मानवी जीवाची ही तगमग विचारात घेऊन त्यांच्या उन्नतीसाठी ईश्वरी संकेतानुसारच आजपर्यंत साक्षात्कारी संतांचे अवतार झालेले आहेत. ही संत परंपरा युगानुयुगे चालत आलेली आहे. परंतु सर्वांनाच संतसहवास प्रत्यक्ष घडतो असे नाही. म्हणून संतांच्या साहित्यातून त्यांनी मांडलेले त्यांचे विचार व त्यांनी केलेले मार्गदर्शन सर्वांना उपलब्ध व्हावे, या उद्देशाने 'ओंकार न्यास' दरवर्षी 'कल्याणी'च्या रूपाने एका संताचे साहित्य पुष्प लोकांना उपलब्ध करून देण्याचा प्रयत्न करीत आहे. आमच्या या प्रयत्नांस वाचकांचा चांगला प्रतिसाद मिळतो, हा आमचा अनुभव आहे हे आनंदाने नमूद करावे असे वाटते.

संत साहित्याच्या पुष्पांची ही जी पुष्पमाला 'ओंकार'न्यास गुंफीत आहे त्यातील हे १४ वे भावपुष्प या वर्षी 'श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर' यांचे चरणी विनम्र भावाने समर्पित करण्यात येत आहे.

संतांची आर्वी म्हणून प्रसिद्ध असलेल्या 'आर्वी' गावी ३ ऑगस्ट १९२५ रोजी श्रीबाबा महाराजांचा जन्म झाला. तपोनिष्ठ संतकुल परंपरा लाभलेल्या या बालकाला साधुसंतांचा सहवास लहानपणापासूनच लाभला. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज तर त्यांच्यावर पुत्रवत प्रेम करीत असत. वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी देवाच्या सख्यत्वासाठी घरदार, जिवलग सोडून त्यांनी सन्यस्त वृत्तीने भारत भ्रमण केले. भ्रमण कालावधीमध्ये मोठमोठ्या सत् पुरुषांच्या सहवासात खडतर तपश्चर्या करून प्रखर साधना केली. ईश्वरी प्रेरणेतून लिहिले गेलेले त्यांचे ग्रंथ, साधना शिबिरे, धर्म प्रबोधन या द्वारे त्यांनी समाज जागृतीचे अनमोल कार्य केले. ज्ञानेश्वरीच्या १२ व्या अध्यायावरील प्रतिपद टीका असणारा 'दिव्यामृतधारा' हा त्यांचा ग्रंथ म्हणजे तर अलौकिक असा ठेवा आहे. आधुनिक काळामध्ये दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शन करणाऱ्या या महान योग्याचे चरणी नतमस्तक होऊन या वर्षीचा अंक प्रकाशित करण्यात येत आहे.

आमच्या अंकाचा दर्जा उंचावणाऱ्या विचारवंत साधक लेखकांच्या सहाय्याशिवाय आम्ही अंक काढू शकत नाही याची पूर्ण जाणीव आम्हाला आहे. त्यांचे ऋण आम्ही फेडू शकणार नसलो तरी औपचारिक शिष्टाचार म्हणून आम्ही त्यांचे आभार मानीत आहोत.

त्याचप्रमाणे अंक काढण्यासाठी आर्थिक सहाय्य करणाऱ्या जाहिरातदारांचे पण आम्ही ऋणी आहोत. कोणतीही अपेक्षा न ठेवता लेख देणारे लेखक, जाहिरातदार व अंकासाठी हस्ते परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे पुनःश्च आभार मानल्याशिवाय रहावत नाही.

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

*– सौ. रजनी काळे*

'मोरेश्वर' || श्री गुरुदेव ||

तार : मोक्षधाम, माचणूर
पोस्ट : ब्रह्मपुरी, ता. मंगळवेढे
जिल्हा : सोलापूर [ महाराष्ट्र ]

स्थान माचणूर

जा. क्र.

दिनांक ९।३।६८ —

माँ - स. सा. वंदन —

कालचे रथावरून माझी पत्रे मिळाली असे कळाले. परवा पुनःपत्र तुला व पुढे कामांना यात्रेच्या फॉर्मसह पाठवले आहे ते मिळा-ल्याचे कळव लवकर.

तुझे हे पत्र मनाला हालवणारे असे आहे. तुझ्या आंतरीक भावनांचे मंगलदर्शन झाले. काही स्वरूप ही मला कळले आहेस. माँ – तू माझी माँ आहेसना! मग माँ ला माँ कोणी ज्ञानी अज्ञानी, शिक्षीत अशिक्षीत असे म्हणून माँ म्हणत असतो. माँ म्हणजे जिव्हाळ्याचे परमधाम – लेकरांच्या विसाव्याचे ठिकाण. या ठिकाणी जे हृदय असते तेच सर्व शिक्षणाद्वारे ~~प्राप्त करायचे~~ असते. माचे अंतःकरण लाभावे म्हणूनच विद्या शिकायची असते. विद्येचे माँ बनणे हे शेवटचे कार्य असते. मग सांग – माँ तुझ्याजवळ सर्व शिक्षणाचा जो परिपाक त्याचाच मी जर अनुभव करतो तर माझा सर्वांत मोठे शिक्षण घेतलेला कोण आहे असे वाटते. माँ तू माझी माँ आहेसना! शब्दांचे अर्थ करणे वेगळे आणि अर्थाचा जो भाव त्याचीच मूर्ती बनणे हे महाभाग्याचे आहे. तूं पंडीता नसली तरी भक्ता – माता व निष्काम प्रेमळता आहेस. यामुळेच पंडीताची शब्द यावरी तुझ्या ओवी नाही तर हृदयाचे ओलेपण डोळ्यावाटे या कामासाठी टपटप पृथ्वीत ओसंडते. माझ्याबाबा तुझी असो, लोकांच्या सर्वांनी स्मरावे! माँ या हृदयाची किंमत लाखो पंडीतांनाही करता येणे शक्य नसते. बाबा म्हणून तुझी हाकेनंतर तुझा हात पाठीवरून फिरावा, स्वरूपाने तुझ्या

## अनुक्रमणिका

"जय जय गुरुमहाराज गुरु । जय जय परब्रह्म सद्गुरू ॥"



**श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर नामजप यंत्र"**

संकल्पना, निर्मिती व हस्ताक्षर

**वसंत गोडबोले**

१२४, शनिवार पेठ (नेने घाट), पुणे ४११ ०३०.

# सगुण चरित्रे । परम पवित्रें


**डॉ. सौ. नीला जोशीराव**

विवाहोत्तर १४ वर्षांनी महाविद्यालयीन शिक्षणास सुरुवात. १९६९ साली एम.ए. मेरिटमध्ये. २२ वर्षे प्राध्यापक [illegible] विभाग प्रमुख म्हणून १९९२ मध्ये निवृत्त. जीवन विकास, ज्ञानदीप, पुरुषार्थ, सप्तरंग इ. मासिकातून [illegible] 'दासबोधातील भक्तीमार्ग' प्रबंधास प्रा. जिन्सिवाले पुरस्कार. गीता, ज्ञानेश्वरी, [illegible], दासबोध विविध वि[illegible] [illegible] [illegible] प्रवचने.


*'सगुण चरित्रे । परम पवित्रें ।*
*हरीची वर्णावी ॥*
*सज्जनवृंदे मनोभावें ।*
*आधी वंदावी ॥'* - (श्रीएकनाथ)

या श्रीनाथांच्या आज्ञेप्रमाणे नाथपंथाचे योगीराज प. पू. बाबा आर्वीकर यांचे सगुण-चरित्र शब्दबद्ध करण्याचा असाच, नम्र प्रयत्न श्री माऊलीचे कृपेकरून करावयाचा व ज्याचा त्याला तो समर्पित करावयाचा.

प. पू. बाबा श्रीज्ञानेश्वरी-प्रवचने करीत, ती ऐकल्यावर कोणी म्हटले की 'काय छान बोलता !' बाबा उद्‌गारत असत, 'मी बोलतो ? छे ! अनंत अवकाशात जी वर्णमाला झळकते ती मी बघतो-वाचतो.' अशी जगावेगळी अनुभूती ऐकली तर समर्थोक्तीचे स्मरण होते -

*'जो जनामध्ये वागे ।*
*परी जनावेगळी गोष्टी सांगे ।*
*ज्याचे अंतरीं ज्ञान जागे ।*
*धन्य तो साधु'*

(श्रीदासबोध)

प. पू. बाबांना त्यांच्या लौकिक चरित्राबद्दल फारशी ओढ नसली तरी साधकांस ते चरित्र दीपस्तंभच होय. वैयक्तिक, सामाजिक, पारमार्थिक असे सर्वांगीण दिशादर्शन तो दीपस्तंभ करीत असतो व राहील.

'दिव्यामृत धारा' या ग्रंथात बडोधाचे डॉ. रं. स. गोडबोले यांनी प. पू. बाबांचा परिचय करून दिला. धर्मभास्कर १९८४ च्या अंकात - संत बाबा - आर्वीकर विशेषांकात 'आनंदयात्रीच्या पाऊलखुणा' या लेखात श्री शरद भगत (माचणूर) यांनी तो करून दिला. बाबांच्या धाकट्या बंधु व सौ. वहिनीने जो सांगितला; त्यांच्या बहिणीने - आर्वीला जे ऐकले ते या चरित्राचे आधार.

बाबांच्या परतत्त्वस्पर्शी ग्रंथसंपदेचा परिचय येथे फारसा करून न देता मुख्यतः त्यांचे चरित्र साधकांस मार्गदर्शक ठरेल म्हणून शब्दबद्ध करणार.

विदर्भातील वर्धा जिल्हा, नागपूर अमरावती मार्गावरील 'तळेगांव' पासून एक फाटा 'आर्वी' कडे वळतो. येथून ३॥ कि.मी. वर आर्वी आहे. 'संतांची आर्वी' म्हणून ती प्रसिद्ध आहे. प. पू. तुकडोजी महाराज हे याच परिसरातील होते. पू. बाबांच्या माचणूर येथील आश्रमात संत तुकडोजी महाराजांचे गुरुदेव-सेवा मंडळ व रा. स्व. संघ दोहोंचे वळण दिसते. 'आपले चरित्र लिहू नये' असे पू. बाबा म्हणत असत. त्यामुळे त्यांचे आदर्श साधक-शिष्य व गुरू म्हणून जेवढे दर्शन मला ग्रंथातून घडले ते व तेवढेच आपण बघू या.

'बघू या' म्हटले खरे पण हे असामान्य चरित्र बघणार ते चर्मचक्षूंना शक्य नाही आणि प्रज्ञाचक्षूंचे दृष्टीने हा सामान्य जीव अंधच असतो. तरी पण हे दर्शन घेण्यास निघावयाचे तर आर्वीस जावयाचे - आर्वीचे दुचक्के जोशी घराणे - एक धर्मशील, सदाचार संपन्न, प्रतिष्ठित म्हणून मान्यता पावलेले कुटुंब. या जोशी घराण्यावर पंचक्रोशीतील सर्व संतांचा अपरंपार लोभ; पण आर्वीचे नव्हे विदर्भाचे भूषण अशा मायापाखर घालणाऱ्या 'मायबाई' वर पू. बाबांची विशेषच श्रद्धा, माया होती.

श्रीबाबांचे पिता प्रभाकरपंत हेच बाबांचे मार्गदर्शक गुरू होते. आर्वीला ते शिक्षक होते. आर्वी गावात एक 'नारायण माळी' नामक 'वेडापिसा' अवतार म्हणावा तसा सत्पुरुष त्यावेळी नांदत असे. अखंड नामस्मरणात दंग असलेला हा नारायण बाबांच्या घरी नेहेमी येऊन जाऊन असे. त्यांचे परस्पर ज्ञानाचे आदान प्रदान होत असावे; असाच पुढील प्रसंग घडला.

बाबांचे बाबा व्यावहारिक 'रु. आणे - पै' च्या 'काळ - काम - वेगा'च्या गणितापासून नेहेमी दूर असत. पगार घरापर्यंत येईलच अशी खात्री नसे. कुणाला आवश्यकता असेल तर तो देऊन टाकावयाचा. नाथपंथाचा त्यांचा अभ्यास व अनुभव होता. श्रीबाबांच्या ग्रंथांमध्ये जी नाथपंथांची रहस्ये प्रकट झाली आहेत; ती या पिता-पुत्रांच्या अभ्यासातूनच त्यांना लाभली.

गुरु-शिष्यांच्या गूढ आत्यैक्यावरील ग्रंथाचे वाचन हाच बाळपणचा अध्यात्मिक अभ्यासाचा श्रीगणेशा. वडिलांनी असे पुष्कळ ग्रंथ त्यांना वाचायला दिले. तोच ठसा या बालयोग्याच्या मनात भावी योगीराजाची राजमुद्रा होऊन ठसला.

बाबांच्या जन्मापूर्वीच वडिलांना एकदा आसन्न मरणावस्थेतून 'नारायण माळी' या अल्पवयीन नामयोग्याने आपल्या आयुष्याच्या हिशोबातील २५ वर्षे देऊन पुनःश्च उठविले. कृष्णार्जुनाची जोडी असावी तसे मास्तर (प्रभाकर पंत) व हा बालयोगी नांदत असत.

प्रभाकर पंत निस्सीम दत्तभक्त होते. त्यांचा पारमार्थिक अधिकार थोर होता. त्यांनी त्यांच्याच शक्ति बीजरूपाने बाबांमध्ये संक्रमित केल्या, म्हणजेच गुरु-शिष्यांचे गूढ आत्यैक्य प्रगट झाले तेच पू. बाबा चे निगूढ विभूतिमत्त्व. पुढे वयाच्या १५ व्या वर्षी परमपूज्य पिता दत्तचरणीं विलीन झाले व पू. बाबा गावातील त्यांच्या दत्तमंदिरातच वास्तव्याला आले. त्या मंदिरात राहून त्यांनी 'पंचाग्नी साधना' सारख्या काही विलक्षण साधना केल्या. (ते स्वतः पाहिलेली एक व्यक्ति नागपुरात आहे) पुढे दोन वर्षांनी त्यांनी याच दत्तगुरूंना परिभ्रमणाची आज्ञा विचारली. अवघ्या १७ वे वर्षी

'मोरेश्वर' नेसत्या वस्त्रानिशी (पंचा) व गीता-ज्ञानेश्वरी ग्रंथ घेऊन; 'आर्वी'च्या जन्मभूमीच्या कृपाप्रसादे परिभ्रमणास निघाला. या बालयोग्यास कोणी एक अज्ञात शक्ति गुरूगम्य मार्गावरून चालवित होती. तिच्या आंतरिक आदेशानुसार बाबा गोदाकिनारी नाशिक येथे आले. मार्गातले खाणे-पिणे, मंदिरात निवास यदृच्छेने होत असे. दक्षिण काशी नाशिक-त्र्यंबकेश्वर ही परमार्थाची जंगम विद्यापीठे आहेत. ज्ञानगंगा गोदावरीच्या जलतुषारात पू. बाबा तासनूतास सुस्नात होत होते. तेथील शंकराचार्य मंदिरात शास्त्रचर्चा ते सतत श्रवण करीत. गोदातीरी येणारा यात्रेकरू; त्यात जपी-तपी, बैरागी, साधु-संन्यासी, जोगडे, जंगम, निरंजनी, अवधूत, नाथ, कानफाटे, अवघड, शैव-शाक्त असे विविध पंथांचे दर्शन बाबांना घडत असे. सखोल, सूक्ष्म तीक्ष्ण बुद्धीचा 'मोरेश्वर' त्या सर्व नोंदी मन-बुद्धीत गोंदवून घेत असे. श्रीबाबांच्या वाणी-लेखणीत जे विविध पंथांचे दर्शन घडते ते याच सूक्ष्म अवलोकन शक्तीचे निदर्शक होय. याच सत्संगतीचा महिमा त्यांचे पुढील वाटचालीचे 'पाथेय' होते. इथे घडलेली संत सेवा त्यांना पुढे जन्मभर पुरून उरली.

नेसते धोतर, खांद्यावर पंचा, हातात पोथी, अंगात कुडते एवढेच घेऊन गोदातीराचा निरोप घेऊन बाबा 'पंढरपूर'च्या विठ्ठलाच्या दरबारी दाखल झाले. चंद्रभागेचे त्रिकाल स्नान अन् पांडुरंगाचे अखंड दर्शन हेच त्यांचे पाठबळ होते. ज्ञानोबा ते तुकोबा या हजारो संतमंडळामुळे भुवैकुंठ झालेल्या त्या क्षेत्रदेवतेने, चंद्रभागेच्या मऊ वाळवंटाने बाबांना नर्मदामाईचे स्वाधीन केले.

बाबा उत्तरेकडे ॐकारेश्वराच्या विलक्षण ओढीने निघाले. जेथे पूज्यपाद श्रीआचार्यांना, परमहंस टेंबे स्वामींना आपले समाधी-साधन, संजीवन नाम लाभले त्या पवित्र नर्मदामाईच्या कुशीत तिचे हे ज्ञानभुकेले लेकरू विसावले. शिव तपोमूर्ती नर्मदेने त्यांना येथेच श्रीगुरुस्पर्शदीक्षा प्रदान केली असे 'साधना-संहिता' या ग्रंथातील बाबांचे प्रास्ताविक सांगते.

'रेवातीरे तपः कुर्यात्' तपःसाधनाभिमुख असा हा ऋषीकुमार; श्रीनर्मदा माईच्या साक्षीने त्याची योगांगे इथेच उन्मीलित झाली. करतल भिक्षा तरुतल वासः असा मोरेश्वर, भूमीचे आसन व आकाशाचे पांघरूण ओढून श्रीगुरुदर्शनासाठी भावव्याकुळ झालेला होता. त्यांना त्या अबोध अवस्थेत संरक्षक वज्रकवच होते. त्यांची माता-पित्याची पुण्याई, संत तुकडोजी महाराजांचे आशिर्वाद यांमुळे परमहंस परिव्राजक 'महेश्वरानंद' यती यांनी 'हृदयां हृदय एक होऊन' या बालयोग्याला अनुग्रह दिला.

***'जाणतेनो गुरु भजिजे ।***
***तेणे कृतकार्या होईजे ॥'***

ज्ञानेश्वरी अ. १

असा कृतकृत्य झालेला हा ज्ञानयोगी तुर्यावस्था ओलांडून सहज उन्मनीत पोचला. यतीवर श्रीमहेश्वरानंद सद्गुरु रूपाने 'मागे पुढे उभा सांभाळीसी' असे या सत्शिष्याला अहोरात्र सांभाळित होते. त्यांच्याच आज्ञेने पू. बाबांची परिभ्रमण यात्रा श्रीवृंदावनाकडे सुरू झाली.

विंध्याद्रीच्या कुशीतून त्याला मुरलीमनोहराची मुरली ऐकू येऊ लागली. 'मार्गशीर्ष एकादशीस' अनुग्रह दीक्षा परिपूर्ण झाली; आणि बाबा जगद्गुरू कृष्णाच्या ओढीने निघाले.

'वृक्षवल्ली आम्हां सोयरे वनचरे' हे केवळ शब्द नव्हेत ती तुकोबांची मंत्रवाणी बाबांनी स्वतः अनुभवली. गुर्वाज्ञेने इंदोरहून उज्जैनीस येऊन श्रीमहांकाळेश्वराचे दर्शन घेतले. तिथे तपेबाबांकडे त्यांची मंत्रदीक्षा घ्यावी तसा मंत्रशास्त्राचा अभ्यास झाला. पंधरा दिवसांचे अनुष्ठान करून फाल्गुन शु. ५ ला बाबा वृंदावनास पोचले. श्रीकृष्णाची अनंत रूपे, अनंत नावे असे विश्वरूप दर्शनच त्यांना घडले.

यमुनेचे स्नान आणि ११ दिवस 'श्रीकृष्ण' ध्यानात बाबा तल्लीन होते. 'वृंदावनमे राधे राधे । कुंजगलीमें राधे राधे ।' या राधातत्त्वाची 'दिव्यामृत धारेची' अनुभूती तिथे पावलोपावली येत होती. यमुनेची योगशक्ती पाठीशी उभीच होती.

इथेच श्रीमत् भगवत् गीतेची पारायणे बाबांना पावली. ही कृष्णलीला भूमी बाबांना आत्म ज्ञानप्रकाशाचे वलय देऊन गेली. 'गीता' हा प्रभूचा दिव्य वेणूनादच – –

***'वृंदावनीं वेणू । वेणू कवनाचा माय वाजे ।***
***वेणूनादे गोवर्धन गाजे ।'***

अशी ही 'भानुदासासी पावली प्रेमभक्ती' तीच बाबांना या व्रजभूमीत भेटली. तिथे त्याला 'शुकाचार्य' हे बंगाली परमहंस व त्यांचा 'सत्संग' आपलासा करून गेला. 'उडिया बाबांचे' नामसंकीर्तन, 'काठियावाला बाबांचे' दर्शन यांतून ही प्रेमभक्ती-गंगा-गीतेचे श्लोक गात गात पुढे निघाली. महेश्वरानंदयती याच कृष्णरूपात त्याला मार्गदर्शन करीत. 'ज्याने अर्जुन सावरला, उद्धव बोधिला, ज्याने गोपाळ तारले' तोच हा राधारमण म्हणजे 'महेश्वरानंद' होत –

श्रीगुरूकृपेकरून श्री वृंदावनात पू. बाबांना श्री राधेचे मार्गदर्शन व दर्शन घडले. तिनेच त्यांना श्रीकृष्ण ध्यानात निमग्न केले म्हणूनच गीता वृंदावन - गोकुळ - मीरा - माऊली ज्ञानेश्वर - श्रीकृष्ण या नावाच्या उच्चाराबरोबर बाबा ध्यानमग्न होऊन जात असत. श्री यमुनेने बाबांना देवतात्मा हिमाचलाच्या स्वाधीन केले. पू. बाबांना नाथ पंथाची गूढ रहस्ये याच जमुनामैय्याने उलगडून दाखविली. अडीच तीन वर्षे तिथे साधना केल्यावर पू. बाबा 'उत्तर काशीकडे' निघाले.

श्रीगंगा किनारी ते वर्ष-दीड वर्ष साधनेत मग्न झाले. ऋषीकेश येथे स्वर्गाश्रमासमोरील एका पर्णकुटीत ते वास्तव्याला होते. तेथील वास्तव्यात एका महारोग्याची सेवा हीच त्यांची साधना होती. 'उत्तरकाशी'चा काशीविश्वेश्वर पू. बाबांना विविध नामा-रूपांनी भेटला. सत् ब्रह्मेंद्रनाथांकडून प्राणविद्या त्यांनी आत्मसात केली. त्यांचे आज्ञेनुसार पुढील अध्ययनासाठी 'कपालेश्वर', 'पशुपतेश्वराकडे' पू. बाबा निघाले. या काळात 'राघवाचार्य' या संस्कृत पंडिताचा सत्संग बाबांना लाभला.

त्यानंतर श्रीकैलास-मानस दर्शन. श्रीकेदार - बद्रीनाथ दर्शन, पू. बाबांनी डोळे-कान-मन-प्राण भरभरून घेतले. निबिड अरण्यात, जपी-तपी-बैरागी-योगी यांचे धुनीजवळ बसून अनेक रात्री पू. बाबांनी साक्षात अनुभूती घेतली. गंगा किनारी अनेक धर्मशाळा, चट्ट्या बाबांचे आश्रयस्थान होत्या. एखादा नाथपंथी योगी धुनीतून अमृत-कंद काढून देई. त्यामुळे अनेक दिवस तहान-भुकेशिवाय राहता येई. कधी कधी उपाशी पोटी गंगा-माईच्या अमृतमधुर तीर्थजलावरच जगावे; श्रीगंगेच्या मऊ रेतीचे आंथरूण, आकाशाचे पांघरूण, रात्रीच्या रात्री साधनेत निघून जात. कोणी अज्ञात गुरुशक्ति या कठोर साधनेत 'अयाचित व्रत' त्यांचेकडून करवून घेत होती.

त्या व्रतस्थ जीवनात अज्ञात यात्रेकरू पू. बाबांना खाऊपिऊ घालत.

प्रमान अवलं[illegible] देत, अगत्यान निवासाला घेऊन जात; खर्चाला पैसे देत [illegible] पु. बाबा आवश्यक त्याचा उपयोग करून सर्व गंगा किनारी [illegible] - साधु-संन्यासी यांना वाटून देत. अपरिग्रह वृत्तीने केवळ एका पंचावर हे अ-पूर्व परिभ्रमण सुरू होते.

अठरा वीस वर्षांचा हा युवा योगी हिमालयाच्या गिरी-गव्हरात, ऊन-वारा-पाऊस-थंडी सारे सहन करीत साधनेत समरस झाला होता. साधु-संतांच्या मेळाव्यात, नागा साधूंच्या आखाड्यात, ऋषीमुनींच्या पर्णकुटीत, यती-योगी वरांच्या गुहागुंफेत आनंदाने राहीला. साक्षात निळकंठ महादेवाकडे ऐन महा शिवरात्रीच्या सुमुहूर्ती दर्शनार्थ येणारे हत्तींचे कळप पू. बाबांनी पाहिले. हिंस्त्र श्वापदे जवळून न्याहाळली. कृष्णमृग-कस्तुरी मृग असे हरणांचे कळप पाहिले. हिमाचल प्रदेशातील पशु-पक्ष्यांशी मैत्री जोडली. पक्ष्यांचे कूजन ऐकले. अलकनंदा, मंदाकिनी यांचा खळखळाट ऐकला. आजचा हा बालधृवच म्हणावा. हिमालयातील दिव्य वनौषधी, कंदमुळेफळे यांचा आस्वाद घेतला.

हरिद्वार, ऋषीकेश, रुद्रगया, उत्तरकाशी, बद्री-केदार नंतर नेपाळमध्ये श्रीपशुपतीनाथ दर्शन, साधना करून दक्षिणेत बंगालमध्ये पू. बाबा उतरले. श्रीरामकृष्ण परमहंसांच्या दक्षिणेश्वरी त्यांच्या वृत्ती रमल्या. बाळपणी जे रामकृष्ण - विवेकानंद वाचले होते त्यांचे त्यांच्या तपोभूमीसह दर्शन घेतले. काही आदेश मिळाले. कलकत्त्याला श्रीकाली मातेचे दर्शन घडले.

या परिभ्रमणात पिंड ब्रह्मांडाचे विश्व-व्यापीदर्शन आणि ज्ञानही पू. बाबांना लाभले. काही 'मागावयाचे-मिळवावयाचे' उरले नाही. फक्त 'गुरुकृपादृष्टीची' भूक. त्यासाठीच पुढे श्रीजगन्नाथपुरीत आले. निळ्या भोर समुद्राशी पुष्कळ हितगुज केले. देवाचा 'रथोत्सव' डोळे भरून पाहिला –

*'ऐश्वर्ये भारी । या ऐश्वर्ये भारी ।*
*महाराज आपुली कथा ना । कुठे निघे स्वारी ? ॥'*

स्वातंत्र्यवीर सावरकरांचा हा सनातन प्रश्न त्याला विचारण्यासाठी 'बाबा' पुरीत आले होते. खरोखर ही विश्वाची रथयात्रा विश्वसम्राटासह कुठून कुठे निघाली आहे ? ती 'मर्मबंधातली ठेव' घेऊन, श्री चैतन्य महाप्रभूंच्या नामस्मरण भक्तीचा विडा उचलून पू. बाबा त्याच्याच प्रसार प्रचारार्थ महाराष्ट्राकडे वळले.

पू. बाबा महाराजांची ही भ्रमणगाथा लोकविलक्षण आहे. आत्मरती आत्मक्रीड अशा श्री गीताप्रणित स्वानंदावस्थेत ते अहोरात्र नांदत असत. श्रीगुरुंच्या इच्छेने, ते जिथे नेतील तिथे पाऊले टाकीत असत.

'पू. बाबांचा फिरविता धनी वेगळाचि ।' होता.

एका उच्च कोटीत -

*मंजूर जे तुम्हाला स्वानंद तोचि माझा ।*
*राजाल जेथी जेथे तेथेच मोक्ष माझा ॥'*
*हे कोण भाग्य माझे । मज विश्वगूढ कळले ।*

अशी साक्षात्कार संपन्न अवस्था तीच ही 'भ्रमणगाथा' महाराष्ट्रात प्रथम पू. बाबा महात्माजींच्या वर्धा येथील सेवाग्राम आश्रमात ९ महिने वास्तव्यास होते. तेथील आश्रम व्यवस्था, अनुशासन, स्वच्छता, स्वावलंबन याचाच अवलंब पुढे त्यांनी 'माचणूर' आश्रमात केला. पू. विनोबाजी भावे यांचा सत्संग त्याचवेळी पू. बाबांना पारमार्थिक वैभव प्रदान करून गेला. जन्मभूमीच्या ओढीने बाबा आर्वीला येऊन राहिले.

आर्वीची पंचक्रोशी संत मंडळाने गुरुकृपावलयांकित केलेली आहे. 'श्री वासुदेव शास्त्री घाट' हे विरक्त योगसिद्ध सत्पुरुष त्यावेळी [illegible] वास्तव्यास होते. पूज्य बाबांचे भावजीवन, व्यावहारिक वाटण[illegible] जीवन आणि त्यांची सामान्य जीवाला न पेलणारी, अनाकलनीय [illegible] गूढ, मौन भक्तिसाधना या त्रिविध दर्शनात पू. बाबांच्या कुळ[illegible] सिंहाचा वाटा आहे.

श्रीवाल्मिकी रामायणात आरंभीचा प्रश्न मोठा महत्त्वाचा [illegible] - महर्षी देवर्षींना विचारतात – (सागराप्रमाणे गंभीर, हिमाचलापेक्षा [illegible]) 'देवर्षे ! सांप्रत या संसारात गुणवान, पराक्रमी, सर्वज्ञ, कृतज्ञ, सत्यवक्ता, दृढव्रती, दृढप्रतिज्ञ कोण आहे ? सदाचारी, सर्व प्राणीमात्रांचे हित करणारा कोण ? अतिशय सुंदर, मन ताब्यात ठेवणारा, राग जिंकणारा, कांतिमान, मत्सररहीत कोण ? लढाईत तो रागावला तर देवही त्याला भितात.'

त्याचप्रमाणे या गुणसंघाताचे एकजीव रसायन म्हणजे पू. बाबा. दुचक्के जोशी घराण्याचे हे पारमार्थिक वैभव मौनमुद्रेने सांभाळणारी पू. बाबांची भावंडे आजही नागपुरात आहेत. त्यांचेशी बोलताना -

१) दुचक्के जोशी – धरमपेठ – नागपूर.
२) दुचक्के जोशी – नरेंद्रनगर – नागपूर.
३) दुचक्के जोशी – हल्ली मुक्काम - माचणूर.

'पू. बाबांचे चरित्र असे का ?' या अवघड प्रश्नाचे उत्तर गवसते. एक तर शिवस्वरूपच असणारा हा जीव. 'बुडता हे जन देखवेना डोळा ।' असा कळवळा घेऊन आपल्यासारख्या प्रापंचिक जनांचे आत्मजागरण करण्यासाठीच जन्माला आला आणि दुसरे 'जगद् हितायच' हे जगत्कल्याणाचे कंकण बांधून आला. तो मूळचा श्रीमाऊलीवेडा जीव ज्ञानेश्वरीतील संन्यस्त आत्माच होय –

*'(पार्था !) मी आणि माझेपण ।*
*विसरले जयाचे अंतःकरण ।*
*तो चि एक संन्यासी जाण ।*
*निरंतर ॥' (श्रीज्ञानेश्वरी अ. /)*

असा नित्य, निरंतर संन्यासी, स्वयंभू संन्यासी सामान्यांच्या गोतावळ्यात गुंतवण्यासाठी आलेलाच नव्हता. पण 'बोलिले जे ऋषी । ते साच भावे ॥ वर्तन करावयाचे म्हणूनच आदिमायेने त्यांचे 'पवित्र कुळ' आणि त्यातील 'पारमार्थिक वायु मंडल' अशी रचना केली.

बाबांच्या तिसऱ्या पिढीपर्यंत ज्या रामायण प्रवचनांचा प्रकाश पोचला त्या पू. बाबांच्या आजी 'ताई'; त्यांचे रामायण निरूपणात मोठी वेधशक्ति असे. १९३५-३६ च्या सुमारास या रामायण श्रोत्यांनी वाडाआंगण भरून जात असे. प. पू. ताईच्या अंतःकरणाची उदारता, 'सर्व भूतहितेरताः' ही वृत्ती अशा उच्च पारमार्थिक गुणांचे संस्कार व संक्रमण आसमंतात होत असे. पूज्य बाबांसारखा जन्मजन्मांतरीचा शुद्ध जीव हे सारे नकळत, शिवस्वरूपी ओढ घेण्यासाठी ही दुर्लभ, सूक्ष्म संस्कारशीलता अंतरंगी साठवित असेल. तीच मधुर-वत्सलता, तीच अमृत-मधुर वाणी पुढे सिद्धेश्वर चरणी त्या काळात श्रीमाचणूर क्षेत्रात हजारो श्रोत्यांना मंत्रमुग्ध करीत पंचक्रोशी जागवून गेली. 'किष्किंधा कांड' सांगावे ते प. पू. ताई महाराजांनीच मुळात हे कांडच निसर्गसौंदर्याने आंतर्बाह्य घमघमलेले आहे. त्यातील सुगंध ताईच्या पवित्र वाणीतून पू. बाबांनी नेमका उचलला. ती सुगंधाची दरवळ पू. बाबांच्या प्रवचनांच्या काळात अनंत जीवांचा उद्धार करून गेली. 'बाबा माचणूरच्या साधना सप्ताहात प्रसादाची साखर मुठींनी,

ओंजळींनी सर्वत्र उधळीत असत. कुणी कशासाठी ? विचारले तर सांगत असत की परा प्रकृतीतील जीव (मुंगी, मुंगळे इ.) हा प्रसाद घेऊन स्वतःचा उद्धार करतील.'

आयुष्यभर जीवनव्रती म्हणून जगलेल्या उंच, देखण्या व वेध-शक्ति असणारे भारदस्त, धिप्पाड, पहाडासारखे सर्वाधार ठरलेले पू. बाबांचे व्यक्तिमत्त्व हा पू. ताईचाच वारसा म्हणावा.

भावापेक्षा देखील बालमित्र म्हणून बाळपणापासून एकत्रच लहानाचे मोठे झालेले. बालपणी एका ताटात जेवलेले पू. बाबांचे चुलत भाऊ श्री. दुचक्के जोशी स्वानुभव सांगत होते, तो किती सांगू ! किती नको असे त्यांना होते. त्यामुळे पू. बाबांच्या अंतरंग दर्शनासाठी अन् पुढे घडलेले त्यांचे असामान्य विभूतीमत्त्व समजून घेण्यासाठी या स्वानुभवी आठवणींचा फार उपयोग होतो.

'आर्वीचे' 'दुचक्के - जोशी' व 'आर्वीकर' अशा तीन उपनावांनी हे घराणे प्रसिद्ध आहे. मूळचे भिक्षुक वृत्तीचे ग्रामजोशी. पुढे सरकारी वतनदार कालांतराने हे गुरुघराणे झाले. प. पू. बाबांचे वडील साक्षात सत्पुरुषच होते. प्रभाकरराव कधीच कोणाकडेही लग्नकार्यास गेले नाही. जवळचे, दूरचे कोणत्याही कार्याच्या गर्दीत त्यांचा 'मी' कधीच गुंतला नाही. 'अनासक्ति' योगच जन्माला घेऊन आलेला हा देवमाणूस. सहा फूट उंच, वजनदार, भारदस्त व्यक्तिमत्त्वाचा 'भाऊ' हे त्यांचे टोपणनाव, त्यांचे घरातही मौनव्रत असे. मुलांशी देखील भाषण नाही. अखंड 'दत्तगुरू' हा जप सुरू असे. 'काकु' ही बाबांची आई. त्या सर्वसामान्य पण निःस्वार्थ कुटुंबवत्सल स्त्री होत्या. त्यांच्या घरी एक पोपट होता. भाऊ त्याच्या पिंजऱ्यासमोर चुटक्या वाजवून म्हणायचे, 'म्हणा, दत्तगुरू, दत्तगुरू' तो पोपटही तसाच जप करीत असे. तो कोणी पूर्व जन्मीचा शापभ्रष्ट जीव असावा. भाऊंना एकच मित्र हा पोपट. बाकी कोणाशी त्यांनी कधी साहचर्य केलेच नाही.

'नारायण' नावाचे एक सत्पुरुश आर्वीत गावभर नामस्मरण करीत व कागदावर कशाची तरी यादी करीत सर्वत्र फिरत असत. मांत्रिक, सत्पुरुष, सिद्धपुरुष असे भाऊंचे आप्तस्वकीय होत असत. ते सत्पुरुष - नारायण बाबांच्या घरी अधून मधून वास्तव्यास असत. नारायणाची कृपा आपल्यावर आहे असे भाऊंना वाटत असे. बाबांच्या आईचा विश्वास या सत्पुरुषाचे ठायी दृढ होता. 'भाऊ' भागवतावर प्रवचने करीत, श्रोता असो, नसो प्रवचने सुरू असत. नाथपंथाच्या खुणा भाऊंमध्ये साक्षात वास करीत होत्या. प्रपंच्याच्या मर्यादेत भावणारा तो जीवच नव्हता. आपपर भावाचा जन्मच तिथे झाला नव्हता. या 'नारायण' महाराजांची एक आठवण सुधाकर भाऊंनी (पू. बाबांचे धाकटे बंधू - सध्या मु. पो. माचणूर) सांगितली. पू. बाबांचे जन्मापूर्वी 'भाऊ' फार आजारी झाले. अगदी प्राणोत्क्रमण झाले; अशी वेळ आली. बाबांच्या आई म्हणाल्या, 'नारायणांना येऊ द्या. नंतर तुम्ही ठरवा.' सर्व गावभर नारायणाचा शोध सुरू झाला. काही वेळाने हे सत्पुरुष पू. बाबांच्याच वाड्यातून वरच्या घरातून हसतमुखाने उतरले. भाऊंना म्हणाले, 'ऊठ; तुला काय झालंय ? गंडांतर गेले.' खरोखर भाऊ उठले. पूर्ण बरे झाले. पुढे पू. बाबांचा जन्म झाला. ते नारायणांचे नाम-जपाचे तेजच पू. बाबांमध्ये प्रविष्ट झाले असावे.

बाबांचे घराण्यात परंपरेने भागवत प्रवचनकार झाले. आजोबा उत्तम भागवत प्रवचनकार होते. त्यांचे भागवत श्रवणास शेकडो लोक येत असत. एकत्र कुटुंब पद्धतीत चुलत-सख्खे हा भावच नव्हता. सर्व घरांमध्ये श्रीमत् भागवत, नवनाथ पोथी, पांडव प्रताप, रामायण, भक्तिविजय, रामविजय या धर्मग्रंथांचे पारायण पाठ होत असत. लहानपणी ही मुले याच ग्रंथाच्या सहवासात वाचनात मोठी होत होती. 'जोशी' ही वृत्ती व व्यवसाय होता. पू. बाबा बालपणी बरेचदा आजारी होत असत. परंतु एक बालयोगी संचिताच्या व्यथा आनंदाने सोसत होता.

आर्वीचे 'जोशी' घराणे हे एकत्र कुटुंब पद्धतीतील सुसंस्कारित घर होते. कुटुंबाच्या पाठशाळेप्रमाणे बाबा शालेय जीवनात उत्तम विद्यार्थी-वक्ता-श्रोता होते. नृत्य-नाट्य-संगीतात पटुत्व होते. गाणे तर उत्तमच म्हणत असत. खंजिरी भजने, पहाडी मधुर स्वराने आळवीत असत. शाळेतील नाटकात कसलेल्या नटाप्रमाणे कामे करीत असत. अशा नाटकांतून जगद् नाट्याचा नाटककार कोण ? तोच आपला 'श्रीगुरू' असे उंच विचार वैभव पू. बाबांना प्राप्त झाले. नाटकात मुख्यतः शिवाजीचे काम बाबा करीत.

'मायबाई महाराज' या आर्वीच्या सिद्ध सद्गुरू होत्या. नाथपंथाचा वारसा हा याच गुरुंचा कृपाप्रसाद या घराण्याला लाभला. बाबांची प्रवचने पुढे या मायबाई मठात झाली. नाथपंथाची उपासना जोशी घराण्यात पिढ्यान्पिढ्या नांदत होती. याज्ञिक, भागवत प्रवचनकार असे हे गुरू घराणे आर्वीचे भूषण होते.

आर्वीच्या पंचक्रोशीतील सत्पुरुष राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांचे संस्कार पू. बाबांवर सखोल-सूक्ष्म उमटत होते. कारण ते पू. बाबांचे पिता-प्रभाकरपंत-यांचे घनिष्ठ मित्र होते. एकदा महाराज पू. बाबांच्या घरी आले आणि वरच्या मजल्यावरील एका खोलीत दत्ताच्या फोटोजवळ खूप गुलाल उधळला. कदाचित भावी दत्तभक्त - बाबांच्या जन्माचा तो शुभसंकेत असावा. पू. बाबा त्या प्रतिमेला व तेथील आलमारीला (ज्यावर गुलाल उधळला होता) नित्य नमन करीत असत.

संत अडकूजी महाराज हे तुकडोजी महाराजांचे गुरू घराणे. श्रीज्ञानेश्वर परंपरेतील नाथपंथाचा सखोल ठसा मायबाई रूपाने जसा पू. बाबांना घडवीत होता तसाच मायबाई-अडकोजी-तुकडोजी या परंपरेचा स्वतंत्र शोध व अभ्यास होणे आवश्यक आहे. ही परंपरा बाबांच्या बाळपणीच या थोर सत्पुरुषाची पायाभरणी करीत होती. नृत्यसंगीत ही कोणाची लीला ? वक्तृत्वाचा वक्ता कोण ? असे पू. बाबांचे सनातन प्रश्न असत. संगीतज्ञ संगीतात प्राण ओतून गातो, त्यांतील खरा गायक कोण ? बाबाच स्वतः उत्तर देत असत - 'गुरुदेव - जय गुरुदेव'.

अभ्यासक संशोधकांस इथे 'नांगरल्याविण भुई बरी' असे आवाहन आहे. ही अभ्यासाची 'सनद' ज्याला मिळेल तो भाग्यवान जीव होय. पू. तुकडोजी महाराजांप्रमाणेच संत शिरोमणी मायबाई, अडकोजी, तात्याजी महाराज अशी अनेक विभूतीमत्त्वे महाराजांशी अतूट नाते जोडून आहेत तो एक अभ्यास-विषयच आहे.

बाळपणी पू. बाबा व मधुकर आष्टीकर, मधु अभ्यंकर, रावळे, देशपांडे ही पुढे नावाजलेली मंडळी ही बाबांचे संघातील मित्र होते. त्यावेळी आष्टीकर व पू. बाबा प्रार्थना सांगत असत. ती मराठी व दोन कडव्यांची होती -

*'नमो मातृभूमी जिथे [illegible] ।*
*नमो आर्यभूमी जिथे [illegible] ।*
*नमो धर्मभूमी जियेच्याच [illegible] ।*
*पडो देह माझा सदा ती [illegible] ॥'*

या नमनातील 'मातृभूमी' भावी परिभ्रमण काळात आसेतु-हिमाचल दर्शन देती झाली असावी. एरवी या देहबोधात नसलेल्या जीवाला कोणी सांभाळले असेल ? आर्वी पंचक्रोशीतील 'तात्याजी महाराज' हे अप्पाजींचे नातू तेही भागवत प्रवचनकार होते असे म्हणतात. पण पुढे विदेही झाले. लोक त्यांना दगड मारायचे. त्याच्या खुणा, जखमा त्यांचे शरीरावर होत्या. 'बालोन्मत्त पिशाच्चवत् वृत्ती'चा सत्पुरुष. याचे मोरू वर - बाबांवर फार प्रेम होते. हा वेडा-पिसा अवतार पू. मोरेश्वर-बाबा-महाराजांकडे श्राद्धान्न जेवायला यायचे; अंगणात बसून जेवायचे. पू. बाबांनी पुढे तपश्चर्या केली ती याच तात्याजी महाराजांचे समाधी जवळ बसून केली. स्वतःला बंद करून घेऊन पू. बाबा साधना करीत असत.

बाबांचे बालपण सामान्य मुलांसारखे नव्हतेच. विशेषतः पहाटे ३॥ च्या ब्राह्ममुहूर्ती उठावे. साधना करावी. त्याच काळातील एक विलक्षण घटना, आजही आर्वीतील पू. बाबांच्या जुन्या घरातील वरच्या मजल्यावरील साधनेच्या लहानशा खोलीत, पू. बाबांच्या पुतण्याने सांगितली. ती अशी –

पू. बाबा साधनेत निमग्न होते. त्या बंद खोलीत त्रैमूर्ती आपापल्या आसनावर बसून त्यांना साधनेत उपकारक मार्गदर्शन करीत. एके दिवशी त्यांची ती आसने तिथेच राहून गेली. पू. बाबांनी ती प्रसाद म्हणून जपून ठेवली पण काही दिवसांनी ती आपसूक दिसेनाशी झाली. पू. बाबा बेचैन झाले. गुरुंच्या मठात जाऊन या गूढाचे रहस्य विचारू लागले. त्यांना उत्तर मिळाले ते असे की, 'तू खोली बंद करून साधना करतोस हे खरे पण उदबत्ती लावून करतोस ना ? मग त्याच अग्नी-तत्त्वातून ते तीन सत्पुरुष आले आणि पुनःश्च त्यातच अंतर्धान पावले. त्यांची प्रसाद-वस्तू ही पंच भौतिक नव्हतीच ती-ही मूलतत्त्वात विलीन होऊन गेली.

या व अशा साक्षात्कारी घटना हेच बाबांचे जगावेगळे बालपण होते. त्यांनी १७ वे वर्षीच आपली सर्व वह्या पुस्तके गावगंगेत ठेवून दिली अन् स्वतः आर्वीतील प्रसिद्ध दत्तमंदिरात राहायला गेले. पू. बाबांचे बालमित्र श्री. दिनकर शं. देशपांडे यांनी सांगितले की, ११ ते १७ या वयापर्यंत पू. बाबा त्यांचे मित्र म्हणून काही आठवणी त्यांचे जवळ आहेत, जसे मधु आष्टीकर अन् बाबा जास्त घनिष्ठ मित्र होते. बाबांचे बालपण कष्टात गेले. तसेच अमुक घरी जेवीन; असा सोवळे ओवळे अशी चिकित्सा नसे. माचणूरहून दरवर्षी पू. बाबा आर्वीत कसब्यातील (जुने गाव) श्रीराममंदिरात रामनवरात्रात येत असत. येताना रामाच्या वस्त्रासाठी सॅटीनचे कापड आणत असत. त्यांचा शिंपी ठरलेला असे; पण त्या रामाची वस्त्रे शिवून झाली की बाबांनी दिलेले पैसे तो पुनः त्यांनाच देऊन टाकत असे. फक्त ज्या वर्षी बाबा दाढेच्या कॅन्सरने अत्यवस्थ होते त्या वर्षापासून या रामाच्या दर्शनात खंड पडला. श्री. देशपांडे तर म्हणाले, की बालपणी अतिशय खोड्याळ, गमत्या, व्रात्य मुलाचे भवितव्य नियतीने एवढे थोर घडविलेच कसे ? हाच त्यांच्या चरित्रकारांचा महत्त्वाचा लेखन विशेष आहे.

श्रीक्षेत्र माचणूरला साधना सप्ताहात श्री. देशपांडे उपस्थित होते. त्यांनी विचारले की तू जे ग्रंथलेखन केलेस, तू जी प्रवचने करतोय ही तू कुठे शिकलास ? एवढा अभ्यास कुठे केला ? तर बाबांचे एकच उत्तर. 'मला दृष्टीसमोरच्या अंतराळात सोन्यासारखी अक्षरे लखलखीत दिसतात. ती मी वाचतो, लिहितो.' खरोखर 'अघटित घटना परियसी माया' हे करेल ते लोकविलक्षणच म्हणावे. कारण आजही थोरा-थोरांना, अभ्यासकांना दुग्ध्यात टाकणारा बाबांचा ग्रंथसंग्रह आहे. बडोदे येथील श्री. व सौ. जावडेकर त्यांची सुकन्या कु. डॉ. प्रज्ञा जावडेकर, रंगनाथ कुलकर्णी तसेच मुंबई, पुणे, सोलापूर, माचणूर, कोल्हापूर, हुपरी इ. ठिकाणी बाबांचा विद्वान शिष्यवर्ग आहे पण बाबांच्या त्या ग्रंथसंभारातील लेखन पाहून त्यांनाही मोठा अचंबा वाटतो. बाबांच्या चरित्रातील अलौकिक भागाचे आकलन होईना म्हणून ते काम थांबले. प. पू. बाबांच्या पूर्वजांच्या सखोल अभ्यासाने हे कोडे काहीसे उलगडते असे वाटते. त्या सर्व पूर्वजांचे ज्ञान, वाचासिद्धी, तपसाधना; बाबांसाठी पारमार्थिक योगदान ठरले. बाबांचा आवाज घुमणारा, मधुर, खणखणीत, उच्चार स्पष्ट असा होता, असे देशपांडे म्हणाले.

पू. बाबांचे सख्खे चुलत भाऊ त्यांच्या घराण्यातील साधकांची माहिती देतात, ती अशी – 'अमरावतीस पू. बाबा एका घरी भिक्षा मागतात, 'बाई ! जरा सुईदोरा देते ? आपला तळपाय दाखवितात व तिचा सुई-दोरा घेऊन तो चपलेप्रमाणे गोलाकार शिवून काढतात'' ती बाई अवाक् होताच तिथून सहज निघून जातात.

हे नाथपंथाचे वैभव होय. पू. अण्णा पटवर्धन सहज सांगत असत. अपान वायूने जे मोठे आतडे बाहेर काढले तेच प्राणाने आंतमार्गात ओढून घेतले. (चरित्र - ले. अप्रबुद्ध)

हे अद्वयानंद वैभव प्राप्त झालेला, स्वानंद साम्राज्याचा चक्रवर्ती बाबा श्रीमाऊलींच्या आज्ञेने — 'निगूढ मठ होआवा । को शिवालय' - श्रीसिद्धेश्वरा सन्निध राहून सर्व यात्रेकरूंसाठी आजही साधना सप्ताहात (श्रीगीता जयंती पूर्वी ५ दि.) श्रीबाबा जीवाला मार्गदर्शन करीत असतात. त्या क्षेत्राचे तारे-वारे-पर्यावरण-वृक्ष-वेली हे सारे वेगळेच आहे; तसे का ? तर सत्ययुगाचा एका यज्ञाचा दाखला देतात. आजही त्यांच्या स्वानुभवी शिष्यांची अमृतवाणी गुंजन करीत असते 'माझ्या सिद्धेश्वराची कृपादृष्टी-कृपादृष्टी तुम्हां सर्वांवर आहे. चंद्रभागा खोल आहे. पायऱ्या निसरड्या आहेत. थंडी फार आहे. पाणी थंड आहे. घरी कोणी आजारी आहे. सर्व चिंता इथेच सोडून द्या. कारण माझा सिद्धेश्वर तुमच्या पायांतळी आपला हात ठेवून तुमच्या पावलांची वाट बघतोय.'

'आम्ही वैकुंठवासी' हे शब्द साक्षात् जगणारे हे सत्पुरुष जगून दाखविण्यापुरते इथे येतात. एरवी 'बोलिले जे ऋषी ।'

ते साच भावे वर्तणारे बाबा अन् त्यांचे अ-पूर्व चरित्र आपणांस कसे कळणार ?

*'तेथे आवश्यक पांडवा ।*
*ऐसा ठावो जोडावा'*

आपण फक्त जाऊन बघा – माचणूरचे हृद्‌गत् साधकांस पालवीत आहे.

**प्रा. डॉ. सौ. नीला जोशीराव**
'प्रसाद' २९०, रामनगर, नागपूर - १०.





# संतधर्माचे उद्गाते - श्रीबाबामहाराज आर्वीकर (जीवनचरित्र)


डॉ. ग. वा. करंदीकर

*एम.ए.पीएच.डी. समर्थ रामदासांची अध्यात्मपर स्फुट प्रकरणे, एक विवेचक अभ्यास.*
*३३ वर्षे अध्यापन. मराठीचे प्राध्यापक, ४ पुस्तके प्रकाशित. १५ वर्षे गीता धर्म मंडळ, पुणे संस्थेचे कार्यवाह.*


***जे वर्तत दिसती देही । परी ते देही ना, माझी ठायी ।***
***आणि मी तयांची हृदयी । समग्र असे ॥***

(ज्ञाने. ९-४०९)

***'ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥***

(गीता ९.२९)

'ईश्वर सर्वत्र भरून राहिला आहे. सर्व प्राणिमात्रांमध्ये तो सारखाच व्यापून राहिला आहे. त्याच्या ठिकाणी आपपर भाव नाही. मात्र जे माझे नित्य स्मरण करतात, जे आपल्या जीवनातील अहंकार आपण होऊन नष्ट करतात, मनोभावे प्रत्येक कर्म मला अर्पण करून, त्या कर्मकुसुमांनी माझी पूजा करतात, असे माझे भक्त, जरी आपापल्या देहाने वावरत असले तरी, त्यांच्या ठिकाणी देहतादात्म्य नसतेच ! ते माझ्या ठिकाणी सर्वांगाने एकरूप झालेले असतात, आणि मी त्यांच्या अंतःकरणात विसावलेले असतो.' श्रीमद्भगवद्गीतेत 'राजविद्या, राजगुह्य' सांगताना भगवंताने अर्जुनाला जे सांगितले, त्याचे आजच्या वर्तमानकाळी प्रत्यंतर, श्रीबाबामहाराज आर्वीकर तथा मोरेश्वर जोशी, यांच्या जीवनचरित्रात दिसून येते.

उपासतापासाने देहदंड सोसून, तीव्र स्वरूपाची तपस्या करून, आत्मविद्या मिळवावी, ईश्वराचा शोध घ्यावा, सद्गुरूंची कृपा लाभावी. यासाठी श्रीमोरेश्वराने वयाच्या पंधरा वर्षानंतरची सुमारे पंधरा वर्षे जे जे केले त्यासंबंधीची माहिती त्यांच्या जवळच्या व्यक्तींनाही यथार्थपणे सांगता येत नाही. मात्र साधकदशा संपवून सिद्धस्थितीत श्रीबाबामहाराजांनी जे ज्ञान संपादन केले, त्याचे मनोज्ञ दर्शन त्यांच्या मौलिक ग्रंथरचनेत पाहावयास मिळते. ग्रीष्माचा दाह सहन करणे अशक्य होते, परंतु त्यानंतर येणाऱ्या वर्षाऋतूत मेघकृपेचा जो वरदवर्षाव होतो, त्या अमृतधारेत सुस्नात होताना अवघी वसुंधरा पुलकित होते, असेच काहीतरी श्रीबाबामहाराज आर्वीकरांच्या चरित्राचे अवलोकन करताना वाटते.

वर्धा जिल्ह्यात आर्वी हे संत सत्पुरुषांचे गाव म्हणून आजही प्रसिद्ध आहे. संत मायबाई नावाच्या एका विदेही साध्वीचा महिमा, आजही त्या गावात जाणवतो, मी एकदा काही कारणाने आर्वीला गेलो असता तेथील माझ्या परिचिताने मला मायबाईच्या मठात आवर्जून नेले होते. असे सांगतात की, साडेतीनशे वर्षांपूर्वी वर्धा जिल्ह्यातील या निर्जन अरण्यात कोणा 'तेलंगराय' नावाच्या एका सैनिक पेशाच्या सज्जनाने अरण्याचा कायापालट करून आर्वी गाव वसविले. आजही त्या गावात तेलंगरायाची समाधी आहे. महाराष्ट्राच्या इतर विभागापेक्षा विदर्भ विभागात आस्तिक्य भाव अधिक जाणवतो. तेथे राहणारी, साधी दिसणारी माणसे आपापल्या उदरनिर्वाहाचे साधन जपत, जपत साधुसज्जनांना मान देतात. श्रद्धायुक्त अंतःकरणाने त्यांच्यासमोर नम्र होतात. लहान-मोठ्या गावांत, एखादी समाधी, एखादा पीर, एखादा मठ किंवा एखादे मंदिर इतके नावारूपाला आलेले असते की, त्या नावानेच ते गाव ओळखले जाते. राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांची मोझरी, गांधीजींचे सेवाग्राम, आ. विनोबांचे पवनार, मायबाईचे आर्वी अशा तऱ्हेने त्या त्या गावांच्या नावामागे तेथे वास्तव्य करून राहिलेल्या थोर व्यक्तींच्या पुण्याईचे वलय असते.

आर्वीच्या मायबाई तशा दीर्घायुषी होत्या. पतीसह त्या पंढरीची वारी करीत असत. भिक्षा मागून, मिळालेल्या धान्याचा उपयोग करून, गोरगरिबांना त्या अन्नदान करीत. स्वतः अपरिग्रह वृत्ती स्वीकारून दीनदुबळ्यांना मदत करीत. त्यामुळे सामान्य लोकांमध्ये 'मायबाई'चा महिमा वाढला. सन १९१४ मध्ये त्या ब्रह्मलीन झाल्या. त्यांच्या निर्वाणानंतर भक्तजनांनी आर्वीला संत मायबाईचा मठ उभारला. त्या मठात भाविक जनांची नवससायासाच्या निमित्ताने वर्दळ वाढू लागली. श्रीबाबामहाराजांचे पणजोबा काशीनाथपंत जोशी हे संत मायबाईचे निष्ठावंत भक्त होते. काशीनाथपंतांना एक मुलगा होता त्याचे नाव पांडुरंग. त्यांच्या विवाहानंतर त्यांना दोन मुलगे झाले. एकाचे नाव कृष्णाजी व दुसऱ्याचे नाव प्रभाकर.

श्री. प्रभाकरपंतांनी उदरनिर्वाहासाठी शिक्षकी पेशा पत्करला होता. तथापि ते वृत्तीने धार्मिक होते. ते स्वतः दत्तभक्त होते. सतत गुरुचरित्राची पारायणे करीत असत. त्यांच्या पत्नीचे नाव अन्नपूर्णाबाई. या दाम्पत्याचे तिसरे अपत्य म्हणजे मोरेश्वर. श्रावण शु. १४, शके १८४७ दि. ३ ऑगस्ट १९२५ या दिवशी मोरेश्वराचा जन्म झाला.

लहानपणापासून आईवडिलांनी मोठ्या काळजीने मोरेश्वराचा सांभाळ केला. नवस, अंगारेधुपारे, गंडेदोरे हे बाळाच्या बाधानिवारणासाठी उपयोगी पडत असत. मायबाईच्या मठातील अंगाराही मिळे. त्या काळात श्रीनारायण महाराज माळी या सत्पुरुषाचे आर्वीत वास्तव्य होते. त्यांचा श्री. प्रभाकरपंत व चि. मोरेश्वरावर कृपालोभ होता. श्री. प्रभाकरपंत गृहस्थी असूनही विरक्त वृत्तीचे होते. तथापि त्यांचे मोरेश्वरावर विशेष प्रेम होते.

बालपणातील या धार्मिक वातावरणाचा मोरेश्वरावर एक वेगळाच संस्कार झाला असावा. घराजवळच असलेल्या मायबाईच्या मठात तो एकटाच जाऊन बसत असे. शाळेतील ग्रंथालयातील धार्मिक ग्रंथ वाचण्याची त्याला आवड होती. वयाच्या पंधराव्या वर्षीच मोरेश्वराचे प्रेमळ पितृछत्र हरपले. त्या व्याकुळ परिस्थितीत मॅट्रिकची परीक्षाही अर्धवट सोडावी लागली. वृत्तीमध्ये एक प्रकारची उदासीनता आली. संत तुकडोजी महाराजांच्या 'गुरुदेव सेवा मंडळा'चे एक वर्षभर मोरेश्वराने कार्य केले. तुकडोजी महाराजांचे काव्य बरेचसे त्यांना मुखोद्गत झाले. पण त्या

कार्यातही मन रमेना. ते आर्वीला परत आले, तरी घरी राहणे त्यांना मानवेना. ते दत्तमंदिरात राहू लागले. मूळच्या विरक्त बुद्धीने त्यांच्या मन-बुद्धीचा ताबा घेतला. आईबद्दल प्रेम वाटत असले तरी, आपल्या उदरनिर्वाहाचा भार तिच्यावर पडू नये, अशा भावनेने त्यांनी घराचा त्याग केला. जन्मजात ईश्वरशरणतेची पिंडप्रकृती असल्यामुळेच ते मंदिरात राहू लागले. ईश्वराचा शोध करावा या भावनेने उचल खाल्ली. घरी येण्याबद्दलचा आईचा आग्रह टाळण्यासाठी पंढरीची वारी करावी असे मोरेश्वराला वाटले. अकिंचन स्थितीत वारकऱ्याच्या निष्ठेने घरादाराचा त्याग करून 'स्वावलंबी - स्वाध्याय व्रत' स्वीकारून श्रीमोरेश्वराने म्हणजे बाबासाहेबांनी आर्वीचा निरोप घेतला. तो कायमचाच ! वयाच्या सोळाव्या वर्षी विठ्ठल नामाचा जयघोष करीत बाबासाहेब पंढरपूरला आले. संत ज्ञानदेव, नामदेव, संत तुकाराम यांच्या अभंगाचे संस्कार झाले होतेच. आपल्या 'आत्मकथनपर' कवितेत ते लिहितात -

*सोळा वरुषाचा । निघालो आडरानी ।*
*पंढरी वाटेनी । म्हणत विठ्ठल ॥*
*कुठेही पडावे । काहीही करावे ।*
*देई तेचि खावे । भगवंत ॥ —*

श्रीबाबासाहेबांच्या साधक दशेला सुरुवात झाली. प्रापंचिकांचा राजरस्ता सोडून ते आता 'आडरानी' निघाले. आता आपला सारा भार त्यांनी एका भगवंतावर टाकला. कुठे थांबावेसे वाटले तर तेथे थांबून थोडा विसावा घ्यावा, जेथे जे जसे मिळेल ते खावे, निदान पाणी तरी असतेच ! ते घेऊन दिवस काढावे. साऱ्या आप्तस्वकीयांचा, मित्रपरिवारांचा त्याग करून ईश्वरभेटीसाठी तळमळणारा जीव म्हणत होता -

*'ईश्वरा ! साहवेना दुजेपण*
*वेगळाले हे जीवन' —*

विठ्ठलाचे चरण हाच आता जीवनाधार असे ठरवून ते पंढरीला आले. त्यांनी श्रीविठ्ठलाचे डोळा भरून दर्शन घेतले. भक्तांच्या अभंग गायनाने चंद्रभागेचा तीर दुमदुमून जातो हे त्यांनी अनुभवले. वीणा, टाळ-मृदुंगाच्या तालावर अभंग गायनात काही दिवस गेले. पूर्वी एक वर्षभर खंजिरीच्या तालावर भजने म्हटली होतीच. काही दिवसांनी साधनेसाठी नाशिक क्षेत्राच्या ठिकाणी जावे, असे त्यांना वाटले. पूर्वी म्हणजे साडेतीनशे वर्षापूर्वी समर्थ रामदासांनी त्या क्षेत्री राहून बारा वर्षे साधना केली होती. साडेसातशे वर्षापूर्वी जवळच्या त्र्यंबकेश्वरी गहिनीनाथांनी निवृत्तिनाथांना दीक्षा दिली होती. निवृत्तिनाथांनी ज्ञानदेवांकडून गीतेवर भाष्य लिहून घेतले. ज्ञानदेवांनी भक्तीचा देवध्वज उभारला. हे सर्व श्रीबाबासाहेबांना माहीत होते. तपस्येसाठी ते गोदातटाकी नाशिकला आले. तेथे घाटावर बैरागी-गोसाव्यांचे अनेक गट श्रीबाबासाहेबांनी पाहिले. चौकसपणे प्रत्येक आखाड्यातील गोसाव्यांचे संप्रदाय समजून घेतले. सुमारे अडीच वर्षे अयाचित वृत्तीने ते नाशिकक्षेत्री राहिले. लहानपणापासून शरीरावर होणाऱ्या लहानमोठ्या आघातातून कधी औषधोपचारांनी, कधी साधुसत्पुरुषांच्या अंगाऱ्याने किंवा आशीर्वादाने ते वाचले होते. अशा दैवी चमत्कारांबद्दल भाबडेपणा बाळगू नये, आपल्याच नव्हे तर, अवतीभवतीच्या व्यक्तीला चमत्कार सदृश घटनांनी स्वास्थ्य मिळाले, असे पाहिले असले तरी ते चमत्कार नव्हेत. त्या त्या व्यक्तीच्या ईश्वर शरणतेचा तो आविष्कार असतो, असे श्रीबाबासाहेबांना वाटत असे. प्रौढपणी आपल्या जवळ असणाऱ्या साधक मित्रांनां ते म्हणाले, 'काही वेळा काही दैवी चमत्कार वाटावे अशा गोष्टी घडतात. वस्तुतः कुळाची पुण्याई, जीवाची अनंत जन्माची पुण्याई. यांचा प्रभाव पडून नैसर्गिक आघातातूनही सुरक्षितता लाभल्याचे बरेच अनुभव येतात. सत्कर्म निष्ठेमुळे जन्मोजन्मी प्राप्त झालेल्या पुण्याईची ती 'साक्ष' असते ! पूर्वकर्म संस्काराप्रमाणे काही अघटित किंवा अलौकिक प्रसंग घडून येतात. व्यक्तीव्यक्तींच्या जीवनात अशा प्रसंगाची भिन्नता किंवा विविधता आढळून येत असली तरी, त्या सर्व प्रसंगांतून घडविले जाणारे व्यक्तित्त्व मात्र त्या महाशक्तीद्वारे सांभाळले जाते !' हे त्यांचे विचार म्हणजे त्यांच्या स्वतःच्या जीवनातील भल्याबुऱ्या प्रसंगाबद्दलचे त्यांचे स्वतःचेच 'निदान' आहे. आपल्या जीवनातील प्रत्येक घटनेचे मोजमाप ईश्वरशरणगतेच्या फूटपट्टीने मोजण्याची किमया श्रीबाबासाहेबांना साधली होती. त्या अशा महाशक्तीचा शोध घेण्याचाच त्यांचा तो साधनाकाळ होता.

नाशिकच्या वास्तव्यात उत्तर भारतातील तीर्थक्षेत्रात नित्य जाणारे बैरागी-गोसावी साधक बाबासाहेबांना भेटले. त्यांना नाशिकमध्ये, स्वतःला बंदिस्त करून ठेवायचे नव्हते. 'अंतरीची ओढ' त्यांना निराळेच काही सांगत असावी. ते त्यामुळे विमनस्क होत. नाशिक सोडून उत्तर दिशेकडे जावे असे त्यांनी ठरविले. सातपुड्याच्या जंगलातून, विंध्य पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांतून ते पायी प्रवास करीत निघाले. अंगावर पुरेसे वस्त्र नाही; पोटात घासभर अन्न नाही. आपल्या त्या स्थितीचे वर्णन त्यांनी एका कवितेत केले आहे, ते म्हणतात -

*'जन्मजन्मीच्या कर्मप्रवाही*
*शिणलो हरि वाया ।*
*भ्रमण भ्रांतीची जीव वंचना*
*पुरवी ही वाया ।*
*भवाब्धीच्या अनंतधारा*
*वाविती रे मज भया ।*
*जीव राख तू पतितपावना,*
*शुद्ध करी मम काया ।*

अशी विनवणी करीत करीत ते नर्मदा नदीतून पोहून ॐकारेश्वराच्या मंदिरात पोचले. मंदिरातील शिवलिंगाची त्यांनी पूजा केली. तीर्थ घेतले. पण ईश्वरदर्शनाची तगमग थांबली नाही. ती तगमग त्या मंदिराच्या परिसरातच यती महेश्वरानंदाच्या करुणाघन कृपाप्रसादाने थांबली. देवाचा शोध घेण्यासाठी निघालेल्या या युवकाला पाहून यती महेश्वरानंदांना अपूर्वाई वाटली. त्यांनी श्रीबाबासाहेबांना उन्मनी अवस्थेप्रत नेऊन अद्वैतानुभवाचे सुख प्राप्त करून दिले. तेथेच श्रीबाबासाहेबांना स्वप्न दृष्टान्त झाला. आपल्या 'साधन-संहिता' या ओवीरूप ग्रंथात त्यांनी त्या साक्षात्कारी दृश्याचे वर्णन केले आहे. त्याचा भावानुवाद पुढीलप्रमाणे आहे -

'जीवा, जाग, देव दिसावा व नित्य व्हावा वास्तव जाग !

अनुभवाचे सातत्य चिरकाल राहावे आणि आनंदाचे भान शाश्वत व्हावे, यासाठी जीवा ऊठ, आकाराच्या दर्शनात भावाचा ऐक्यरस ओतून

---

● *श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर - ले. जिजाताई हाटे - (पृष्ठ १४), संतकृपा प्रकाशन, पुणे.*

● *तत्रैव - (पृष्ठ १५)*

देवाचे देवपण सजवले आहे. भारतीयांच्या दृष्टीने मूर्तीचा आकार म्हणजे देव नसून, देवाचा आकार मूर्ती झाली आहे. हे पारमार्थिक गौप्य स्पष्ट कर. देवच कलात्मक क्रीडेचा चैतन्य-प्रसन्न करीत आहे. चल जीवा, साधनांगाने चालू लाग.' नंतर जीव तेजाळला, निरामयी होऊन वागू लागला. यती महेश्वरानंदांनी श्रीबाबासाहेबांना असे उन्मनी अवस्थांतीत नेऊन अद्वैतानुभवाचे सुख दिले.'[३]

सद्गुरुंचा कृपांकित हात त्यांच्या मस्तकावर पडला. आणि सर्वांतरी असलेल्या निरामयतेचा विमल भाव श्रीबाबासाहेबांच्या मनी स्थिरावला.

सद्गुरूंनी हा भाव नित्य राहावा म्हणून 'मधुरा भाव' स्वीकारावा, असे त्यांना सुचविले. सद्गुरूंच्या आदेशाप्रमाणे श्रीबाबासाहेब मथुरा-वृंदावन क्षेत्राकडे निघाले. शरीरात प्राण राहावा यासाठी पडतील ते कष्ट सहन करीत ते गुरुदेवांना विनवणी करू लागले.

*'गुरुदेवा, तुजवीण मजसी कोण त्राता ?*
*शाम वाजुनी शांतवी आता !*
*वाजवी सोऽहं पावा*
*जो जगज्जीवना विसावा !!'*

वृंदावनातील आपल्या भ्रमंती काळानंतर श्रीबाबासाहेबांनी आपला 'मनोपदेश' पुस्तिकेच्या प्रस्तावनेत हे श्लोक आपण का लिहिले याचे कारण सांगताना, 'ईश्वरप्राप्तीत पूर्वसंस्कारामुळे कोठे अडथळा येत असेल तर, आपले आपणच मनाचा कानाकोपरा धुंडाळावा, म्हणून ही श्लोकरचना झाली आहे, असे लिहिले आहे. समर्थांच्या मनाचा श्लोकाचा आदर्श त्यांच्यासमोर होता. समर्थांच्या त्या काव्यशैलीप्रमाणे त्यांच्या मनोपदेशाची रचना आहे. भुजंगप्रयात हेच वृत्त आहे. उदा. त्यातील एक श्लोक असा –

*कृपा वंदना निंदना ना करावी ।*
*स्वये सर्व निंदा, स्तुती रे सहावी ।*
*न हो क्षुब्ध कोठे नको राग कोठे ।*
*पहावे समानार्थ हे सत्य मोठे ॥*

श्रीबाबामहाराजांनी वृंदावनात गीतेचा अभ्यास केला. श्रीमद् भागवत श्रवण केले. ईश्वरदर्शनाची उत्कट ओढ होतीच. यमुना तीरावर विहार करणाऱ्या कान्होबाने या भक्ताला एक गुपित सांगितले. त्यांचा आत्मरूप भाव ईश्वरी भावाशी एकरूप झाला. 'प्रभूचे तेजोमय दर्शन झाले तर, भक्त विरघळून जातो; पण देवाला भक्ताचे विरघळणे नको असते. भक्ताबरोबर आनंद-क्रीडा करण्यासाठी ते निर्गुणत्व, निराकारत्व गुणमयी बनते ! गोकुळ वृंदावनातील गोपगोपिकांच्या रासक्रीडेचा हा अर्थ त्यांना उमगला. वृंदावनातील भक्तांनी श्रीबाबामहाराजांचा 'महंत' म्हणून गौरव केला. त्यांना तेथील कलात्मक क्रीडेची चैतन्य प्रसवता ओळखता आली पण श्रीबाबामहाराजांना तर क्रीडनात रमायचे नव्हते ! त्यांनी वृंदावनाचा निरोप घेतला.

आता नगाधिराज हिमालयाचे दर्शन घ्यायचे होते. पुराणकालापासूनचे गौरीहराचे ते वसतिस्थान. भारतीय संस्कृतीतील शिवत्वाचे ज्ञान मिळविण्यासाठी हृषिकेश हरिद्वारमार्गे हिमालयात पदभ्रमण करावे, असे श्रीबाबामहाराजांना ठरविले. काही दिवस हरिद्वार येथे त्यांचे वास्तव्य झाले. कैलासीच्या नागर जमातीशी त्यांचा परिचय झाला. त्यांच्याकडून त्यांना तंत्रविद्या आत्मसात करता आली.

इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून, मेकॉले सूत्राप्रमाणे भारतात विद्यादान केले जात होते. त्यातून गुलामगिरीचे भरणपोषण होत असे. एखादाच 'वाघिणीचे दूध' पिऊन स्वातंत्र्याचा हुंकार काढी ! पुरातन ब्रह्मविद्या तर लुप्तप्राय झाली होती. हिमालयासारख्या गिरिकंदरी राहणाऱ्या तपस्व्यांच्या आश्रमात सेवावृत्तीने राहून ती विद्या मिळणे शक्य होते. सत्पुरुषांची सेवा सतत अभ्यास, मनन-चिंतन, योगसाधना आणि चौकस निरीक्षण ही ज्ञानग्रहणाची साधने त्यांना माहीत झाली होती. तेथील अनेक आश्रमांतील उपासना पद्धतीचे त्यांनी अवलोकन केले. गुरुमुखातून तंत्र-मंत्र आत्मसात केले. ती चालती बोलती विद्यापीठेच होती.

*(१) 'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।*
*उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनः तत्त्वदर्शिना ॥'*

(गीता ४.३४)

*(२) 'श्रद्धावान लभते ज्ञानम् ।'*

(गीता ४.३९)

*(३) 'ज्ञानम् लब्ध्वा परां शांतिम् आचिरेण अधिगच्छति ।*

(गीता. ४.३९)

त्या ज्ञानप्राप्तीमुळे श्रेष्ठ अशी 'शांती' (मोक्षत्व) लाभते. गीतेतून भगवंताने केलेल्या या मार्गदर्शनाप्रमाणे वागून श्रीबाबामहाराजांनी ज्ञानसंपन्नता प्राप्त करून घेतली. आर्वी सोडल्यापासून भ्रमंती हाच जीवनक्रम बनला होता.' 'ईश्वराराधना' हा त्यांच्या जीवनाचा एकमेव ध्यास होता. विज्ञानाने बाह्य सृष्टीचे आकलन करून घेता येईल, तर आत्मज्ञानाने विश्वनिर्माण शक्तीची उपासना साधेल. शाश्वत सत्याचा शोध करता येईल. त्या खऱ्या शोधाने, जीवनात अंतर्बाह्य बदल होऊन निजानंदाची प्राप्ती होईल. 'ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽ शुभात् ।' (गीता ९.१).'कोणाचाही मत्सर न करता, आत्मज्ञान आणि प्रपंचविज्ञान यांसह सर्व जाणून घेतले की, कर्मबंधातील सर्व अशुभापासून मुक्तता होते, मोक्षप्राप्ती होते.' हे भगवंतांनी अर्जुनाला जे 'राजगुह्य' सांगितले होते, तेच श्रीबाबामहाराजांनी 'भ्रमंती-व्रताने' प्राप्त करून घेतले ! या भ्रमंतीतपाने त्यांना निर्भयता, निग्रह, अहिंसा, स्वाध्याय, ऋजुता, अक्रोध, सौजन्य, दया, क्षमा, धैर्य, नम्रता अशी गीताप्रणीत गुणमयी दैवीसंपदा प्राप्त झाली. आर्वीच्या विमनस्क मोरेश्वर जोशीचे रूपांतर प्रभुभक्तीमुळे दैवी संपन्नतेच्या श्रीबाबामहाराजांमध्ये झाले !

हिमालयीन आश्रमातील अध्ययन संपल्यानंतर श्रीबाबामहाराजांनी नेपाळचा पशुपती, कलकत्त्यातील दक्षिणेश्वर, ओरिसातील जगन्नाथपुरी आदी तीर्थक्षेत्रांना भेटी दिल्या. मनसोक्त भ्रमन्तीनंतर पुनश्च महाराष्ट्रात ते आले. उत्तरेतील प्रवासात नाथसंप्रदायाचा जो त्यांच्यावर प्रभाव पडला होता त्यानुसार ते नगर जिल्ह्यातील मढी येथील कानिफनाथांच्या मंदिरात आले. त्या मुक्कामातच त्यांच्या 'माचणूर' या कर्मभूमीकडे जाण्याच्या त्यांना आदेश मिळाला. त्यापूर्वी एक वर्षभर ते आर्वीला राहिले होते.

मंगळवेढा गावाजवळ माचणूर हे लहान गाव आहे. तेथील भीमानदीला चंद्रभागेसारखे चतुर्थीच्या चंद्राकृती वळण आहे. नदीत डोह आहे. तेथे मोठे मोठे मासे आहेत. माचणूर हे 'मत्स्यन्न ऊर' म्हणजे माशांचे गाव अशी

---

*• श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर - लेखिका जिजाताई हाटे (पृष्ठ १७), संतकृपा प्रकाशन, पुणे.*

कोणी व्युत्पत्ती सांगतात. मत्स्येंद्रनाथांशी किंवा मच्छावताराशीही कोणाला अन्वय लावता येईल. तेथे श्रीसिद्धेश्वराचे प्राचीन मंदिर आहे. 'नाथांचे ठाणे' अशा नावाने माचणूर ओळखले जाते. श्रीकाशीनाथ महाराज, श्रीसिद्धराम अशा सिद्ध पुरुषांची ती तपोभूमी आहे. माचणूरला येण्यापूर्वी गाणगापूर, अक्कलकोट येथे काही दिवस श्रीबाबामहाराजांनी मुक्काम केला होता. सन १९५५ मध्ये व्रतस्थपणे त्यांनी माचणूरला पहिला चातुर्मास केला. अनेकांना त्यांनी 'तुलसी रामायण', ज्ञानेश्वरी अशा ग्रंथांधारे भक्तिमार्गावर मार्गदर्शन केले. त्यांनी अनेक अभंग, आरत्या लिहिल्या. आळंदीक्षेत्रासह चातुर्मासात श्रीज्ञानदेवांच्या समाधीच्या सान्निध्यात त्यांच्या काव्यशक्तीला बहर आला. आळंदी येथेच वयाच्या एकतिसाव्या वर्षी त्यांनी 'साधन-संहिता' हा ओवीबद्ध ग्रंथ लिहिला. त्यात भक्तीबरोबरच योगप्रक्रियेचे तपशीलवार वर्णन आहे. ते सर्व आपल्या अनुभवाप्रमाणे त्यांनी लिहिले आहे.

*'आम्ही कथूं जे जे । ते अनुभवाचे काजे ।*
*सत विश्वास पाहिजे । बोध व्हाया ॥*
*आमुचिये प्रमाणास । अनुभव हाचि व्यास ।*
*नेईल साधना सिद्धिस । निश्चयाने ॥'*

'भक्ती, प्रेम हा मूलभूत पाया असून सद्‌गुरूंना अनन्यभावे शरण गेल्यावर, त्यांच्या कृपेने आत्मानुभूतीच्या पायऱ्या सहजतेने चढता येतात. हीच 'सहज साधना' होय. सारे जीवनच परमेश्वराशी 'समरस' करून कर्म करावे. इंद्रिय विकारांचे दमन करावे, मन, बुद्धी आणि वृत्ती या सर्व ईश्वराभिमुख ठेवण्याचा अभ्यास करावा.' असा त्या ग्रंथातून बोध घेता येतो. या ग्रंथाचे दोन सर्ग असून त्यात १४६१ ओव्या आहेत.

माचणूरच्या श्रीसिद्धेश्वराच्या साक्षीने श्रीबाबामहाराजांनी तेथे पवित्र स्थान निर्माण केले. चातुर्मासातील रसाळ प्रवचनामुळे अनेक श्रोत्यांमार्फत या तरुण साधूबद्दल लोकांमध्ये आकर्षण निर्माण झाले. सोलापूर, कोल्हापूर, पुणे, मुंबई, बडोदे अशा शहरांतही त्यांची प्रवचने होऊ लागली. ज्ञानेश्वरी-पारायणे, विविध ठिकाणचे चातुर्मास अशा निमित्ताने त्यांच्या प्रगल्भतेचा अनेकांना प्रत्यय आला.

'साधनसंहिते'नंतर पुढील दहा वर्षात श्रीज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानाचे स्वानुभवातून जाणवलेले रहस्य उलगडून दाखविण्यासाठी 'दिव्यामृतधारा' हा त्रिखंडात्मक ग्रंथराज त्यांनी लिहून काढला. ज्ञानेश्वरीच्या १२ व्या अध्यायातील 'नमन' आणि 'भक्तिमार्ग' या दोन विषयांवर असलेल्या प्रत्येक ओवीतील प्रत्येक शब्दांवरील त्यांचे अनुभवसिद्ध चिंतन आपणाला वाचायला मिळते. दिव्यामृतधारेच्या प्रसिद्ध झालेल्या पहिल्या खंडात बडोद्याच्या डॉ. अनंत गणेश जावडेकर यांनी श्रीबाबामहाराजांसंबंधी एक गौरवपर परिचय लेख लिहिला आहे. त्यात ते म्हणतात, 'लौकिक अर्थाने ते अल्पशिक्षित, पण वेदवाङ्मयापासून विसाव्या शतकापर्यंतच्या तात्त्विक साहित्याचा आणि पाश्चात्त्य तात्त्विक विचारसरणीचा उल्लेख त्यांच्या या ग्रंथात पानोपानी मिळतो. विश्वविद्यालयात, अध्ययन, अध्यापन, संशोधन करण्यात त्यांचे जीवन गेले अशा प्राध्यापकांनाही स्तिमित करणारी विद्वत्ता या हजारो पृष्ठांच्या जाडजूड ग्रंथात आढळून येते. वाचक धीराचा आणि चिकाटीचा असेल तरच त्याला तत्त्वज्ञानातील गूढ प्रमेयांचा उलगडा होईल... हा ग्रंथ केवळ पांडित्यपूर्ण बुद्धीचा प्रकर्ष नाही, तर श्रीज्ञानेश्वरांच्या हृदयातील भावोत्कर्ष, तशाच हृदयंगम भक्तिसौंदर्याने टिपून, लेखकाने आपल्या हाती दिलेला भरघोस प्रसाद आहे.' [१] स्व. डॉ. ज. वा. जोशी यांनी एका लेखात 'श्रीबाबांनी दिव्यामृतधारा या ग्रंथात भारतीय साक्षात्कार दर्शनातील सर्व विचारप्रवाहांची, मूलग्राही दृष्टीने अभ्यासपूर्वक समीक्षा मांडली आहे. वेदकाळापासून विकसित झालेली योगयुक्त भक्तिसाधनेची श्रीज्ञानदेवांची साधनादृष्टी स्पष्ट केली आहे.' [२] श्रीबाबामहाराजांच्या महत्त्वाच्या अशा या ग्रंथाचे लेखन सन १९६३ च्या चातुर्मासात सुरू झाले. १९६६मध्ये पहिल्या खंडाचे प्रकाशन झाले. दुसऱ्या खंडाचे हस्तलिखित १९६३ मध्ये पूर्ण झाले होते. दुसऱ्या व तिसऱ्या खंडाला संदर्भ, टीपा वगैरे देऊन तो सिद्ध झाला. श्रीबाबांच्या निर्वाणानंतर डिसेंबर १९७२ मध्ये दोन्ही खंड एकत्रित प्रसिद्ध करण्यात आले. या ग्रंथामुळे संतवाङ्मयाच्या अभ्यासाला एक नवी दृष्टी प्राप्त झाली आहे. एक व्यापक बैठक मिळाली आहे.

सन १९५५ पासून विविध ठिकाणी 'साधना सप्ताह' संपन्न होत असत. प्रत्येक ठिकाणी श्रीबाबामहाराजांची 'ज्ञानेश्वरी', 'रामचरितमानस' अशा ग्रंथांवर प्रगल्भ प्रवचने होत असत. सप्ताहातील कार्यक्रम शिस्तशीर एखाद्या शिबिरासारखे होत असत. त्यांतूनच नवे नवे प्रकल्प सुरू झाले. माचणूरला निर्माण झालेल्या मठाला प्रथम 'आनंदमठ' असे नाव होते. पुढे 'मोक्षधाम' आश्रम असे नामाभिधान करण्यात आले. आश्रमाचा आर्थिक व्यवहार अत्यंत काटेकोरपणे पाहिला जाई. भगवंताच्या दयेचा जयघोष व्हावा, जीवन् जीव खडबडून जागवावा, अशा प्रबळ भावनेने आश्रमाची वाटचाल सुरू होती. माचणूरच्या आश्रमात मुंबईहून काही भक्त साधनेसाठी येत. श्रीबाबामहाराजही मुंबईला त्यांच्याकडे जात असत. त्यांच्याबरोबर १९६३-६५ च्या दरम्यान त्यांनी उत्तर भारतातील तीर्थक्षेत्रेही पुन्हा पाहिली. पण या यात्रा महिना-दीड महिन्याच्या असत.

साधना सप्ताहाच्या निमित्तातून जे धर्मजागरण झाले होते, ह्याला संस्थात्मक अधिष्ठान देण्यासाठी 'संतधर्म प्रसारक मंडळ' सन १९६२ मध्ये स्थापन करण्यात आले. 'मोक्षधाम प्रकाशन मंडळ'ही सुरू झाले. श्रीबाबांनी आपल्या धर्मपर विचाराचा प्रचार करण्यासाठी दि. १५ ऑगस्ट १९६८ ला 'सांगाती' हे त्रैमासिक सुरू केले. ते १९७३ पर्यंत नियमित निघत असे. त्यानंतर सांगातीचे वार्षिक विशेषांक निघू लागले. श्रीबाबामहाराजांनी आपल्या शिष्यांपैकी निकटवर्तीयांना पत्रे लिहून काही विषय समजावून दिले. त्या पत्रांच्या साहाय्याने 'माचणूरचे मनोगत' आणि 'देवाचिये द्वारी' हे दोन ग्रंथ प्रसिद्ध झाले. 'नवविधा भक्तियोग' हा अप्रकाशित ग्रंथ नुकताच प्रसिद्ध झाला आहे. भागवतातील नऊ प्रकारच्या भक्तीपैकी वंदन भक्तीऐवजी त्यांनी पूजनभक्ती असे नामाभिधान दिलेला एक प्रकार आहे. हा ओवीबद्ध ग्रंथ असून प्रत्येक प्रकाराचेही स्पष्टीकरण त्यांच्या स्वतंत्र प्रज्ञा शक्तीने व्यक्त झालेले आहे. स्मरण भक्तीच्या ओव्यांचे हस्तलिखित प्रवासात गहाळ झाले आहे, पण त्याची प्रस्तावना मार्मिक आहे.

ही साहित्य निर्मिती निमित्ताने झालेली असली तरी त्यात एक श्रद्धाळू ध्येयवाद आहे. 'संत धर्मः जीवन दर्शन' या त्यांच्या ग्रंथात शब्दांतून

---

*(१) दिव्यामृतधारा - प्रथम खंड (मोरेश्वर), तृतीया आवृत्ती १९९८ (पृष्ठ ३१), के. मि. ढवळे प्रकाशन, मुंबई.*

*(२) सांगाती (पुण्यस्मृती विशेषांक) डिसें. १९९८, (पृष्ठ ६५), संपादक - शरद भगत*

... झालेले 'संत माहात्म्य' विशेष महत्त्वाचे आहे. 'परमेश्वराने निर्माण ... सृष्टीत परमेश्वराचे प्राकट्य कसे पाहायचे ते संत शिकवितात. ... त्यांचा धर्मविचार आहे... व्यक्तिगत साधना विश्व जीवनातून झाली पाहिजे, असा संतांचा सांगावा आहे. एकट्याचा मोक्ष त्यांना अभिप्रेत नाही. व्यक्तिगत उद्धार आणि जगदुद्धार या क्रिया एकाच वेळी घडल्या पाहिजेत. ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम यांनी स्वच्छ सांगितले आहे की, विश्व वैकुंठाला न्यायचे नसून वैकुंठच या भूतलावर आणायचे आहे. 'वैकुंठीचा देव आणू या भूतळा ।' अशी त्यांची प्रतिज्ञा आहे.[१] हाच उद्देश मनी बाळगून श्रीबाबामहाराजांनी माचणूरचा आश्रम उभारला. त्यांची 'चतुर्विधा क्षेत्रशुद्धी' ही व्यापक भूमिका 'माचणूरचे हृद्‌गत' या ग्रंथात स्पष्ट झाली आहे. 'मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार ही मानवांतर्गत ईश्वरदत्त शक्तिकेंद्रे आहेत. मन हे भावनाक्षेत्र, बुद्धी हे विद्याक्षेत्र, चित्त हे विहारक्षेत्र आणि अहंकार हे कर्तृत्व क्षेत्र आहे. सार्वजनिक जीवनात मनाचे स्थान मंदिर किंवा तीर्थक्षेत्र, बुद्धीचे स्थान म्हणजे विद्यापीठ. शाळा शिक्षणक्षेत्र, चित्ताचे स्थान म्हणजे कुटुंब आणि अहंकाराचे क्षेत्र म्हणजे ग्राम. म्हणून चित्त चतुष्टय शुद्धीप्रमाणे मंदिर, शाळा, कुटुंब आणि ग्राम यांचीही शुद्धी करावी लागेल.'[२]

*(१) संतधर्म : जीवन दर्शन - श्रीबाबामहाराज आर्वीकर (पृष्ठ २६)*

*(२) माचणूरचे हृद्‌गत - श्रीबाबामहाराज आर्वीकर (पृष्ठ ५७)*

एकाच वेळी व्यक्ती आणि जगत यांच्या सर्वांगीण विचार करणारा हा अभ्यासू, द्रष्टा कवी आणि कार्यकर्ता कॅन्सरसारख्या असाध्य व्याधीने दि. २ डिसें. १९७१ माचणूर येथेच अनंतात विलीन झाला. विसाव्या शतकातील या सिद्धसंताचा परिचय करून देताना ते स्वतः संतचरित्राकडे कोणत्या आदर्श दृष्टीने पाहात होते, ते त्यांच्याच शब्दांतून व्यक्त करता येईल. श्रीबाबामहाराज म्हणतात, 'संतांच्या जीवन चरित्रातून, सर्वसामान्य जीवाला काही बोध प्राप्त झाला पाहिजे. जीवांचा आयुपथ उत्कर्षाकडे जाणारा असला पाहिजे. संतपदाची प्राप्ती त्यांना ज्या वाटचालीने गवसली, ती वाटचाल म्हणजेच त्यांचा अंतर्बाह्य विहार उमगला पाहिजे. तेच संतचरित्र होय... साधनापथ समजून घेणे व त्याप्रमाणे आचरण करणे, हे संतचरित्र जाणून घेतल्याचे मर्म आहे.'

– श्रीबाबा ! त्याच श्रद्धादृष्टीने आम्ही तुम्हाला समजून घेत आहोत. इत्यलम् !

**डॉ. ग. वा. करंदीकर**

**आधार**


*१) दिव्यामृतधारा प्रथम खंड*

*२) सांगाती - पुण्यस्मृति विशेषांक १९९६*

*३) श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर (चरित्र) - जिजाताई हाटे*

*४) श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर दिव्य जीवन दर्शन - वि. श्री. फणसळकर*

*५) नवविधा भक्तियोग*

*६) देवाचिये दारी*





## ओवाळू आरती...

ओवाळू आरती भावे गुरुराया ।
काया वाणी मन ठेवोनि पाया ।।धृ.।।

निर्गुणाचा कैसा झालासी सगुण ।
देहा देही अवघा तूंचि आत्माराम ।।
पंचवीस ग्रामी स्वामींची खूण ।
पांचामागे उरला स्वये आपण ।।१।।

यश अंबरी कोंदिला भाव ।
त्यामाजी बैसला माझा गुरुराव ।।
साधोनि झाला जो अवघा वसुदेव ।
वैराग्यासी दिधला आपुला ठाव ।।२।।

औटकारी चाले सोऽहं हुंकारा ।
राही नवमद्वारी तारी भवधारा ।।
एके स्थानी राहे गुप्तीचा मारा ।
सांभाळी तो जीवा प्रेमे आसरा ।।३।।

**– श्रीसंत बाबामहाराज**

# ज्ञानसूर्याचा अरुणोदय



**श्री. नंदकुमार प्रभुणे**

*एच.ए.लि. पिंपरी येथे ३५ वर्षे अकौंटस् मध्ये नोकरी. सध्या निवृत्त. ललितकथा आवडता प्रांत. किर्लोस्कर, प्रपंच, [illegible] मासिकातून कथा प्रसिद्ध. 'आसीत' कथासंग्रह कै. श्री. [illegible] पुब्लिकेशन्स यांचे शुभहस्ते प्रकाशित. डॉ. वि. रा. [illegible] व कै. डॉ. प. वि. कुलकर्णी यांच्यामुळे अध्यात्म ग्रंथ वाचनाची गोडी.*

भगवद्भक्ति ज्या कुळात सुखनैव नांदत असते त्या कुळात भगवंताचा अवतार होत असतो. ईश्वराला जन्म घेण्यास ते पवित्र कुल असावे लागते. विदर्भातील 'आर्वी' या गावी श्री. प्रभाकरपंत जोशी व त्यांच्या पत्नी सौ. वेणूबाई यांच्या पोटी श्रावण शुद्ध चतुर्दशी, शके १८४७ म्हणजे इ. स. १९२५ या दिवशी आपल्या पू. बाबा महाराजांचा जन्म झाला. त्या वेळी त्यांचे नामकरण 'मोरेश्वर' असे ठेवले होते. नर्मदा काठी वामन भट नावाचे संन्याशी होते. त्यांची कृपा आर्वीकर घराण्यातील मोरेश्वरांचे पणजोबा पू. काशिनाथ पंत यांचेवर झाली. वयाच्या साठाव्या वर्षी त्यांना पुत्रप्राप्ती झाली. त्यांचे नाव पांडुरंग. हे आपल्या पू. बाबांचे आजोबा.

लहानपणापासून मोरेश्वरांची वृत्ती अंतर्मुख होती. एकांत त्यांना प्रिय होता. घरी वडील अवधूतगीता, रामायण हे धर्मग्रंथ वाचीत. तेही कानांवर पडायचे. त्यामुळेच भगवंताच्या प्रेमाचे बीज अंतःकरणात रुजले. त्यांना संत तुकडोजी महाराजांच्या दर्शनाचा योग आला.

## तीर्थक्षेत्रांना भेटी

एक दिवस कुणाला न सांगता पू. मोरेश्वर हे घरातून निघाले ते थेट पंढरपूरला विठ्ठलाच्या दर्शनाला आले. तेथे त्यांना नाशिक क्षेत्री जाण्याचा कौल मिळाला. भगवंताची प्रेरणा समजून ते नाशिकला आले. तेथे योगीराज सीताराम दास महाराज, दादा धुनीवाले यांचेकडून मार्गदर्शन मिळाले. नाशिकहून नर्मदेकाठी ओंकारेश्वरी आले. तेथे यति महेश्वरानंदांचे दर्शन घडले. त्यांनीच पू. बाबांना आत्मस्वरूपाचा बोध दिला.

हरिद्वार, ऋषिकेश या ठिकाणी ते गेले. ही यात्रा करीत असताना ते भोवतालची परिस्थिती न्याहाळत होते. धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक याचे अवलोकन सुरूच होते. एकदा 'दासबोध' ग्रंथ हाती आला आणि त्यांना सज्जनगडावर जाऊन समर्थांच्या समाधीचे दर्शन घेण्याची उर्मी निर्माण झाली. पुढे तर 'दासनवमी'ला ते गडावर असत. सातारा येथे प्रज्ञानंद स्वामींनी मराठीत अनुवाद केलेला 'रामचरित मानस' ग्रंथ घेतला. रामनवमी पासून पारायण सुरू केले. घरी चोरी झाली तरी ते विचलीत झाले नाहीत. चोरीस गेलेल्या वस्तू परत मिळाल्या. येथे धर्मग्रंथाचे सामर्थ्य त्यांना प्रचितीस आले. याच वेळी सज्जनगडावर श्रीमती जिजाबाईची भेट झाली. जिजींच्या मनात बाळकृष्णाचे रूप होते ते बाळकृष्णच श्रीबाबांच्या रूपाने भेटले याची खात्री झाली नि त्या 'माचणूर' येथे आल्या. पू. बाबांनी मजकूर सांगावा आणि पू. जिजीने तो लिहून घ्यावा अशी 'सच्चिदानंद' बाबांची भूमिका त्यांच्या वाट्याला आली. अधून मधून पू. बाबांचे आळंदीस जाणे-येणे होई. पू. बाबांचे सांगणे असे की, 'निर्विकार मन व अंतर्बाह्य शुचिता सर्व जीवनाचे सुखदायक महाबीज होय. परमार्थातला सर्वात मोठा टप्पा समर्पण भावाचा !'

## मोक्षधामचा मठ

इ. स. १९५४ साली पू. बाबा महाराज 'माचणूर'ला आले तेव्हा हा भाग काट्याकुट्यांनी भरलेला होता. भयग्रस्त वातावरणामुळे पुजारीसुद्धा सिद्धेश्वराची व काशिनाथ महाराजांच्या समाधीची पूजा उरकून लवकर जाई. कानिफनाथांच्या आदेशाने ते अक्कलकोट येथे आले आणि श्री स्वामींच्या आशिर्वादाने 'माचणूर' ला आले. उजाड माळरानावर नंदनवन उभे राहिले. मुलांसाठी शाळा सुरू झाल्या. दत्तजयंती सोहळाही साजरा होतो. माचणूरच्या पवित्र स्थानाविषयी ते काव्यात सांगतात –

*'बांधून ठेविला मी । अति दिव्य तो महाल ।*
*नांदा सुखें स्वभावें । करण्यात देह भोल'*

माचणूरला ते साधक शिबीर घेत. त्यांत कार्यकर्त्यांना मार्गदर्शन असे. राजकीय, धार्मिक व सामाजिक संघटन करण्याचा माझा विचार नसून शुद्ध साधुत्व बाहेर आणावे त्याचे प्रतिक उभारावे असा मानस आहे. माचणूरला मठ बांधून त्याचे 'मोक्षधाम' असे नामकरण केले. पाया मजबूत असेल तर साधना उत्तम होते असे सांगत. पू. बाबांचे स्फुट लेखन खूप आहे. परंतु त्यांनी ज्ञानेश्वरी ग्रंथातील बाराव्या अध्यायावर लिहिलेला 'दिव्यामृत धारा' त्रिखंडात्मक ग्रंथ प्रतिपद भाष्य करणारा एकमेव ग्रंथ आहे. १९६६ साली हा ग्रंथ मुंबईत प्रकाशित झाला. त्यानंतर माचणूर येथे दत्तजयंती दिवशी जन्मोत्सव साजरा झाला आणि दुसरे दिवशी मार्गशीर्ष शु. पौर्णिमा शके १८९३ (इ. स. १९७१) रोजी सकाळी पू. बाबा अनंतात विलीन झाले. अवतार कार्याची समाप्ती झाली.

'माचणूरचे हृदगत्' हा प्रवचनांचा संग्रह प्रसिद्ध झालेला आहे. 'सज्जनता निर्माण करणे साधुता निर्माण करणे हेच एकमेव मंगल कार्य आहे.' हे कार्य माचणूरहून घडावे अशी पू. बाबांची इच्छा होती. 'असंगाच्या संगामुळे मृत्यू येतो आणि आपल्याला खाऊन टाकतो. म्हणून सावध रहा. अमर व्हा. परमार्थ हा अमरत्वाकडे जाणारा मार्ग आहे.' अशा अनेक सुंदर भावना पू. बाबांनी प्रवचनात व्यक्त केल्या आहेत.

पू. बाबा महाराजांच्या चरणी, तीर्थस्वरूप जिजाताईना वंदन करून त्यांनीच ही लेखन सेवा करवून घेतली. ही त्यांचीच कृपा आणि कै. डॉ. व. दि. कुलकर्णींनी 'माचणूर'च्या मार्गाकडे अंगुलिनिर्देश केला तेव्हा ते स्मरणही उचित ठरेल. 'अशा दिव्य संतांसी माझा प्रणाम.'

संदर्भ ग्रंथ : १. स्मृति सौरभ श्रीमती जिजाताई हाटे
२. माचणूरचे हृद्गत् - संकलन श्री. शरद भगत
३. अमृत तुषार - दिव्यामृत धारा - सारसंक्षेप - श्रीमती जिजाबाई हाटे

**श्री. नंदकुमार प्रभुणे**
इ/६०२, शेफालिका हाईटस्, बलवंत पूरम्, शिवतीर्थ नगर, पौड रस्ता, पुणे ४११०३८.



# संतधर्माचा महायात्रिक : संत बाबा महाराज


**श्री. शरद भगत**

*काही काळ बँकेत नोकरी. एकता मासिकाचे माजी संपादक. सांगाती नियतकालिकाचे संपादक. श्रीबाबामहाराजांचे अप्रकाशित वाङ्मय प्रकाशित करण्यात सिंहाचा वाटा*


संतधर्माची मंगल ध्वजा खांद्यावर घेऊन आनंदाच्या महामेरूकडे निघालेल्या एका अनोख्या, जगावेगळ्या पथिकाची ही काही पदचिन्हे ! आनंदाच्या महासागरात समर्पित होण्यासाठी कडेकपारीतून धो धो वाहात जाणाऱ्या एका स्वानंद-सरितेच्या या काही लहरी आहेत ! विश्वगोल उजळून काढणाऱ्या तेजोमय भास्कराच्या या काही किरणशलाका होत ! असंख्य तारकांनी चमकणाऱ्या नभः प्रांगणातील काही प्रकाशमान ताऱ्यांचेच हे दर्शन आहे. अमृताच्या सागरातील फक्त एक अंजुळी ! ! पण ही अंजुळी म्हणजे श्रीज्ञानदेव म्हणतात त्याप्रमाणे -

*'अमृताच्या सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी ।*
*तेचि वे अमृतलहरी । चुळीं घेतलिया ॥* ज्ञा. १२/२६

अशा स्वरूपाची अंजुळी आहे.

आपण सारेच खरं म्हणजे आनंदयात्री आहोत ! 'सत्यं शिवं सुंदरम्' ची पूजा बांधायला निघालेले, त्यासाठी त्याचा शोध आणि बोध घेऊन आपापल्या सामर्थ्यानिशी मार्गस्थ झालेले आपण सारे आनंदयात्रीच आहोत, नाही कां ? पण या मेळाव्यातील एखादा महायात्रिक सर्वांच्या बराच पुढे चालून जातो, त्याला तेथून त्याहीपुढची वाट दिसते, म्हणून तो मागीलांसाठी एक दीपस्तंभ ठरतो ! श्रीसंत बाबा महाराज आर्वीकर हे अशाच एका प्रज्वलंत दीपस्तंभाचे या जगातील नाव होय.

संत ही एक उज्ज्वल संस्कृती व दिव्य परंपरा आहे. मानवी जीवनाचे परिपूर्ण विकसित व महन्मंगल असे स्वरूप म्हणजे संत ! विश्वजीवनाची समतोल अवस्था नित्य सांभाळली जावी व मानवमात्रांना दिव्य जीवनाचे पथप्रदर्शन प्रत्येक कालखंडात होत रहावे, यासाठीच विश्वपृष्ठावर संत परंपरा प्राचीन काळापासून निर्माण झाली. भारत वर्षात तर या संतपरंपरेने असे एक मंगल संस्कृतिशिल्प निर्माण केले की ते विश्वजननीचे अनुपम भूषण होय. मानवसंघाचे देवसंघात रूपांतर करणारी भारतीय संस्कृतीची अमर शिल्पकला रेखांकित करणाऱ्या यच्चयावत् संतांचा एकच धर्म आहे. तोच संतधर्म, ईशधर्म वा आत्मधर्म होय.

## विदर्भाची पावनभूमी

विदर्भाच्या पावनभूमीने अति प्राचीन काळापासून भारताचे भाग्य घडविणाऱ्या अनेक दिव्य जीवांना जन्म दिला आहे. ब्रह्मविद्येच्या उपासकांची मंगलमालिका अति प्राचीन काळापासून वर्धा-पूर्णेच्या अखंड धारेतून सतत ओघळत राहिली आहे.

वर्धेच्या - वसिष्ठेच्या पावन परिसरात संतभूमी आर्वी, ज्या भूमीचे वर्णन वं. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांनी असे केले आहे की,

*'संतांचे आगर वर्धा तीरावर ।*
*आर्वी हे माहेर असे त्यांचे ॥'*

अशा संतभूमी आर्वीत श्रावण शुद्ध चतुर्दशी शके १८४७ म्हणजे दि. ३ ऑगस्ट १९२५ या शुभदिनी, एका पुण्यात्म्याने देहाची खोळ धारण केली आणि **मोरेश्वर प्रभाकर जोशी** या अभिधानाने लौकिक जगात प्रवेश केला. संतवर बाबा महाराज यांचे पहिले पाऊल विश्व पृष्ठावर उमटले. पण धारणा निश्चित होती की,

*'आम्ही कर्मी आलो । स्वरूप सोडोन ।*
*जावे पालटोन । जेथील तेथे ॥'*

## तपस्वी पूर्वज

पिताश्री प्रभाकर पंत व आई अन्नपूर्णाबाई यांच्या पोटी जन्मलेल्या मोरेश्वराला एक तपोनिष्ठ कुलपरंपरा लाभली होती. या कुळाचे मुळ पुरुष **श्री. वामनदेव ब्रह्मचारी** हे श्रीक्षेत्र ओंकारेश्वर (बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक) येथे तपस्या करीत रहात असत. ओंकारेश्वराचे हे नर्मदातीर म्हणजे, 'रेवातीरे तपः कुर्यात् मरणं जान्हवीतटे ।' असे तपस्येचे महातीर्थच होय. अशा ह्या नर्मदातीरावर वास्तव्य करीत असलेल्या वामनदेवांचा काळ सुमारे तीनशे वर्षांपूर्वीचा ! प्रसिद्ध **नाथसंप्रदायी महासाधू मीननाथ यांचे वामनदेव हे शिष्य होते.**

तपस्या सिद्ध झाल्यावर परिभ्रमणासाठी जेव्हा ते बाहेर पडले तेव्हा प्रथम मध्यप्रदेशातील बडवाह या गांवी ते आले. तेथून फिरत फिरत बदनूर गांवी आल्यावर त्यांनी एका बालाला आपला मानसपुत्र मानून शिष्य केले. ईश्वरी प्रेरणेने व एका अपूर्व योगाने अकस्मात लाभलेला असा शिष्य म्हणजे सद्गुरुनाथांचा मानसपुत्रच होय. आपली प्राचीन गुरु-शिष्य परंपरा याला साक्ष आहे. या मानसपुत्रामुळे 'सिंग' घराण्याशी वामनदेवांचा संबंध आला व ते 'सिंग' घराण्याचे श्रद्धेय बनले. या 'सिंग' घराण्याचे वाडवडील नागपूरच्या भोसले राजघराण्यात नोकरीस होते. सिंग घराण्याचा प्रांजळपणा व खानदानी स्वभाव पाहून भोसले राजघराण्याने त्यांना मोठी इनामदारी बहाल केली व श्रद्धेय वामनदेवांचाही इनाम अर्पण करून गौरव केला. सिंग घराण्याबरोबर पुढे वामन नागपूरकडे आले व जवळच असलेली रामक्षेत्राची पावन भूमी रामटेक ही वामनदेवांची तपोभूमी बनली. तेथील 'चोर बावडी' नामक एकांत रमणीय स्थानी वामनदेव तपस्या करू लागले. काही कालानंतर 'सिंग' कुळाबरोबरच वामनदेवांची पाऊले आर्वी ह्या संतभूमीकडे वळली.

वर्धा जिल्ह्यातील ही आर्वी नगरी **तेलंगराव** नावाच्या एका सत्पुरुषाने

सद्गुरू वामनदेव ब्रह्मचारी यांचे शिष्यवर [illegible] [illegible]नाथ' यांचे लग्न झाले. त्यांना पुढे पुत्रलाभ झाला व [illegible] 'पांडुरंग' असे ठेवण्यात आले. ईश्वरी साधनेचे बाळकडू घेऊ[illegible] [illegible]डुरंगही जन्मले होते. त्या काळी म्हणजे सुमारे दीडशे-पावणे [illegible] [illegible]र्वी आर्वी येथे **पुण्यश्लोक मायबाई** नावाच्या एक स्त्री-संत भ[illegible] नांदत होत्या. अशा संतभूमी आर्वीत जन्मलेल्या पांडुरंगालाही स्व[illegible] संत मायबाईचा सत्संग लाभला. ते आपल्या भक्तिसाधनेत इतके [illegible]ण व एकाग्र झाले की, वयाची ५०-५५ वर्षे उलटून गेली तरी त्यांनी विवाहाचा विचारही केला नाही. पण पुढे संत मायबाईनी त्यांना लग्न करण्याचा आदेश दिला व त्यांनी स्वतः पुढाकार घेऊन एका बालिकेशी त्यांचे लग्न लावून दिले. या मायबाईच्या कृपेने पुढे श्री. पांडुरंगपंतांचा जो वंशविस्तार झाला, त्यातच पुढे श्री. प्रभाकरपंतांच्या पोटी मोरेश्वराचा जन्म झाला. ह्या संत पदवी लाभलेल्या मोरेश्वरबाबांच्याच चरित्रातील काही ठळक पदचिन्हे आपण अवलोकन करीत आहोत.

## साधुसंतांची संगती

मोरेश्वराचे वडील श्री. प्रभाकर पांडुरंग जोशी हे एक अत्यंत सत्त्वशील व दत्तभक्त होते. व्यवसायाने जरी ते प्राथमिक शिक्षक म्हणून समाजाला परिचित होते, तरी ते एक श्रेष्ठ साधक होते. समाधी अवस्थेपर्यंत त्यांचा अभ्यास होता. संतांच्या संगतीची त्यांना तीव्र तळमळ असायची. त्या काळी आर्वीला **श्री. नारायण महाराज माळी** (वानखेडे) नावाचे एक तरुण सिद्धपुरुष रहात असत. प्रभाकर मास्तरांचा त्यांच्याशी निकटचा संबंध आला व त्यांनी नारायण महाराजांचे निस्सीम प्रेम संपादन केले. त्या काळी यामुळे आर्वीकर जनता या दोघांना जणू कृष्णार्जुनाची जोडीच असे प्रेमादराने संबोधीत असे. श्री. नारायण महाराज बरेचदा प्रभाकरपंतांच्या घरीच रहात असत.

श्री. प्रभाकर मास्तरांच्या वयाच्या सुमारे ३६ वर्षानंतर एकदा ते आसन्नमरणावस्थेत असताना, त्यांनी प्राणत्यागही केलेल्या अवस्थेत, सिद्धावस्थेत नांदणाऱ्या नारायण महाराजांनी त्यांना जिवंत केले. हा चमत्कार नसून एक सत्य घटना आहे. यानंतर त्यांना सुमारे बारा वर्षे आयुष्य लाभले व त्या काळातच आपल्या मोरेश्वर बाबांचा जन्म झाला. हे निखालस सत्य आहे. माचणूर क्षेत्री पूज्य बाबा महाराजांच्या संगतीत नांदत असताना त्यांनी एकदा काही साधकांसमोर हे उघडपणे सांगितले होते की, 'वडिलांच्या मृत्यूनंतर आम्ही जन्मलो. केवळ मी एकटाच नव्हे तर माझा धाकटा भाऊ सुधाकरही !' आम्ही त्यावेळचे सारे साधक श्रीबाबांच्या ह्या सांगण्याने आश्चर्यचकित झालो होतो. आणि त्या वेळी त्यांनी आपल्या वडिलांना श्री. नारायण महाराजांनी जीवदान दिले त्याची कथाही सांगितली होती, असो.

धीरोदात्त, शांतात्मा अशा पितृछायेत मोरेश्वराचे जीवन-संस्कार संपन्न होत होते. पण बालपणीच मोरेश्वराला निरनिराळ्या व्याधींनी भयंकर त्रस्त केले होते. पिशाच्चे व काही देवता यांचे त्याच्यावर नेहमी आक्रमण होई. अशावेळी समर्थ नारायण महाराज चोवीस तास त्याला आपल्या जवळ घेऊन बसत. मोरेश्वरांभोवती मृत्यूचे भयंकर तांडव चाले. हा प्रकार मातुःश्री अन्नपूर्णाआईनी व पिता प्रभाकरपंतांनी डोळ्यांनी पाहिला होता. मोरेश्वराचे जीवित हरण करावयास येणाऱ्या अनेकविध भयानक [illegible] बाल मोरेश्वराचे रक्षण करी. कधी कधी खडावांचा खड खड आवाज करीत प्रत्यक्ष दत्तप्रभू येत असल्याचे त्या मातापित्यांना दिसे व त्यांची काळजी मग दूर होई. श्रीनारायण महाराजांसारख्या सत्पुरुषांनीच मोरेश्वराचे बालजीवन घडविले व पुढे दत्तप्रभूंच्या आज्ञेने अन्नपूर्णाआईनी मोरेश्वराला कुलस्वामिनी भगवती रेणुकामातेच्या ओटीत घातले. धर्मदेवतांच्या साम्राज्यातून लहानपणीच मोरेश्वराचे जीवन घडविले गेले हे अलौकिकच नव्हे काय ?

## वं. राष्ट्रसंत तुकडोजींचा सत्संग

त्या काळात आर्वीत वं. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज परमहंस दशेत वावरत असत. त्यांचा परमार्थ-अधिकार प्रत्यक्ष विष्णुतत्त्वाचा होता. केवळ धर्मकार्यार्थ प्रकट झालेले ते एक थोर महात्मा होते. मोरेश्वराचे वडील श्री. प्रभाकरपंत यांचा श्रीतुकडोजी महाराजांशी स्नेह जडला व ते त्यांना आपल्या घरी घेऊन येऊ लागले. राष्ट्रसंत त्या घरी मोठ्या प्रेमाने कधी कधी राहात असत. अन्नपूर्णाआईनी मोठ्या प्रेमाने त्यांना भाकरी करून जेवू घातले आहे. मोरेश्वराच्या भाग्याने लहानपणीच त्याला संत तुकडोजींचा सहवास लाभला. वयाच्या केवळ दहाव्या वर्षी प्रथम मोरेश्वरांनी जेव्हा तुकडोजींचे खंजिरी भजन ऐकले, तेव्हा देहभान विसरून तो भावसमाधीत प्रविष्ट झाला होता. संत तुकडोजींनी बाल मोरेश्वराची ती अवस्था ओळखली होती. भजन संपल्यावर श्री. रामचरणलालांच्या घरी जेव्हा मोरेश्वर आपल्या वडिलांबरोबर त्यांना भेटण्यासाठी गेला तेव्हा रात्रीचे बारा वाजून गेले होते तरीही राष्ट्रसंतांच्या सत्संगात आर्वीकर सद्भक्त मंडळी रंगून गेलेली होती. एक अवर्णनीय आनंद तेथे निर्माण झालेला होता. संत तुकडोजी महाराज आपल्या ऊर्ध्व नजरेने विश्वस्वामींचे दर्शन करण्यात गुंगून गेले होते. मोरेश्वर तेथे जाताच महाराजांचे तेच नेत्र मोरेश्वरावर पडले व घरभर शांतीचे हसरे व प्रसन्न वारे वाहू लागले.

*'आनंदाचे डोही आनंद तरंग ।*
*आनंदाचे अंग आनंदचि ॥'*

असाच काहीसा अनुभव भक्तमंडळी चाखीत होते. मोरेश्वराने अनिमिष नेत्रांनी महाराजांचे मूकपूजन केले. महाराज तंद्रीत गुणगुणत होते, 'अग वृत्ती कुठे तूं जाते । तव प्रेम कुणाशी जडले । चल फिर आतां माघारा..॥' मोठे मधुर व भावोत्कट स्वर होते ते !! मोरेश्वर स्तंभित झाला. ते रहस्यपूर्ण रम्य स्वर ऐकताच त्याचे भान हरपले ! तोही उत्स्फूर्ततेने सहज उद्गारला, 'सुहृतदसा गुरू मोहे दीजै...।' मग काय ! रसाने रस उफाळतच गेला !

संत तुकडोजींप्रमाणे मोरेश्वराला त्या काळी आर्वीत **शेख फकीर, काशीनाथ बाबा** या सत्पुरुषांचाही सहवास मिळत असे व त्यांच्याशी काही सत्चर्चाही होत असत.

## सद्ग्रंथांचे अध्ययन

शालेय शिक्षण व संतसमागम घडत असतानाच पित्याने दूरदृष्टीने मोरेश्वरांकडून काही अध्ययन करून घेतले. **रामायण, महाभारत, भगवद्गीता, अवधूत गीता, रामगीता, शिवपुराण, भागवतपुराण, गरूडपुराण, पद्मपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, पांडवप्रताप** इत्यादी ग्रंथांचे अध्ययन मोरेश्वराने लहान वयातच पूर्ण केले. आध्यात्मिक योगपर ग्रंथ व संतवाङ्मयाचे परिशीलनही त्याने केले. गोस्वामी तुलसीदास विरचित **'रामचरितमानस'** सारख्या अद्वितीय

भक्तिमहाकाव्याचा आस्वादही लहान वयातच मोरेश्वराने घेतला.

यावेळी मोरेश्वराचे शालेय शिक्षणही सुरू होते. पण त्याच्या संशोधक बुद्धीला पठडीबंद शालेय शिक्षण कधी फारसे आवडले नाही. एकदा त्याच्या वर्गशिक्षकाने त्याच्या वृत्तीचा वेगळेपणा पाहून त्याला विचारले होते, 'अरे मोरेश्वर, तुला मी काय शिकवू सांग बरे ?' तेव्हा त्याने उत्तर दिले होते, 'गुरुजी असे काहीतरी मला शिकवा की जे पुन्हा कधीही शिकावे लागणार नाही.' मोरेश्वराचा वेगळेपणा त्या शिक्षकांना ह्या उत्तराने जास्तच जाणवला ! शाळा संपली की आष्टी रस्त्यावरील टेकड्यांवर एकांतात जाऊन मोरेश्वर काही साधना करीत असे. कसेबसे मॅट्रिकपर्यंतचे शालेय शिक्षण त्याने संपविले. त्यावेळी पिता श्री. प्रभाकरपंत यांचे निधनही झाले.

मग पुन्हा एकदा वं. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांचा सहवास मोरेश्वराला लाभला. त्या वेळी संत तुकडोजी धर्मसेवेच्या, राष्ट्रसेवेच्या कार्यात हिरीरीने भाग घेत असत. लोकांना या कार्यासाठी आवाहन देत होते व मार्गदर्शन करीत होते. मोरेश्वराने आपल्या या कार्यात सहभागी व्हावे अशी राष्ट्रसंतांची इच्छा त्यांनी प्रगट करताच मोरेश्वराने सत्संगलाभाच्या ऊर्मीने त्यात उडीच घेतली. राष्ट्रसंतांचे खंजिरी भजनाचे अनेक कार्यक्रम त्यावेळी गावोगावी होत असत. छिंदवाडा जिल्ह्यातील यासाठीची प्रचारकाची जबाबदारी मोरेश्वराने घेतली व सुमारे एक-दीड वर्षे तो या कामात नेटाने कार्य करीत असे. राष्ट्रसंत कार्यक्रमासाठी ज्या गांवी जाणार असतील, तेथील कार्यक्रमाची पूर्वयोजना व संचालन मोरेश्वर स्वतः करीत असे. महाराजांच्या सांगण्यानुसार त्या वेळी मोरेश्वराने स्वामी रामतीर्थांचे वाङ्मय, तसेच मानवेंद्रनाथ रॉय, रवींद्रनाथ टागोर, महात्मा गांधी यांचेही साहित्य त्याने अभ्यासले.

श्रीसंत तुकडोजी महाराजांना तर मोरेश्वराच्या हृदयात पितृतुल्य स्थान होते. त्यांच्या साधुत्वावर त्याची अचल निष्ठा होती. पण गुरुदेव सेवा मंडळाच्या त्या स्थूल कार्यात मात्र त्याला फार काळ रमता आले नाही. एकांत साधनेसाठी दूर कुठेतरी निघून जावे ही ओढ उत्कट होत होती. पूर्व संस्कारांनी, तपश्चर्या करण्यासाठी एकांत सेवन करण्याचे विचार जसजसे बळावू लागले, तसतसे मोरेश्वराने छिंदवाडा जिल्ह्यातील आपल्या कार्याला पूर्णविराम दिला व पुन्हा तो जन्मग्राम आर्वीला येऊन राहिला. मात्र आता स्वतःच्या घरी न राहता त्याने श्री दत्तमंदिर येथे आपली साधना सुरू केली. आईला आपल्या मुलाचे हे वागणे मोठे गूढ वाटे. पदराखाली झाकून आणलेली भाकरी तिने सजल नेत्रांनी मोरेश्वराला खाऊ घातली. घळघळणाऱ्या नेत्रांनी मोरेश्वराची ती लोकविलक्षण अवस्था अवलोकन करताना अन्नपूर्णा आईना प्रेमाचे नुसते भरते येई. पण जगराहाटी वेगळीच ! ठराविक चाकोरीत अगतिकपणे फिरणाऱ्या जगाने मोरेश्वराच्या वागणुकीवर मूर्खपणाचे - पागलपणाचे शिक्कामोर्तब केव्हाच करून टाकले होते ! पण मोरेश्वराचा भार प्रत्यक्ष त्या दत्तप्रभूंनीच उचलला आहे, हे त्या अज्ञजनांना कसे कळावे ? थोड्याच दिवसांत श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने मोरेश्वराने एका उत्तररात्री आर्वी सोडली.

## भ्रमणगाथा

मोरेश्वराची भ्रमणगाथा सुरू झाली. एका आनंदयात्रीची ही महानंदयात्रा मोठी विलक्षण आहे. एकाकी भ्रमण करताना आर्वी सोडल्यावर मोरेश्वर कुठे, कसा गेला, कुठे कसा राहिला, त्याने काय साधना केली, हे सर्व साकल्याने सांगणे-लिहिणे मोठेच कठीण ! प्रसंगोपात भावी काळात त्याने आपल्या निकटवर्तीयांजवळ कथन केलेल्या माहितीवरून व स्वतःच्या हस्ताक्षरांत लिहून ठेवलेल्या काही मजकुरावरूनच (की जो मजकूरही श्रीबाबा महाराजांच्या निर्वाणानंतरच आम्हास उपलब्ध झाला.) ही भ्रमणगाथा आम्ही लिहीत आहोत याची मला पूर्ण जाणीव आहे. हा लेख म्हणजे त्या भ्रमणगाथेतील काही पृष्ठांवरील फक्त महत्त्वाच्या पंक्ती आहेत. पण या ओळींमधूनही खूप काही दडलेले आहे. एका साधकाच्या महाप्रवासातल्या या फक्त काही उमटलेल्या पाऊलखुणा आहेत. पण ह्या पाऊलखुणाही ती जीवनयात्रा दिग्दर्शित करणाऱ्या दीपकालिका आहेत.

आर्वीहून निघालेली मोरेश्वराची पदयात्रा प्रथम पंढरपूरच्या दिशेने, मार्गस्थ झाली. 'सुखालागी आरंण्य सेवीत जावे' ही समर्थांची उक्ती सार्थ करणारा मोरेश्वर बालयोगी अरण्यातून एकाकी चालू लागला. अन्नपूर्णाआईचे वात्सल्याने गहिवरलेले डोळे मोरेश्वराच्या मार्गावर आसवांच्या पायघड्या घालीत होते आणि संतसेवारत भक्तवर पिताश्री प्रभाकरपंतांचे प्रेमाने ओसंडणारे हृदय, अव्यक्तातून त्या बालयोग्याची चिमुकली पाऊले त्या कल्याणपथावर खंबीरपणाने व यथार्थतेने पडावीत म्हणून दत्तप्रभूंची प्रार्थना करीत होते. आपल्याकडे येणारा हा लहानगा जीव सुखरूपतेने यावा याची त्या भगवान विठ्ठलाला केवढी काळजी ! **लाड कारंजापासूनच** (श्रीनरसिंह सरस्वतींचे जन्मगांव) **श्री. नामदेव किराणे** नावाच्या एका सज्जन गृहस्थाने मोरेश्वराची काळजी वाहिली. वाटेत औंढ्या नागनाथाचे दर्शन घेऊन मोरेश्वर पंढरीत येऊन दाखल झाला. पंढरपूरच्या पांडुरंगाची भक्तिपताका दूरवर डौलाने लहरत होती. ते भक्तिपीठ मोरेश्वराला फार आवडले. पुण्यसलिला अशा त्या चंद्रभागेत स्नान करावे, साधुसंतांची व सद्भक्तांची दर्शने घ्यावीत व विप्र दत्तघाटावरील एकांतात ध्यानधारणा करावी असा मोरेश्वराचा नित्यक्रम होऊन बसला होता. पंढरीच्या भागवतधर्माचे स्तन्य पिऊन मोरेश्वराचे जीवन परिपुष्ट होत होते. काही काळाने पंढरीनाथांच्या आज्ञेने मोरेश्वराने पुढे नाशिककडे प्रयाण केले. गोदावरीच्या पावन तटाकी तीन वर्षे वास्तव्य करून मोरेश्वराने तेथे गायत्री पुरश्चरण केले. त्याकाळी नाशिकमध्ये विद्यमान असलेले प्रसिद्ध पंडित **श्रीराम गोसावी व शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी** प्रमुतींच्या भेटी घेऊन सत्संग केला. **संत गाडगेमहाराजांच्या** समवेत प्रेमळ हरिकथा श्रवण करीत, बागबगीच्यांतील स्वच्छतेची कामेही त्याने केली. नाशिकच्या त्या रामक्षेत्रात भक्तिरसाने ओथंबलेले हृदय घेऊन मोरेश्वराने त्या करुणासागर जानकीनाथाला आपल्या प्रेमाश्रूंनी अभिषेक केला. आपल्या स्वामींच्या या लहानग्या भक्ताला डोळे भरून पाहाण्यासाठी रामरंगी रंगलेले हनुमंत एकदा त्याच्या पुढ्यात येऊन ठाकले होते ! मंदिरातील आरतीच्या वेळी, श्रीरामांच्या पदकमलांवर दृष्टी खिळवून स्फुंदत उभ्या असलेल्या बाल मोरेश्वराकडे एका सद्भक्ताने लक्ष वेधले आणि अगदी धावत जाऊन त्यांनी त्याला प्रेमालिंगन दिले, कुरवाळले. त्या वेळी गालावरील हाडाला झालेल्या व्रणाने एका भयंकर व्याधीने मोरेश्वराला ग्रासले होते. त्या सद्भक्ताने मोरेश्वराला आपल्याबरोबर नागपूरला नेले व औषधोपचाराने ती व्याधी त्यांनी बरी केली. नागपूरमध्ये त्यावेळी सुप्रसिद्ध **महायोगी स्वामी सीताराम महाराज, श्री. गौरीशंकर महाराज** यांच्याशी मोरेश्वराचा सत्संग घडला. श्रीसीताराम महाराजांकडून त्याने योगांग उत्तम प्रकारे ग्रहण केले. नंतर त्याची पाऊले श्रीक्षेत्र ओंकारेश्वराकडे वळली.

भक्तियुक्त अंतःकरणाने योगप्रयोगात सरसावलेला मोरेश्वर आपल्या भ्रमणगाथेचे पुढील अध्याय लिहू लागला. अरण्यातून चाललेल्या या परिभ्रमणात 'जग' आणि 'मन' या विश्वजननीच्या दोन सद्ग्रंथांचे अध्ययन तो एकाग्रतेने करीत होता.

***'संशोधावे जग । संशोधावे मन ।***
***आपुले अंतर । संशोधावे ॥'***

हा त्याचा नित्याचा परिपाठ ! अरण्यातून जाताना कधी कंदमुळे खावीत तर कुठल्या पाल्यावरच भूक भागवावी आणि अथक चालत राहावे ! अंगावर एखादे फाटके वस्त्र असायचे ! कधी एखाद्या गावात जाऊन भिक्षा मागावी व पुढे जावे ! विराग योगाने संपन्न झालेला हा ऋषिकुमार त्यावेळी फक्त १७-१८ वर्षांचा होता. पण जन्मोजन्मीच्या पुण्याईने पावन व धीरगंभीर झालेला हा जीव, जणू नाते सांगायचा उपनिषद्कालीन ऋषिकुळाशी !

नर्मदातीर म्हणजे भारतीयांच्या तपःसाधनेचे एक पुण्यमय प्रांगण ! अति प्राचीन काळापासून या नर्मदा तटाकी कितीतरी महात्म्यांची तपश्चर्या फुलली नि फळली ! परमार्थविश्वात दिव्य देह धारण करून राहिलेल्या व मुमुक्षू जीवांना साधनेचे मार्गदर्शन करणाऱ्या दिव्यात्म्यांची ही पुण्यपेठच होय. शास्त्रवचनच आहे, **'रेवातीरे तपः कुर्यात् मरणं जान्हवीतटे ।'**

ओंकारेश्वरच्या रानाडोंगरांतून हिंडत एकांत वासात साधना करीत, वृक्षवल्लींची सोयरीक करीत सारखा त्या जगदीशाला आळवायचा, 'देवा घेशील ना रे मला जवळ ? आता नको रे दूर ठेवू.' त्याचे ते अनोखे भक्तिमय बोल ऐकून पंचमहाभूतेही हरखून जायची ! 'गुरुबिन कौन बतावे बाट' असे गदगदलेल्या कंठाने गुणगुणत, विकट यमघाटाच्या पुष्कळ पायऱ्या चढून गेलेला मोरेश्वरयोगी सद्गुरूंच्या दर्शनासाठी तळमळत होता ! नर्मदातीरीचा कण न् कण आपल्या प्रेमाश्रूंनी ओलाचिंब करून टाकीत होता. **एक परमहंस परिव्राजक यति महेश्वरानंद** त्याची सर्व अवस्था अव्यक्तातून न्याहाळीत होते. 'आपैसा भेटे' असे ते यति गुरूरूपाने दयार्द्र अंतःकरणाने, कृपादृष्टीने उत्कंठित झाले होते. 'मोहे लगी लटकं गुरूचरणनकी' अशा अवस्थेत रडत-ओरडत हिंडणाऱ्या मोरेश्वराला भेटण्यासाठी ते आसुसले होते. आणि मग एक दिवस भगवती नर्मदेच्या पावन कुशीत गुरुकृपामृताचे आकंठ पान मोरेश्वराला घडले ! 'हृदया हृदय एक झाले । ये हृदयीचे ते हृदयी घातले ॥' असे ते दिव्य मीलन होते ! गुरुकृपेचे अंजन लेवून मोरेश्वराचे जीवन धन्य झाले, कृतार्थ झाले !

***'तेणे अंजनगुणे दिव्य दृष्टि झाली ।***
***कल्पना निमाली द्वैताद्वैत ॥'***

अशा अवस्थेचा मोरेश्वर धनी झाला !

***'गुरु तेथ ज्ञान । ज्ञानी आत्मदर्शन ।***
***दर्शनी समाधान । आथि जैसे ॥'***

अशी ज्ञानेशवाणी त्याच्या जीवनात साकार झाली. **यती महेश्वरानंदांनी** तूर्यातीत उन्मनी अवस्थेत नांदविले व वाढविले ! आणि एक दिवस त्यांनी मोरेश्वराला सांगितले, 'तू आता वृंदावनला जा ! जाताना उज्जयिनीला महांकालेश्वराचे दर्शन घेऊन मग पुढे जा ! मी यापुढे तुझ्या अंगसंगाने राहीन. सर्वतः मला तू जाणत राहशील !!' आपल्या त्या कृपांकिताला त्यांनी आश्वासन दिले, 'मी आता तुझ्यातूनच तुला वाढवीन ! ज्ञानानेच जग[illegible] [illegible]. तो पवित्र दिवस होता मार्गशीर्षमासाच्या एकादशीचा, म्हण[illegible] [illegible]चा !

[illegible] [illegible]ी धाने सरकत होती. पर्वतराजीतून जाताना एकदा त्याला भगवान [illegible] [illegible]े **दर्शन दिले व मंत्रही सांगितला.** कृष्णभेटीसाठी आतुरलेले मन घे[illegible] [illegible]रेश्वराची यात्रा मथुरा-वृंदावनाकडे स्वाभाविकपणे मार्गस्थ झाली. [illegible] [illegible]ंदन कन्हैयाला डोळे भरून पहावं म्हणून त्याची पुण्याई नेत्रांतून [illegible] देवाच्या त्या नामरूपाला अभिषेक घालीत होती. भक्तीचे अमर संगीत मोरेश्वराच्या पाऊलखुणांतून जणू गुंजारव करीत होते. मनमोहन राधारमणाच्या दिव्य प्रेमाची गाथा पावलागणिक भूपृष्ठावर लिहिली जात होती.

उज्जयिनीवरून जाताना त्याने महांकालेश्वराचे दर्शन घेतले. तेथे **श्री. तपेबाबांकडून** त्याला **मंत्रशास्त्राचा** अभ्यास झाला. त्यासाठी पंधरा दिवसांचे अनुष्ठान तिथे केले व मग वृंदावनला फाल्गुनातल्या पंचमीस येऊन पोहोचला. तेथील उत्सवात विराट रूपाने श्रीहरी त्याने पाहिला. वृंदावनच्या त्या प्रेमभूमीत मोरेश्वराने अडीच-तीन वर्षे वास्तव्य केले. राधारमणाच्या अखंड स्मरणात वृंदावनच्या कुंजगलीतून हिंडताना, त्या स्वर्गीय प्रेममय भूमीने एक आगळाच दिव्यानुभूतीचा प्रत्यय मोरेश्वराला दिला. **शुकाचार्य** नावाचे एक बंगाली परमहंस, **उडियाबाबा व काठियावाले बाबा** आदि संतांचा सत्संग त्याला लाभला. श्रीकृष्णाची अमरवाणी असलेली भगवद्‌गीता या भूमीतच मोरेश्वराला एक अनोखा ज्ञानप्रकाश देऊन गेली. त्या गीतेची पारायणे त्याने केली. मनमोहन श्रीकृष्णाच्या वेणुनादाचे अमर संगीत ऐकताना मोरेश्वराचे देहभान हरपून जाई ! सद्गुरू यती महेश्वरानंदांना कृष्णस्वरूपातच तो जाणू लागला.

***'सद्गुरु प्राणेश्वर । श्रीकृष्णनामाचे सुंदर ।***
***गोपाळांचा जो आधार । भक्तवत्सल ॥'***

या दिव्यानुभूतीने भक्तवर मोरेश्वराचे जीवन सालंकृत झाले. 'ज्याने अर्जुन सावरला, उद्धव ज्याने बोधिला, ज्याने गोपाळ तारले तो कृष्णकन्हैया म्हणजेच यति महेश्वरानंद' असा बोध मोरेश्वराच्या अंतरंगात सुप्रतिष्ठित झाला.

वृंदावनमधील ते मंतरलेले दिवस अनुभवल्यानंतर मोरेश्वराची पाऊले **उत्तर काशीकडे** वळली. तेथे त्याने **सत्ग्रह्मेंद्रनाथांकडून प्राणविद्या** आत्मसात केली. त्यांनीच पुढे काही अभ्यासासाठी मोरेश्वराला **कपालेश्वर** व **पाशुपतेश्वर** येथे जाण्यास सांगितले. **स्वर्गाश्रमातही** काही काळ त्याने साधना केली. त्यावेळी **राघवाचार्य** नावाचे एक संस्कृत पंडित तिथे रहात असल्यामुळे त्यांच्याशी शास्त्रचर्चा करण्याचा योग मोरेश्वराला मिळाला. नंतर **कैलास, बद्रीनाथ, केदारनाथ** अशी तीर्थे करीत तो दक्षिणेश्वराकडे निघाला. वाटेत **आसनसोलवरून शांतिनिकेतन** येथेही तो जाऊन आला. या वेळपर्यंत मोरेश्वरची साधना सिद्धावस्थेला पोहोचली होती. आपल्या परिभ्रमणात निरनिराळे आखाडे, मठ, आश्रम यांचे मोरेश्वराने जवळून निरीक्षण-परीक्षण केले. तेथील विविध उपासनापद्धतींचेही अवलोकन केले. भ्रमण करीत **जगन्नाथपुरीला** पोहोचल्यावर तेथील **श्री चैतन्यमहाप्रभूंच्या मंदिरातून** भक्तिप्रेमाचा विडा उचलून मग पुन्हा त्याची पाऊले महाराष्ट्राकडे वळली. या सर्व भ्रमणगाथेचे वर्णन साकल्याने करणे कठीणच आहे. अशी ती एकाकी पदयात्रा होती. तिचे वर्णन 'फिरविता धनी वेगळाचि' असेच काहीसे करावे लागेल. त्यामुळे त्याचे जीवन पूर्णतया ईश्वरी योजनेचा

सहज स्वीकार करीत होते.

*'मंजूर जे तुम्हाला स्वानंद तोचि माझा ।*
*राखाल जेवी जेथे तेथेच मोक्ष माझा ॥'*

अशा काव्यपंक्तीनीच त्या जीवनाचे वर्णन करावे लागेल.

महाराष्ट्रात आल्यावर प्रथम काही काळ **महात्मा गांधीजींच्या सेवाग्राम आश्रमात वर्धा** येथे मोरेश्वराने सुमारे नऊ महिने वास्तव्य केले. **संत** विनोबाजींचा सत्संगही त्यावेळी त्याला लाभला. नंतर जन्मगांव आर्वीला तो आला. त्या वेळी आर्वीला **श्री. वासुदेवशास्त्री घाटे** म्हणून सिद्धपुरुष वैराग्य साधनेत रममाण झालेले होते. तसेच जवळच असलेल्या **टाकरखेडा येथे स्वरोदय उपासक संत लहानुजी महाराजही** होते. या दोघांचा सत्संग त्याला लाभला. आर्वी ही संत मायबाईची पावन भूमी की जिथे नाथांचा भक्ति ज्ञानदीप अखंड तेवत होता ! सुमारे वर्षभर तिथे राहिल्यानंतर **श्रीअक्कलकोट स्वामींचे** दर्शन पुन्हा त्याला झाले व आदेश मिळाला, 'कान्होबांच्या गुंफेत जा...' स्वाभाविकच आर्वीहून मोरेश्वरांची पाऊले नगर जिल्ह्यातील **कानिफनाथांच्या मढीकडे** वळली. मढीहून पुढे **अंबाजोगाई, परळी वैजनाथ, हैद्राबाद** असा प्रवास करून मोरेश्वर दत्तप्रभूंची सिद्धभूमी असलेल्या **गाणगापूरला** येऊन पोहोचला. तेथे भीमा-अमरजा संगमावर एकांतवासात भगवान दत्तात्रेयांशी गुजगोष्टी करण्याचा दिव्यानुभव अनुभव येऊन 'गुरुगीता' प्रसादही त्याला लाभला. आणि मग **स्वामी समर्थांच्या अक्कलकोटी** तो आला. गावाबाहेरील एकांतातील एक दर्गा पाहिल्यावर त्याला आर्वीच्या वलीसाहेबांच्या (तेलंगराय) स्थानाचीच आठवण झाली व त्याचे मन प्रसन्न झाले. एकदा भुकेने व्याकुळ झालेल्या एका फकिराने मोरेश्वराला स्वामींच्या वटवृक्षमंदिरातील ओवरीत दर्शन देऊन आपल्या कटोऱ्यातून आमटी-भाताचे भरपूर जेवण दिले होते. त्या कटोऱ्यातील आमटी-भात म्हणजे एक अलौकिक लीला होता. 'आलमका खाया और आगमका पाया कभी खतम नहीं होता.' असे त्याचे दिव्य रहस्य सांगून तो फकीर निघून गेला. तो फकीर म्हणजेच त्या दर्ग्यातील ते अवलिया सत्पुरुष होत ! स्वामींच्या आज्ञेशिवाय अक्कलकोट सोडू नये असा संदेश त्यांनीच मोरेश्वराला दिला. स्वामींच्याच आदेशाने पुढे मोरेश्वरनाथ पुन्हा एकदा कानिफनाथांच्या मढीकडे गेले असताना तेथे **श्री. जीवनाथ व श्री. नाथस्वामी** या दोन सत्पुरुषांशी त्यांची भेट झाली व त्या दोघांच्या आदेशानुसार नाथ मोरेश्वर अक्कलकोट-सोलापूरमार्गे मंगळवेढा तालुक्यातील **श्रीक्षेत्र माचणूरच्या सिद्धेश्वर मंदिरात** येऊन दाखल झाले. गूढ दिव्यानुभव घेत घेत, ईश्वरीय प्रेरणेने व सत्पुरुषांच्या आदेशाने संपन्न झालेली ही मोरेश्वर भ्रमणयात्रा, एका ईश्वरीकार्यासाठी माचणूर येथे येऊन विसावली. १९५४ सालचा काळ तो !

नाथसंप्रदायाचे प्राचीन ठाणे असलेल्या श्रीक्षेत्र माचणूरच्या पावन भूमीतून जसजशी मोरेश्वरनाथ उर्फ बाबा महाराज यांची पाऊले फिरू लागली, तसतशी त्या भूमीने आपल्या पोटीचे रहस्य त्यांना उलगडून सांगितले. गुरू गोरक्षनाथांनी जेथे एकवीस दिवसांचे अनुष्ठान करून एका गुप्त वज्रलिंगाची स्थापना केली होती, त्याची साक्षही त्यांना गवसली. या प्राचीन धर्मपीठाने **'संतधर्म प्रचाराचा'** नवयुगातील कार्याचा आदेशही त्यांना स्पष्टपणे प्राप्त झाला आणि मग तशा प्रकारच्या कार्याची मुहूर्तमेढ तिथे स्वाभाविकपणेच रोवली गेली.

*'भूमिभार सारुनी ज्ञानदीपची पाजळी ।*
*धर्मवीर प्रतकले सिद्धराम ये स्थळी ॥'*

असे माचणूरच्या भगवान सिद्धेश्वरांचे स्वरूपकार्यही बाबा महाराजांना निवेदित झाले. कुतूहलाने धर्मशील भाविक जन ह्या अनोख्या साधूच्या पवित्र विहाराकडेचे अवलोकन करू लागले. थोडेसे बोलणे व ओळख होताक्षणीच त्यांच्या पवित्र साधुत्वाविषयी लोकांना आदरयुक्त आकर्षण वाटू लागले. हळूहळू पुण्यशील धर्मप्रेमीजनांचे संमेलनच तिथे भरू लागले. पूज्य बाबा महाराजांचे माचणूर येथून समाजासमोर प्रकट झालेले जीवन, उघडपणे जनतेने पाहिले असल्याने, या चरित्रगुणसंकीर्तनाच्या एका लेखात ते प्रत्येक घटनेनिशी निवेदन करणे आवश्यक नाही. त्यासाठी स्वतंत्र ग्रंथच निर्माण करावा लागेल. तसाही प्रयत्न आमच्या साधक-भगिनी श्रीमती जिजाताई हाटे यांनी 'संतकृपा' ह्या पुण्यातील सुप्रसिद्ध प्रकाशनातर्फे केला आहे व त्यानंतर मुंबईचे श्री. वि. श्री. फणसळकर या आमच्या साधक बंधूंनी 'मोक्षधाम प्रकाशन मंडळा'मार्फत केला आहे. या लेखांत श्रीसंत बाबामहाराजांनी स्वतःच्या हस्ताक्षरात लिहून ठेवलेल्या कागदांच्या आधारे त्यांच्या चरित्रांतील फक्त ठळक घटनांचा आढावा घेतला आहे. त्यांच्या जीवनयात्रेतील ह्या काही महत्त्वपूर्ण पाऊल खुणा होत. याच 'कल्याणी' विशेषांकात आमच्या नागपूरच्या आदरणीय साधक-भगिनी व लेखिका डॉ. सौ. नीलाताई जोशीराव यांनीही, प्राप्त झालेल्या माहितीच्या आधारे श्रद्धापूर्वक संत बाबा महाराजांचे चरित्र गुणसंकीर्तन केले आहे.

इ. स. १९५४ च्या अखेरीस श्रीबाबामहाराज माचणूरला आले व आपल्या प्रभावी प्रवचनांमुळे सर्वत्र त्यांचा कीर्तिसुगंध दरवळू लागला. त्यांची अभिजात जीवनदृष्टी, विवेचनाची अभिनव शैली व तपोनिष्ठ उज्ज्वल चरित्र, यामुळे धार्मिक मने स्वाभाविकपणे माचणूरला एकत्रित होऊ लागली. पंढरपूर, सोलापूर, अक्कलकोट, बार्शी, पुणे, मुंबईपासून लोक माचणूरला जमा होऊ लागले. त्यामुळे १९५५ साली माचणूरला श्रीबाबांच्या आदेशाने **'चातुर्मास्य समाप्ती उत्सव'** साजरा झाला. आपल्या प्रासादिक रससिद्ध वाणीने श्रीबाबांनी संतधर्माचा संदेश सर्वत्र दुमदुमवून टाकला.

माचणूरला काही दिवस राहून श्रीबाबा एक वर्षभर आळंदीला जाऊन राहिले. त्यांच्याजवळ त्यावेळी चार-पाच सेवकही रहात असत. ज्ञानाईच्या प्रेमभक्तीने बेधुंद झालेले श्रीबाबा, इंद्रायणीच्या अंकावर त्या मंतरलेल्या भूमीत स्वानंदी अवस्थेत लहरत होते. रडत-ओरडत वेळी-अवेळी उघड्या माळरानावरून हिंडणारे श्रीबाबा, ज्ञानोबांच्या समाधीचे दर्शन घेताना स्फुंदून स्फुंदून रडणारे श्रीबाबा, रात्री-अपरात्री पुराने भरलेल्या इंद्रायणीत शरीर झोकून देणारे श्रीबाबा, कधी गोड ताला-सुरांत ज्ञानाईच्या भक्तिप्रेमाची गीते गात नाचणारे श्रीबाबा ही सारी एका प्रेमयोग्याचीच रूपे होती. आळंदीच्या वास्तव्यात साधनेचे सार्वत्रिक मार्गदर्शन करणारा ओवीरूप ग्रंथ **'साधना-संहिता'** हा केवळ अकरा दिवसांत लिहून पूर्ण झाला व पुढे त्या ग्रंथाचे प्रकाशनही झाले.

इ. स. १९५७ सालानंतरच्या निर्वाणापर्यंतचा १४-१५ वर्षाचा काळ हा श्रीबाबांच्या उत्तरार्धातील जीवनाचा कार्यरत असा तेजस्वी कालखंड आहे. त्यांच्या माचणूरच्या वास्तव्यामुळे व जमलेल्या प्रेमीजनांच्या सहकार्याने **'मोक्षधाम'** आश्रमाची वास्तू क्रमाक्रमाने सिद्ध झाली. जिज्ञासू साधकांना आध्यात्मिक साधनेचे मार्गदर्शन व्हावे व धर्मोत्सवांतून संतांचा तेजस्वी संदेश सर्वत्र प्रसृत व्हावा यासाठीच आश्रमाची ही योजना साकार झाली होती. प्रतिवर्षी मार्गशीर्ष शुद्ध पंचमी ते द्वादशी या पुण्यकाळात त्यांनी **'साधना-सप्ताह-महोत्सव'** असे नियोजन केले व त्यामुळे हजारो भाविक

... लागले. माचणूरच्या उघड्या माळरानावर श्रीबाबांनी धर्माचे सुंदर नंदनवन निर्माण केले.

१९५७-५८ मध्ये श्रीबाबामहाराजलिखित **'साधना-संहित'**, **'प्रार्थना-प्रभात'**, **'प्रभातपाठ'** **'मनोपदेश'**, **'आचार-संहिता'** आदि वाङ्मय प्रकाशित झाले. पूजनीय, बाबांनी गावोगावी प्रवचने करून 'धार्मिका ! जागा हो !' अशी ललकार उठवून सहस्रावधी लोकांना खडबडून जागे केले व महाराष्ट्रात धर्मजागरणाचे एक तेजस्वी पर्वच आकाराला आणले. हे सर्व कार्य एका तत्त्वनिष्ठ धारणेनेच त्यांनी हाताळले. संघटनायुक्त, संस्थावादी कार्यपद्धती त्यांनी यासाठी न वापरता एक नवीन सांस्कृतिक कार्यतंत्र उभे करण्याचा त्यांचा मानस होता.

१९६०-६१ साली पुण्याला एक मोठा **'संतस्मृति महोत्सव'** श्रीबाबामहाराजांच्या मार्गदर्शनाने साजरा झाला व १९६२ मध्ये अशा प्रचारकार्यासाठी **'संतधर्म प्रसारक मंडळ'** या नावाने एक सुसूत्र कार्ययोजना मराठी जनतेसमोर त्यांनी साकार केली. या मंडळाला **'चतुर्विधा क्षेत्रशुद्धी'** चा प्रत्यक्ष कार्यक्रमही दिला व **'अध्यात्मविद्या मंदिरे'** अभ्यासकांसाठी विशिष्ट ठिकाणी निर्माण व्हावीत अशा प्रयत्नांना ते लागले. त्यासाठी सात वर्षांचा अभ्यासक्रमही त्यांनी तयार केला व विद्वज्जनांना यासाठी आवाहन केले. सरस्वतीचा वरदहस्त लाभलेले श्रीबाबा एक स्वानुभवसंपन्न साहित्यिक आहेत अशी सर्वत्र त्यांची प्रसिद्धी झाली. भक्तिशास्त्राचे सांगोपांग विवेचन करणारा, ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायाच्या आधारे त्रिखंडात्मक **'दिव्यामृतधारा'** हा बृहत् ग्रंथ त्यांनी अतिशय परिश्रमपूर्वक लिहून पूर्ण केला. १९६६ साली 'दिव्यामृतधारा' ग्रंथाचा प्रथम खंड मुंबईमध्ये मोठ्या थाटाने प्रसिद्धही झाला. १९६८ साली त्यांनी **'संतधर्म, जीवन, संस्कृती संदेशक'** अशा **'सांगाती'** या त्रैमासिकाची योजना माचणूर आश्रमातील साधकांच्या मार्फत क्रियान्वित केली. हा सर्व व्याप व प्रवचन दौरे सांभाळून प्रकृतीला अतिशय त्रास होत असतानासुद्धा 'धर्म रक्षावयासाठी । करणे आटी आम्हासी ।' हे संतांचे जीवनव्रत निष्ठापूर्वक ते आचरीत होते. प्रवचनांसाठी त्यांचे दूरवर इंदूर, बडोदा, धार, देवास, महू तसेच नागपूर, वर्धा, आर्वी आदी ठिकाणीही ते गेले होते.

इ. स. १९६९ साली त्यांनी निकटवर्तीयांना सांगायला सुरुवात केली की, 'आता माझे आयुष्य फार थोडे राहिले आहे. तुम्ही माचणूरची सर्व कार्ययोजना नीट समजून घ्या.' आश्रमांतील काही साधकांनी श्रीबाबांचे ते विचार लिहूनही ठेवले. पण भविष्य काळात काही भयंकर दडून बसले आहे याची कल्पना कुणालाच आली नाही. पण होणारे कधी टळते का ? श्रीबाबांच्या हिरडीला झालेल्या बारीकशा व्रणाची जेव्हा मुंबईला तपासणी झाली व त्यांना कॅन्सर झाला ही बातमी जेव्हा प्रसृत झाली, तेव्हा मात्र सारेच हबकले ! महाराष्ट्राचे काळीजच फाटून गेलेले !

एक महायोगी आपल्या महाप्रयाणाची सिद्धता शांतपणे करीत होता ! सभोवती जमलेला भाविक समुदाय तो भयंकर योग टाळावा म्हणून दैवी उपायांची व विविध औषधोपचारांची योजना करण्याच्या धावपळीत गुंतून गेलेला होता. आयुर्वेदाच्या उपचारांनी रोगनिवारण करण्याचे धोरण स्वतः श्रीबाबांनी स्वीकारले होते व तशी उपाययोजना चालूही होती. पण... कशाचीही व कुणाचीही तमा न बाळगता ते विधिलिखित आकार घेत होते ! श्रीबाबांनी धीरगंभीरपणे, अनंत वेदना सहन करीत असतानाही, निरवानिरवीची सर्व कामे पूर्ण केली. **'सिद्ध सारस्वत संघ'** या नावाचे अकरा जणांचे एक विश्वस्त मंडळ नियुक्त करून, आश्रमाची सर्व व्यवस्था व कार्यभार त्या मंडळाकडे सुपूर्त केला.

'सारे जग मृत्यूच्या दाढेत आहे पण तो मृत्यू माझ्या दाढेत आहे' असे सहजादूगार काढीत, भगवंताच्या विभूति स्वरूप असलेल्या त्या यमराजाला आलिंगन देण्यासाठी, आपले दोन्ही बाहू पसरून ते धीरगंभीरपणे उभे राहिले !!

दि. २ डिसेंबर १९७१ चा तो दिवस म्हणजे मार्गशीर्ष मासीची उत्फुल्ल पौर्णिमा ! सकाळीच ९ वाजून २० मिनिटांनी माचणूरच्या आश्रमात संत श्रीबाबामहाराजांनी चिरनिद्रा घेतली. एका संतश्रेष्ठाची जीवनज्योती महाप्रकाशात विलीन झाली ! 'मोरेश्वर प्रभाकर जोशी' ही देहाची खोळ गळून पडली नि साधकांचा एक जिवलग सांगाती क्षितिजापार निघून गेला. अवघे धर्मप्रांगण उजाड झाले ! पुणे आकाशवाणी निनादली की संत बाबामहाराज आर्वीकर यांचे महानिर्वाण ! वृत्तपत्रांनी आपल्या लाडक्या मार्गदर्शक संतवराला, रकाने भरभरून श्रद्धांजली वाहिली. धर्मवंतांची अंतःकरणे पिळवटून निघाली पण 'संत बाबामहाराज आर्वीकर गेले' हे विदारक सत्य तटस्थपणे सर्वांसमोर उभे होते !!

श्रीबाबांच्या निर्याणाने महाराष्ट्रातील धार्मिक व आध्यात्मिक क्रांतीचे पुण्यपर्व थबकले ! नाथसंप्रदायाचा एक थोर सिद्ध धर्मप्रवर्तक, भारताला सनातन संतधर्माची दीक्षा देऊन, उपासनामय चिरंजीवनाचा एक तेजस्वी अध्याय लिहून गेला ! देहाची घोंगडी फाटायचीच. पण पुण्यात्म्यांचा जीवनसंदेश अमृताच्या अक्षरवेलीने विश्वपृष्ठावर चिरंजीव असतो.

**श्री. शरद भगत**
श्रीक्षेत्र माचणूर, जि. सोलापूर.



# गीता व ज्ञानेश्वरीत रमलेले बाबा महाराज आर्वीकर

ज्योतिष भास्कर - पंडित हिंगे

प्रसिद्ध ज्योतिष भास्कर व [illegible], कवी, पत्रकार, ३ पुस्तके प्रकाशित, ५ पुस्तके व १ कविता संग्रह प्रकाशनाच्या मार्गावर

फलज्योतिष शास्त्रातील अनुभव घेण्यासाठी कुंडली हा एक रामबाण उपाय आहे. मनुष्यांच्या स्वभाव गुणधर्माचे खरे प्रतिबिंब. कुंडलीतील आरशात स्पष्टपणे दिसून येते. सर्वत्र देवाला भजणारी किंवा धार्मिकतेकडे झुकलेली माणसे पहायला मिळत नाहीत. ज्याचा जसा पिंड तसेच फळ पहायला मिळते, अनुभवायला मिळते. जीवन म्हणजे खरे तर प्रेम ज्ञान व शक्ती यांचा संगमच. या तीन गोष्टी ज्यांच्या जवळ असतात त्यांचं जीवन निश्चितपणे कृतार्थ बनते, त्यातही प्रार्थना म्हणजे आत्मशुद्धीसाठीच ईश्वराला घातलेली हाक असते. प्रार्थनेमुळे अहंकार व गर्व दूर होतो. त्यातही नम्रतेसारखा सद्‌गुण नाही. नम्रता म्हणजे तरी काय ? तर लवचिकपणा ! यामध्ये तणावाची शक्ती आहे. जिंकण्याची कला आहे. शौर्याची पराकाष्ठा आहे. नम्रता ही प्रेमाची आणि स्नेहाची जननी आहे. विनम्रवृत्ती दैवी गुणांचं मूळ आहे. नम्रता म्हणजे हृदयस्थ परमेश्वराचा सन्मान किंवा परमेश्वराच्या साक्षात्काराचा प्रमुख आविष्कार !!

## फलज्योतिष शास्त्र काय सांगते

फलज्योतिष शास्त्रात एकूण पुढील प्रमाणे चार प्रकारचे त्रिकोण येतात. १) धर्म, २) अर्थ, ३) काम, ४) मोक्ष असे हे चार त्रिकोण आहेत. जन्म लग्न कुंडलीतील प्रथम, पंचम व नवम हे तीन स्थाने धर्म त्रिकोणात येतात, ती पुढील प्रमाणे दाखविलेली आहेत.

धर्मत्रिकोण कोणता ?




**स्थाने**

१, ५ वं ९ धर्म त्रिकोण

२, ६ व १० अर्थ त्रिकोण

३, ७ वं ११ काम त्रिकोण

४, ८ व १२ मोक्ष त्रिकोण

## धर्म त्रिकोणाला महत्त्व कशासाठी ?

अध्यात्म योगाचा जास्तीत जास्त महत्त्वाचा संबंध म्हणजे, धर्म त्रिकोणाशीच येत असतो. हा त्रिकोण मात्र कुंडलीत दाखविल्याप्रमाणेच पहिले, पांचवे व नववे या स्थानापासून बनतो. जन्म कुंडलीतील पंचम स्थान, तेथे असणारे विविध ग्रह, आणि त्या स्थानाचा स्वामी ग्रह म्हणजेच पंचम स्थानातील राशीचा स्वामी ह्यांचा मात्र परमार्थातील उपासना, जपजाप्य, आन्हिक तसेच नित्योपासनेशी जवळचा संबंध असतो. पंचम स्थानावरून श्रद्धा, भक्ती, उपासना याचा विचार होत असतो. परमार्थात भक्तीचा कारक ग्रह शुक्र आहे आणि भक्ति तत्त्वज्ञान देणारा मात्र गुरू आहे. तर वैराग्य संपन्न करणारे ग्रह शनी व केतू ! हेच परमार्थात पूर्णता देतात.

## ग्रहयोग नक्की काय सांगतात –

पंचमस्थानी चंद्र, बुध, गुरू, शुक्र हे ग्रह असताना नित्योपासना नामस्मरण यांना उत्तम स्थान प्राप्ती ! तर पंचम स्थानातील शुभ ग्रह संबंध हे अध्यात्मास उत्तमच असतात. महातपाचे फल देणारा मात्र केतू आहे. जन्म कुंडलीत जर अनुक्रमे मंगळ, शुक्र आणि गुरू या राशीत असतील तर परमार्थ साधनासाठी केतू निश्चित फलदायी होतो. जन्म कुंडलीत रवि, चंद्र, बुध यांचे हर्षल, नेपच्यून, प्लुटो बरोबर होणारे लाभ, नवपंचम, युती सारखे शुभयोग परमार्थात प्रगती देतात. केतू ग्रह पंचम, नवम अगर व्यय म्हणजेच (५, ९ व १२ स्थानी) असता अथवा गुरूची त्यांच्यावर पूर्ण दृष्टी असता अध्यात्मात गोडी लागते आणि अध्यात्म विद्येची प्राप्ती देखील होते.

## अध्यात्मासाठी ग्रहयोग संबंध

पंचम स्थान आणि व्यय स्थान यांच्या मधील ग्रहांशी एँकमेकांस असणारे संबंध ईश्वर भक्तीची ओढ देणारे असतात. जन्म कुंडलीत गुरू, शनीची परस्परावरील दृष्टी, दोन्ही ग्रहांत अध्यात्म देवाण-घेवाण करण्यास मात्र निश्चितच उत्तम असते. जन्म कुंडलीतील अनुक्रमे १, ५, ९ आणि ४, ८, १२ ही स्थाने आध्यात्मिक प्रगतीस उत्तमच असतात. गुरू, शनि बरोबर केतू व काही अशा विशिष्ट पद्धतीत मात्र राहूचा विचार करणे योग्य ठरते.

## प्रत्येक ग्रहावरून काय पाहतात

आत्मा कारक रवि, मन कारक चंद्र, बुद्धी कारक बुध, त्याचप्रमाणे उत्साह शक्तिकारक मंगळ ग्रह देखील तपाचरण प्रगतीला साथ देऊ

शकतो. पंचम स्थानावरून धर्म, मंत्रशास्त्र, प्रगती, नवम स्थानावरून धार्मिक आचार, दशमावरून कृती, तपाचरण तर व्ययस्थानावरून मात्र परलोक प्राप्ती, मोक्ष आणि ईश्वरोपासना पाहिले जाते. मोक्ष प्राप्तीकरिता गुरू ग्रह पाया असला तरी देखील कळसापर्यंत पोहोचण्यासाठी मात्र 'शनि' आवश्यक असतो.

## अध्यात्म योग अन बाबा महाराज आर्वीकर

आजच्या लेखात संत श्रेष्ठ, मोरेश्वर प्रभाकर जोशी ऊर्फ बाबा महाराज आर्वीकर सद्‌गुरू म्हणून कसे थोर अधिकारी पुरुष होते; आणि त्यांनी लिहिलेल्या 'दिव्यामृतधारा' तसेच 'साधनासंहिता' आणि 'माचणूरचे हृदगत' या ग्रंथांतून त्यांचे श्रेष्ठत्व दिसून येते. त्यांच्या जीवनात संत श्रेष्ठ तुकडोजी महाराजांचा सहवास घडला, पुंडलीक महाराज यांचा सत्संग त्यांना लाभला. यती महेश्वरानंदांची भेट झाली. तर त्यांची प्रत्यक्ष औढ्यानागनाथाने परीक्षाही घेतली. नाशिकच्या पंचवटीत त्यांनी गायत्री पुरश्चरण केले. गाडगे महाराज यांचा सत्संग त्यांना लाभला. ओंकारेश्वराला त्यांना भगवान दत्तात्रेयाचे दर्शन झाले आणि मंत्रही मिळाला. अशा या बाबा महाराज आर्वीकरांचे पत्रिकेत असे कोणते ग्रहयोग होते की त्यांना अध्यात्माच्या विविध मार्गांकडे ओढले गेले. अनेक यतींच्या भेटीचे योग आले तेच आपण आता पाहाणार आहोत.

## बाबा महाराज आर्वीकर यांची जन्मकुंडली

जन्म दिनांक - ३ ऑगस्ट १९२५, जन्म वेळ - संध्याकाळी ६-३०, जन्म स्थळ = आर्वी (इंडिया), रास = मकर, उत्तराषाडा - नक्षत्र, तिसरे चरण, तिथी = श्रावण शुद्ध १४, शके १८४७







नवमांश कुंडली

## जन्म कुंडलीचे स्पष्ट विवरण

वरील जन्म कुंडलीचे अवलोकन करता बाबा महाराज आर्वीकर यांच्या मकर लग्नाचे कुंडलीत लग्नी चंद्र असून पंचमेश शुक्राचा व्ययेश गुरु ग्रहाबरोबर मात्र 'नवपंचम' योग आहे. त्यामुळेच त्यांना ईश्वर भक्तीची ओढ निर्माण झालेली होती. या शिवाय सदर कुंडलीत शनि-गुरूचा शुभ योग असून शनीची गुरूवर दृष्टी आहे. शिवाय गुरू धनेत व शनि शुक्र राशीत असल्यामुळेच (उच्च राशीत) अध्यात्म देवाण घेवाण दृष्टीने हे योग पूरक आहेत. जन्म कुंडलीत १, ५, ९ स्थानीचे ग्रह अध्यात्म प्रगतीला उत्तम असतात. लग्नी मकरेचा चंद्र केतू असून चंद्र-हर्षल लाभ योग आहे. चतुर्थेश मंगल-बुध शुक्र बरोबर असून त्याचा गुरू बरोबर नवपंचम योग आहे; त्यामुळे अध्यात्माच्या प्रगतीत उत्तम अशी पुष्ठी मिळालेली आहे. अष्टमेश रवि चंद्र केतूची मात्र प्रतियोगात असून रवि-राहूची कर्केत अंशात्मक युती आहे. चंद्र, बुध, शुक्र नामस्मरणाला योग्य असतात तेव्हा बाबांच्या कुंडलीत पंचमेश शुक्र बुधाचे युती योगात असून गुरूचे अंशात्मक नव पंचम योगात आहे तर शुक्र आणि बुधाचा शनीशी लाभ योग झालेला आहे.

## बाबांना अनेक विभूतींचे दर्शन झाले

वरील योगामुळेच नामस्मरण, नित्योपासना यात कधीच खंड पडला नाही. गुरु ग्रहाची देखील बुध-शुक्रावर दृष्टी आहेच. चंद्राचा हर्षलची लाभ असून रवि हर्षल नवपंचम योगात आहे. त्यामुळे बाबांना परमार्थाचे प्रगतीत अडथळे आले नाहीत तर उलट यती महेश्वरानंद, शंकराचार्य, योगीपुरुष सीताराम महाराज, नागासाधू मौनीबाबांचे दर्शन घडले. त्यांच्या जीवनात उज्जयनीत महांकाळेश्वर दर्शनाबरोबरच तपे बाबांकडून मंत्रशास्त्राचा अभ्यास झाला. उत्तर काशीत ब्रह्मेंद्रनाथांकडून प्राणविद्या मिळाली. व्ययस्थानी धनु राशीचा गुरू असल्यामुळेच कैलास, बद्रीनाथ, केदार येथे वास्तव्य करण्याचा योग आला. सन १९५४ चे दरम्यान एका वटवृक्ष मंदिरात एक सप्ताहभर प्रवचन झाले. अक्कलकोट येथे मठाजवळच्या दर्ग्यात प्रसाद प्राप्ती झाली. पुढे कानिफनाथांच्याच आदेशाने मढीला जाण्याचा आदेश स्वीकारतानाच जीवनाथ, नाथ स्वामी भेट झाली आणि पुढे मात्र अक्कलकोट, सोलापूर आणि माचणूर अशी भटकंती करीत असतानाच माचणूरचे सिद्धेश्वर मंदिर, नदीचा प्रशस्त मार्ग, घाट आणि भीमेचे चंद्रकोरी असे पात्र त्यांना आवडल्याने त्यांनी येथेच वास्तव्य केले.

## बाबांची भगवत गीतेवरील प्रवचने

माचणूर येथे आल्यावर मात्र त्यांनी भक्तियोगावर प्रवचनाला सुरुवात केली. प्रवचनासाठी त्यांनी गीतेच्या बाराव्या अध्यायातील पुढील श्लोकांवर मात्र सात प्रवचने दिली.

*'मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।*
*श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥'*

बाबांनी पुढे तुलसी रामायण आणि ज्ञानेश्वरीवरील असंख्य प्रवचने केली. सन १९५६ मध्ये ज्या वेळी बाबा श्रीक्षेत्र आळंदीस आले होते, त्यावेळी तेथील वास्तव्यात बाबांनी प्रवचनाबरोबरच 'साधना संहिता' हा एक आत्मानुभव सिद्ध ग्रंथ लिहिला. या ग्रंथातील लेखात ज्ञानेश्वरीतील अध्याय ६ मधील पुढील ओव्यांची सत्यता देखील पटून येते.

*'तैसी दशेची वाट न पाहता । वयसे थिया गांवा न येता ।*
*बाळपणींच सर्वज्ञाता - । वरी तयातें - ॥४५३॥*
*तिये सिद्धप्रज्ञेचे नि लाभे । मनचि सारस्वते दुभे - ।*

*मग सकळ शास्त्रे स्वयंभे । निघती मुखे ॥ ४५४॥*

बाबांनी ज्ञानेश्वरीच्या १२ व्या अध्यायातील पुढील ओवीवर एक सप्ताहभर प्रवचने केली.

***'तैसे सर्वक्रियासहित । मजमाजि सूनि चित्त ।***
***जे रातिदिनो न म्हणत । उपासिती — ॥'***

बाबांची नवमांश कुंडली पाहताना देखील पुढील गोष्टी दिसून आलेल्या आहेत. त्या अशा बुध आणि शुक्र हे ग्रह पंचमात सिंहेचे आहेत म्हणजेच ते नवमांशात वर्गोत्तम झालेले आहेत. भाग्य आणि व्यय स्थानाधिपती गुरू शुक्राच्या तूळ राशीत राहू बरोबर असून त्यांना शनि चंद्राबरोबर नवपंचम योग झालाय. पंचमेश रवि हा गुरूचे धनु राशीत असून त्याचा शनि चंद्राबरोबर शुभ योग असून गुरूशी लाभ योग तर मंगळ, बुध, शुक्र आणि रवि बरोबर नवपंचम योग करीत आहे. गुरू, नेपच्यून कोणताही योग हा उपासना, अध्यात्म दृष्टीने उत्तम असतो तो योगही त्यांचे कुंडलीत आहे.

### ज्ञानेश्वरी हे खरे ह्रदयाचे क्षेत्र आहे

बाबा महाराजांनी ज्ञानेश्वरीच्या १२ वे अध्यायावर प्रतिपदटीका लेखन करताना ज्ञानेश्वर दर्शनाचे खरे द्वैताद्वैत विलक्षण भक्तीचे, सामरस्य सिद्धान्त रहस्य व श्रेष्ठत्व एका वाक्यात ग्रथित केले आहे. ते म्हणतात, 'ज्ञानेश्वरीचा भक्तिपंथ हा मोक्षाच्या वाटेवरून वैकुंठाच्या पीठास जाणार नाही तर मोक्षाचा अधिपती जो भगवंत त्यासच वैराण वाळवंटी नाचण्यास येण्यासाठी आखलेला तो पंथ आहे.' बाबा महाराज आपल्या प्रवचनात तर नेहमी सांगायचे, 'ज्ञानेश्वरी हा दीपस्तंभ आहे, तो सहज स्थितीचा पर्याय आहे. ते बुद्धीचे क्षेत्र नसून ह्रदयाचे क्षेत्र आहे. साहित्याच्या पेटीतला शृंगार नसून साहित्याची पेटी ज्ञानेश्वरीत लपविलेली आहे. ज्ञानेश्वरीत चित्स्पर्श आहे, तो जीवाचा स्वतंत्र अनुभव आहे, ज्ञानेश्वरी प्रेमळ माऊली आहे, आईचे बोल लेकराला कळणारच, तेव्हा आपण फक्त ज्ञानेश्वरीचे मूल होऊन बसावे; मग ज्ञानेश्वरी कुणालाही कळेल.'

### बाबांचे माचणूरला महानिर्वाण

अशा प्रकारे ज्ञानेश्वरीमय झालेल्या बाबांचे मार्गशीर्ष पौर्णिमा, शके १८९३, गुरुवारी सकाळी (२ डिसेंबर १९७१) ९-२० वाजता माचणूर येथे महानिर्वाण झाले.

**ज्योतिष भास्कर / मंत्रशास्त्रज्ञ — पंडित हिंगे**
अमरबाग सोसायटी ई/१३ गाडीतळ, हडपसर, पुणे ४११०२८.
दूरभाष - (०२०) २६९९०४३५

***कार्य ही स्वभावसिद्ध नैसर्गिक प्रक्रिया आहे. दुधाचे दही होणे, झाडाला फुले-फळे येणे हे कार्य आहे. पण कर्म हे अहंकारामुळे निर्माण होते. सोन्याचा अलंकार करणे हे कर्म आहे. कर्मात मूळ वस्तूचे गुणधर्म बदलत नाहीत. जसे अलंकारात सोन्याचेच गुणधर्म असतात. पण कार्यात मात्र ते गुणधर्म बदलून जातात. दह्यात दुधाचेच गुणधर्म राहात नाहीत.***

## कल्याणी

*साधुसंतांचे वरदान आमुच्या न्यासाला,*
*झाला प्रारंभ ''कल्याणी'' मासिकाला,*
*लोकसंग्रह न्यासाला मिळाला अव्याहत,*
*त्यामुळे चालना मिळाली सतत,*
*सज्जनांची मिळाली संगत,*
*म्हणूनी देवाने दिला हात,*
*सांगा हो सांगा कसे घडत गेले*
*म्हणूनी मला हे काव्य स्फुरले*
*''कल्याणी'' चे हे चौदाव्या वर्षात पदार्पण,*
*म्हणूनी मी हे केले काव्य देवाला अर्पण*




**कमलाबाई सातवळेकर**



# श्री संत बाबामहाराज आर्वीकरांचे श्रीक्षेत्र माचणूर


**श्री. अरविंद बा. बीडकर**

*मेकॅनिकल ड्राफ्टस्मन. केंद्रीय नागरी संरक्षण खात्यातून मुख्य ड्राफ्टस्मन म्हणून सेवानिवृत्त. प. पू. नानामहाराज तराणेकर (इंदूर) त्रिपदी परिवार पुणे शाखा सदस्य व प्रतिनिधी. शांतिपुरुष, आदिमाता, श्रीअक्कलकोट स्वामी [illegible] भूषणराज, सा. विवेक, भालचंद्र, रोहिणी इत्यादींमध्ये लेखन.*


भीतिग्रस्त माणसांच्या मनाला, भक्तिमार्गाने सदाचारसंपन्न करून, त्यांच्या प्रपंचात नैतिक बळ देऊन, त्यांची परमार्थाची वाट सुकर करून, समाज सुधारणेचे कार्य संत करतात. त्यासाठी संत, वैयक्तिक पुण्याची वाटचाल, स्वतः खडतर साधनांद्वारे प्राप्त करून, अंतिम दृष्ट्या सामाजिक पुण्याच्या साध्यासाठी ते आपला देह झिजवितात. सामान्य आणि संत ह्यांच्यामध्ये अजून एक मूलभूत फरक आहे. सामान्य माणूस आपली स्वतःची वैयक्तिक वर्तमान आर्थिक स्थिती लक्षात घेऊन भविष्यासाठी एक कायम स्वरूपी निवासासाठी गाव बघतो आणि आपले स्वतःचे कर्तृत्व, अहंकार मनात न ठेवता, समाजात उगाळत असतो. त्यासाठी त्याचे जन्मगाव वा कार्यकर्तृत्वस्थान ह्यांपैकी कोणत्यातरी गावी, कोठेतरी कायम स्वरूपी रहाण्याचा तो सतत विचार करतो. विचार बोलून दाखवीत असतो. प्रत्यक्षात आचरणातही तो आणतो.

परंतु संत आपल्या कार्याची दिशा मनोमन पक्की करतात. त्यासाठी करत असलेल्या वा करणार असल्याच्या कार्याबाबत ते मौन बाळगतात. जेव्हा त्यांचा महाकाळ येतो. तेव्हा त्याचा ते स्वतःहून स्वीकार करतात. त्यामुळे तो दिवस, ती तिथी 'पुण्यतिथी' होते. त्यांच्या वास्तव्याने, कर्तृत्वाने पावन झालेली भूमी, ते गाव, ते स्थान मात्र 'श्रीक्षेत्र' बनते. ह्या बाबत आद्य शंकराचार्यापासून आतापर्यंतची अनेक उदाहरणे देता येतील. आधुनिक काळातील उदाहरणांमध्ये, कोकणातील माणगावच्या 'टेंबे स्वामींचे' क्षेत्र झाले, गुजराथमधील 'गरुडेश्वर' तर गुजरातच्या 'गांडा महाराजांचे' क्षेत्र महाराष्ट्रातील परभणी जवळच्या गोदाकाठीचे 'गुंज'. तसेच कोकणातील संगमेश्वरच्या 'रंग अवधूतांचे' क्षेत्र गुजराथच्या 'नारेश्वर'चे. असो. ह्या अशा अनेक संतांच्या वास्तव्यावरून जसे 'गोंदावल्याचे गोंदावलेकर महाराज, अक्कलकोटचे श्रीस्वामी समर्थ, शेगावचे गजानन महाराज, शिर्डीचे साईबाबा इ. त्या त्या क्षेत्राला त्यांचे नाव कायमस्वरूपी लागते. अशाच अनेक संतांच्या नामावलीत विदर्भातील, वर्धा जिल्ह्यातील 'आर्वी' येथे जन्मलेले श्री. मोरेश्वर प्रभाकर दुचक्के-जोशी हे आत्मसाक्षात्कारी सत्पुरुष 'श्री संत बाबामहाराज आर्वीकर श्रीक्षेत्र माचणूर' नावाने प्रसिद्ध झाले.

माझे सद्गुरू प. पू. श्री समर्थ नाना महाराज तराणेकर (इंदूर, मध्यप्रदेश) म्हणतात 'संत महात्मे यांचे जीवन अस्तित्व म्हणजे केवळ संतोषाचे उत्सर्जन, उपासना मार्गातील अन्य सर्वसाधारण उपासकांना, संत महात्म्यांचा चिन्मय सहवास लाभावा. चिन्मय मार्गदर्शन मिळावे यासाठीच संतांची जीवनचरित्रे कार्य करीत असतात. संत देहाने जरी नसले तरी तळमळीच्या साधकांना ते प्रत्यक्ष आहेतच. मानवी देहांत आलेल्या ईश शक्तीने, मानवी देहाचे नियम पालन करण्यासाठी केवळ देहाची खोळ टाकून दिली आहे. संतांचे अस्तित्व, त्यांच्या वास्तव्याने पावन झालेली भूमी त्यांची समाधिस्थाने ही सर्व चिन्मय, सर्वदा मार्गदर्शक, सर्वदा बोलकीच.'

श्रीक्षेत्र माचणूर, ता. मंगळवेढा, जि. सोलापूर ह्या खेडेगावात श्रीस्वामी समर्थांच्या आदेशामुळे प. पू. बाबामहाराजांचे आगमन झाले. आजही 'तीन-चारशे मातीच्या भिंती असलेल्या व शेणामातीने सारवलेल्या घरांचे गांव' हे आहे. पुरातन गावाची साक्ष देणारी, ढासळलेल्या किल्ल्याची तटबंदीची भिंत नदीच्या कडेकडेने पसरलेली आहे. पंढरपूर मार्गाने, संत दामाजीपंतांच्या मंगळवेढे इथून, माचणूर १४ कि.मी. आहे. तर सोलापूरहून तिर्‍हे-बेगमपूर मार्गाने माचणूर ४१ कि.मी. आहे. दोन्ही मार्गांवरून महाराष्ट्र राज्य परिवहन मंडळाच्या प्रवासी गाड्या सारख्या चालू असतात.

माचणूरचे प्राचीन नाव 'हरिहर-क्षेत्र'. नीरा नरसिंगपूर ते पंढरपूर पर्यंतचा भीमाकाठ हा प्राचीन 'हरिक्षेत्र' परिसर. तर पंढरपूर-सरकोली-माचणूर-सिद्धापूर हा भाग 'हर क्षेत्र' म्हणून प्रसिद्ध. माचणूरला हरिहर मिलन झाले म्हणून 'हरिहर-क्षेत्र' म्हटले गेले. पंढरपूरप्रमाणेच चंद्रकोरी-सारखी वळण घेऊन वाहणारी भीमा म्हणजे चंद्रभागा नदी येथील ब्रह्मपुरी-माचणूर-बेगमपूर दरम्यान चंद्रकोरीच्या आकारांत वाहत, येथून पुढे गाणगापूरला जाते. माचणूरचे सिद्धेश्वर महादेव मंदिर, नदीकडे जाण्याचा प्रशस्त मार्ग, घाट, भीमेचे चंद्रकोरी निसर्गरम्य भरलेले पात्र व नाथपंथाचे पुरातन प्राचीन ठाणे असल्याची 'जाणीव' झाल्याने प. पू. बाबा महाराजांनी येथे वास्तव्य केले. मात्र त्यांच्या कायम वास्तव्यामुळेच माचणूर स्थान पुन्हा तीर्थक्षेत्र म्हणून प्रकाशात आले. येथे असलेल्या श्रीकाशिनाथ महाराजांच्या समाधिस्थानाजवळून भारताची मध्य 'भूगर्भ-रेषा' जाते. या ठिकाणी गुरुत्वाकर्षण शक्ती जास्त असते. त्यामुळे साधना करणाऱ्यांचा सत्त्वगुण जास्त वाढतो. हेही प. पू. बाबा महाराजांनी सिद्ध करून दिले. विशेष म्हणजे आद्य शंकराचार्यांनीसुद्धा विदर्भातील एका स्थानी, अशाच एका विभागणाऱ्या भूमध्य भूगर्भ रेषेवर शिवलिंग स्थापन केले असून ते स्थान 'मध्यमेश्वर मंदिर' नावाने प्रसिद्ध आहे.

श्री सिद्धेश्वर मंदिराच्या डाव्या बाजूकडील पडवीत महाराज प्रथम आले व श्री काशिनाथ महाराजांच्या समाधी जवळील ओवऱ्या साफ करून ते राहू लागले. महाराजांची तुळशीरामायण व ज्ञानेश्वरीवरील माचणूरांतील चातुर्मासांत झालेली प्रवचने व चातुर्मास समाप्ती उत्सव पाहून माचणूरच्याच धार्मिक प्रवृत्तीच्या श्रीमती तुकाबाई डोके ह्यांनी समाधिस्थानापासून रस्त्यापर्यंत असलेली जागा, सुमारे चार एकर पू. बाबा महाराजांना दान दिली. त्या जागेत प. पू. बाबांचा 'मोक्षधाम' नावाचा आश्रम आहे की

ज्याचे पूर्वी 'आनंदधाम' नाव होते. प. पू. बाबांच्या पुण्यतिथीस, म्हणजे दत्तजयंतीस 'साधना महोत्सव' नावाने येथे 'धर्मोत्सव' होतो. ह्या व्यतिरिक्त पू. बाबांनी घालून दिलेल्या शिस्तबद्ध आखणीप्रमाणे नित्यनैमित्तिक कार्यक्रम कायम स्वरूपी आश्रमात चालू असतात.

श्री सिद्धेश्वर महादेव मंदिर हे पुरातन जागृत देवस्थान असून त्याची बांधणी हेमाडपंथी आहे. भोवताली संरक्षक तटबंदी असून प्रवेश कमानीच्या आत डाव्या बाजूस श्री मल्लिकार्जुन मंदिर आहे. श्री गोरक्षनाथांनी स्थापन केलेले एक गुप्त वज्रलिंग येथे आहे. भीमा नदीस घाट असून पात्रांत श्री जटाशंकरांचे मंदिर आहे. सुमारे दीडशे वर्षांपूर्वी अक्कलकोटच्या स्वामी समर्थांचे काही काळ माचणूरला वास्तव्य होते. त्यांनी सिद्धेश्वर मंदिरात नंदीच्या मागे स्थापन केलेल्या भगवान श्री दत्तात्रेयांच्या पादुका आहेत. तसेच भीमा नदीच्या पाणवठ्याजवळील छोट्याशा उंचवट्यावर स्वामी समर्थांनी स्थापन केलेल्या अष्टभूजा देवीची मूर्ती असलेले मंदिर आहे. 'मोक्षधाम' आश्रमांच्या जागेत श्री काशिनाथ महाराज-पूर्वी काशीहून आलेले शिवभक्त संन्यासी – यांची समाधी असून त्यावर पूर्वाभिमुख शिवलिंग आहे.

पुरातन नाथपंथीय क्षेत्र असलेल्या माचणूरच्या पंचक्रोशीत अर्धनारी-नटेश्वराचे 'अर्धनारीत' मंदिर आहे. ''उचिठाण - उच्चस्थान' या टेकडीवर अनेक यज्ञ झाले. त्या यज्ञवेदीतील भस्म आजही श्रीसिद्धेश्वर महादेवाच्या पूजेसाठी आणले जाते. 'बठाण - अवस्थान' येथे यज्ञकालांत सिद्ध महात्म्यांचा निवास असे. 'बेगमपूर - घोडेश्वर' येथे प्राचीन काळातील परमहंस स्वामी नावाच्या सत्पुरुषाची नदीकाठी समाधी असून त्यांच्या पादुका श्री. जहागिरदार घराण्यात पूजेत असून वंशपरंपरेने चालत आलेल्या आहेत. स्वामी नदीच्या प्रवाहावर घोंगडी पसरून त्यावर बसून माचणूरला श्रीसिद्धेश्वरांच्या दर्शनास येत असत असे तेथे सांगितले जाते. 'सिद्धापूर' या गावी चंद्रभागेच्या प्रवाहात गणपती असून किक्रांतीस म्हणजे मकर संक्रांतीच्या दुसऱ्या दिवशी त्या मूर्तीचे दर्शन होते. त्या दिवशी गावात मोठी यात्रा भरते.

अशा या क्षेत्र माचणूर येथे, आपल्या मागे पीठ वा गादी न ठेवता प. पू. बाबा महाराजांनी नाथसंप्रदायाची - 'शिवभक्ती' हे परम उद्दिष्ट असलेला हा एकेश्वरवादी संप्रदाय असून शिव ही त्यांची उपास्य देवता आहे. जे पिंडात तेच ब्रह्मांडात आहे. जीवनातील चैतन्याने विश्वचैतन्याशी एकरूप होऊन 'सामरसीकरण' साधले पाहिजे असे या संप्रदायाचे तत्त्वज्ञान आहे. भक्तीप्रधान, विचारधारा, सामूहिक ध्यान, सामूहिक प्रार्थना या उपासनात्मक कार्यक्रमांद्वारे देऊन समाजाला उपकृत करून ठेविले आहे.

प. पू. बाबामहाराज आर्वीकर ह्यांच्या, श्री क्षेत्र माचणूर येथील स्थानाला आणि पवित्रोत्तम स्मृतीस शतशः प्रणाम.

(संदर्भ श्री. वि. श्री. फणसळकर यांच्या 'श्री संत बाबामहाराज आर्वीकर दिव्य जीवन दर्शन' पुस्तकाच्या आधारे, साभार.)

**श्री. अरविंद ना. बीडकर**

४ जयति, संगमनगर, पद्मावती, पुणे ३७. फोन : २४२११२०७

***साधुसंतांची सगुणोपासना हा मोठा मार्मिक विचार आहे. व्यक्त व अव्यक्त अशा दोन रूपांनी असणाऱ्या परमात्म्याचे भजन एकाच वेळी करावयाचे झाल्यास, सगुणच भजले पाहिजे असा संतांच्या गांवचा अनुभव आहे. कारण सगुणाच्या ठायी निर्गुणाचे वास्तव रूप असतेच II***

## ॥ ॐ ॥
## ॥ श्रीगुरुदेव ॥

सद्गुरुनाथा तुझिया नयनी ।
ब्रह्मठसा देखिला ।
देखिला ब्रह्मठसा देखिला ॥ धृ. ॥

ज्ञानेशांची खूण मला ती ।
दिसली तुझिया नयनी ।
ओळख पटली तूंच असशी तो ।
सद्गुरु ब्रह्मज्ञानी ।
शतजन्मांच्या पुण्याईने क्षण भाग्याचा आला ॥१॥
देखिला ब्रह्मठसा देखिला ॥धृ.॥

गंगा वाहे वात्सल्याने कारुण्याने भिजूनी ।
प्रेमाचा तो पूर वाहतो तुझिया नेत्रांमधुनी ।
तेजोमय त्या कृपादृष्टीने धन्य करी मजला ॥२॥
देखिला ब्रह्मठसा देखिला ॥धृ.॥

भक्तांसाठी भवसागरी या ।
मंथन ते करूनी ।
अखंड विलसे शांभवी मुद्रा ।
स्वयें विष प्राशुनी ।
कुंभ अमृताचा भरूनी ओसंडत राहिला ॥३॥
देखिला ब्रह्मठसा देखिला ॥धृ.॥

निर्गुणाचे वैभव मिरवी ।
तुझे सगुण रूप ।
भक्तीप्रसाद रसकल्लोळी ।
तुझेचि रे स्वरूप ।
चंदनाच्या चरणाशी चैतन्याचा स्पर्श मला जाहला ॥४॥
देखिला ब्रह्मठसा देखिला ॥धृ.॥

भव्य दिव्य ते स्वरूप पाहुनी ।
मन माझे मोहिले ।
जीवदशेच्या मम ज्योतीला ।
तव कृपे उजळिले ।
तुझ्या दर्शनामधुनी साक्षात् परमात्मा भेटला ॥५॥
देखिला ब्रह्मठसा देखिला ॥धृ.॥

**श्री. अप्पा दिवेकर,**
मुंबई



# गीताप्रबोध - एक अपूर्व निरूपण


## कै. डॉ. व. दि. कुलकर्णी

एम.ए. पीएच.डी. १६ वर्षे ३ महाविद्यालयांत प्राध्यापक. निवृत्त विभाग प्रमुख, मुंबई विद्यापीठ १२ वर्षे. ग्रंथसंपदा समीक्षा-महानुभाव पंथ, अर्वाचीन वाङ्मय इतिहास, चरित्र, आत्मचरित्र इत्यादी. पुरस्कार – महाराष्ट्र राज्य पुरस्कार, इचलकरंजी फाऊंडेशन, अखिल भारतीय महानुभाव परिषद, मुंबई. मराठी साहित्य संघ, महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, मराठी ग्रंथालय पुणे, कालिका प्रकाशन, वडगांव, यामुनाचार्य आश्रम पुणे इ. संत वाङ्मयाचे अध्ययन


'गीता प्रबोध' या श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर यांच्या ग्रंथास कै. डॉ. व. दि. कुलकर्णी यांची लाभलेली प्रस्तावना.

ब्रह्मीभूत प. पू. श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर हे एक साक्षात्कारी थोर महात्मा होऊन गेले. पण वाङ्मयरूपाने ते आपणा सर्वांसाठी सदैव आपल्या सन्निध आहेतच. त्यांचा श्रीज्ञानेश्वर माऊली यांच्या ज्ञानेश्वरीवरील प्रतिपद टीका करणारा 'दिव्यामृतधारा' हा ग्रंथ, भागवत संतांचे तत्त्वज्ञान आणि हृदय उलगडून दाखविणारा एक विलक्षण ग्रंथ आहे. स्वतः ज्ञानेश्वर होऊनच जणू तो ग्रंथ त्यांच्या दिव्यानुभूतीतूनच अवतरला आहे, असे पदोपदी जाणवते. ज्ञानेश्वरी ही भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनास सांगितलेल्या श्रीमद् भगवद्‌गीतेची प्रतिपद टीका आहे. बाबामहाराज यांनी मूळ भगवद् गीतेवरच प्रस्तुत 'गीताप्रबोध' हा ग्रंथ लिहिला आहे. हा ग्रंथही अभ्यासकांना आणि जिज्ञासू भक्तांना अभूतपूर्व स्वरूपाचाच प्रतीत व्हावा असा आहे.

'गीताप्रबोध' हा ग्रंथ तसा लिहिलेला नाही. तो बाबांनी आपल्या भक्ताला पत्राद्वारे उत्स्फूर्तपणे, अखंडपणे 'सांगितलेला' आहे. पत्ररूपातील गीतार्थ-कथन असे हे पाहिलेच असावे. त्यात केवळ गीतेच्या प्रत्येक पदाचा अर्थच सांगितलेला आहे, असे नाही तर गीतेचे रहस्यच त्यांनी उलगडून दाखवले आहे. या कथनाचा विशेष असा की ज्या भक्ताला हे सांगितले आहे, तो बाबांचा एकनिष्ठ भक्त आहेच, पण बाबांनी हा भक्त मातृस्थानी मानलेला आहे. आपल्या भक्तरूप माऊलीला, एक साक्षात्कारी, ज्ञानी बालक, ब्रह्मविद्या विशद करून सांगत आहे, असा काही विलक्षण योग येथे घडून आला आहे. काकूमाँ (विमलाबाई पुरोहित) यांच्यापुढे बाबा पुत्ररूपाने उभे असत आणि त्या दोघांतील वत्सल भाव केवळ दैवी स्वरूपाचा असे. त्या मातेसाठी बाबा 'गीता' सोपी करून सांगत आहेत. आचार्य विनोबाजींनी आईला 'गीता' कळावी म्हणून ती सोप्या, सुंदर रूपात 'गीताई' म्हणून आपणा सर्वांच्या हाती दिली, तीच गोष्ट या पत्ररूप 'गीताप्रबोध'च्या कथनाची आहे.

मुळात 'गीता' ही भगवंतांनी अर्जुनाला सांगितलेली ! तो संवादच आहे. 'गीताप्रबोध' प्रत्यक्ष काकूमाँ आणि बाबा यांच्यातील संवाद नाही, पण त्याचे कथनच इतके प्रेममय आणि मधुर आहे की, श्रोता-वक्ता यांच्यात भेदच उरलेला नाही. या कथनातील ही प्रेममयताच स्वतंत्रपणे आस्वाद्य आहे. बाबा एक पत्र लिहितात. पत्राची मर्यादा संपते पण विषय चालूच असतो. दुसरे लगेच पत्र लिहायला बसतात. त्याची मर्यादा संपते आणि विषय चालूच असतो. अशी पत्रांमागून पत्रे दिवसानुदिवस बाबा लिहितात आणि गंगौघाप्रमाणे गीताप्रवाह अखंडपणे आपल्या गतीने आणि विस्ताराने चालू राहतो. हा 'गीताप्रबोध' ग्रंथ म्हणजे प्रवाही, मुक्त पण समृद्ध असे कथन आहे. त्यात गंगेची पवित्रता आणि पावकता तुडुंब भरून राहिली आहे.

बाबांनी गीतेच्या पहिल्या अध्यायापासूनच प्रबोधनाला प्रारंभ केला आहे. त्यांनी पहिला अध्याय वर्ज्य मानलेला नाही. उलट पहिल्या अध्यायाचे प्रयोजन किती मूलभूत आणि पुढील तत्त्वदर्शनास अखंड प्रेरक कसे ठरले आहे, हे त्यांनी विविध अंगांनी सुस्पष्ट केले आहे. कुरूक्षेत्रावरील अर्जुन नेमका काय भावावस्थेत आहे हे समजल्याशिवाय गीतेतील ब्रह्मविद्येचे आणि कर्म - ज्ञान - भक्ति - योगाचे रहस्य ध्यानी येणार नाही. मूळ गीतेत पहिल्या अध्यायाचा 'पुष्पिकेमध्ये' 'अर्जुनविषादयोग' म्हटले आहे. बाबांनी त्यास 'विषादयोग' न म्हणता 'आवरणयोग' म्हटले आहे. हे आवरण कोणते आणि कसे स्वतःला फसवणारे आहे, हे बाबांनी अर्जुनाच्या भावस्थितीचे सूक्ष्म विश्लेषण करून आपल्या निदर्शनास आणले आहे. विश्लेषणाची ही शैली अती खेळकर आणि प्रसन्न आहे. हा अर्जुन किंबहुना 'अर्जुनातला अर्जुन' अखंड डोळ्यांपुढे ठेवून बाबांनी 'गीताप्रबोध' सांगितला आहे. आपण सारे जीवनक्षेत्रातले असेच संभ्रमित, किंकर्तव्यमूढ झालेले व्याकूळ अर्जुनच आहोत. मुळात अर्जुनाच्या निमित्ताने आणि आता काकूमाँच्या निमित्ताने आपणा सर्वांना हा 'गीताप्रबोध' लाभला आहे.

'गीता' हा ग्रंथ केवळ वैदिक सनातन हिंदू धर्माचा प्रातिनिधिक ग्रंथ नाही. तो अखिल विश्वाचा, मानवजातीचा ग्रंथ आहे. शुद्ध दृष्टीने त्या ग्रंथाकडे पाहता आले पाहिजे. 'गीते'वरती वेगवेगळ्या देश - काल - परिस्थितीमध्ये टीका लिहिल्या गेल्या आहेत; आणि गीतेने देश - काल परिस्थितीनुरूप अर्थही दिलेले आहेत. गीताग्रंथ हा बहर्थप्रसवी ग्रंथ आहे. ही अर्थनिरूपणे कधी कधी परस्परविरोधीही असल्याचे दिसून येते. पण त्यामुळे गीतादर्शन दूषित होत नाही. तिचा अर्थविस्तार आणि अर्थवत्ताच उलट प्रकर्षाने प्रतीत होते. केवळ मराठीतील अर्वाचीन टीकाग्रंथ घेतले तरीसुद्धा त्यातही ही अर्थविविधता स्पष्ट जाणवते. लो. टिळकांचे 'गीतारहस्य' 'ज्ञानमूलक - भक्तिप्रधान - निष्काम कर्मयोगा'चे तत्त्व प्रतिपादन करते. म. गांधी 'अनासक्तियोगा'चे गीत - सूत्र, गीतारहस्य म्हणून सांगतात. प. सातवळेकर गीतेला 'पुरुषार्थ प्रबोधिनी असेच संबोधतात आणि पुरुषार्थ, पराक्रम, विजीगिषू वृत्ती पुरस्कार 'गीता' करते असे सांगतात. याआधी सतराव्या शतकात (इ. स. १६८० मध्ये) आनंदवर्धन यांनी 'गीता' कर्मपर आहे, हे निःसंदिग्धपणे आपल्या 'आनंदवर्धिनी' या गीता-टीकेत विशद केले आहे.

योगी अरविंद यांनी गीतेवर अत्यंत सूक्ष्म, खोल व तत्त्वविश्लेषणात्मक निबंध-लेखन केले आहे. त्यामध्ये गीतेच्या शिकवणीचे सार म्हणून ते सांगतात, '१) पहिली कर्मयोगाची पायरी चढत असता, साधकाने यज्ञ-

बुद्धीने, निःस्वार्थतेने कर्म करावयाचे असते. या पायरीवर कर्म केलेच पाहिजे, असा गीतेचा आग्रह आहे. २) दुसरी पायरी ज्ञानयोग. येथे आत्मसाक्षात्कारावर, आत्मा आणि विश्व यांच्या खऱ्या स्वरूपाच्या ज्ञानावर 'गीता' जोर देते, तरीपण येथे कर्मयज्ञ चालू राहतो, ज्ञानमार्गाशी कर्ममार्ग या पायरीवर मिळून जातो, पण ज्ञानमार्गात तो लुप्त होत नाही. ३) शेवटची पायरी भक्तियोगाची. येथे परमात्मा ईश्वराच्या स्वरूपात पूजेचा आणि साधनेचा विषय होतो. येथे भक्तीवर जोर दिला जातो; तरीपण ज्ञानाला गौणत्व दिले जात नाही; त्याला उच्च स्थान देण्यात येते; त्यात प्राण भरला जातो; त्याची पूर्णता करण्यात येते. तसेच येथे कर्मयज्ञ चालू राहतो.' शेवटी निष्कर्ष म्हणून योगी अरविंद म्हणतात, 'पूर्वी, कर्म आणि ज्ञान असा, एकाच स्थानाला पोचवणारा दोन मार्गांचा जोडमार्ग होतो, तो आता कर्म - ज्ञान - भक्ती असा त्रिमार्गी होऊन, एकाच स्थानाला पोचवणारा तीन मार्गांचा जोडमार्ग साधकाला उपलब्ध होतो. येथे कर्मयज्ञाचे फळ - साधकापुढे साध्य म्हणून तीनही मार्गांत ठेवले जाणारे फळ - प्राप्त होते. ईश्वराशी ऐक्य, एकरूपता आणि त्याच्या सर्वश्रेष्ठ दिव्यशक्तीशी एकरूपता, एकता हे ते फळ होय.' (गीतेवरील निबंध खंड १, पृ. ४९-५०)

'गीता' हा कर्म - ज्ञान - भक्तिसमन्वयात्मक ग्रंथ आहे. बाबामहाराजांनी काकूमौंना पत्रातून जो 'गीताप्रबोध' घडविला तो समग्र गीताग्रंथाचा नाही. पत्रलेखनास प्रारंभ झाला तो ५.१.६३ या तारखेस आणि शेवटचे पत्रलेखन १४.४.६७ या तारखेचे आहे. यानंतर, बाबांनी पुढे देह ठेवला आणि 'गीताप्रबोध' हा पत्रात्मक ग्रंथ तेथेच समाप्त झाला. 'गीताप्रबोध' मध्ये गीतेचे पहिले दोन अध्याय संपूर्णपणे आले असून, तिसऱ्या अध्यायाचे पहिले सोळा श्लोक आलेले आहेत. यामुळे 'गीताप्रबोध' हा ग्रंथ एका दृष्टीने अपुरा ठरतो. पण तसे वाटण्याचे कारण नाही. बाबामहाराजांचा गीतेकडे पाहण्याचा दृष्टिकोण त्यात अभिव्यक्त झालेला आहे आणि त्यांची गीतेची बैठक सुदृढपणे मांडली गेली आहे. 'दिव्यामृतधारा' (खंड १) हा ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायातील पहिल्या एकोणीस ओव्यांवरील जरी असला, तरी तो समग्र ज्ञानेश्वरीला व्यापून टाकणारा, एक दिव्य दर्शन घडवणारा असा अधिष्ठानभूत ग्रंथ आहे. तीच गोष्ट 'गीताप्रबोधा'ची होय.

गीतेचे अभ्यासक – विशेषतः पाश्चात्त्य टीकाकार गीता अठरा अध्यायी मानत नाहीत. रूडॉल्फ ऑटो हे टीकाकार २ व ११ अशी दोन अध्यायीच गीता मानतात. काही पाश्चात्त्य अभ्यासक मूळ गीता ७०० श्लोकी न मानता २५० श्लोकाचीच मानतात. त्या २५० मध्येही मूळ सूत्रात्मक १३३ श्लोक आणि स्पष्टीकरणात्मक म्हणून ११७ श्लोक आहेत असे ते म्हणतात. काही अभ्यासक 'गीता' ही ११, १२ व ५ अशी तीन अध्यायीच असल्याचे सांगतात. हे सारे बाजूला ठेवले तरी पहिल्या तीन अध्यायांत, गीतेच्या जन्माचे कारण आणि त्यावरील आध्यात्मिक व तत्त्वज्ञानात्मक दर्शन व प्रत्यक्ष कृति-व्यवहार हा स्पष्ट झाला आहे. अ-स्थितमनस्क अर्जुन, पहिल्या अध्यायात येतो आणि स्थितप्रज्ञाचे समग्र दर्शन दुसऱ्या अध्यायात येते. त्याआधी आत्म्याचे अमरत्व येऊन जाते व स्थितप्रज्ञदर्शनानंतर 'ब्राह्मी स्थिती'चे निदर्शन होते आणि पुढे तिसऱ्या - चवथ्या अध्यायापासून कर्म, अकर्म, नैष्कर्म्य, विकर्म इत्यादींचा विचार सुरू होतो. अशा तऱ्हेने गीतेचे जन्मकारण, त्यावरील शाश्वत अध्यात्मविचार आणि प्रत्यक्ष आचारधर्म या एवढ्या भागातही पुरा होतो. बाबामहाराज समग्र गीतेचा आध्यात्मिक आणि धार्मिक आशय ध्यानात घेऊनच तेथे बोलत असल्यामुळे, हे लेखन मूळ प्रवाहाशी अलग न होता एकजीवच झालेले आहे.

बाबामहाराजांचे चिंतन हे स्वतंत्र आणि मोकळे आहे. 'भाष्यकाराते वाट पुसतु' ते गेलेले नाहीत. पण भाष्यकारांकडे त्यांनी डोळेझाक केलेली नाही. त्यांच्या अर्थदर्शनात स्वामी विवेकानंद, योगी अरविंद, आचार्य विनोबाजी यांचे संदर्भ येतात. तसेच डॉ. ॲनी बेझंट यांचे गीता-भाषांतर त्यांना मनापासून मान्य झालेले आहे. श्री जगद्‌गुरू आद्य शंकराचार्य यांचे गीताभाष्य तर आधारभूत आहेच. अमराठी 'भाषिक, उत्तर हिंदुस्थानी, विविध धर्मपंथीयांची गीताटीका त्यांनी आत्मसात केलेली आहे. संत कबीर आणि संत तुलसीदास यांचे संदर्भ त्यांच्या विवेचनात सहज येतात. गीतेच्या पदांचा अर्थ लावताना आणि त्यातील आशयाचा गाभा शोधताना, ते या सर्व अभ्यासकांना हाती घेतात, पण अखेर स्वतःस जे प्रत्ययास आले, अनुभवास आले, ते निःसंदिग्धपणे मांडतात. 'गीताप्रबोधा'त बाबामहाराज 'स्वमत'च बोलले आहेत.

प्रत्येक पदाचा म्हणजे मूळ शब्दाचा अर्थशोध घेण्याची त्यांची पद्धती 'दिव्यामृतधारा' या ग्रंथात आपणांस जी दिसून येते, तीच येथेही अनुभवास येते. शब्दार्थ, अंतरंग, शब्दसंकेत इ. संज्ञा येथे त्यांनी वापरलेल्या नाहीत. पण अर्थशोधनाची आणि निर्णयाची रीती तीच आहे. गीतेतील प्रत्येक शब्द, तीमधील संबोधनेसुद्धा साभिप्राय आहेत; हे बाबामहाराज आपल्या दृष्टोपत्तीस आणून देतात. अर्जुनाला 'अनघ' (अ. १५.२०) असे म्हणताना, त्यात भगवंताच्या मनातील भावार्थ किती व्यापक आणि खोल आहे हे त्यांनी अन्य टीकाकारांच्या अर्थविवरणाच्या संदर्भात स्पष्ट केलेले आहे. 'यथा नावमिवाम्भसि' (अ. २.६७) या अलंकारातील आशय बाबांनी असाच स्वतंत्ररीत्या विवरून दाखविला आहे. असे कितीतरी ! शब्दाची वालिफ, म्हणजे टरफल, काढून टाकून शब्दाचे अंतर भेदून जाण्यात त्यांची प्रज्ञा सहजरीत्या रमते; व आशयाच्या गाभ्याशी जाऊन भिडते.

केवळ शब्दार्थ आणि त्यातील भावाशय, एवढ्यापुरतीच ही प्रज्ञा - प्रतिभा कार्यरत असते असे नाही; तर अध्यात्म आणि तत्त्वज्ञान यांतील मूलभूत संज्ञांच्या अर्थवत्तेबाबतही ती अशीच जागृत आणि अंतर्भेदी असल्याचे दिसून येते. 'निष्काम कर्मयोग' आणि 'अनासक्तियोग' यांचा बाबांनी घेतलेला परामर्श या संदर्भात बारकाईने ध्यानी घेण्यासारखा आहे. निष्काम कर्मयोग नैष्कर्म्याकडे जाण्याची शक्यता, तसेच अनासक्तियोग अलिप्ततेकडे जाण्याची शक्यता स्पष्ट करून, कर्म निर्लेपपणे कसे केले जावे, हे बाबा दाखवून देतात. कर्मसंन्यास किंवा अकर्मत्व हे गीतेचे तत्त्वज्ञान नाही. 'गीता' कर्मपूर्तीचे तत्त्वज्ञान निःसंदिग्धपणे मांडते; हे बाबांनी आत्मविश्वासपूर्वक ठामपणे मांडलेले आहे. त्यांनी 'कर्मनिष्ठायोग' असाही शब्दप्रयोग केलेला आहे. 'कर्म ही एक अनादी शक्ती आहे. कर्मवृत्ती ज्या अवस्थेत निर्माण होते, तेथे जाण्यासाठी कर्ता स्वस्थ झाला पाहिजे. कारण कर्त्यावरच कर्म निर्भर असते. कर्माने व्यापलेला कर्ता, कर्म सोडून स्वस्थ होऊ शकत नाही.' असे सांगून कर्माचे स्वरूप विशद करताना ते म्हणतात, 'प्रथम सत्काम - वृत्तिनिर्धार; नंतर विधायक (विधियुक्त), रचनात्मक कर्मे करणे, मग त्यातील उणिवा दूर सारणारे विज्ञान वा तंत्र अवगत करणे व मनोव्यापारावर लक्ष ठेवून, क्रियेशी ते सुसंवादी करणे, हे महत्त्वपूर्ण कार्य असते. यामुळे उत्तम कार्याची उत्तम फळे, ईश्वरसेवेचे रूप घेतात व सारा समाज एका दिव्य सुखाकडे व

महान कर्मप्रवृत्तीच्या उद्दिष्टाने, विज्ञान व ज्ञान प्राप्त करून, मुक्तीकडे नेला जातो.' गीतेच्या तिसऱ्या अध्यायातील श्लोक -३ वरील बाबांचे भाष्य एकाग्रचित्ताने यासाठी अभ्यासले पाहिजे. 'कर्मपूर्ती'चा किंवा या 'कर्मनिष्ठायोगा'चा सविस्तर विचार बाबांनी 'माचणूरचे हृद्‌गत' या आपल्या प्रवचनात केला आहे. तो जिज्ञासूंनी अवश्य पाहावा.

या संदर्भात बाबांनी 'यज्ञ' या संज्ञेचा केलेला विचार गीतेतील कर्मयोगाचे रहस्य आणखी उलगडून दाखवणारा आहे. ते म्हणतात, 'कर्म हा मोठा पावन शब्द ! मोठी मंगल प्रेरणा ! धर्मयुक्त कर्म याचा विवेक आहे. कर्त्याच्या शुद्धतेने आचरलेले कर्म. कर्ता शुद्ध होण्यासाठी केवळ संन्यासाचा आचार उपयुक्त नाही. तर दुर्दम्य, शाश्वत, सत्य, ईश्वर यांवर श्रद्धा हवी. हीच श्रद्धा सत्याची आहे; निसर्गाच्या उघड्या यथार्थ रूपावरची आहे. प्रत्येक साधकाने श्वास घेण्यापासून तो झोपण्यापर्यंतचे प्रत्येक कर्म, माझ्या ईश्वराच्या अवतीर्णतेसाठीच मी करीन; अशी प्रतिज्ञा केली पाहिजे.' या अश रचनात्मक आणि विधायक सत्कर्मालाच बाबामहाराज 'यज्ञ' म्हणतात. या 'यज्ञा'नेच त्या सोज्वळ अनादी ब्रह्मतेचे सायुज्य घडते व जीव हा समाजाच्या, देशाच्या व स्वतःच्या उत्थानमार्गाचा द्रष्टा होऊन मुक्त होतो. निष्कर्ष म्हणून बाबा सांगतात, 'कर्मयोग हा असा आहे. यात यज्ञमय जीवन आहे. या यज्ञात तप, स्वाध्याय, आर्जव व समर्पण आहे. त्यागाचा मनोहर कलश त्यात आहे. त्यातील पवित्र जलाने सारे जग पवित्र करायचे आहे. भगवंतांनी हाच कर्मयोग निसर्गरूप असून, मोठा महत्त्वाचा आहे, हे पुनः पुन्हा सांगितले आहे.' बाबांचे 'योगः कर्मसु कौशलम्' यावरील भाष्य आणि 'कर्मण्येवाधिकारस्ते...' यावरील विस्तृत टीका या संदर्भात मन लावून अभ्यासावी !

बाबामहाराजांचे प्रस्तुत गीतादर्शन केवळ आध्यात्मिक विचिकित्सेच्या अंगाने जात नाही. ते अध्यात्माच्या अधिष्ठानावर स्थिर उभारलेले, जिवंत धर्मदर्शन आहे. यामुळे माणसामधला संभ्रमित झालेला अर्जुन त्यांच्या विवेचन - विवरणात नित्य उपस्थित असतो. अर्जुन हा एक सामान्य माणूस म्हणून, पण एका असामान्य भूमिकेत सापडलेला पुरुषावतार आहे. तो आपणां सर्वांचा प्रतिनिधी असतो आणि तरीही वेगळा भावतो; अशा अर्जुनाच्या मनाचा मागोवा ज्ञानेश्वर माऊलींनी घेतला आहे. बाबामहाराजांना ज्ञानेश्वरमाउली ही प्रमाणभूत दिव्य चैतन्यशक्ती आहे. तिच्या मार्गाने, तिच्या प्रकाशात थेट पुढे जाताना दिसतात. स्थितप्रज्ञदर्शन घडवताना ते माउलीच्या तेजोमंडलात हरपल्यासारखे जाणवतात. प्रसंग-विशेषी ज्ञानेश्वरीतील शब्दांचे अंतरंग अनुभवताना ते आणखी खोल अवगाहन करतात. गीतेच्या अन्य टीकाकारांहून तर ते वेगळे दिसतातच ('स्थितप्रज्ञस्य का भाषा...' या श्लोकाचा बाबांनी दिलेला सरलार्थ पाहावा.) पण ज्ञानेश्वरमाउलीचा हात धरून जाताना, ते आईजवळ बालकाने जसे मुक्तपणे वागावे, तसे मुक्त - स्वतंत्र अर्थविहारही प्रेमाच्या लडिवाळ अधिकाराने करताना दिसतात. बाबांनी काकूमौं यांना मातृभक्तीने केलेला हा 'गीताप्रबोध' असाच अपूर्व प्रेमाने तुडुंब भरलेला आहे.

श्रीसमर्थ रामदास स्वामींनी आपल्या शिष्यांना विमलब्रह्माचा आणि जीवनधर्माचा बोध केला; 'दासबोध' म्हणून तो सुविख्यात आहे. बाबांनी भगवंताच्या मुखातून निघालेल्या गीतोपनिषदातील ब्रह्मविद्यांतर्गत योगशास्त्राचा हा बोध प्रकर्षाने केला आहे. या 'प्रबोध' लेखनाचे आणखी एक महत्त्वाचे प्रयोजन आहे. हा 'प्र - बोध' आहे. गीतेसंबंधी, पर्यायाने वैदिक सनातन धर्मासंबंधी, विपरीत रूढ विचार आणि गैरसमजुती भारतीय आणि अभारतीय अभ्यासकांमध्ये पसरलेल्या आढळून येतात. गीतेतील अध्यात्म, तत्त्वज्ञान आणि धर्मविचार याचे मूळ विशुद्ध रूप काय आहे, हे दाखवून देणे आज अत्यंत निकडीचे, आवश्यक असे आपले कर्तव्य झाले आहे. स्वामी विवेकानंदांनी आपल्या व्याख्यानातून हे विशुद्ध धर्मदर्शन विविध अंगांनी सर्व जगापुढे शंभर वर्षांपूर्वीच मांडले होते. ती निष्ठा बाबामहाराजांच्या ठायी जणू प्रगट झाली आहे. पुरुषार्थप्रधान धर्मसंस्कृतीचे उत्थापन स्वामी विवेकानंदांनी आपल्या प्रभावी वाणीने जे केले व कर्मयोगाचा निकोप अर्थ जो प्रगट केला तो जिज्ञासूंनी मुळातून पाहावा. बाबामहाराज आज घटकेचे विवेकानंदच जाणवतात. 'माचणूरचे हृद्‌गत' मधे तर ते प्रकर्षाने दिसून येते. भारताला धर्मनिष्ठ दिव्य कर्मयोगाची आज नितांत आवश्यकता आहे व हा कर्मयोग कसा साध्य करता येईल याचे सुस्पष्ट मार्गदर्शन बाबांनी 'माचणूरचे हृद्‌गत' मधे केले आहे. 'गीताप्रबोध' आणि 'माचणूरचे हृद्‌गत' दोन्ही मिळून एकत्र अभ्यास करण्याचे व आपल्या जीवनव्यवहारात आणण्याचे ग्रंथ आहेत.

योगी अरविंद आणि स्वामी विवेकानंद यांच्याप्रमाणेच बाबामहाराज यांनाही स्वराष्ट्र आणि विशुद्ध मूल धर्म यांच्या उत्कर्षाची मानवकल्याणासाठी असलेली निकड तीव्रतेने जाणवते. मानवकल्याणाचे कार्य वैदिक सनातन धर्मच करू शकेल असे केवळ आपले दार्शनिक आणि धर्मचिंतकच म्हणतात असे नाही. श्री. डेव्हिड फ्राउले यांनी 'Arise Arjuna' या आपल्या ग्रंथात हा विचार केंद्रवर्ती रूपात मांडलेला आहे. डेव्हिड फ्राउले यांनी वेदोपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि श्रीमद्‌भगवद्‌गीता या प्रस्थानत्रयीचा सखोल अभ्यास केलेला आहे आणि वैदिक सनातन धर्माच्या तेजस्वितेने भारावून त्यांनी हिंदू धर्माचा स्वीकार केला आहे. 'वामदेवशास्त्री' हे नामाभिधानही त्यांनी घेतले आहे. त्यांचा वैदिक अध्यात्मग्रंथांचा आणि भारतीय धर्माचाराचा अखंड अभ्यास चालू असतो. पूर्व आणि पश्चिमेकडील धर्म, संस्कृती, राजकारण, अर्थकारण यांचे एकत्रित चिंतन करून ते आजच्या धर्मदर्शनाचे व धर्मव्यवहाराचे सूत्र आपल्या ग्रंथातून मांडत असतात. त्यातील निष्कर्ष 'गीताप्रबोध'च्या संदर्भात वाचकांपुढे ठेवणे उचित ठरले. ते म्हणतात, 'Classical India was never passive and resigned, never gave up without resistance, never gave in without defending Truth in all possible ways. India was a land of great sages and yougis, like Buddha and Shankara. It was also a land of Rama and Krishna, of great kings and warriors who knew how to rule according to higher law and protect spritiual life.'...

'Today India as a whole appears to be in the dejection of Arjuna, standing between two great armies before the great and unavoidable battle'...

'Life is always Kurukshetra. There are always two forces in life, not simply the good and the bad, but the ascending force of spiritual growth and the descending force of worldly illusion and division... To take pleasure in the problems of India is to delight in the sufferings of one's own mother, as India is the mother of the world. India is like the heart centre of the planet.... A force of inner strength and spiritual guidance for the world is unlikely to come from the countries of the West. The West is too distorted by the mass media and its culture of self - indulgence.... India

alone as a country has the potential to take the role of spiritually guiding the world.'....

'The world needs a spiritual and moral force that speaks out, or Divine silence that makes us question all that we do. Not only the leaders of India, whether political, intellectual or religious, must arise with the force of Arjuna, they must defend humanity as a whole, the environment as a whole, the Earth as our Mother, religion as a force of unversality and peace.'....

'However, for this to occur India must undergo radical change. India today does not represent the soul of India, but only its shadow. Let India awaken and for this the true of Arjuna must arise.'....

भारतीयांचा हा आवरणयोग नष्ट व्हावा यासाठी हा 'गीताप्रबोध' आहे. भगवंताच्या गीतेने अर्जुनाचा मोह नष्ट झाला आणि त्याला स्व-रूपाची आणि स्व-धर्माची स्मृती झाली; जाग आली आणि भगवंताच्या आदेशाप्रमाणे तो स्वकर्तव्यासाठी सिद्ध झाला. 'युद्ध्यस्व विगतज्वरः' हा तो भगवंताचा आदेश होय. कोणताही विकार मनात न आणता; निर्लेप, निर्मम, निरंहकारी वृत्तीने जीवनाचे युद्ध खेळण्याची कला आत्मसात करण्याची वृत्ती अंगी बाणली पाहिजे. सत्कर्माच्या फुलांनीच परमेश्वराची पूजा बांधायची असते, नैष्कर्म्याने नव्हे. कोणताही जीवजंतू क्षणभरही कर्मरहित राहू शकत नाही. हे ध्यानी घेऊन, कर्मच परमेश्वररूप करणे हा धर्म होय, हे गीता सांगते. बाबांनी हाच संदेश 'दिव्यामृतधारे'मध्ये दिला आहे, तोच 'माचणूरच्या हृद्‌गता'तही आहे आणि तो प्रस्तुत 'गीताप्रबोधा'चा प्राणभूत भाग झालेला आहे. प. पू. ब्रह्मीभूत बाबांच्या कृपाशीर्वादे ही 'बाबा-गीता' आज सर्वांना उपलब्ध होत आहे. ह्या प्रकाशात सर्वांनी अखंड जागे राहावे हीच प. पू. बाबामहाराजांची भगवंताच्या चरणी प्रसादाची मागणी आहे.

सर्वे सर्वत्र नदन्तु !

ॐ तत्सत् ।

- डॉ. द. दि. कुलकर्णी

(सौ. कविता निरगुडकर यांच्या सौजन्याने)

---

गुरु मोरेश्वरा सर्वेश्वरा
अलख निरंजन ओंकारा ।।धृ.।।
तू करुणेचा सागर । तू सर्वांचा आधार ।
तू ब्रह्मकमळ सुंदर । पसरला गंध अनिवार ।
तू शीतल मंद समीर । तू प्रेमाचे मंदीर ।।१।।
तू ज्ञानाचा ईश्वर । सहज तू योगभास्कर ।
तू भक्तीचे माहेर । प्रेमाचा नित्य विहार ।
पसरला दाट अंधार । उजळण्या तुझा अवतार ।।२।।
तू प्रेमळ दिव्य फकीर । भवसिंधू नेसि पार ।
तू पवित्र जीवन सार । फोडले प्रेम भांडार ।
तू मोक्षधाम साकार । भेटाया भक्त अधीर ।।३।।

श्री. श्री. के. पुसाळकर

# श्री बाबामहाराजांची विचारधारा


डॉ. विद्यासागर पाटंगणकर

एम.ए. (प्रथम श्रेणी प्रथम) पीएच.डी. (मराठी) १९८०-८७ श्रीसंत दामाजी महाविद्यालय मंगळवेढा. १९८७ पासून [illegible] महाविद्यालय बीड प्राध्यापक. १९९३ पासून प्रपाठक व संशोधन मार्गदर्शक. ८ विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन. [illegible] मान्यताप्राप्त नियतकालिकांतून सातत्याने लेखन, निरनिराळ्या अभ्यास परिषदेत सहभाग व निबंध वाचन. काव्य, [illegible] अभंग, ओवी — ६ पुस्तके प्रकाशित. अनेक अ. भा. साहित्य व नाट्यसंमेलन परिसंवादात सहभाग.


आधुनिक काळातील महान तत्त्वद्रष्टे, अनुभविक, प्रज्ञावंत, संत म्हणून श्रीबाबामहाराज आर्वीकर यांचे नाव घेतले जाते. आर्वीकर महाराजांनी कोणताही नवीन संप्रदाय स्थापन केला नाही वा नवे 'पीठ' निर्माण करून कर्मकांड वाढवले नाही यातच त्यांचे द्रष्टेपण होते. त्यांनी 'अध्यात्म साधना' आपल्या जीवनसरणीचा अविभाज्य भाग मानला. म्हणून देवपूजेचे स्तोम, आन्हिकांचे कर्मकांड व भक्तिसाधनेचे देव्हारे त्यांनी मांडले नाहीत. त्यांची दृष्टी अत्यंत परिणत होती. समाज जीवनाचा त्यांचा सूक्ष्म अभ्यास होता. 'अध्यात्म' हे सुंदर जगण्याचे शास्त्र आहे, ईश्वराकडे जाण्याचा मार्ग सहजीवनातून जातो असे ते वारंवार सांगत. विज्ञानाचे, भौतिकशास्त्रांचे, सामाजिक शास्त्रांचे महत्त्व त्यांनी गौण मानले नाही, मात्र धर्माला ते जीवनाचे विज्ञान म्हणतात. भारतीय धारणेतील मूल्यसमन्वयातून प्रवाहित झालेली संस्कृतीची धारा त्यांना आदर्श वाटते. वेद-उपनिषदातील श्रेष्ठ तत्त्वज्ञान, तत्त्वचिंतन, भारतीय मध्ययुगीन संतांनी उपदेशिलेला धर्मविचार, गीता-भागवत आदी ग्रंथांतून जीवनसत्याचे व शाश्वताचे रूप त्यांनी वेळोवेळी आपल्या वाणीतून शब्दांकित केले. त्या विचारधारेतील काही बिंदू यथामती आपणा सर्वज्ञांसमोर ठेवत आहे.

परमपूज्य श्रीबाबा महाराज यांनी आपल्या प्रासादिक वाणीने आम्हा महाराष्ट्रीयांचे जीवन समृद्ध केले आहे. त्यांचे 'दिव्यामृत धारेने' आध्यात्मिक भरणपोषण केले. 'माचणूरचे हृद्‌गत' आणि 'पत्र पारिजात' मधून जीवनातील कार्याची दिशा सहजपणे दिग्दर्शित केली. 'सांगाती' सारख्या नियतकालिकांतील त्यांचे विचारधन चिंतनाचा एक नवा आदर्शच प्रस्थापित करतात. प्रस्तुत लेखात 'माचणूरचे हृदगत्' आणि 'सांगाती'मधून आलेल्या काही विचारप्रवर्तक विचारधनाच्या आधारे पूज्य बाबांच्या विचारधारेचा परिचय करून घेऊ.

श्रीक्षेत्र माचणूर येथे बाबांनी जी प्रवचने दिली ती 'माचणूरचे हृद्‌गत' म्हणून प्रसिद्ध आहेत. माचणूर हे केवळ निमित्त आहे. बाबांनी त्या पाच प्रवचनांतून एक समृद्ध, सम्यक् अशी जीवनदृष्टी दिली आहे. सुरुवातीलाच त्यांनी स्पष्ट केले की, 'मी कुठल्याही देवाच्या मूर्तीला भजणारा माणूस नाही हे तुम्ही लक्षात घ्या.' बाबा महाराजांनी कर्मकांडाचा निषेध करून 'भारतीय संवेदने'चा पुरस्कार केला आहे. बाबांनी ''मी' कोण आहे ?' असा प्रश्न उपस्थित करून उत्तर दिले की, 'मी कोणी नाही.' 'मी' हे नुसते एक भान आहे. 'I is abstract thing in the world' ज्याला आपण 'मी' समजतो ते एक भावात्मक रूप आहे. हा 'मी' जेव्हा लीन होतो, जेव्हा नाहीसा होतो, तेव्हा जे काही असेल ते मूळ 'अस्तित्व' आहे. 'मी' जिवंत असतो तोपर्यंत 'सेवा' ही सेवा नसून ती 'चाकरी' असते. 'मी पुजारी आहे' असे समजून पूजा केली तर ती फक्त 'नोकरी' होईल ती 'ईशसेवा' होणार नाही. म्हणून स्वामींच्या चरणात अखंड लीन होऊन निष्ठापूर्वक ध्यान करीत राहणे हीच सेवा होय. अशी सेवा जमत नसेल तर बाबा महाराज म्हणतात, तुम्ही मंदिरे बांधण्याची व देवतांच्या पूजेची उठाठेव करण्याऐवजी बाग-बगीचे तयार करा. तिथे मुले खेळतील ! 'उदात्त पातळीवर जाता येत नसेल, तर ती भ्रष्ट करण्यापेक्षा खालच्या पातळीवर उभे राहणे चांगले !' बाबांचे विचार किती अविकृत आणि स्पष्ट आहेत, हे यातून दिसेल.

बाबांनी जीवनाची किती सुंदर व्याख्या केली आहे. ते म्हणतात, राम-कृष्ण हे अवतार म्हणजे आपल्याच आत्म्याची विकसित रूपे होत. 'गुणात निर्गुणाचा संबोध होतो, त्या वेळी गुण-निर्गुण हा भेद मिटतो. माणसातच जीव शिरतो त्यावेळी माणूस आणि जीव हा भेद मिटतो. आणि जीवन नावाचा एक घटक आपणास प्रत्ययाला येतो.' असे जीवन आपणास प्रथम कळले पाहिजे. म्हणजे 'अमरत्व' हे खरे तत्त्व आहे. 'साधना' म्हणजे या चैतन्याचे ईशतत्त्वाचे पूर्ण अवतरण : त्यासाठी संतांची 'मांदियाळी' जमावी, स्वकष्टावर जगण्याची धारणा असावी. ध्यानधारणा या सहजकृती व्हाव्या ही बाबांची भूमिका आहे. 'साधकत्व' हेच त्याचे जगणे झाले पाहिजे.

तुकोबांनी म्हटल्याप्रमाणे -

'विषय तो त्यांचा झाला नारायण' किंवा

संत जनीजनार्दन एका पदात म्हणतात -

*'आत्मा शंभुपती । गिरिजा हेचि मती । प्राण पै करिती परिचर्या ।*

*शरीर आवार । इंद्रिय परिवार । पूजा पुरस्कार विषय भोग ॥*

*पायाचे चालणे नेमे प्रदक्षिणा ।*

*वाचेचे बोलणे सकळ स्तुती । विश्वरूप ध्यान नयनावलोकन । करावे वर्तन अंगासवे ॥*

*ऐसे सर्व कर्म जाण अखिल करणे । जनार्दन म्हणे शिवसेवा ॥'*

ही 'शिवसेवा' बाबांनाही अभिप्रेत आहे.

साधकाने स्वार्थी बनू नये, नसता तो पारमार्थिक व्यभिचार ठरतो. तो निरंतर साधकच असावा. 'आता माझी साधनेची वेळ झाली' असे साधकाने म्हणणे योग्य नव्हे. कारण त्याचा समग्र जीवनव्यवहारच साधनामय असला पाहिजे. बाबा म्हणतात -

'साधनेचा स्वभाव घेऊन जे जगतात तेच साधक होत.'

भारतीयता आणि साधक या जीवननिष्ठा आहेत; मात्र याचा संप्रदाय होता कामा नये असे ते कटाक्षाने बजावतात. भक्ती हा सहज स्वभाव

असावा. मन नसताना जे जगणे त्याचे नाव भक्ती, भक्त असतो, तो भक्ती करतोच ! सज्जनता निर्माण करणे हे खरे कार्य आहे. संपूर्ण विश्वकल्याण फक्त भारतच करू शकतो; असे बाबा सांगतात.

साधनेला आकार येण्यासाठी सर्वप्रथम 'इदं न मम' हा पाठ साधकाने घोकला पाहिजे. 'इदं न मम' या शब्दात सखोल आर्तता आहे. तडफड आहे. तळमळ आहे. देवासाठी जगेन आणि देवासाठीच मरेन ही ऊर्मी चित्तात हवी. ही ऊर्मी नित्य जागृत असेल, तर जीवन जगण्याच्या कोणत्याही क्षणाला आपण साधकच राहू. बाबा महाराज म्हणतात, 'अगदी रतिसुखाच्या काळातही तुम्ही साधकच राहाल'. - कारण रतिसुख प्रसंगी आपण पशू नसतो, तर 'माणूसच' असतो. रतिविषय पशू व माणूस यांना सारखाच असला, तरी रति काळात 'माणसाचा' 'पशू' होत नाही. 'माणूसपणा' ची धारणा हे श्रेष्ठ तत्त्व आहे. ते मन-बुद्धी व इंद्रियांना समजून द्या. हे समजावून देणे म्हणजेच साधक जीवन जगणे होय.

कर्माद्वारे निर्माण होणारा दृश्य, संवेद्य पदार्थ वा धर्म असेल ते सगळे माझे नाही. या जाणिवेत चित्त ठेवणे हा 'इदं न मम'चा खरा अर्थ आहे. बाबा म्हणतात, 'सोडायचे काही नसते, ते सर्व सुटलेलेच असते !' कर्म सर्व ईश्वराप्रीत्यर्थ करावेत हाच गीतेचा कर्मसिद्धांत सांगतो. 'नैष्कर्म्य' किंवा 'विदेहीत्व' या अवस्था आहेत, दशा आहेत, त्यांचा अभ्यास वेगळा असतो; नाहीतर फजितीचे प्रसंग ओढवतील. बाबा महाराज विनोदाने म्हणतात –

'वस्त्र रहित राहणे म्हणजे विदेही असे जर असते, तर पशु-पक्षी विदेही म्हणून त्यांना नमस्कार करण्याची पाळी आली नसती का ?'

'इदं न मम' हा एक अभ्यास आहे. आध्यात्मिक बैठकीवरील प्रत्येक कार्य ही ईशसेवाच आहे. एकेका दुर्गुणाचा लय सद्गुणात व सद्गुणांचे उच्चतम गुणात विसर्जन करणे. हा एक अभ्यास साधनेतून करता येतो. मन स्थिर करणे हे ध्यानासाठी नको, तर समर्पणासाठी गरजेचे आहे. भोगण्यापेक्षा दानात महापुण्य आहे. जीवनशुद्धीसाठी 'दाना'ची गरज आहे. सावधानता, समभावना आणि सत्कामता ही त्रयी जीवनशुद्धीसाठी महत्त्वाची आहे. 'इदं नमम' यात 'कृष्णार्पणा'ची समर्पणाची भावना आहे. मात्र समर्पण आणि त्याग एक नव्हेत ! वाईटाचा त्याग व चांगल्याचे समर्पण, मलाचा त्याग व अन्नाचे समर्पण; देहाचा त्याग मात्र जीवाचे समर्पण !

बाबा महाराज सूचकपणे म्हणतात - संदेश देतात -

'त्यागाने निर्दोष व्हा, समर्पणाने दिव्य व्हा !'

आपल्याला ईश्वराने दिलेल्या बुद्धी, इंद्रिय, मन यांचा ईश्वराप्रित्यर्थ समर्पण बुद्धीने उपयोग केला नाही, तर आपण चोर ठरू !

बाबा म्हणतात, 'समर्पणा'च्या अभ्यासासाठी दक्षता आणि शुचिता यांची जोड हवी. आपण दक्ष अर्थात सावधान असावे, शुचिर्भूत असावे.

'अंतःकरण शुचिता परमार्थात श्रेष्ठ होय. धर्मनिष्ठ स्वभाव, पवित्र क्रिया, निर्मल संकल्प, निष्कपट वाणी, प्रामाणिक विचार म्हणजे शुचित्व' असे बाबा सांगतात.

तुकोबांनी एका अभंगात म्हटल्याप्रमाणे –

'पवित्र तो देह । वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ'

बाबा महाराजांनी मन, आचरण, संकल्प, भावना, बुद्धी, इंद्रिये सर्वत्र 'पवित्र' अपेक्षिले आहे. तसेच 'अनपेक्ष' भावना अधोरेखांकित केली आहे. 'निरपेक्ष' आणि 'अनपेक्ष' यांतील सूक्ष्म भेद ते सांगतात. भिऊन मोक्षाकडे जाऊ नका. निर्भय व्हा. अमर व्हा - 'ईश्वरीय कार्य' करण्याच्या प्रेरणेने जगा. तेच निर्वासनिक होणे होय. 'सहजं कर्म कौंतेय' असे कृष्ण गीतेत सांगतो. हे सहजकर्म म्हणजे ईश्वराने नेमून दिलेले कार्य होय. कर्मपूर्ती कधीच होत नसते. काम संपवायचे नाही, तर ते पूर्णविळ करायचे ! गीतेत 'योगः कर्मसु कौशलम्' असे म्हटले आहे. 'कर्माचा बरे-वाईटपणा त्याच्या स्वरूपावर अवलंबून नसून त्यामागील सुष्ट किंवा दुष्ट भावनेवर अवलंबून आहे.' असे बाबा म्हणतात. ते म्हणतात - श्रीकृष्णाचे जीवन कर्मन्यायाचे सुंदर उदाहरण आहे. घोडे धुण्यापासून ते पत्रावळी उचलण्यापर्यंत सर्व कामे त्यांनी केली. ज्ञान सांगितले, युद्धही केले, योगेश्वर म्हणून प्रख्यात झाले पण सर्व उपाधींचे समर्पण त्यांनी केले.

बाबांनी विज्ञाननिष्ठेलाही महत्त्व दिले आहे. धार्मिक माणूस विज्ञाननिष्ठ असला पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. धर्म हा प्रगतीचा सोपान आहे; धर्म हे जीवन विज्ञान आहे. साधनेतील विज्ञान प्रकट करून तुम्ही ती श्रद्धा सत्याश्रित करा, त्यातून आत्मविश्वास निर्माण होतो तेव्हाच साधनेला रंग येतो, ती सतेज होते. परमार्थाचा फलभार घेऊन येते असे ते म्हणतात. भारतीयांनी 'एटिकेट्स् मॅनर्स' म्हणून - शिष्टाचार म्हणून धर्म स्वीकारला नाही, तर ते एक जीवनशास्त्र म्हणून, सत्याकडे-अध्यात्माकडे नेणारी प्रक्रिया म्हणून या संस्कृतीचा स्वीकार केला. पाश्चात्त्य भोगवादी देह भोगाचाच विचार करतात; पण आपले अध्यात्मवादी म्हणतात - देह केवळ भोग भोगून नष्ट करू नका. 'ज्ञान-विज्ञान सहितं' असा पुरुष निर्माण झाला पाहिजे. खऱ्या अर्थाने जीवनवादी झाले पाहिजे. 'ज्याला जीवन कळेल त्यालाच अध्यात्म कळेल' असे बाबा म्हणतात.

भारतीय संदर्भात अध्यात्म आणि जीवन हे एकरूप आहे. कारण भारतीय जीवन धर्माधिष्ठित आहे. परंतु आज धर्मभावना मृत होत आहे. धर्माचा केवळ भावनात्मकतेनेच विचार आज होत असल्याने तो मृतप्राय बनत आहे. त्यामागील कर्तव्य भावना जागवण्याची आज आवश्यकता आहे. निष्ठा, एक दिव्य भाव जागृत करावा लागेल. ते म्हणतात, 'आई' या शब्दाने उचंबळणारी भावना प्रत्यक्ष व्यवहारात सालंकृत-साकार झाली तरच 'आई' ला सजीवता येईल; तीच गोष्ट धर्माची आहे. आज समाजकारण, अर्थकारण, राजकारण सर्वकाही चालू आहे. पण 'माणूस' मात्र कोठेच दिसत नाही. माणूस हा मूलभूत घटक धर्माने महत्त्वाचा मानला. तो दिव्य होण्यासाठी सर्व साधना-अध्यात्म-जप-तप यांचे मूल्य सांगितले. बाबा महाराज म्हणतात, आज माणसाच्या शरीर-मन-आणि बुद्धी यांच्यातील निकोपता जोपासणे, त्यात सुसंवाद साधणे आद्य प्रमुख गरजेचे आहे. माणसातील तन-मनाचे सुसंवादित्व व सामंजस्य श्रमशीलतेशिवाय वाढणार नाही. माणसात श्रम करण्याची शक्ती असली, तरी त्याची बुद्धी भ्रष्ट झाली आहे; विकृत बनली आहे. शरीर-मन आणि बुद्धीचे आरोग्य म्हणजेच सुसंवाद आणि हा सुसंवाद अध्यात्माने निर्माण करता येतो. धर्माचे विकृत प्रतिपादन काही मंडळी करताहेत म्हणून सर्व विचारांच्या शुद्धीकरणाची आवश्यकता आहे.

बाबा महाराजांनी सामाजिक शास्त्रांच्या सिद्धांतांचा परामर्श घेतला आहे. ते म्हणतात, 'अर्थ' ही विलक्षण शक्ती आहे. धार्मिक लोक तिला लक्ष्मी म्हणतात, तर अध्यात्मवादी प्रकृती म्हणतात. भांडवलदारांनी धनाला प्रतिष्ठा दिली. मार्क्सने 'श्रम' नावाचा घटक शोधून 'श्रमशक्ती' ला श्रेष्ठ ठरवले. भांडवलदारांनी 'पैसा' हा शाश्वत घटक मानला तर मार्क्सने 'श्रम' हा विश्वाचा मूल घटक असल्याचे प्रतिपादन केले. मात्र भारतीय

द्रष्ट्या ऋषी-मुनींनी 'प्राण' हे तत्त्व शाश्वत मानले होते. प्राण या मूल्याशिवाय जगाचे मूल्य शून्य आहे. भारतानेच प्रथम हा सिद्धांत सिद्ध केला की चेतनेकडे चला - 'मृत्योऽर्मा अमृतं गमय' 'प्राण' या मूलभूत घटकाचे दुसरे नाव ब्रह्म. तेच सत्य व आद्य होय. तेच अखंड शाश्वत आहे. 'समाज' ही जशी अमूर्त संकल्पना तशीच 'ब्रह्म' ही संकल्पना होय. ब्रह्म तेवढे सत्य ही संकल्पना भारतीयांनी रुजविली.

शरीर हेच आपले मंदिर व आत्मा हा देव ही भारतीयांची भूमिका आहे. 'तुम्हीच तुमचे मंदिर आहात. त्यालाच घडवायचे आहे. हे जेव्हा माणूस विसरतो, तेव्हा बाहेरच्या देवळांची डागडुजी करण्यासाठी ट्रस्टी नेमावे लागतात !' असे परखडपणे बाबा महाराज म्हणतात !

मोठेपणा, प्रतिष्ठा या संबंधी बाबा म्हणतात –

'माणूस मोठा होतो, तो खऱ्या अर्थाने मोठा झाला का ? तोही प्रतिष्ठित झाला पण मोठा नाही झाला. तुम्हाला फक्त प्रतिष्ठा मिळते. जसे पूजा देवाची होते आणि दगडच फक्त ओला होतो.'

या बाबामहाराजांच्या विचारात केवढी सखोलता - केवढे गांभीर्य दडलेले आहे ! जीवनाचे उत्थान घडले पाहिजे. आपल्याला आपला परिचय घडत गेला पाहिजे. अभिरुची दिव्यातिदिव्य होत गेली पाहिजे. आपण आपली जाणीव सूक्ष्म करीत नेली पाहिजे. विश्व हे चैतन्याचाच विलास आहे. जीवन हे एक चैतन्य आहे. चेतना हीच एकमात्र सत्य आहे, त्याचेच सर्वत्र प्रस्फुरण आहे. आपल्याला जो जडाचा प्रत्यय येतो, तो जाणीव दोष आहे. चैतन्यापासून आपले मन-बुद्धी दूरवर गेल्यानेच आपला प्रत्यय जडावला आहे. चित्‌च्या प्रयोगासाठी जीवनावर प्रेम करा. आपण सतत अखंड कर्मरत राहिले पाहिजे; तेव्हाच आपणास प्रेमरत होता येईल. 'इदं न मम' म्हणण्याचा अधिकार तेव्हाच प्राप्त होईल. 'इदं' हे तुमच्या श्रमातून निर्माण होते, ज्ञानातून-बुद्धीतून निर्माण होते. ते 'माझे नाही' असे म्हणा. पण श्रम थांबवू नका. कर्म करीत राहा. 'तृप्तकाम' होण्यासाठी 'सत्काम' व्हा. सत्यासाठी कर्मशील बना.

आज जग बिघडले आहे. म्हणजे जगातले काय बिघडले आहे ? बाबामहाराज सांगतात – माणसांच्या भावना बिघडल्या आहेत. भावनिक विश्वनिर्मिती हे आजचे सत्कार्य व जगत्कार्य आहे. 'धर्म' ही आमची जीवनरचना होती. तीर्थक्षेत्र, विद्यापीठे, कुटुंब आणि ग्राम ही भारतीय जीवनपद्धती होती. यालाच मन, बुद्धी, चित्त, अहंकार म्हणतात ! हे चार शक्तीघटक आहेत. त्या चार शक्तीघटकांतूनच जीवनव्यवहार होत असतो.

मानवांतर्गत या चार शक्ती घटकांची सामाजिक जीवनातील रूपे कोणती ? तर मन हे भावनाक्षेत्र म्हणून मंदिर हे त्याचे सार्वजनिक रूप, बुद्धी हे ज्ञानक्षेत्र म्हणून विद्यापीठ (शाळा-महाविद्यालये) हे त्याचे सार्वजनिक रूप. चित्ताचे क्षेत्र कुटुंब व अहंकाराचे क्षेत्र 'ग्राम' होय. जगातला प्रत्येक माणूस यांपैकी एका क्षेत्रात असतोच !

शुद्ध चित्ताचा उदय होण्यासाठी कुटुंब क्षेत्राचे शुद्धीकरण करावे लागेल. त्यात अर्थशुद्धी व श्रमशुद्धी या बाबी आल्या. अर्थशुद्धी व श्रमशुद्धी यालाच 'यज्ञ' ही संज्ञा होती. आज हे क्षेत्र बिघडले आहे. दुसऱ्यासाठी आपण का श्रम करावे ही भावना निर्माण झाली की श्रम 'अशुद्ध' होतात - भ्रष्ट होतात - त्यात 'विकार' बळावतात. आज इतरांसाठी श्रम करण्याची भावना नष्ट होत चालली आहे. पूर्वी अतिथी-अभ्यागत-दीन-दुःखी यांच्यासाठी श्रम करण्याची धारणा होती. कुटुंबाचा एकेक मजबूत किल्ला आता ढासळत चालला आहे.

कुटुंबाप्रमाणेच 'ग्राम' घटक ही अशुद्ध झाला आहे. 'इंद्रियग्राम' या संकल्पनेत 'एकी' अपेक्षित आहे. आज मत्सर, कलह, असूया, हेवेदावे यांनी गावाचा ताबा घेतला आहे. संत तुकडोजींनी 'ग्रामगीते'त ग्रामशुद्धीवरच भर दिला आहे. जीवनासाठी तीन शक्तीतत्त्वांची गरज असते. प्राण, धन आणि सत्ता. आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक अशा त्रिविधा शक्तींचा वापर 'ग्रामा'त केला आहे. ग्रामदेवतेची कल्पना प्रस्थापित केली. परस्परांची नाती निर्माण केली. नात्यात आदर्श प्रस्थापित केले. कहाणी वाङ्मयात आजही डोकावले, तरी हे आढळते की - 'हाकारे पिटारे करारे डांगोरा - नगरात कोणी उपाशी आहे का याचा शोध करा' असा डांगोरा पिटला जात असे. कोणी दुःखी-कष्टी असतील त्यांची प्रथम खबरदारी घेतली जाई. उपाशी असतील तर अन्न दिले जाई. हे त्याग समर्पणाचे सूत्र ग्राम संदर्भात होते. भावनात्मक दृष्टीने 'ग्राम' मजबूत होते. ते गाव आज धर्मीय-जातीय-पंथीय विभेदांनी पोखरले आहे. भांडणांनी उद्ध्वस्त झाले आहे.

विद्यापीठ हे तिसरे क्षेत्र. पूर्वी त्यातून धर्म शिक्षण दिले जाई. धर्मशिक्षण म्हणजे जीवनसमृद्ध करणारे शिक्षण. त्यातून जीवनवादी सर्वांग परिपूर्ण अभ्यासू मंडळी बाहेर पडत. आज नुसत्या कागदांच्या पदव्या घेऊन तरुण बाहेर पडत आहेत. बुद्धी-मन सुसंस्कृत-सुविद्य करणारे-निर्भय करणारे योग-प्रयोग याद्वारे जीवन उन्नत बनविणारे शिक्षण देण्याची खरी गरज आहे; तरच राष्ट्र तेजस्वी होईल व पुरुषार्थ पूर्ण होईल असे बाबा म्हणतात. चिंतन व योग यांचे शिक्षण देणाऱ्या प्रयोगशाळा विद्यापीठांना जोडल्या पाहिजेत. हेच विद्याक्षेत्राच्या शुद्धीचे कार्य होय.

तीर्थक्षेत्रांचे शुद्धीकरण ही चौथी बाब. 'तरति अनेन इति तीर्थम्' 'तरति पापादिकं यस्मात्' अशी तीर्थाची व्याख्या करता येईल. भूलोकी वैकुंठ आणणारे एक प्रभावी विद्यासत्र म्हणजे तीर्थक्षेत्र होय. मानवी मनाच्या भावशुद्धीसाठी तीर्थाची योजना ऋषिमुनींनी केली आहे. मात्र तिथेच आज ढोंगबाजी, लुटालूट, दांभिकता निर्माण झाली आहे.

तीर्थक्षेत्रे बिघडण्याचे कारण म्हणजे सामाजिक प्रतिष्ठेची मूल्ये जडाश्रित झाली. सत्ता, संपत्ती आणि संघटना या शक्ती प्रभावी बनल्या. दैवी गुण ऱ्हास पावले. तीर्थाच्या शुद्धीकरणासाठी चळवळ हाती घेणे गरजेचे आहे. तीर्थाचे पावित्र्य राखले पाहिजे. सदाचारी, अध्यात्मप्रवण विरक्त साधूंनी तीर्थाचा आश्रय केला पाहिजे. भावशुद्धी करून तीर्थशुद्धीची मोहीम राबवली पाहिजे. संत तुकोबांनी त्या काळी 'आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा झाली धणी' अशी तीर्थावरील ओंगळपणावर टीका केलीच होती, याची आठवण व्हावी. या चतुर्विध शुद्धीकरणाचा विचार बाबा महाराजांनी मार्मिकपणे मांडला आहे. 'भावनिक विश्व' निर्माण करण्याचा संकल्प त्यांनी माणघूरच्या व्याख्यानातून केलेला दिसतो. भारतीयत्वाचा खरा आदर्श सिद्ध करून त्यांनी श्रमनिष्ठ, अहंकाररहित, कर्मतत्पर, चेतनायुक्त, समूहसंवेद्य, कल्याणात्मक, शुद्ध, शुचिर्भूत, अखंड साधनांकित, विश्वात्मक एक धर्म विचार प्रकट केला आहे, तो आचरणात आणला आहे. अशा प्रज्ञासूर्यास माझे कोटी कोटी प्रणाम !

**डॉ. विद्यासागर पाटंगणकर**
वरचे पाटंगण, पाटंगण गल्ली,
बीड.



# संत बाबामहाराज दिग्दर्शित सामाजिक परिवर्तनाची नवी दिशा


**प्रा. प्रज्ञा अ. जावडेकर**

एम.ए. बडोदे विद्यापीठात अर्थशास्त्राच्या प्राध्यापिका – अर्थशास्त्रात सुवर्णपदक नामवंत वक्त्या व लेखिका. [illegible] तरुणपणापासून अनेक व्याख्याने. श्रीबाबामहाराजांच्या साहित्याच्या व्यासंगी अभ्यासक वारकरी संगीत भजन व [illegible]


## उपोद्घात

आज आपण सर्वत्र हाकाटी करतो की समाज बिघडला आहे. आणि मग समाज सुधारण्यासाठी निरनिराळे वाद-समाजवाद, साम्यवाद, मानवतावाद मांडले जातात.

पण समाज बिघडला आहे, म्हणजे नेमकं काय बिघडलं आहे, याकडे आपलं बहुधा लक्षच नसतं. समाज बिघडला आहे, म्हणजे खरोखरी माणूस बिघडला आहे. प्रत्येक माणूस सुधारला की समाज सुधारणारच आहे. शिवाय, आपण 'धर्म बुडाला धर्म बुडाला' असाही ओरडा करतो. श्रीबाबा म्हणतात - 'अहो, धर्म धर्म म्हणजे तरी काय आहे शेवटी ? सज्जनताच ना ? माणसे सज्जन बनली, की काम झाले.' (माचणूरचे हृद्गत पृ. २२) 'सज्जनता निर्माण करणे, साधुता निर्माण करणे हेच एकमेव मंगल कार्य आहे. हेच कार्य आपल्याल माचणूरहून घडवायचे आहे. यालाच मी धर्मकार्य म्हणतो, आध्यात्मिक कार्य म्हणतो. सगळ्या जगाचे परिवर्तन करणारे हे एक अत्यंत सुंदर तत्त्व जे मी आपणास सांगत आहे, ते भारतीय द्रष्ट्यांनीच दिलेले आहे. ते सहज आहे, सोपे आहे. जगामध्ये आपल्याला परिवर्तन घडवून आणायचे आहे याचा अर्थ आपण स्वतःच तसे घडायचे आहे. आपण आपल्याला घडवू लागलो की, जग आपोआप घडेल. 'सहनाववतु' इथपर्यंत मर्यादा राखा, 'तुम्ही आम्ही मिळून घडवू' इथपर्यंत चालेल. पण 'मी तुला घडवितोय ही भूमिका मला मानवत नाही. मला वाटते की आपणच आपल्याला शिकवावे आणि जर दुसऱ्या एखाद्याने ऐकलेच, तर त्याला शिकवावे. समर्थांनी म्हटले आहे, 'शहाणे करूनी सोडावे । सकळ जन ।' याचा अर्थ शहाणपणा आधी आपल्याकडे आला पाहिजे.' (माचणूरचे हृद्गत - पृ. २१, २२)

समाजपरिवर्तनाची जी दिशा श्रीबाबांना अभिप्रेत आहे ते स्वतःच म्हणतात त्याप्रमाणे-भारतीय द्रष्ट्यांनाही अभिप्रेत आहे-ती सारांशरूपाने वरील उद्गारांत आपल्याला आढळते. प्रवचने, स्फुट लेखन, पत्रे यांतून श्रीबाबांचे या बाबतीतील विचार व्यक्त झाले आहेत. 'संतधर्म : जीवनदर्शन' या संपादित पुस्तकात श्री. शरद भगत यांनी ते फार चांगल्या प्रकारे ग्रथित केले आहेत. त्यातून व श्रीबाबांच्या शक्य तेवढ्या सर्वच वाङ्मयातून, या विषयावरील श्रीबाबांचे विचार या लेखात मांडण्याचा नम्र प्रयत्न केला आहे. ते शक्य तेवढे त्यांच्याच शब्दांत देण्याचाच कटाक्ष ठेवला आहे. ते विचार इतके सुस्पष्ट शब्दांत आहेत की त्यावर अधिक स्पष्टीकरणाची गरज नाही आणि एका लेखाच्या मर्यादेत ते शक्य नाही. आपण म्हणाल, पूर्वापार ऋषींनी जे सांगून ठेवलं, तेच जर श्रीबाबा सांगत आहेत, तर त्यात नवी दिशा ती कोणती ?

त्याचं उत्तर असं की - आजवर सर्वच संतांनी हेच म्हटले आहे की - 'आम्ही वैकुंठवासी । आलो याच कारणासी ।। बोलिले जे ऋषी । साच भावे ।।' श्रीतुकाराम महाराज. 'धर्म रक्षावयासाठी । करणे आटी आम्हासी ।' ज्ञानेश्वरीच्या शेवटी माऊलीही तेच म्हणतात - 'हे धर्मकीर्तन सिद्धी गेले ।' श्रीसमर्थ म्हणतात - 'धर्मस्थापनेचे नर । ते हे ईश्वराचे अवतार । मागे झाले पुढे होणार । देणे ईश्वराचे ।।' तेव्हा पुनःपुन्हा तोच सनातन धर्म रक्षण्यासाठी ईश्वर अवतार घेत असतो संतांच्या रूपाने. तोच वेदकालीन ऋषिप्रणीत धर्म, परंतु त्या त्या काळाच्या गरजेनुसार, श्रीबाबा म्हणतात त्याप्रमाणे, 'नवा पोशाख देऊन' (प्रार्थना प्रभात पृ. १०) संत समाजात पुनःप्रस्थापित करीत असतात. हेच श्रीबाबांचेही जीवनकार्य होते. आपली श्रद्धासुमने अर्पित करताना पूज्य श्रीगुळवणीमहाराज लिहितात - 'भारतीय जीवननिष्ठेचा व ऋषिमुनींनी निर्देशिलेल्या शाश्वत, दिव्य व प्रेममय भक्तिपथाचा आपल्या ओजस्वी जीवनात सुसंपन्न आलेख प्रकट करणाऱ्या' श्रीबाबामहाराजांकरवी, 'महाराष्ट्र भूमंडळात एक नव्या धर्मजागरणाची 'प्रार्थना प्रभात' प्राचीकडे आरक्त वर्णांकित सुचिन्हांनी मंडित झाली आहे.' (सांगाती - श्रीबाबामहाराज विशेषांक पृ. २)

दुसरे असे की या धर्मासाठी त्यांनी एका नव्या शब्दाची योजना केली. तो म्हणजे 'संतधर्म.' तिसरे म्हणजे माणूस सुधारण्यासाठी- संतधर्माच्या पुनःस्थापनेसाठी 'चतुर्विधाक्षेत्रहीशुद्धी'ची प्रत्यक्ष कार्यप्रणाली त्यांनी घालून दिली. चौथी गोष्ट म्हणजे कार्यकर्ता कसा असावा याबद्दल सुस्पष्ट विवेचन केले. भक्तीबद्दलच्या खुळचट कल्पना लोकांच्या मनातून काढून टाकून उलट 'समाजाचा खरा सेवक ईश्वरभक्तच होऊ शकतो' हेही तथाकथित समाजसेवकांना ठणकावून सांगितले. (संतधर्म : जीवनदर्शन पृ. ८०) मात्र त्याचबरोबर 'जनताजनार्दनाची सेवा'च एकदम करायला निघणाऱ्या तथाकथित धर्मसेवक भक्तांनाही इशारा दिला की, आधी स्वतःमधील ईश्वराला ओळखा. आधी 'आत्मनो मोक्षार्थं' आणि मग 'जगद्धिताय च.'

## नवे धर्मजागरण

आता आपण श्रीगुळवणीमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे श्रीबाबांनी 'नवे धर्मजागरण' केले ते काय हे पाहू.

श्रीबाबांनी पाहिले की, 'आज मानवांच्या पतनाचा विदारक चित्रपट प्रत्यक्षाने आपण पहात आहो. अत्यंत दुर्बल, म्लान व दीन झालेला मानव, सर्वच सद्गुणांपासून दिवसेंदिवस विन्मुख होऊ लागला आहे. देव, धर्म यांविषयी आंधळ्या समजुती उराशी बाळगून उत्क्रांतीचा दिव्य पथ अंधाराने

काळाकुट्ट होऊ लागला आहे. देव, धर्म यांविषयी आंधळ्या समजुती उराशी बाळगून उत्क्रांतीचा दिव्य पंथ अंधाराने काळाकुट्ट झाला आहे. हिताहिताचा विचार स्वार्थांध मनोवृत्तीने विनाशाचे वाटेवर अविवेकाने होत आहे.... श्वानवत् वृत्तीने आजचा मानव मानवांची व मानवी मूल्यांची स्मशानयात्रा करण्यास्तव, द्रव्यलोभी होऊन प्रगतीची हाडे मात्र चघळतो आहे. धर्माचा अनादि स्तंभ मोडून काढण्याचा प्रयत्न करण्यात आसुरी वृत्ती गर्क झाली आहे.' (प्रार्थना प्रभात पृ. ५) म्हणून श्रीबाबा हाक देतात -

***ही घोर धर्मग्लानी बघवे कशी बघा ना ।***
***तिळ प्रेम ना मनी का ? धर्मात चेतवा ना ।***

(प्रार्थना प्रभात पृ. ४)

पुन्हा अशा परिस्थितीत समाधुरीण काय करत आहेत ? तर धर्म हाच समाजाची धारणा करतो, 'धारणात् धर्म इत्याहुः धर्मो धारयते प्रजाः ।' हा भारतीय विचार सोडून देऊन, पाश्चात्त्य विचारधारा आपण स्वीकारतो आहोत हेही दयनीय दृश्य श्रीबाबांना दिसले. तेव्हा पुनरपि 'धर्माचे रक्षण करा म्हणजे धर्मच तुमचे रक्षण करेल' - 'धर्मो रक्षति रक्षितः' हे नव्याने सांगण्याची आवश्यकता होती. ते लिहितात - 'नानाविध समाजवादी सुधारक कल्पनांचा, विचारांचा अभ्यास करून मी असा निष्कर्ष काढला आहे की, संतांचा धर्म सांभाळला, तरच भ्रष्टता, दैन्य, दुःख व दुर्भिक्ष्य दूर होईल, पौरुष जागेल व जीवन सतेज होईल. मानव व समाज आदर्श व दिव्य करणे हेच संतधर्माचे कार्य आहे... एकाच वेळी दोन्हींचे (व्यक्ती व समाज) उत्थान साधा. ते साधण्याचा एकच मार्ग आहे व तो म्हणजे, व्यक्तींच्या आत ईश्वराचे श्वास उठू द्या व समाजशरीरात व्यक्तित्त्वाच्या आदर्शाचा प्राण ओता. जीवनात संतांचा धर्म व ईश्वराची सत्ता सुदृढतेने संचरित केली तरच हे शक्य आहे... एखादी व्यक्ती जर केवळ आपले व्यक्तित्वच उत्कर्षाकडे नेऊ लागेल व समाजोत्कर्ष करण्याचे टाळेल, तर ते व्यक्तित्व शेवटी शून्यतेनेच भरलेले राहील. कारण तो एक घटक हा समाजाचाच अविच्छेद्य असा भाग असतो... समाज प्रगत म्हणजे ऐहिक दृष्टीने खूप संपन्न असला व समाजाचा आत्मा जो मानव, तोच जर अधःपतित असेल, तर तो समाज प्रगत आहे असे म्हणण्यात काय अर्थ ? आज काही समाजसेवक व्यक्तित्वाचा विकास लक्षात न घेता, समाजाचे कलेवर सजविण्यात आपले सर्व बळ खर्ची घालतात. तसेच काही मूर्ख जीव आपण व आपली साधना एवढेच बिऱ्हाड पाठीवर घेऊन, विंचवासारखे हिंडत असतात व जिथे जुळेल तिथे इतरांना दंश केल्याशिवाय रहात नाहीत. जीवन या जाणिवेने समावेशित झालेल्या व्यक्ति-विश्व-ईश्वर (जीव-जगत्-जगदीश्वर) या तीन घटकांचे जे सजातीय व एकरसत्व आहे ते त्यांना कळत नाही... व्यक्ति-ईश्वर-विश्व या तीन शक्तिघटकांतून प्रवाही असलेला निर्मळ चेतनस्रोत प्रथम लक्षात घ्या व तो स्रोत या तिघांच्याही ठायी अप्रतिहत उत्कर्षित होऊ द्या.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. ५१ ते ५३)

भारतीय धर्मविचाराच्या मुळाशी जे अधिष्ठानभूत तत्त्वज्ञान आहे, ते असे आहे की ब्रह्म हेच एक सत्य आहे व त्यापासूनच हे सर्व जीव व जगत् निर्माण झाले आहे, त्या रूपाने ब्रह्मच नटले आहे. भारतीय तत्त्वचिंतन चिंतनासाठी चिंतन नसून जीवनाभिमुख चिंतन आहे. त्यामुळे यात तत्त्वज्ञान व जीवन, तत्त्वज्ञान व विज्ञान यांमध्ये भांडण नाही, हेही श्रीबाबांनी ठासून मांडले. समाजवाद व साम्यवाद हे पाश्चात्त्य वाद व भारतीय धर्ममय जीवनरचना यांची तुलना करताना श्रीबाबामहाराज लिहितात -

'शाश्वत सिद्धान्त ज्याच्या पाठीशी नाही, तो सिद्धान्त खोटा असे सर्वच जण मानतात. समाजवादी लोकांनी 'समाज' हा घटक शाश्वत मानला व मगच आपल्या समाजवादी तत्त्वज्ञानाची उभारणी केली. ते म्हणतात की माणसे मरून जातात पण समाज मात्र अखंड चालला आहे... समाज शाश्वत समजून सर्व सत्ता समाजाच्या स्वाधीन करा असे समाजवादी म्हणतात. मार्क्सवादी श्रमसत्तेला महत्त्व देतात. सामाजिक श्रमाची सत्ता समाजावर असावी असे त्यांचे म्हणणे आहे. या साध्यासाठी राजसत्ता हस्तगत करावी असा साम्यवादींचा कार्यक्रम असतो... या दोन्ही कल्पनांपेक्षा भारतीय कल्पना कितीतरी उदात्त आहे. भारतीय कल्पनेने, प्रतिभेने वरील कल्पनांचे खंडन केलेले आहे. 'ब्रह्म' नावाचा एक घटक भारतीयांनी निर्माण केला - म्हणजे होता तो शोधला.' (माचणूरचे हृद्‌गत पृ. ४६) ब्रह्म, प्राण, जीवन हे शाश्वत मूल्य होय. 'प्राण हे शाश्वत मूल्य होय. या मूल्याच्या भरवशावर श्रम करता येणे शक्य आहे... जेथे सजीवता नाही, जीवन नाही तेथे श्रम वा पैसा असणे संभवनीयच नाही.' म्हणून 'माचणूर मार्क्सवाद मानीत नाही. समाजवादही मानीत नाही. माचणूर फक्त 'जीवनवाद मानते.' (माच. हृद्‌गत पृ. ४५, ४६, ४८) 'धर्म, अध्यात्म व साधना याच मौल्यवान व शाश्वत गोष्टी आहेत. याशिवाय जे राजकारण, समाजकारण वा अर्थकारण असेल, त्यांना काहीही अर्थ नाही. त्या सगळ्या वृथा वल्गना आहेत. धर्माशिवाय त्यांना काडीचीही किंमत नाही. राजकारण, समाजकारण व अर्थकारण ही सर्व 'कारणे' कोणासाठी निर्माण झाली आहेत ? माणसासाठीच ना ? राज्य कोण चालवील ? समाज कोणाचा ? म्हणून सर्वांतील मूलभूत घटक जो माणूस, तो दिव्यातिदिव्य करण्याची व्यवस्था कोणती याचाच विचार वास्तविक झाला पाहिजे. माणूस दिव्य झाला की ही सर्व 'कारणे' दिव्य होतीलच.' (मा. हृद्‌गत पृ. ४०, ४१) माणसाला दिव्य करण्याचे काम धर्मच करतो. शिवाय, 'भारतीय सृष्टीमध्ये जे धर्मकारण आहे, ते समाजकारण, राजकारण आदी सर्व 'कारणांना' व्यापून आहे. जीवनाच्या सर्व क्षेत्रांना अधिष्ठानभूत असा धर्माचा विचार आहे.' (मा.हृ. पृ. ४३)

## संतधर्म

'संतधर्म' असे म्हणताना श्रीबाबामहाराजांना आपली जी मूळ 'धर्म' संकल्पना आहे, 'धर्मोऽस्य विश्वस्य जगतः प्रतिष्ठा' तीच अभिप्रेत आहे. ज्यामुळे सर्व विश्वाची धारणा होते, तो धर्म. परंतु धर्माला संत असा विशेष शब्द जोडून 'संतधर्म' असा नवीन शब्द प्रचलित करण्याचे प्रयोजन ते स्वतःच सांगतात - 'संस्कृती व धर्म हे शब्द आजचे जग फार विपरीत अर्थाने जाणते. पण त्यासारखे पवित्र असे दुसरे पर्यायी शब्दच नाहीत. म्हणून सध्याच्या विपरीत जाणिवेस फक्त दूर सारावे यासाठीच मी धर्म व संस्कृती या शब्दांमागे 'संत' शब्द लावतो. नाहीतर धर्म व संस्कृती ही संतांचीच जीवनरचनात्मक व्यवस्था असते. त्यामागे 'संत' शब्दाची वास्तविक गरज नाही. पण सत्ताधाऱ्यांनी व सामाजिक संघटनांनी या दोन शब्दांना खंडशः केले आहे. त्यातील पावित्र्य व विशालता भ्रष्ट केली आहे... मी 'मानवधर्म' न म्हणता संतधर्म म्हणतो. संतधर्मात मानवधर्म + मानवेतर जीवनरचना यांचा संगम आहे... 'समाजधर्मा' प्रमाणेच 'राष्ट्रधर्म' व 'विश्वधर्म' हेही शब्द फसवेच आहेत. विश्वात्मक देवाची विश्वकल्याणासाठी प्रार्थना करणाऱ्या विशाल, विश्वव्यापी हृदयाच्या संताग्रणी ज्ञानेश्वरांनाच

विचारा की तुम्ही देवास काय प्रार्थिले ? अहो, ज्ञानेश विश्वकल्याणासाठी विश्वधर्म मागत नाहीत... ते म्हणतात 'विश्व स्वधर्मे सूर्ये पाहो ।' स्वधर्म, आत्मधर्म हाच संतधर्म.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. ११, १२) 'स्वधर्म हा सर्वांना एकच असतो व तो म्हणजे ईश्वराकडे जाण्यासाठी कर्म करणे.' (ब्रह्मनिनाद भाग १, पृ. ४४) या स्वधर्माकडे, आत्मधर्माकडे नेण्याचे व लोकांना नीतिधर्माचेही शिक्षण देण्याचे कार्य संतांनीच केले आहे. म्हणून त्यांच्याबद्दल कृतज्ञतेचा भाव व्यक्त करण्याच्या दृष्टीनेही हा 'संतधर्म' शब्द यथार्थ आहे असे मला वाटते. आणि दुसरे म्हणजे संतांच्या पावन चरित्राचा, कार्याचा व वाङ्मयाचा खोल ठसा संपूर्ण समाजाच्या हृदयावर अंकित आहे. त्यामुळे 'संतधर्म' म्हटल्यावर एक जवळीक व सुलभसोपेपणा धर्माबद्दल वाटतो. कारण धर्माची तत्त्वे जास्तीत जास्त सोप्या शब्दांत व सहज आचरणातून संतांनी समाजापर्यंत नेऊन पोहोचविली. तिसरं म्हणजे, संत पदाला प्राप्त झालेले सारे थोर एकाच सनातन धर्माचे प्रणेते होत. त्यामुळे संतधर्म शब्द संप्रदायनिरपेक्षही होतो. चौथी गोष्ट म्हणजे 'सनातन धर्म' किंवा 'हिंदू धर्म' शब्द वापरल्याने अन्यधर्मीय तसेच आपल्याच धर्मातील तथाकथित 'धर्मनिरपेक्ष' मंडळी उगीचच चवताळतात. वास्तविक हिंदू धर्म हा 'वसुधैव कुटुम्बकम्' अशी विशाल दृष्टी असलेला एकमेव धर्म आहे. तो संकुचित नाहीच नाही. परंतु 'संतधर्म' म्हटल्यावर ते अन्यधर्मीय व आपल्याच धर्मातील मंडळीही संतधर्म काय सांगतो हे जाणायला तरी आपल्या सनातन धर्माकडे वळतील. कारण संत हे सर्वच धर्मामध्ये झाले आहेत आणि संतांबद्दल आदराचा भाव तथाकथित बुद्धिवाद्यांमध्येही आहे. परंतु संतधर्म म्हणजे भोळसटपणा, कमालीची सहिष्णुता नव्हे. दया, क्षमा, शांती हे गुण संतधर्मात अभिप्रेत आहेत. परंतु दयेची व्याख्या श्रीतुकाराममहाराज कशी करतात, ते पहा - 'दया तिचे नाव । भूतांचे पाळण । आणिक निर्दाळण । कंटकांचे ।।'

धर्म, संतधर्म म्हणजे काय, ते श्रीबाबा विशद करतात - 'खरा धर्म हा एकच आहे. धर्म अनेक कसे असू शकतील ?... धर्म हा एकच असतो. तो सद्धर्म होय. तो सत्यास प्राप्त करणारा, मानवात दैवी तेज व ओज जागृत करणारा व सर्व विश्वाला धारणारूप असतो... ईशनिर्मित सृष्टिनियमांचे पालन करून सुखाने सत्याकडे जाणे हाच धर्म होय... पदार्थमात्रही धर्म सोडून व्यक्त होणे असंभव असते. पदार्थाचा प्रभाव ज्या विशेष गुणाने प्रकट होतो, तो गुणच त्याचा धर्म होय... मानवीसृष्टी व मानवेतर जीवनरचना यांच्या उत्क्रांतीचा विचार धर्मात आहे. हाच संतधर्म, ईशधर्म किंवा आत्मधर्म होय. ईशधर्म हा चराचराचा निसर्गधर्म आहे. मानवाचे हे कर्तव्य आहे की, त्याने या विश्वव्यापी धर्माचे आकलन करून घेऊन, त्याचेशी सुसंगत अशा मानवधर्माचे डोळसपणे आचरण करावे.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. १६, १७) भारतीयांनी प्रथमपासूनच मांडलेला हा विचार आता - आता कुठे पाश्चात्त्य लोक 'परिसरविज्ञाना'त मांडू लागले आहेत.

'अखिल सृष्टी ही मानवाच्या उपभोगासाठी ईश्वराने निर्माण केली आहे.' असा पाश्चात्त्य विचार ! याउलट श्रीबाबा लिहितात - 'जीवन हे एक साधन आहे हे ओळखून प्राप्त वेळेचा सदुपयोग करणे हे सुविद्य लक्षण होय.... जीवनाचा उपयोग करणे हा धर्म व उपभोग घेणे हा अधर्म.' (ब्रह्मनिनाद भाग १, पृ. १६)

'जगण्याची कला याचा खरा अर्थ आहे, ईश्वराकडे जाण्याची क्रिया... पंचविषयांची सुखे सोडण्यास संत सांगत नाहीत. पण ती वापरावी कशी याचा आचार ते सांगतात. परमेश्वराने निर्माण केलेल्या सृष्टीत परमेश्वराचे प्राकट्य कसे पाहायचे ते संत शिकवितात. तोच त्यांचा धर्मविचार आहे... व्यक्तिगत साधना विश्वजीवनातून झाली पाहिजे असा त्यांचा सांगावा आहे. एकट्याचा मोक्ष त्यांना अभिप्रेत नाही. व्यक्तिगत उद्धार व जगदुद्धार या क्रिया एकाच वेळी घडल्या पाहिजेत. ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम यांनी स्वच्छ सांगितले आहे की, विश्व वैकुंठाला न्यायचे नसून वैकुंठच या भूतलावर आणायचे आहे. 'वैकुंठीचा देव आणू या भूतळा ।' अशी त्यांची प्रतिज्ञा आहे.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. २६)

## कार्यप्रणाली

'आचारप्रभवो धर्मः ।' यावर भर देताना श्रीबाबा लिहितात - 'धर्मविषयक भावनात्मक आस्था असूनही, त्याच्या प्रत्यक्ष आचरणासंबंधी मात्र अनास्था दिसते... म्हणजे आपण धर्माचा प्रत्यक्ष जीवनाशी नाते जोडण्याचा प्रयोग करीत नाही. माणसाला राहायला घर पाहिजे असते, पण ते बांधण्यासाठी करावयाचा उपद्व्याप व कटकट मात्र नको असते. तसे आपले धर्माच्या बाबतीत झाले आहे... (धर्मासाठी) जीवन झिजविण्याची काही व्यवस्था आपण स्वीकारली पाहिजे.' (मा. हृद्गत पृ. ३९, ४०)

'सकळ धर्मामाजी धर्म । स्वरूपी राहणे हा स्वधर्म ।।' (समर्थ रामदास) स्वतःचे व विश्वाचे खरे ब्रह्मरूप जाणणे, अनुभवणे हाच मानवाचा स्वधर्म आहे. व या स्वधर्मात व्यक्तीचे व विश्वाचे कल्याण एकाच वेळी साधते. जर सर्वत्र ब्रह्म ईश्वर आहे, तर मग त्याचे ज्ञान आपणास का नाही ? ते कसे होईल ? श्रीबाबा लिहितात - 'विश्व हे ईश्वराचे रूपच आहे. जाणिवेच्या अव्यवस्थितपणामुळेच ईश्वराचे हे मंगलरूप न दिसता, अव्यवस्थित रूपात म्हणजे द्वन्द्वपूर्ण रूपांनी आपण विश्व पाहतो. जाण सुसूत्र व्यवस्थेने आली की, हे सर्व जगत् ईश्वरच जाणले जाते.' (ब्रह्मनिनाद भाग २, पृ. ६,७) वास्तविक आत्मा हा ज्ञानरूपच आहे, पण तो आत्मप्रत्यय आपणास येत नाही. 'जेव्हा आपण मन, बुद्धी, चित्त व इंद्रिये यांना परिशुद्ध राखू, तेव्हाच आत्म्याचा शुद्धतम प्रत्यय आपल्याला येऊ शकेल. आत्म्याचा हा शुद्धतम प्रत्यय येण्यासाठी जी जीवनरचना भारतीय द्रष्ट्यांनी केली, त्या रचनेलाच 'धर्म' म्हणतात. अशा प्रकारची व्यवस्था फक्त हिंदू जीवनपद्धतीत आहे. या जीवनपद्धतीचाच विचार आपण माचणूरला, चतुर्विधा क्षेत्रशुद्धीच्या कार्यरूपाने केला आहे.' (मा. हृद्. पृ. ६९, ७०)

## भावनिक विश्व

नैसर्गिक विश्व व भावनिक विश्व या दोन्हींचा विचार श्रीबाबांनी केला आहे. निसर्गनियमांना अनुकूल असेच मानवाने वागणे हा त्याचा धर्म आहे. त्याचप्रमाणे भावनिक विश्व की, जे मानवाचे खास विश्व आहे - त्यातही त्याने धर्मानुकूल व्यवहार करावा. हे भावनिक विश्व म्हणजे काय ? श्रीबाबा लिहितात - 'भावनिक विश्व' हे संस्कृतीचे निसर्गानुकूल घडविलेले शिल्प आहे. समाज, राष्ट्र, विश्व हे सारे भावनिक जगाचेच घटक असतात. मानव ज्या जगात जगतो-विहरतो, त्या जगास तो आपल्या जीवनानंदासाठी, इहपर प्रगतीसाठी एक आगळे-वेगळे स्वरूप देत असतो... दृश्यमान जगाच्या अंगावरच त्याने आपल्या या स्वतंत्र जगाची स्थापना केलेली असते. स्त्रीला भगिनी-माता-पत्नी-दुहिता अशा विविध रूपांत त्याने नटविलेले असते... पुरुषाला भ्राता-पिता-मामा-चुलता-मित्र अशी कितीतरी

रूपे तो देतो. आपल्या जीवन-संपर्कात येणारी प्रत्येक गोष्ट तो या प्रकारे आपल्या स्वतंत्रनिर्मितीच्या जगात अवतरित करतो. यामुळेच सुख, आनंद, प्रगती, कुटुंब, संसार इत्यादींचा तो आस्वाद घेऊ शकतो. केवळ दगडामातीच्या, वारापाण्याच्या, अग्नीच्या, गगनाच्या दृश्यात त्याला स्वजीवनाचा प्रगत आविष्कार अनुभवता आला नसता... त्याचा सारा व्यवहार याच भावनिक जगात असतो.... बरे-वाईट हे सारे या जगातच अवतरते. हे भावनिक विश्व जेवढे सत्यासमीप असेल, तेवढी मानवी व्यवहारात उदात्तता, दिव्यता, सहकारिता व आदर्शता अनुभवास येत असते.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. ६१) 'आज जग बिघडले आहे असे सर्वजण म्हणतात. म्हणजे या जगातले काय बिघडले आहे ? तर आपल्याला असे दिसून येईल की माणसांच्या भावनाच फक्त बिघडलेल्या आहेत. या भावना वास्तवतेकडे, यथार्थाकडे नेणाऱ्या म्हणजे सत्याश्रयी करणे, म्हणजेच भावनिक विश्व निर्माण करणे होय. हेच सत्कार्य व जगत्कार्य होय. याचीच अत्यधिक गरज आजच्या जगाला आहे असे माझे स्पष्ट मत आहे... ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव या सर्व संतांनी हेच कार्य केले. भावनिक विश्वाची निर्मिती करणे हेच सर्व सज्जनांचे व साधुसंतांचे एकमेव कार्य आहे.' 'म्हणून...प्रथम आपापल्या घरात भावनिक विश्व आकाराला आणलेच पाहिजे. घराघरांतून जी पितापुत्रांची, मातापुत्रांची, भावाभावांची, पतिपत्नींची भांडणे असतील, त्या भांडणांचे मूळ तुम्ही शोधून काढले पाहिजे. मग तुम्हाला असे आढळून येईल की, सर्व भांडणांच्या मुळाशी 'विकार' हेच कारण आहे. काही वेळेला 'अज्ञान' हेही कारण आहे. परस्परांनी परस्परांना समजून घेऊन अज्ञान व विकार यांच्यापासून दूर होणे, हीच साधनेची सुरुवात नाही का ?' (मा.हृद्. पृ. ५६ वरील तिन्ही अवतरणे)

## चित्तचतुष्टयाच्या शुद्धीसाठी चतुर्विधा क्षेत्रशुद्धी

मानवाच्या भावनिक विश्वाची शुद्धी साधायची असेल, तर त्याचे अंतःकरण 'चित्तचतुष्टय' शुद्ध व्हायला हवे. चित्तचतुष्टय म्हणजे 'मन-बुद्धि-चित्त-अहंकार ही मानवांतर्गत ईश्वरदत्त शक्तिकेन्द्रे आहेत. जगात कोणत्याही श्रेणीचा कोणताही मानव, नव्हे तर अखिल जीवमात्र ईश्वरदत्त चार घटकांनी व्यापलेल्या क्षेत्राबाहेर जगलेला नाही. अखिल ब्रह्मांडांत होणारी उलाढाल याच शक्तिघटकांच्या अंतर्बाह्य क्षेत्रांत घडत असते.' 'जगात घडणारी भ्रष्टता, परस्पर आक्रमण, असंतोष, अराजक, फसवाफसवी वा लुबाडणूक इत्यादी दुष्ट स्वभाव आज जे दिसतात, त्याचे कारणही हेच की, या चतुर्विध क्षेत्रांची व्यवस्था व अवस्था भंग पावून निकृष्ट पातळीवर आली आहे. म्हणून सुधारणा, प्रगती करावयाची आहे, ती याच शक्तिघटकांच्या अवस्थेत व्हावयास हवी... या चार शक्तिघटकांची स्थूलप्रत्ययी दृश्यमान रूपे न्याहाळताना असे दिसून येते की मन हे भावनाक्षेत्र, बुद्धी हे विद्याक्षेत्र, चित्त हे विहारक्षेत्र व अहंकार हे कर्तृत्वक्षेत्र होय.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. ५८, ५९) 'मानवांतर्गत या चार शक्तिघटकांची सामाजिक जीवनातील रूपे कोणती ? तर मन हे भावनाक्षेत्र म्हणून त्याचे सार्वजनिक जीवनातील स्थान म्हणजे मंदिर किंवा तीर्थक्षेत्र होय. बुद्धी हे ज्ञानक्षेत्र म्हणून सार्वजनिक जीवनातील तिचे स्थान म्हणजे विद्यापीठ (शाळा, महाविद्यालय किंवा शिक्षणक्षेत्र) होय. त्याप्रमाणे चित्ताचे क्षेत्र कुटुंब व अहंकाराचे क्षेत्र ग्राम हे होय.' (मा.हृद्.पृ.५७) म्हणूनच चित्तचतुष्टयाच्या शुद्धीसाठी या चतुर्विधा क्षेत्रांच्या शुद्धीचा विचार श्रीबाबांनी मांडला. बाह्य क्षेत्रशुद्धीकडून अंतःकरण शुद्धीकडे जाण्याचा हा उपाय सांगितला, त्याचबरोबर आतूनही अंतःकरणशुद्धी कशी साधावी हेही त्यांनी सांगितले आहे. त्याचा विचार आपण नंतर करू.

### कुटुंबक्षेत्र

'चित्त हे त्यागाने शुद्ध व्हावयाचे आहे. त्याचे प्रगट स्थान कुटुंब होय. आज कुटुंब व्यवस्था उद्ध्वस्त होऊ पहात आहे. कुटुंबियांसाठी आपण त्यागपूर्ण जीवन जगायचे आहे. या उदात्त विचाराऐवजी, स्वतःच्या भोगासाठी कुटुंब असा भ्रष्ट विचार रूढ होऊ पहात आहे. जोपर्यंत मनुष्य त्यागमय संकल्पाने परिवारात राहू शकत नाही, तोपर्यंत समाजासाठीही काही त्याग करण्याची बुद्धी त्याला होणार नाही व त्याचे चित्त शुद्ध होणार नाही.' (संतधर्मः जीवनदर्शन पृ. ६९) '(कुटुंबक्षेत्र शुद्धीत) अर्थशुद्धी व श्रमशुद्धी ही दोन्ही आलीच... विकार सोडून कर्तव्यक्षमतेत श्रमशील असणे ही श्रमशुद्धी होय. विकारांसाठीच जेव्हा श्रम करावे असे वाटेल तेव्हा श्रम अशुद्ध होतात, भ्रष्ट होतात. ही विकारी सृष्टी वाढली की माणूस कुटुंबापासून वेगळा होणार. दुसऱ्यासाठी आपण का श्रम करावे अशी भावना त्यावेळी निर्माण होते. कुटुंबियांप्रमाणेच अतिथी-अभ्यागत, दीन, दुःखी या सर्वांसाठी श्रम करण्याची धारणा पूर्वी होती.' (मा.हृद्. पृ. ५७, ५८) 'संत सांगतात की तुमच्या कुटुंबियांना अर्थशक्तीने गुलाम करू नका. त्यांना मानसिक, बौद्धिक, स्वातंत्र्य देऊन त्यांचा आंतरिक विकास घडवून आणा.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. ६९) 'गृह म्हणजे माणसे राहण्याचे ठिकाण असे नव्हे, तर जेथील माणसे त्या गृहाची सत् परंपरा, कुळाचार, विचार-वैशिष्ट्ये व पावित्र्यपूर्ण देवदेवतार्चन सांभाळतात, तेथे गृह असते, वा असे करणे म्हणजेच घर सांभाळणे होय. केवळ हशीखुषी, खाणेपिणे, चैन एवढे चांगले होणे म्हणजे गृह सांभाळणे नव्हे. हीच विचारधारा समाज, संप्रदाय, राष्ट्र इत्यादींना लावा.' (सांगाती-श्रीबाबामहाराज विशेषांक पृ. ३७) 'भारतीय जीवनपद्धतीचा पुरेपूर आणि निर्लज्ज मनाने स्वीकार केला पाहिजे. एवढे जरी तुम्ही केले तरी माचणूरला येण्याचे सार्थक झाले असे मी समजेन.' 'पोषाखापासून ते प्रत्येक व्यवहारापर्यंत तुम्ही भारतीय बना... पोषाखाने काय होणार असे म्हणू नका. पोषाखाचाही काही परिणाम आहे, प्रभाव आहे.' (मा. हृद् पृ. ७१, ७३) कुटुंबसंस्था हीच समाजाला पायाभूत आहे, तिचीच आज काय दुरवस्था झाली आहे यावर अधिक भाष्य करणे न लगे ! मुळात कुटुंबेच संस्कारहीन झाली आहेत म्हणून आज व्यक्ती, समाज व राष्ट्र दिशाहीन झाले आहे. यासाठीच कुटुंबक्षेत्राबद्दल येथे थोडे विस्ताराने लिहिले. बाकीची तीन क्षेत्रेही-ग्रामक्षेत्र, विद्यापीठ क्षेत्र, तीर्थक्षेत्र-अर्थात् महत्त्वाचीच आहेत. परंतु कुटुंबातील सुसंस्कार जर प्रबल आणि चांगले रुजलेले असतील, तर अशा कुटुंबातील व्यक्ती, बाहेरच्या अत्यंत विपरीत वातावरणातही बिघडत नाहीत. आपले संस्कार पक्के धरून ठेवतात असा अनुभव आहे. एका लेखात सर्वच गोष्टी विस्ताराने सांगणे शक्य नाही. म्हणून बाकीच्या तीन क्षेत्रांचा विचार येथे अगदी थोडक्यात करू.

### ग्रामक्षेत्र

'ग्राम म्हणजे प्रगतीची गती. ज्या ग्रामात ही गती नसेल, त्याला सांस्कृतिक दृष्टीने ग्राम समजणे ही केवळ एक रूढीच मानावी लागेल.'

(संतधर्म : जीवनदर्शन पृ. ७०) 'आजच्या ग्रामात ग्रामपंचायत आहे. पण पंचाईत करण्याची जागा म्हणजे पंचायत अशी व्याख्या करण्याची पाळी आली आहे. आज आपल्या ग्रामात कलह आहे, मत्सर आहे, असूया आहे, भांडणे, हेवेदावे आहेत... माणसाची जिथे प्रगती होणार नाही असे स्थान म्हणजे ग्राम, अशी व्याख्या करण्याची पाळी आली आहे.' (मा. हृद्. पृ. ५९) 'आपले ग्राम स्वच्छ, निर्मळ व निकोप राखून तेथील ग्रामदेवतेला सर्वांनी सामूहिकपणे आवाहन केले तर निश्चितच ती ग्रामदेवता ग्रामस्थांमध्ये सद्‌भावना, सत्प्रेरणा व धर्मशीलता, निर्माण करील... सहयोग व सहकार या दोन तत्त्वांवर ग्रामस्थांचा व्यवहार स्थिर करणे हेच ग्रामशुद्धीचे लक्ष्य आहे. या व्यतिरिक्त सर्व ग्रामसुधारणा, विध्वंसकच होत. सहयोग व सहकार यांचे मूल्यमापन आर्थिक पायावर नको. ते श्रमाधिष्ठित असावे. कारण अर्थ हा श्रमाचा परिणाम होय. जेथे अर्थाधिष्ठित सहकार व सहयोग असेल, तेथे कलह, गटबाजी, पक्ष व अनैतिक स्वार्थ निर्माण होतोच.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. ७१) अशाप्रकारे अर्थशुद्धी ही ग्रामक्षेत्रातही पाळली पाहिजे असा श्रीबाबांचा कटाक्ष होता. हा आपला प्राचीन भारतीय अर्थशास्त्राचाच विचार आहे, ज्याचं पाश्चात्त्य अर्थविचाराला सोयरसुतकही नाही. 'गावासाठी आपण आपल्या जबाबदारीची जाणीव घेऊन त्यासाठी काही त्याग करायला सिद्ध असले पाहिजे... गावात कुणी दुःखी-कष्टी असतील त्यांना मदत करणे, कुणी उपाशी राहू नये याची खबरदारी घेणे यासाठी त्याग व समर्पण यांची आवश्यकता असते.' (मा. हृद्. पृ. ६०) अशा प्रकारे माणसाचा 'अहंकार' हा घटक शुद्ध होतो, व्यापक होतो.

## विद्यापीठ क्षेत्र

'शिक्षणाने जर माणसे एकमेकांना फसविण्याचे नवनवीन मार्ग काढू लागली, तर अशा शिक्षणाचा उपयोग ? विद्यापीठ शुद्ध करणे यात विद्याशुद्धी हा उपक्रम आहे. त्यासाठी धर्मशिक्षण विद्यापीठांतून देणे आवश्यक आहे... म्हणजे जीवन शुद्ध करणारे, जीवन समृद्ध करणारे शिक्षण पाहिजे... शिवाय सर्व भारतीय शास्त्रांचे अध्ययन होऊ शकेल अशी महाविद्यापीठे निर्माण झाली पाहिजेत. अशा पीठातून भारतीय जीवनपद्धतीचा सर्वांगपरिपूर्ण अभ्यास केलेली मंडळी बाहेर पडून, त्यांनी जगभर सर्व भाषांमधून तिचा प्रसार करावा असे मला वाटते... जेवढी काही भारतीयता आज तुम्हाला समजली असेल, ती आग्रहपूर्वक तुम्ही आचरली पाहिजे... निरनिराळ्या प्रकारची माहितीची भेंडोळी आपल्या बुद्धीत कोंबणे असा आजचा ज्ञानप्रगतीचा विवेक झाला आहे. पण बुद्धीला व मनाला सुविद्य, सुसंस्कृत व निर्भय करणारे योग-प्रयोग व धर्माचार यांचे शिक्षण विद्यापीठातून देण्याची व्यवस्था झाली, तरच राष्ट्रजीवन तेजस्वी व पुरुषार्थपूर्ण होईल.' (मा. हृद्. पृ. ६१,६२) याउलट आजचे शिक्षण म्हणजे माहितीप्रधान, जीवनविन्मुख, पाश्चात्त्य आचारविचार व भाषा यांचेच संस्कार करणारे व केवळ पाश्चात्त्य शास्त्रांच्या शिक्षणावर भर देणारे झाले आहे. त्यामुळे विद्यार्थ्यांच्या मनात भारताविषयी अस्मिता अभावानेच आढळते. विद्या हे पैसा कमावण्याचे साधन केवळ राहिले आहे. विद्येने सुसंस्कार व ज्ञानप्राप्ती साधायची आहे हे आमच्या गावीही नाही !

## तीर्थक्षेत्र

'मनांच्या विशुद्धीसाठी व त्यायोगे भावनिक विश्वशुद्धीसाठीच भारतात तीर्थ ही भव्य कल्पना निर्माण झाली... या तीर्थयोजनेद्वारे, भारतासारख्या विस्तृत व अफाट देशाचे सांस्कृतिक ऐक्य साधले गेले. आसेतुहिमाचल सर्वांमध्ये एक धर्मता, एकात्मता व एक संस्कृती घडविली गेली. सारा देश मनाने व कर्माने एकसंधी बनला... तीर्थक्षेत्र हे मानवाचा देव करणारे, भूलोकी वैकुंठ आणणारे एक प्रभावी विद्यासत्र होते. ती या भारताची सांस्कृतिक विद्यापीठेच होती. पण आज काय दिसते ? पुण्याच्या पेठा पापाची कोठारे होऊ पहात आहेत... आज तीर्थक्षेत्र बिघडण्याचे महत्त्वपूर्ण कारण म्हणजे, सामाजिक प्रतिष्ठितपणाची मूल्ये आज जडाश्रित झाली आहेत... सत्ता, संपत्ती व संघटना या तीन शक्तींवरच मानवी प्रतिष्ठा स्थिर झाली आहे... विद्या, सदाचार, सदभिरुची, परोपकार अशा दैवीगुणांची समाजात प्रतिष्ठा नाही. त्यामुळे पवित्रतादायक कोणतेही स्थान, कर्म किंवा विद्या धिक्कारले जात आहे. तीर्थक्षेत्र बिघडण्याचे दुसरे कारण म्हणजे तीर्थवासींचा सदोष विहार आहे. आपला भलाबुरा सारा व्यवहार असे लोक तीर्थस्थानात आचरताना दिसतात... तीर्थाच्या पावित्र्याची ज्यांचेवर खास जबाबदारी आहे असे पुजारी व हक्कदार यांच्यामध्येही हीच प्रवृत्ती दिसून येते. यात्रिकांशी ते स्वार्थाचा व्यवहार करू लागले आहेत. म्हणून आज नव्याने तीर्थक्षेत्रांच्या शुद्धीची चळवळ हाती येणे आवश्यक आहे.' (मा. हृद्. पृ. ६३) 'आचारसंहिता' मध्ये श्रीबाबांनी तीर्थक्षेत्री, पुण्यक्षेत्री व मंदिरात आपला विहार कसा असावा याचे मार्गदर्शन केले आहे, ते मुळातूनच पाहण्याजोगे आहे.

अशा प्रकारे 'या चतुर्विधा क्षेत्रशुद्धीच्या' रूपानेच हे 'भावनिक विश्व' निर्माण करावयाचे आहे.' (मा. हृद्. पृ. ६५) या शुद्धिमोहिमेतून आज समाजात मान्यता पावलेल्या वर्गकलहवादी 'अभारतीय निष्ठा' सत्ता, संपत्ती, संघटना यांच्या जागी भारतीय निष्ठा पुनःप्रस्थापित करायला हव्यात असे श्रीबाबा सांगतात. त्या निष्ठा म्हणजे ज्ञान, दैवीगुणसंपदा व संस्कृती या होत. या निष्ठांच्या प्रस्थापनेतून ईशसत्तावाद अवतरेल व धर्म हाच मानवाचा शास्ता होईल.

## वर्णव्यवस्था

वर्णव्यवस्थेवर खूप टीका होते. पण श्रीबाबा तिचे सत्यस्वरूप विशद करतात, 'वर्ण ही देशातीत, ज्ञातिरहित असणारी अधिकारदर्शक संज्ञा आहे. वर्ण ही निसर्ग-प्रेरणा आहे... वर्णाधिकार ना कोणत्या जातिजमातीच्या मोहोरबंद पुडक्यातून लाभतो, तर तो कर्मतःच प्राप्त होत असतो... वर्ण हे स्वभावतः भिन्नत्वाचे अधिकार दर्शन असले, तरी त्याच्या शुद्ध प्रकृतीत ऊर्ध्वगतिमान होण्यासाठी अवकाश व वाव आहे. शूद्राने ब्राह्मण्य कमवावे असाच प्रगतीचा निसर्ग स्वभावशील वर्णाचरणात असतो. विश्वाच्या स्वाभाविक प्रवृत्ती चारच आहेत. या चार प्रवृत्ती ज्या प्रमाणात ईश्वराभिमुख असतील, त्या प्रमाणात धर्म जागा होतो. तोच स्वधर्म होय... ज्ञान, कर्म, त्याग व सेवा ह्या त्या चार प्रवृत्ती होत. ज्ञान हे ब्रह्मवर्चस्, कर्म हे क्षात्रतेज, त्याग हेच वैश्य व सेवा हेच शूद्र होय... उत्तम सेवा करून त्यागी व्हावे, त्यागाने योगी व्हावे, योगाने ज्ञानी व्हावे व पुढे या सर्वांचा त्याग करून भक्त व्हावे. गीतेचा हाच आदेश आहे. कोणतेही कर्म धर्माने केले, तर सर्व धर्मकृत्ये ही स्वधर्माचीच कर्तव्ये होत. याचा अर्थ सर्व कर्मे समानच आहेत.' 'विषमता ही दोन प्रकारची असते-ईश्वरनिर्मित व मानवनिर्मित ईश्वरनिर्मित विषमता नैसर्गिक आहे व मानवनिर्मित विषमता

कृत्रिम, संघर्ष वाढविणारी व समाजास दानवी बनवणारी असते. ईशनिर्मित विषमतेत न्याय व दया असते व तेथे प्रत्येक घटकाचे स्वास्थ्य व प्रगतीची व्यवस्था सहजसिद्ध असते... ही व्यवस्था गुण व कर्म यावर उभी असते... गरीब व श्रीमंत हा भेद राहणारच. पण गरीबाला श्रीमंत व्हावयास प्रतिबंधक योजनाच समाजात जेव्हा रूढ होते, तेव्हा तिला मानवकृत विषमता म्हणतात.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. ४४ ते ४६).

## आतून अंतःकरण-शुचिता

मन, बुद्धी, चित्त व अहंकार यांची शुद्धी करण्यासाठी बाह्य क्षेत्रांची शुद्धी साधण्याचा जसा एक मार्ग आहे, तसा दुसरा मार्ग अंतःशुद्धीचा. आपल्यामध्ये असलेले जे आत्मतत्त्व, ईशतत्त्व वा गुरुतत्त्व ते शुद्ध आहे. 'जय जय वो शुद्धे' असे माऊलींनी ज्ञानेश्वरीत १२ व्या अध्यायाच्या प्रारंभी सद्‌गुरूंचे स्तवन केले आहे. ते शुद्धतत्त्वच मी आहे व तेच सर्व जगात, सर्व जीवांमध्ये आहे हे ज्ञान होणे हीच खरी शुद्धी. 'जोपर्यंत द्वित्व आहे, तोपर्यंत अमंगलता आहे. वास्तविक एक चैतन्यच विस्तारलेले आहे.' (मा. हृद्. पृ. ३१) म्हणून 'ज्या अज्ञानावस्थेमुळे सारे प्रश्न निर्माण होतात, ती जीवाची अज्ञानबद्ध दशा नाहीशी करणे हाच एक मार्ग आहे. मूलस्वरूपाचे यथार्थ ज्ञान झाल्यानेच आपले सारे प्रश्न सुटणार आहेत.' (मा. हृद्. पृ. ९)

यासाठी पहिली गोष्ट कोणती करायची ? तर 'मी साधक आहे, मी देवाचा आहे, मी देवासाठी जगेन व देवासाठीच मरेन... असे आपल्या बुद्धीला, मनाला व इंद्रियांना समजावून दिले पाहिजे.' (मा. हृद्. पृ. २५, २६) साधनेचा पहिला पाठ आहे - 'इदं न मम ।' हे माझं नाही, हे माझं नाही, असा पाठ साधकाने सतत स्वतःला शिकविला पाहिजे.' (मा. हृद्. पृ. २५) 'या पाठाच्या एकंदर अभ्यासासाठी गीतेत 'अनपेक्षः शुचिर्दक्षः' हा पाठ सांगितला आहे... दक्षता कशासाठी ? तर शुचि साठी, म्हणजे पवित्रतेसाठी... आणि जीवन पावित्र्याने भरून टाकण्यासाठी 'अनपेक्ष' हा पाठ आहे.' (मा. हृद्. पृ. ३०, ३१) मात्र अपेक्षा ठेवायची नाही, तर काही कर्मच करायला नको, असे मात्र मुळीच नाही. 'तुम्ही अखंड कर्मरत रहा. तरच तुम्हाला 'इदं न मम' म्हणण्याचा अधिकार प्राप्त होईल. दुसऱ्याच्या घराकडे पाहून 'इदं न मम' म्हणण्यात काय अर्थ आहे ? 'इदं' हे तुमच्या श्रमातून निर्माण होते... हा 'इदं न मम' चा पाठ शेवटी आपल्या शरीरापर्यंत आणून भिडवा. हे शरीरही माझं नाही इतकं म्हणण्यापर्यंत आपल्यात जागृती झाली पाहिजे.' (मा. हृद्. पृ. १३)

## अभ्यासासाठी काही प्रयोग

'देवाकडे नेणारी वाट जर दिव्य आहे, तर साधकाच्या प्रत्येक लहानसहान कृतीतूनही' माणसातला देवच प्रगट झाला पाहिजे. 'साधक' या जाणिवेने जगू लागले की, साधना आपोआप सुरू होईल.' (मा. हृद्. पृ. १७) साधनेचा दंभ टाळण्यासाठी सहजतेवर श्रीबाबांनी भर दिला आहे. परंतु सहजता, स्वाभाविकता एकदम कुठून येणार ? त्यासाठी अभ्यास आवश्यक आहे. 'अभ्यास करणे म्हणजे स्वभाव घडविणे' (मा. हृद्. पृ. २८) साधना, भक्ती, ध्यान यांचा स्वभावच घडविण्यासाठी काही प्रयोग श्रीबाबांनी मांडले व लोकांकडून साधना शिबिरातून करवून घेतले. उदा. 'आचार-संहिता'मध्ये 'स्वात्मदीक्षा' प्रयोग आहे. कारण 'धार्मिक आचाराचे जगात प्रवेशण्यापूर्वी परमार्थ विचाराचे अंतःकरणात जागरण होणे आवश्यक आहे... (स्वात्मदीक्षेच्या) वेळी बुद्धी ही आपल्या मूळ शक्तीने प्रतिष्ठीत असते की ज्यामुळे त्यावेळच्या उपदेशाने स्वभाव निर्माण करण्याचा घडतो.' ही स्वात्मदीक्षा मुळातूनच पहावी व अनुभवावी. स्वभाव आतून सुधारण्याचा तो एक उपाय आहे, तसेच विश्वाच्या कल्याणाचेही संकल्प त्यात आहेत - ज्यायोगे विश्वशुद्धीही घडेल. ध्यान-प्रयोग, स्वानंद व विश्वशांतीसाठी श्रीगुरुदेवांची प्रार्थना (प्रार्थना-प्रभात), सायं-संध्या यांचाही अंतःकरणशुद्धीसाठी उपयोग आहे. 'साधना-संहिता' व 'साधक-विहार-सूत्रे' यात साधनेचे मार्गदर्शन केले आहे. मानवातील देवाला सलगीने, जिव्हाळ्याने आवाहन करणारी 'मानवगीता' ही स्फूर्तिपद आहे. त्याचप्रमाणे 'प्रभातपाठ'मध्ये सूर्यनमस्काराचे महत्त्व सांगून ते कसे घालावेत याचे मार्गदर्शन केले आहे. ते लिहितात, 'भारतीय उपासनेत सूर्यनमस्कार हा प्रमुखच नव्हे, तर आवश्यक मानला जाणारा प्रयोग आहे... शरीर, मन व बुद्धी या त्रिविध शक्ती सारख्याच प्रगत करणे हेच सामर्थ्याचे व सुखास्थित जिवंतपणाचे प्रतीक होय... साधकाने आपल्या तेजाचा विनियोग लोकहितार्थ करावा, पण तेजहीन असणे युक्त नव्हे... सूर्यनमस्काराची प्राणायामपूर्वक प्रक्रिया जर आम्ही साधली, तर आमच्या जीवनात एक दिव्य तेजाचा आविष्कार सहज होऊ शकतो... बाहेरून जसा अभ्यास करावा व अभ्यासिलेले बुद्धीत साठवावे, तसे बुद्धीचे आतही सूक्ष्मतम व दिव्य स्पंद चेतित करण्याचे कार्यही आवश्यक आहे... ज्याची बुद्धी सूर्य-नमस्काराने निर्मळ व निर्दोष झाली आहे, त्याच्या प्रज्ञेत सर्व ग्रहण यथार्थतेने घडून जीव दिव्य, प्रज्ञावान होऊ लागतो.' (प्रभात पाठ पृ. २९, ३०)

***'देह हा रथ आत्म्याचा, बुद्धि तो रथ चालवी ।***
***मनाचे अश्व जोडोनी, चालला रथ लौकिकी ॥'***

देह ही दैवी वाणी आहे, आत्म्याचा रथ आहे तेव्हा तो सुदृढ हवा. बुद्धीने सारथ्य करून ते योग्य दिशेने-ईश्वराकडे-न्यायला हवा इ. बहारीचे व अत्यंत महत्त्वपूर्ण विवेचन दिव्यामृतधारा द्वितीय खंडात मुळातूनच वाचण्यासारखे आहे.

मनाच्या शुद्धीसाठी 'मनोपदेश' हा ३३३ श्लोकांचा ग्रंथ आहे. प्रास्ताविकात श्रीबाबा लिहितात - 'मन हे जीवनाचे दिव्य शक्तितत्व आहे... त्याचे सामर्थ्य कमी पडताच जीवन दीन, उदास व हतबल झालेच म्हणून समजा... मन ताब्यात घ्यायचे नाही कारण ते मनरूपात ताब्यात असणेच संभवत नाही. तो एक उदासवाणा व दुःखदायी प्रयोग ठरतो... मन ही ज्याची प्रगट अवस्था आहे, त्या आत्मरूपाला आपले आत्मभावनेत प्रगट होऊ देण्याचे केले पाहिजे... अर्थात् मन ताब्यात घ्यायचे नसून मन शुद्ध करावयाचे असते. नाना उपाय व नाना प्रयत्ने हे कार्य आपल्याला साधणे आवश्यक आहे... मनाला नाना प्रकारे उपदेश करून आपले मूळ शुद्धतम स्फुरणेने जागवावे.' (मनोपदेश पृ. ४, ५)

एकूण मन, बुद्धी, चित्त, अहंकार, प्राण हे सर्व त्यांच्या मूळरूपात म्हणजे आत्मरूपात स्थित झालेकीच खऱ्या अर्थाने शुद्ध होतात, असे श्रीबाबा सांगतात. शरीरही ज्या प्राणशक्तीच्या आत्म्याच्या बळावर चालते, तिचेही भान आपणास हवे, तरच शरीर खऱ्या अर्थाने समर्थ होते. श्रीबाबा लिहितात, 'प्राणरूप श्रीगुरु माझे जीवन जगवितात. त्यांच्या कृपेशी कृतज्ञ असणे हीच भक्ती.'

अशा प्रकारे जो सर्व प्रकारे शुद्ध झाला, तोच खऱ्या अर्थाने संतधर्माचा पाईक होऊ शकतो.

## कार्यकर्ता

संतधर्म जगात सुप्रतिष्ठित करण्याचे काम करणारा, चतुर्विधाक्षेत्रशुद्धीची कार्यप्रणाली अंमलात आणणारा कार्यकर्ता कसा असावा, हेही श्रीबाबांनी सांगून ठेवले आहे. अर्थात्, या विश्वाचा निर्माता, पालनकर्ता, संहारकर्ता ईश्वरच आहे. त्याला या विश्वाच्या रक्षणाची काळजी आहेच. सृष्टीची धारणा व्हावी म्हणून त्याने सृष्टीतील पदार्थमात्राला, जीवमात्राला 'धर्म' दिला. सर्व पंचमहाभूते आपापल्या धर्माने चालत आहेत. पण मानव मात्र त्यांच्याही धर्मात दखलगिरी करतो व स्वतःही आपला धर्म पाळत नाही. म्हणून मानवात सतत धर्मजागरण करीत राहावे लागते. त्यासाठी 'धर्मसंस्थापनार्थाय' ईश्वर नेहमी अवतार धारण करीतच असतो. संतांच्या रूपाने तोच येतो. समाजाला सुधारण्याची योग्यता व सामर्थ्य संतांमध्येच असते. फक्त तेच पूर्ण निःस्वार्थ व समाजहिताची खरी कळकळ व कळवळा असणारे असतात. महाभारतात यक्षाने धर्मराजाला प्रश्न विचारला - 'का दिक् ?' धर्मराजाने उत्तर दिले, 'संतः दिक्' दिशा कोणती ? संत हीच दिशा आहे. संत हेच मार्गदर्शक आहेत. तेव्हा खरे कार्यकर्ते तेच होत. परंतु श्रीकृष्णाने जरी गोवर्धन पर्वत उचलला, तरी गोपाळांनीही आपल्या काठ्या लावायच्या असतात. श्रीरामाच्या सेतुबंधनात खारीनेही आपल्या सेवेचा वाटा उचलला. त्याप्रमाणे सामान्य जनांनीही संतांच्या कार्यात आपला सेवेचा भाग उचलायला हवा. कारण सेवेने आपलीच शुद्धी होते. संत शिष्याकडून 'हृदशुद्ध्यर्थ सेवा घेती ।' प. प. श्री. टेंबे स्वामी.

श्रीबाबा लिहितात, 'बरेचदा धर्मकार्यासाठीं काही विशेष गुण असावा असा भ्रम मानवी बुद्धीत होतो. पण धर्मकार्यार्थ त्याची गरज नाही. तुमच्या अंगी ईश्वराने दिलेल्या कोणत्याही गुणाद्वारे धर्म स्वीकारताच, धर्मकार्य सुरू होणार आहे... फक्त समतेच्या धर्माला अंतःकरणात वाव द्या. म्हणजे तुमच्यात आहे त्या गुणानेच धर्मसेवा सुरू होईल... परमेश्वरावर श्रद्धा ठेवणे व त्याला जीवनात मिसळून जगणे म्हणजेच समतेला वाव देऊन जगणे होय.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. १४) 'धर्म जागा होतो ही ईश्वराची कृपा आहे. पण ही ईश्वराची कृपा होण्याकरिता संतांचा जो पथ, म्हणजे नाम व सेवा यांचा स्वीकार केला पाहिजे. सेवेशिवाय नामस्मरण उपयोगाचे नाही. सेवेतच शरणागतीची खूण आहे. सेवा करीत असताना नामस्मरण असावे म्हणजे प्रभुकृपा होते व प्रभुकृपेच्या स्पर्शाने धर्म जागा होतो. असा स्पर्श नसताना केला जाणारा धर्माचार हा दुराचारच जाणावा. प्रथम प्रभुस्पर्श व मग धर्मनिष्ठ जीवन-विहार असावा. धर्म हा देवाचा प्रकाश आहे. पण हा प्रकाश देवापासून आला पाहिजे. आपल्या मनमानी कल्पनांपासून येऊन उपयोगाचा नाही.' (ब्रह्मनिनाद भाग २, पृ. २०) नामस्मरण, सेवा याबरोबरच उपासना, ध्यान याचीही आवश्यकता श्रीबाबा प्रतिपादित करतात. सर्वत्र प्रभूच नटला आहे हा विचार बुद्धीत ठेवून जनता-जनार्दनाची सेवा करायला निघणे हा प्रकार आपल्याला सर्वत्र दिसतो. पण श्रीबाबा इशारा देतात की ध्यानाने अनुभूती प्राप्त करणे आवश्यक आहे. ''प्रभु सर्वत्र आहे' हे सत्य जरी उघडे असले तरी एखाद्या तरी घटकावयवात त्याचा प्रत्यक्ष अनुभव घडला पाहिजे. याचा अर्थ, ही ईश्वराच्या व्यापकतेची पवित्र भावना ठेवू नये असा नाही. तथापि कल्याण तर तेथेच आहे की जेव्हा प्रभू व घटक एकाच संवेद्य धर्माचे आहेत असे घटक जाणेल.' 'विचाराच्या आत अनुभवाचा प्रकाश असला, तरच तो आत्मविचार ठरतो. नाहीतर परविचाराने प्रतिष्ठित होऊन आत्मवंचनेशिवाय लभ्य काय असणार ?' (प्रभातपाठ - ध्यानप्रयोग पृ. २०) उपासनेचे महत्त्व सांगताना श्रीबाबा म्हणतात - 'उपासनेद्वारा मानवाची खरीखुरी तेजस्विता प्रकाशित होऊन, यथार्थ सुखशांतीचा ओघ त्याच्या जीवनात खळाळू शकतो.' (एकसष्ट बोधवचने क्र. ४८) 'अर्चना, स्तुती, जप, ध्यान व सेवा ही उपासनेची पाच मुख्य अंगे आहेत.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. २९)

'धर्मसंस्थापनेचे नर' असे जे ईश्वराचे अवतार संत, त्यांनीही साधना, उपासना, नामस्मरण, सेवा या द्वारे स्वतःला घडविण्यासाठी आयुष्यातील काही काळ खर्ची घातला व मगच स्वभावेच जगत्हितासाठी ते झिजले. श्रीबाबा हे लक्षात आणून देतात की, 'सकळ संतांनी देहबुद्धीचे स्तोम न माजविता, आत्मबुद्धीचा प्रयोग व कायदाच धर्म होय आणि तदर्थच सारे व्यक्त धर्म आहेत असे घोषित केले... 'सकळ धर्मामाजी धर्म । स्वरूपी राहाणे हा स्वधर्म ।' ही आज्ञा व 'सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।' ही भगवद्आज्ञा लक्षात घेतली पाहिजे. हेच भक्तिबीज होय.' (ब्रह्मनिनाद भा. २, पृ. १५) 'प्राप्त झालेला धर्म विवेकपूर्णतेने आचरीतच, त्यापेक्षा उच्च धर्मास पोहोचले पाहिजे, असे निसर्गानेच स्थिर केले आहे... मानवकृत समाजरचनेतील केवळ कल्पित धर्मांना भोगेच्छेने व कर्तव्याच्या भावनेने जाणणे हे मूढपणाचेच ठरते. भाऊ, मामा, काका, पिता हे सारे धर्म मानवाने सामाजिक रचनेसाठी व जीवनातील संघर्ष कमी करण्यासाठी निर्मिले आहेत. पण हे कल्पित धर्म जर आत्मविकसन कार्यात आड येत असतील, तर ते सर्व सोडून देवास शरण जाणे हेच योग्य असते. सर्व शास्त्रांचे व थोरांचे असेच प्रतिपादन आहे.' (ब्रह्मनिनाद भा. २, पृ. १२, १३) 'दिव्यामृतधारा' ग्रंथाचे प्रयोजन सांगताना, ग्रंथारंभी 'अभिदर्शनात' श्रीबाबा लिहितात, 'सध्या धार्मिक समाज निस्तेज, निष्प्रभ झाला आहे. एकूण सारी जीवनरचना उद्‌ध्वस्त होण्याचे दुश्चिन्ह आज दिसत आहे... आज मार्गदर्शक विचारांची गरज आहे. 'ज्ञानेश तत्त्वज्ञान' हे काम करू शकते... ज्ञानेशांचा धर्मसंदेश 'भक्ती' हीचा यथायोग्य व प्रामाणिक विचार व्हावयास पाहिजे.' भक्ती हाच धर्म होय, असे श्रीबाबा प्रतिपादितात. भगवंतही गीतेत भक्तियोगाच्या १२ व्या अध्यायाच्या शेवटी 'धर्म्यामृतमिदं' असेच भक्तीबद्दल म्हणतात. म्हणून श्रीबाबा लिहितात, 'समाजाचा खरा सेवक ईश्वरभक्तच होऊ शकतो. ईश्वरभक्तीतच यच्चयावत् जीवांची सहजपणे, कर्तृत्वाभिमानरहित सेवा घडू शकते... हजारोंनी ईश्वरसेवक, देवभक्त निर्माण करण्यातच राष्ट्रहित सहजपणे संभवेल. हेच कार्य ज्ञानेश्वर, तुकाराम, समर्थ, तुलसीदास, गुरु गोविंदसिंग, कबीर आदी संतांनी न करताच केलेले आहे.' (संतधर्म : जीवनदर्शन पृ. ८०) 'प्रचार हा करायचा नाही. तो आपल्या आचाराने, बोलण्याने सहजच व्हायला पाहिजे... धर्माचे, देवाचे बोलावे व करावे. समाजसेवा नव्हे पण समाजातील देवत्व चेतविताना ईशसेवा घडते हा पारमार्थिक न्याय ध्यानी ठेवा' (संतधर्म पृ. ७९) कार्यकर्ता सात्त्विक असावा, भक्त असावा. 'एखादे वेळेस कार्यकर्ता प्रभावी नसला तरी चालेल, पण तो कार्याचे शुद्धत्व राखणारा व गंभीर असणे आवश्यक आहे.' (संतधर्म पृ. ८३) 'ज्ञानेश हे भक्तीचे फक्त पुरस्कर्ते होते असे नव्हे, तर 'भक्तीशिवाय सर्वांगपरिपूर्ण व व्यक्तीपासून विश्वापर्यंत सकलांच्या कल्याणाचा जीवनादर्शदायी अन्य मार्गच नाही.' असे सिद्ध करणारे सुधारक होते... भक्ती ही केवळ मोक्षाची वाट म्हणून

नाही, तर तो जगण्याचा एक उत्तम, सर्वांगपरिपूर्ण विचार आहे. जगात दिव्यता संचरित करण्याची ती दिव्य शक्ती आहे, असे ज्ञानेशांनी प्रतिपादिले. जगाच्या सुखस्वास्थ्याला आजही त्याची गरज आहे.' (दिव्यामृतधारा खंड १, पृ. ५०४) भक्तिमार्गात 'नामस्मरण' हे मुख्य आहे. त्याने व्यक्तिशुद्धी व विश्वशुद्धीही साधते. श्रीबाबा लिहितात, 'नामस्मरणाच्या सुलभ साधनात जीवन व्यतीत होऊ लागताच, प्रत्येक श्वास हा ज्या पुरुषाचे नामस्मरण असेल, त्या पुरुषाकडे त्या नामाच्या प्रीतीने फेकला जातो. ज्या प्रमाणात नामीवरील प्रीतीच्या आवेगाने नाम घेणे घडेल, त्याप्रमाणात नामीचे दिव्यत्व, शक्तित्व व महानत्व हे नामस्मरण करणाऱ्या जीवाला नकळत लाभू शकते... 'राम राम म्हणता रामचि होसी'.' (दिव्या. खंड १ पृ. २६८) सत्संकल्पाने, नामस्मरणाने विश्वशुद्धी कशी होते ते थोडक्यात पाहू, ते श्रीबाबांनी विशद केले आहे. (दिव्या. खंड १ पृ. २६६ ते २६८) 'सृष्टीत परा आणि अपरा या दोन शक्ती आहेत. परासृष्टीत शुद्ध संकल्पधारी जीव, साधु, संत असतात आणि अपरासृष्टीत दुरात्मे असतात. व्यक्ती जेव्हा सत्संकल्प करते, तेव्हा तो उच्छ्वासावाटे बाहेर पडून परा गटाकडे जातो व संतांचे बळ प्राप्त करून, अधिक बलवान् होऊन श्वासावाटे परत येतो. त्यामुळे व्यक्तीतील व विश्वातील सत्प्रवृत्ती वाढते व व्यक्ती व विश्व शुद्ध होते. याउलट वाईट संकल्प अपरागटाकडे जातो व अधिक बलवान होऊन परत येतो व व्यक्ती व विश्व अधिक अशुद्ध होते. अशा प्रकारे जीवन शुद्ध वा अशुद्ध करण्याचे बीज संकल्प हे आहे. शुद्ध वा अशुद्ध संकल्प निवडण्याचे बौद्धिक बळ जीवामध्ये असेलच असे नाही. यासाठीच 'पवित्र नाम सतत घ्या' असा संतबोध आहे. कारण त्यात सारे विश्व शुद्ध, सामर्थ्यशाली व सुखरूप करण्याची ही पारमार्थिक कला आहे.'

### समारोप

अशा प्रकारे सामाजिक परिवर्तन म्हणजे मानवात परिवर्तन; मानवाने संतधर्माचा-धर्माचा-मार्ग चोखाळणे; त्यासाठी अंतःकरणाची शुचितेची गरज; या मन, बुद्धी, चित्त, अहंकाराच्या शुद्धीसाठी बाह्य चतुर्विधाक्षेत्रांची शुद्धी; तसेच आतूनही ध्यान-साधना, उपासना, नामस्मरण, स्वात्मदीक्षा, सूर्यनमस्कार, मनोपदेश, प्रार्थना, सेवा इ. द्वारे शुद्धी. ईश्वरभक्त, स्वधर्मस्थित होणे हे कार्यकर्त्यासाठी आवश्यक. अशा अनेक विचारांचा मागोवा आपण घेतला. तो श्रीगुरुदेवचरणी ज्यांचा त्यांनाच समर्पित करते.

**प्रा. प्रज्ञा अ. जावडेकर**
गणेशकृपा, पटेल कॉलनी, सिद्धनाथ रोड, बडोदे.

# सारेचि देखिले वैभव...

(पूज्य बाबामहाराजांनी लिहिलेले साधनाकालीन वर्णन)

सारेचि देखिले वैभव सुखाचे । भोगिल्या आशेचे अनुभवे ॥धृ॥
उत्तम वाहनी हिंडलो स्वैर । भरविला दरबार वैभवाचा ॥१॥
वस्त्र मूल्यवान पायतळी माझ्या । वैभवाचा राजा अनुभविला ॥२॥
श्रीमंती नुरली जगामाजी कोठे । राजेपण दिठे मज पाहता ॥३॥
गज अश्वरथ झुलविले द्वारी । साक्ष हरिद्वारी अजुनी आहे ॥४॥
सेवकांचे तांडे चाले मागे पुढे । पाही चहुकडे वैभवासी ॥५॥
जेथे जावे तेथे मानचि मिळे हो । विजय पताका फडके माझी ॥६॥
दरिद्रीही आम्ही सुखविले फार । नदीनाले डोंगर अनवाणी ॥७॥
उघड्या अंगाने फिरलो सर्वत्र । वैभवाला परत पाठविले ॥८॥
गिरीकंदराशी शिरलो भुयारी । घोर वनांतरी फिरलो आम्ही ॥९॥
मैत्री श्वापदांची प्रेमे आम्ही केली । एकांती देखिली माझी मूर्ती ॥१०॥
भिक्षा दारोदार कराया हिंडलो । स्वानंदे भरलो माझ्या अंगे ॥११॥
नाही भीति आम्हा सुख सामग्रीची । ठेव समाधानाची बापे दिली ॥१२॥
साता दिवसांचे पडले उपवास । तरी ना सायास घडले काही ॥१३॥
तीन दिवसांची शिळी भाकरी ती । आनंदा भरती आणावया ॥१४॥
लंगोटीही आम्हा नव्हती एकदा । हर्षानी सदा झाके अंग ॥१५॥
दारिद्र्याचा राजा वैभवाचा स्वामी । अहर्निश स्वामी भरलो ऐसा ॥१६॥
एकटा चाललो महापुरांतरी । शिवालयांतरी ओंकारीच्या ॥१७॥
रत्नांचा मुगुट महंत म्हणोनी । घातला वृंदावनी साऱ्या संती ॥१८॥
तैसेचि सुखाने पादत्राण डोयी । ठेविले मी पाही जगन्नाथी ॥१९॥
पायी तुडविला बर्फाचा डोंगर । धनाचे ढिगार ठायी ठायी ॥२०॥
ऐसी बादशाही भोगिली मी सुखे । आणिक ती दुःखे आनंदाने ॥२१॥
किती सांगू बापा हाल या देहाचे । बंध ते चोरीचे भोगले मी ॥२२॥
वेडा म्हणोनिया मार तो साहिला । कथा खांडव्याला झाली ऐसी ॥२३॥
वाहिले मी ओझे हमालाच्या परी । हीच मुंबापुरी साक्ष आहे ॥२४॥
भांडी घासायासी तीन दिन होतो । हॉटेली चहा तो ग्राहकांसी ॥२५॥
बंदरी राहिलो कोळसा फेकाया । धन्य वाटे माया मज सारी ॥२६॥
तैसाचि फिरलो राजभुवनात । राहिलो सुखात तीन ठायी ॥२७॥
हजारो कोसांची पायपीट केली । बिहारी बंगाली मंत्र विधे ॥२८॥
परी आता झालो गोसावी मुळाचा । वीट वैभवाचा मज आला ॥२९॥
सोळा वरुषांचा निघालो आडरानी । पंढरी वाटेनी म्हणता विठ्ठल ॥३०॥
कुठेही पहावे काहीही करावे । देई तेथि खावे भगवंत ॥३१॥
जरीचे अंबारी देह सजविला । गजावरी मिरविले नेपाळात ॥३२॥
परी गोड नाही वाटे माझ्या जिवा । म्हणोनी देवापाशी आलो ॥३३॥
उणेपणा काही उरलाच नाही । सुखे सर्वव्यापी प्राप्त झाली ॥३४॥
चिंध्या पांघुरल्या उतार वस्त्रांच्या । विंध्याद्री गिरीच्या कडेलागी ॥३५॥
ऐसे बहु आहे चरित्र विटाळ । अज्ञानाचा मूळ ऐसा सारा ॥३६॥
हे काय सांगावे जगापुढे आम्ही । सदाचे निकामी वैभव हे ॥३७॥
याहुनी थोर हरिभक्त झाले । शरीर विटंबिले बहू कष्टे ॥३८॥
आम्ही काय केले व्हायचे ते झाले । हरीने ठेविले तैसे वागू ॥३९॥
सारेचि जाणावे मृगजळी व्याप । वृथा हे विलाप आलापाचे ॥४०॥
बहू ऐसे आहे चरित्र आमुचे । परी ते वाणीचे वृथा शीण ॥४१॥

# अहंकार सोडून भक्तिप्रेम धरावे
# आर्वीकर महाराजांच्या 'मनोपदेश'

प्रा. डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे

प. पू. बाबामहाराज आर्वीकर यांनी तीनशे तेहेतीस श्लोकांची रचना करून 'मनोपदेश' नावाचे भक्तिकाव्य लिहिले आहे. ईश्वरप्राप्ती हे ध्येय साध्य करण्याकरिता भक्ती करणे हाच एकमेव मार्ग आहे. पण त्यांतही अडथळे फार. अहंकार हा सर्वाधिक मोठा अडथळा त्यात असल्याने तो दूर सोडून भक्तिप्रेम करावे, असा मनास उपदेश करून त्यांनी 'नामसाधना' हाती दिली आहे. तिचा मागोवा इथं घेतला असून तो भक्तिमार्गी साधकांस मार्गदर्शक ठरणारा आहे. 'मनाने सदा शाम चिंतीत जावा' हीच साधना बहुमोलाची !

श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनी दोनशे पाच 'मनाचे श्लोक' लिहून रामचिंतन हा साधनमार्ग उपदेशिला आहे. अलिकडील काळात जे आधुनिक संत होऊन गेले, त्यांत प. पू. बाबा महाराज आर्वीकर यांनी तीनशे तेहेतीस श्लोक लिहून 'मनोपदेश' केला आहे. त्यांत भक्तिप्रवृत्त होण्यासाठी त्यांनी मनाला बोध करताना शामचिंतन म्हणजे कृष्णनामाचे स्मरण ही भक्तिसाधना सांगितली आहे. भक्तीत येणारा मुख्य अडथळा म्हणजे अहंकार हा दुर्गुण असल्याने तो दूर सांडून कृष्णप्रेमाचा सद्‌गुण संपादन करावा, अशी भूमिका त्यांनी मनोपदेशात विशद केली आहे.

## पूर्वपीठिका...

'मनोपदेश' वर लिहिताना मला एका पूर्वसुकृताच्या-सुयोगाचे स्मरण होत आहे. १९६३ ते १९७० या कालावधीत मी दै. संचार आणि दै. समाचार या सोलापूर वृत्तपत्रात सहसंपादक म्हणून काम करीत होतो. त्यामुळे सोलापूर जिल्ह्यातील सामाजिक-राजकीय घडामोडींबरोबर धार्मिक स्थळांचे दर्शन घडून येऊन संत-सत्पुरुषांच्या भेटीचा आणि दर्शनाचाही सुयोग प्राप्त झाला होता. मुख्यमंत्री वसंतराव नाईक, गृहमंत्री बाळासाहेब देसाई आणि पाटबंधारे मंत्री राजारामबापू पाटील यांनी तीन दिवस सोलापूर जिल्ह्याचा दौरा केला होता. प्रसिद्धी अधिकारी वि. म. पत्रिके यांनी या दौऱ्यात आम्हा - पत्रकारांना मंगळवेढा येथील सभेसाठी मंत्रीमहोदय जाताना वाटेंत माचणूरला नेले. तिथे प. पू. बाबामहाराज आर्वीकरांचे दर्शन घडले. प्रसन्न मुद्रा, ओजस्वी वाणी, आदराने स्वागत ही त्यांची 'ओळख' घडते न घडते तोच त्यांचे छोटेसे प्रवचन ऐकायला मिळाले. ओघवत्या/प्रवाहीरूपात यांची वाणी भक्तिज्ञान बोलू लागली. सर्वांना अपार आनंद आणि विशेष समाधान लाभले. प. पू. आर्वीकर महाराजांच्या निर्याणानंतर तेथील दत्तजयंती-सप्ताहात अनेक वेळा मी प्रवचन सेवेसाठी गेलो होतो. दर्शनसुख आणि कृपाशीर्वाद यांचे योगानेच आज चाळीस वर्षांनंतर मी त्यांच्या मनोबोधावर लिहून 'लेखन सेवा' करीत आहे. असो.

'मनोपदेश' या श्लोकबद्ध भक्तिकाव्याच्या तीन आवृत्ती प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांतच त्याची उपयुक्तता आणि लोकप्रियता कळून येते. आपल्या 'प्रास्ताविक निवेदन'मध्ये आर्वीकर महाराज सांगतात की, 'मनाचे अमंगलस्वरूप जर परिवर्ती केले व त्यात शुभ्र संकेत निर्माण करून पवित्र केले, तर सारे जग आनंदाचे माहेर आणि देवाचे क्रीडांगण होऊ शकते.' म्हणजेच मनावर संस्कार करायला हवेत. ते संस्कार पारमार्थिकतेच्या अनुषंगाने करणे म्हणजेच भक्तिसाधना करणे होय. 'प्रभुप्राप्तीचे अनंत उपाय आहेत. पण सकल उपायांचे अधिष्ठान मनाचे निकोपपण व सबलपणच असते.' म्हणूनच मनाला बोध करायचा. 'मन ताब्यात घ्यायचे नसून मन शुद्ध करावयाचे असते.' ही गोष्ट केवळ साधनेनेच घडून येऊ शकते; ही गोष्ट इथे सूचित केली गेली आहे.

'वाचकांशी हितगुज' करताना आर्वीकर महाराजांनी म्हटले आहे की, 'अध्यात्ममार्ग ही एक जीवन जगण्याची दिव्य व उदात्त वाट आहे... तो विचार जीवनाच्या व्यवहारापासून वेगळा नाही. परमार्थबोध आपल्या व्यवहार्य जीवनापासून वेगळा ठेवून दिव्यानुभवाची आशा धरणे हे निरर्थक व व्यर्थ असते.' इथे त्यांनी प्रपंच आणि परमार्थ यांची परस्परपूरकता स्पष्ट केली आहे. 'अहो ! व्यवहार करणारा व परमार्थ साधणारा यांत वावरणारे जीवन वेगळे कां आहे ?' असा प्रश्न विचारून त्यांतील एकवाक्यता त्यांनी आग्रहाने प्रतिपादिली आहे.

परमार्थाने काय साध्य करावयाचे आहे ? या प्रश्नाच्या उत्तराच्या दिशेने त्यांनी फार मार्मिक-विचार प्रकट केले आहेत. ते म्हणतात, 'परमार्थविचार व साधना देव मिळावा यापेक्षा देव व्हावयासाठी आहे... देव मिळवावयाचा नसतो तर देव व्हावयाचे असते. देवत्व अंगी यावे यासाठी देवाची कांस ! अहो ! तुमच्या साधनेचा देवावर काय परिणाम होणार ? परिणाम व्हावयाचा असतो, तो आपल्याच जीवनात !!' ईश्वरदर्शनाने

साधकाच्या वृत्तीत बदल घडून येऊन त्यांच्या अंगी देवत्वाचे गुण येतात. ते येण्यासाठी भक्तिसाधना करणे आवश्यक असते; हे वेगळे सांगण्याचे कारण नाही. त्यासाठी 'मनोपदेश' करण्याची आवश्यकता आहे.

'प्रकाशकांचे दोन शब्द' मध्ये मोक्षधाम प्रकाशनाचे अध्यक्ष श्री. नरसिंह दिवेकर यांनी भक्ति करण्याचे यथातथ्यपण नमूद करताना म्हटले आहे की, 'आपले जीवन शुद्ध नि समृद्ध करण्यासाठी जिज्ञासू वृत्तीने प्रयत्नशील आणि प्रयोगशील असणाऱ्या सर्व प्रकारच्या साधकांना हा 'मनोपदेश' ग्रंथही दीपस्तंभासारखा मार्गदर्शक आहे.' साधनेचे दिव्यांग त्यांतून प्रकट होईल, असा आशावाद त्यांनी प्रकट केला आहे.

### दैन्य जावे यासाठी 'योग कीजे'...

श्रीगणेश, श्रीसद्गुरू, श्रीशारदा यांना वंदन करून 'मनोपदेश' भक्तिकाव्याला आर्वीकर महाराजांनी प्रारंभ केला आहे. त्यांच्या कृपादानाचा पान्हा आपल्याला प्राप्त व्हावा, अशी प्रार्थना त्यांनी केली आहे. 'मनामोह हा मर्त्यलोकी कसारे' अशा मोहात अडकलेल्या प्रापंचिक मनाची जाणीव ते करून देतात.(११) हा मोह कसा ? तर 'असा सर्व संसार निःसार झाला । तरी सार तो संग सेवा भुकेला । सुटेना गळेना कधी भोगतृष्णा । मना भोवली आधिची भोगतृष्णा ।।' (२४) तसा हा मोह ! 'जरी दैन्य हे नष्ट हो भाव ऐसा । तरी भोग कीजे कथे सत्य तैसा । सदा सोबती चाल साधोनि मौन । वदे मी तसा आचरी हीच 'खूण' ।।' (२७) प्रापंचिक दुःख / दैन्य काय सांगावे? त्याची रडकथा पुष्कळ आहेच. पण एक गोष्ट महत्त्वाची आहे. ती म्हणजे : 'भला जन्म आला तुला मानवाचा । महत्पुण्ययोगे मिळे देह साचा ।।' (४५) मानवजन्म मिळणे हीच गोष्ट महत् भाग्याची. कारण पाप-पुण्य समान झाले म्हणजेच नरदेह प्राप्त होतो, असे संतांचे सांगणे आहे. मग नरदेहाला येऊन पुण्यमार्ग जोडावा, अध्यात्माची कांस धरावी, भक्तियोग अनुसरावा... म्हणजे ईश्वरदर्शन घडून येऊन मनुष्यजन्माचे सार्थक होते. त्यासाठी ज्ञानचक्षू मिळवायला हवेत. 'सदा प्रेम ओसंडी ज्याचे कृतीने । जणू प्रेम स्वामित्त्व घे आवडीने । वदो प्रेमची कृष्ण की, कृष्णप्रेम । मना ! गोजिरा सावळा घ्याइ नेम ।।' (७१) कृष्ण, माधव, रमानायक इ. नामे उल्लेखून श्रीकृष्णनामाचा आग्रह आर्वीकर महाराजांनी पदोपदी केला आहे. ते सांगतात, 'जिणे धन्य केले प्रभूसख्य केले । त्यजोनि असारा हरी आकळीले । नुरे काम विश्राम पावे जयाने । मना ! होई निष्काम या संगतीने ।।' (८५) गुरुसंगती, नामसंगती, ग्रंथसंगती, साधक संगती अशा स्वरूपातील 'सत्संग' त्यांनी इथे सूचित केला आहे. साधना कोणती ? तर, 'मना कृष्णनामा वदो नित्य वाचा । तरी सार्थकी शीणली सत्य वाचा । जळे पाप नामाग्निने संतवाणी । तरे नामयोगे कथीले पुराणी ।।' (८९) त्यासाठी : म्हणजे नामस्मरण करण्यासाठी : निश्चय हवा आणि नेम म्हणजे नित्यता हवी, अशी पुष्टी त्यांनी पुढे दिली आहे. आपण भक्तिसाधना करीत आहोत की नाही, ही मनाला जागते ठेवून केली पाहिजे, असेही त्यांनी प्रतिपादिले आहे. कारण मनाला विस्मरणही फार असते. नामस्मरणाची सवय होईपर्यंत विस्मरणाची शक्यता अधिक ! म्हणून मन जागे असले पाहिजे !! सर्वत्र ईश्वरीभाव ठेवावा. 'समस्तापरी साधना एक पाही । तया सोडुनी स्थान कोठेची नाही । जगी नित्य नेमिष्ठ सद्भक्त व्हावे । भवाब्धी तराया प्रयत्ने झटावे ।।' (१०७) सद्भक्त होण्यासाठी सद्गुरुंची भेट व्हायला हवी. त्यांचेकडून नाममंत्र मिळायला हवा. आचरणाचा वचनबोधही प्राप्त व्हायला हवा. प्रारब्धानुसार काही दुःख-संकटे येतीलही. पण नामस्मरण आणि नीतिआचरण यासाठीचे प्रयत्न मात्र कधीही सोडता कामा नयेत. त्या प्रयत्नांचे स्वरूपही आर्वीकरमहाराजांनी प्रकट केले आहे. ते म्हणतात, 'बहुता हिता न्याय ते आचरावे । समस्तासवे प्रेमभावे राहावे । बहू आदरे सर्व सेवीत जावे । मना ! उर्ध्वगामी क्रियेला धरावे ।।' (११४) सर्वच गोष्टी आपल्या मनासारख्याच होतील असे नाही. मग जे घडेल, ते देवेच्छा मानून स्वीकारावे. त्यायोगे असमाधानी वा दुःखी-कष्टी होऊ नये. सदैव सदाचारानेच वागावे. देवावर श्रद्धा ठेऊन भक्ती म्हणजे नामस्मरण करावे. त्यायोगेच चित्तशुद्धी होऊ शकेल. 'त्यजी वाद, संवाद तोचि करावा । प्रभूचिंतनी काळ हा सर्व द्यावा । विवादे प्रवर्ते बहू द्वैतभार । असे मूढ बुद्धीस ही चाड फार ।।" (१२३) प्रपंच हा वादाचाच असतो. परमार्थात मात्र संवाद/सुसंवाद, सुखसंवाद घडून येऊन संवादसुख प्राप्त होते. त्यासाठीच तर 'हरिनाम ते नित्य वाचे वादावे ।।' (१२७) हेच तर भक्तिसाधनेने स्वरूप म्हणा वा सारसर्वस्व आहे. असत्संग सोडावा आणि प्रभुसंग स्मरावा हीच आचरणाची गोष्ट आहे. 'जयाचे मुखी नाम ये सर्वकाळ । महादोष नासे, तसे विश्वजाळ । सदा कृष्णकार्यात तल्लीन ठेला । जगी जन्मुनी जीव तो धन्य झाला ।।' (१३९) नामसाधनेनेच जन्मसार्थकता घडून येईल.

### 'जगी जन्मुनी जीव तो मुक्त झाला'

श्रीमसर्थरामदासस्वामींच्या 'मनाचे श्लोक' मध्ये ज्याप्रमाणे 'प्रभाते मनी रामचिंतीत जावा'... 'नुपेक्षी कदा रामदासाभिमानी'... 'मना सज्जना राघवी वस्ती कीजे' अशा सारखे दहा दहा श्लोकबंध आहेत. तसेच इथेही 'मनोपदेश' या भक्तिकाव्यातही 'जगी जन्मुनी जीव तो मुक्त झाला'... 'जरी होशी तू दास त्या माधवाचा'... 'मना पावणे कृष्णनामी विसावा'... असे दहा दहा श्लोकबंध आहेत. रचनेतली ही साम्यस्थळे काव्यदृष्टीनेही महत्त्वपूर्ण आहेत. प्रतिपाद्य विषयाच्या आग्रहपूर्वक प्रतिपादनासाठी असे श्लोकबंध रचले जातात. 'भजे सर्वदा आवडी चक्रधारी' असेही श्लोकबंध साधनविचारावर भर देणारे आहेत.

आत्मसंधानात रंगून जाणारा साधक कृष्णरूपाशी सख्य करतो... कल्पना वल्पना न करता त्याचे मन तृप्त/शांत होते... भेदभाव गळून पडतो... अहंकार नाहीसा होतो. लोभ-क्षोभ बाळगत नाही... मी कर्ता न म्हणता ईश्वरार्पण भावनेने कर्म करतो... मोह-द्रोह ठेवित नाही... भक्ती करताना लाज-चाड धरीत नाही... स्वामीपदीच तो विनम्र होऊन राहतो... आत्मरूपाशी ऐक्य पावून आनंदी असतो... असा जीव हा नरजन्माला येऊन, भक्ती करून, मुक्त होतो... असे प्रतिपादन आर्वीकर महाराजांनी या श्लोकबंधात केले आहे. (१३९-१५३) साधकदशेची ती वाटचालच म्हटली पाहिजे.

जीव मुक्त व्हायला प्रथम त्याने साधकदशा तरी प्राप्त करून घ्यायला हवी. साधकदशेत गुरूभेट व गुरूबोध व्हायला हवा. म्हणूनच आर्वीकर महाराजांनी 'भजे यास्तवे सर्वदा चक्रधारी' असा चौदा श्लोकांचा बंध लिहिला आहे. त्यांत, आपण कोण हे जाणावे... आवडीने भक्तिपर शास्त्रग्रंथ वाचावेत... संतवचने कळून घ्यावीत... नर जन्म ही ईश्वराची कृपा मानून त्याची भक्ती करावी... मिळेल त्यात समाधान मानावे... मनःशांती ढळू न द्यावी... धैर्य सोडू नये... नम्रता अंगिकारावी... विपत्तीत ईश्वराचा धावा करावा... तर संसार सुखाचा होईल... असे प्रतिपादले गेले आहे. (१५४ ते १६७) भक्ती करणे हाही यथोचित-प्रयत्नवादच आहे.

साधन विचारांच्या दृष्टीने पुढील तीन श्लोक विशेष महत्त्वाचे आहेत.

आर्वीकर महाराज लिहितात की, 'सदा सर्व एकांत सेवीत जावा । बहू संगदोष मिळेना विसावा । जगी लोक नादिष्ट फंदिष्ट ढंगी । सुखा निष्टभाषी अतिशिष्ट रंगी ॥' (१७६) 'म्हणौनी समत्वे हरी आळवावा । हरि प्राप्य नी प्रेम हा धर्म घ्यावा । नसे सत्य लीला असे स्थान सोडी । हरीकीर्तनी रंगुनी देव जोडी ॥' (१७९) 'मुखी नाम नी कृष्ण कामा करावे । पदा तीर्थ रानांतरी हिंडवावे । करा संत सेवा सुकर्मी रिझावे । हरीकीर्तना नित्य ऐकती जावे ॥' (१८४) एकांत हा नामस्मरणासाठी आवश्यक आहे. तर हरिकीर्तन हे ईश्वराचे गुणानुसंधान कायम राहावे यासाठी उपकारक आहे. मुखी नाम हे मात्र एकांत असो की लोकांत असो, ते सदैव आणि सर्वत्र घ्यायलाच हवे. भक्तिसाधनेत उपासनेचे सातत्य हेच सर्वाधिक महत्त्वाचे असते. त्यादृष्टीने वरील तीनही श्लोक विशेष महत्त्वाचे ठरतात. हरिचिंतन हे साधनेचे मुख्य अंग आहे, हेच त्यांतून ध्वनित केले गेले आहे.

## परमार्थनुकूल 'आचरण' हवे...

प्रपंच आणि परमार्थ यांची सांगड घालून म्हणजेच : प्रपंचातील कर्तव्य यथायोग्य रीतीने पार पाडून : प्रपंचाला परमार्थीभिमुख करावे लागते. नामस्मरणाबरोबरच नैतिक-आचरणही महत्त्वाचे आहे. त्यासाठी भक्तिप्रवृत्त राहून विनम्रता अंगी बाणवावी, सेवाभाव वाढवावा, अशा प्रकारचा हितोपदेश आर्वीकर महाराजांनी 'जरी होशी तू दास त्या माधवाचा' असा सहा श्लोकांचा बंध लिहिला असून त्यालाच पूरक ठरेल असा बोध 'सदा माधवा प्रेमभावे भजावे' हा सहा श्लोकांचा बंध लिहिला आहे... आणि पुढे दोन्हीला उपकारक ठरेल असा भक्तिबोध त्यांनी 'मना पावणे कृष्णनामी विसावा' असा सात श्लोकांचा बंध लिहिला आहे. हा सर्व श्लोकसमूह परमार्थानुकूल आचरणाचा विचार स्पष्ट करणारा असा आहे.

अहंकार, मद, गर्व हा विनाशकारीच असतो... जगात सदासर्वदा नम्रच असावे. अहंकाराने रावणासारखा बलाढ्यही नष्ट झाला... देवाला अहंकार आवडत नाही... तो गर्वहरणच करतो... उलट त्याला भक्तिप्रेम आवडते... त्यांतच तो प्रसन्नतेने रंगून जातो... 'जरी होशी प्रेम दास त्या माधवाचा' हा व्रतधर्म आचरला तर संकटे-चिंता-दुःख हे नाहीसे होईल. दैन्य न बाळगता आनंदीवृत्ती जोपासावी... भक्तिसेवेने मनोकामना पूर्ण होतात... बुद्धिभेद नष्ट होतो... जीवनाला धन्यता प्राप्त होईल... समाधानी वृत्ती ठेवावी... (२१० ते २२५) हे करता करताच 'सदासंतसेवेत संवाद व्हावा । मना पावणे कृष्णनामी विसावा ॥' (२२९) हे त्यात विशेष महत्त्वाचे आहे. अनेक ग्रंथांचा अभ्यास करावा... अनेक तीर्थक्षेत्रे धुंडाळावीत, पण कृष्णनामीच मन गुंतवून ठेवावे... ज्ञानाचा अहंकार नसावा... अंतर्मुख व्हावे... अहोरात्र कृष्णनामाचे स्मरण करावे... चित्तएकाग्र करावे... पतीसेवेत निमग्न असलेल्या पतिव्रतेप्रमाणे देवभक्तीत दृढता, प्रेमभाव, सौख्य ठेवावे... गौळणी अशाच भूमिकेतून कृष्णाशी सख्य राखून होत्या... (२२८-२३५ आणि २३६-२४०) अशा परमार्थानुकूल आचरणाचा परिणाम काय होतो ? तर आर्वीकर महाराज सांगतात की, 'हरी नाचतो भक्तीच्या प्रांगणात । करी भक्त सेवा नत प्रांगणात । सदा बद्ध तो भक्तप्रेमात होतो । प्रभूता त्यजे, भक्तभावात येतो ॥' (२४१) देव आपला देवपणा विसरून भक्ताशी एकरूप होतो; असे परिवर्तन घडून येऊ शकते. भक्तिसाधनेचे स्वरूप आर्वीकर महाराजांनी आणखी विशद केले आहे. ते म्हणतात, 'हरी सन्मुखी योग त्याते म्हणावे । जरी ना असे त्या प्रयोगा वदावे । प्रयोगा त्यजी, योग साधी मना तूं । न साधे तरी व्यर्थची देहहेतू ॥' (२५१) हरीसन्मुखता म्हणजे सर्वेंद्रियांचा विषय फक्त एकचएक म्हणजे : कृष्णनाम वा कृष्णरूप हाच असायला हवा.

## 'सदासर्वदा त्वत्कृपालाभ होवो...'

देह प्रीती कमी व्हावी आणि देवप्रीती अधिक वाढावी, हाच प्रपंचाकडून परमार्थाकडे जाण्याचा भक्तिमार्ग आहे. आर्वीकरमहाराज सांगतात की, 'मना ! सोड रे देहप्रीती जिवाची । करी जोड तू नित्य या माधवाची ।' (२६३) देहप्राप्त झालाय ना ! मग त्यायोगे प्रपंच करावा. पण कर्तव्ये करून नंतर मन परमार्थाकडे वळवावे. जीवनाची धन्यता अशा परिवर्तनातच आहे. खरे सुख कशात आहे ? तर भक्तिमार्गाने ईश्वरस्वरूप होण्यातच आहे. ईश्वर स्वरूप होणे म्हणजेच ईश्वराचे गुणधर्म आपल्या अंगी बाणवणे होय. देव मिळविणे म्हणजे देवत्व प्राप्त करून घेणे होय. आर्वीकर महाराज सांगतात की, 'मना भक्तिपंथेच ते सौख्य लाभे । दूजा ना उपाया, मना का प्रलोभे । हिरा सापडे स्वर्णसंधी मिळाली । करी सार्थका वा तनू ती जळाली ॥' (२६८) त्यासाठी एकच उपाय आहे. तो म्हणजे, 'मनाने सदा शाम चिंतीत जावा ॥' (२८२) मनुष्यजन्म आहे तोवरच ही गोष्ट साध्य होईल. म्हणूनच भक्तिपंथाची तांतडी करायला हवी. वृद्धापकाळ आल्यावर कुठला परमार्थ होणार ?

आर्वीकर महाराज यांनी 'मनोपदेश' या भक्तिकाव्याचा समारोप प्रार्थनारूपाने केला आहे. ते म्हणतात, 'अता मागणे एवढे एक आहे ? झिजावी तनू आंस ही पोटी राहे । तुझे कारणी, चिंतनी काळ जावो । सदासर्वदा तत्कृपालाभ होवो ॥' (३२९) भक्तीची परिणती कृपाप्राप्तीच व्हायला हवी. ते पुढे म्हणतात, 'तुझे संगतीचा सदा योग यावा । जगी वागता मोकळा भाव यावा । असे रंजले गांजले ते सुखी हो । समस्तास देवा तुझे प्रेम लाभो ॥' (३३०) तुझा भक्तिधर्म वाढावा आणि सज्जनांना दुःखक्लेश नसावेत. (३३१) तसेच दुर्जनांना सुबुद्धी लाभो, एकता नांदावी, सर्व जीव विवेकाने वागावेत. (३३२) आणि 'घडो एकता संप्रदायी मतांची । जडो प्रेमभावे स्मृती साधनेची । झडो द्वेष रागादिके आत्मभावे । सदासर्वदा सौख्य लोकी असावे ॥' (३३३) अशा रीतीने भक्तिमार्गाने सुखप्राप्तीचा 'प्रसाद' त्यांनी मागितला आहे. 'साधना केल्यास सुखप्राप्ती' हा भक्तिसिद्धांतच त्यांनी इथे प्रतिपादिला आहे.

'मनोपदेश'मध्ये एकूण तीनशे तेहेतीस श्लोक आहेत. या तीन-तीन-तीन मधील एक 'गूढार्थ' माझ्या मनी रुंजी घालत आहे. तो असा की, (१) त्रिगुण तीन आहेत. ते म्हणजे सत्व, रज, तम होत. प्रत्येक जीवमात्र हा त्रिगुणांनीच बनलेला आहे. (२) गुरू, नाम, साधना या तिन्हीशिवाय परमार्थ होणे शक्य नाही. म्हणून तमोगुणी आणि रजोगुणी माणसांनी सत्वगुणी व्हावे. त्यांनी गुरुभेट घेऊन गुरूबोध घ्यावा. नामस्मरणात्मक भक्तियोग ही साधना करावी. (३) साधना कशी ? तर प्रातःकाळी, माध्यान्हकाळी, सायंकाळी करावी. त्रिकाल भजन, पोथी, नेम ही साधना केली पाहिजे. सर्वकाळी भजत जावे, ही गोष्ट आणखी उत्तम ! म्हणून 'मनोपदेश' हा तीन + तीन + तीन असाही आहे. भक्तिसाधना फलद्रूप व्हावी, एवढी प्रार्थना करू या !

**प्रा. डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे**
'प्रज्ञा' ए-७४, आसरा सोसायटी, होटगी रस्ता, सोलापूर-३
दूरभाष - (०२१७) २६०००३



# उपनिषदातील गहन अर्थावर लालित्यपूर्ण सिंचन : 'ब्रह्मवाणी'

आचार्य राम शेवाळकर

ईशावास्योपनिषद् हे दशोपनिषदातील क्रमाने व गुणाने पहिले उपनिषद् असून ते सर्वांत लहान आहे. केवळ अठरा श्लोकांत अत्यंत संक्षेपाने त्यात वेदांचे सार सांगितले आहे. अठरा मंत्रांचे सार या उपनिषदाच्या पहिल्या मंत्रातच आले आहे. अठरा मंत्रांच्या या लघुत्तम उपनिषदातूनच अठरा अध्यायांची गीता फुललेली आहे. गीतेच्या एखाद्या अध्यायातील किंवा श्लोकातील महत्त्वाचे गूज या उपनिषदातील एकेका मंत्रातच सामावले आहे. या मंत्रामधील एकेक शब्द बहुवर्थसूचक आहे. त्यामुळे त्यावरील विविध भाष्यांमध्ये अर्थांतर आढळल्यास आश्चर्य नाही. एका दृष्टीने असे अर्थांतर स्वागतार्हच असते. कारण त्या काळाला उपदेश असणारा अर्थ त्या त्या वेळी त्यातून पाझरत असतो.

श्रीसंत बाबामहाराजलिखित या 'ब्रह्मवाणी' ग्रंथामध्ये उपनिषद् माहात्म्य गाताना महाराज म्हणतात, 'उपनिषदांचे महामंत्र म्हणजे करुणावंत ईश्वराचे दर्याद्र मार्गदर्शकच होत ! दहा उपनिषदे म्हणजे दशदिशांच्या जीवांना आकाशातील परमेष्टीकडे नेणारे दहा वाटांवरील दहा वाटाडेच जणू ! या दहांपैकी कोणीही एक निश्चितच त्या परमधामाप्रत न्यावयास समर्थ आहे.' उपनिषदांचे माहात्म्य गाऊन ईशावास्य उपनिषद् कसे वैशिष्ट्यपूर्ण आहे याचे विवेचन करताना श्रीबाबामहाराज म्हणतात, 'या दहा वाटाड्यांपैकी सरळ व बाह्यविश्वाच्या आवारातून नेणारा वाटाड्या असे जे ईशावास्योपनिषद् आहे त्याच्या मार्गाचे यथार्थ ज्ञान होणे आवश्यक आहे. या ईशावास्याला सरळ म्हणण्याचे कारण एवढेच की, मानवाच्या सामान्य निसर्गाचा ज्यांना परिचय होता, ते सारे या वाटाड्याकडूनच पैलपार झाले. केन, कठ, मुंडक, मांडुक्य आदि उपनिषदे जरा आतील निसर्ग-गर्भाच्या जाणिवेचे प्रवासी आहेत. कुणाचे कार्य प्राणाशी, कुणाचे कार्य कर्मगतीशी, कुणाचे अहंकाराशी तर कुणाचे सक्षम जाणिवेशी ! पण ईशावास्याचे कार्य सरळ मनाशीच आहे. मानवाला सुपरिचित अशा मनाचा तोल व विवेक याबाबतच यात विशेषतः मार्गदर्शन आहे. त्याचबरोबर व्यष्टी व समष्टी यांचा नातेसंबंध परमेश्वरीच्या रूपात अंतर्भूत करून व्यक्ती, समाज व विश्व या त्रयींचे कल्याण एकाच मार्गाने साधणे हे या उपनिषदाचे वैशिष्ट्यपूर्ण असे कार्य आहे.'

मी वाचलेल्या आजपर्यंतच्या ईशावास्यावरील भाष्यांत विनोबांची 'वृत्ति' मला अधिक विश्वसनीय म्हणून स्वीकार्य वाटली. विनोबा शब्दांचे अर्थ मूळ धातूवरून व्युत्पत्तीद्वारे समजावून घेतात व त्यातून त्यांना प्रतीत होणारा, त्या मंत्राचा अर्थ विशद करतात. विनोबांची शैली आर्ष परंपरेची असल्याचे प्रसिद्धच आहे. त्यामुळे त्यात शब्दांचा अचूकपणा, नेमकेपणा व भाषेची काटकसर असते. ते अल्पाक्षरांचा वापर करून सूत्रमय पद्धतीने आपले आकलन मांडतात. 'वृत्ति' हे तर त्यांचे ईशोपनिषदावरचे टिपणच आहे.

परंतु पूज्य बाबामहाराजांनी ईशोपनिषदाचा लावलेला अर्थ मला अधिक भावला. या अगोदर ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायाच्या त्यांनी फुलविलेल्या 'दिव्यामृतधारा' ग्रंथामधील अर्थविवरणाने मला खूपच प्रभावित केले होते. त्यामुळे ईशोपनिषद् त्यांना कसे भावले हे जाणून घेण्यास मी उत्सुक होतो. विनोबांच्या 'वृत्ति' मध्ये मला त्यांच्या प्रज्ञायोगाची प्रतीती आली. तर श्रीबाबामहाराजांच्या भाष्यात त्यांचा अध्यात्मयोगातील अधिकार मला जाणवला.

'ईशावास्यमिदम् सर्व' या पहिल्या मंत्राचा अर्थ विशद करताना श्रीबाबामहाराज लिहितात, 'या मंत्रात 'ईशावास्य हे पद अति महत्त्वाचे आहे. ज्याला ईशावास्य कळेल तो स्वभावानेच दुसऱ्या चरणातील मननीय उपदेश पाळतो.' 'सर्व इदम् ईशावास्यम्' या पदाचा सरळ अर्थ असा की, हे सर्व ईश्वराने परिवेष्टित असून ईश्वराच्या मालकीचे व ईश्वरमय आहे. अर्थात् दिसणारे, भासणारे असे जे जे आहे ते सर्व ईश्वरमय असून त्याच्या मालकीचे आहे. या मंत्रात 'ईश' हा शब्द एका गूढ व रम्य रहस्याने भरलेला आहे. ते ईशता ही स्वामित्व अशा अर्थानेच रूढ आहे. स्वामीलाच ईश असे म्हणतात. जसे नरेश, महेश, गणेश इत्यादी. म्हणजे 'ईश' या शब्दाने असा अर्थ ध्वनित होतो की, ज्याने सर्व विश्वजात व्यापले आहे व जो सर्व दृश्यजात स्थितीचा मालक आहे. यातून सत्तारूप परमात्म्याचा बोध होतो. 'वास्यम्' म्हणजे व्यापणारा. अर्थात् ब्रह्म जे सर्वगत व सर्वमयी आहे, त्याचीच मालकी या विश्वावर असल्यामुळे जड या चेतन, दृश्य वा अदृश्य असे सर्वच त्याने नियमित व स्थिर केले आहे. म्हणून या सर्वांच्या दरम्यान कसे व किती मालकीने किंवा हक्काने वागावे हे आपापल्या अधिकाराने सहजच मर्यादित केले आहे. आणि म्हणूनच सर्वत्र आपण असे पाहतो की, एखादी वस्तू व मानव यांचा संबंध काही मर्यादेच्या पुढे असूच शकत नाही. या मर्यादा सीमित झाल्या आहेत. तथापि सत्ता जर वाढीस लागेल तर हळूहळू विश्वाचीही मालकी मानवाला मिळू शकेल. पण सत्ता वाढविण्यासाठी जो नियम आहे तो लक्षात घेतला पाहिजे. केंद्रीय सत्तेच्या जास्तीत जास्त जवळ जाणे हाच तो नियम होय.'

माणसाला सर्व अज्ञात सृष्टीचे आकलन त्याच्या पंच ज्ञानेन्द्रियांद्वारे व विशेषतः बुद्धीच्या माध्यमातून होत असते. पण ते पुष्कळदा शब्दार्थाच्या पातळीवर व तेही वर्णनात्मक रीतीनेच होऊ शकते. हे वर्णन अनुभवाच्या अग्निपरीक्षेतून तावून, सुलाखून निघाल्यावर मग कुठे ते चित्तामध्ये घर करून बसते. या अनुभवपूत आकलनालाच ज्ञान ही संज्ञा आहे. हे ज्ञान प्रयोगसिद्ध ठरल्यास त्याला विज्ञान ही संज्ञा मिळते. पण मानवी बुद्धीच्या

म्हणता येईल. पूज्य बाबामहाराजांच्या भाष्यात या प्रज्ञानाचाच विलास आढळतो. जणू महाराजांचे अध्यात्म सामर्थ्य जाणून खुद्द उपनिषदाने अत्यंत विश्वासाने आपले हृदय त्यांच्यासमोर उलगडून दाखविले. प्रत्यक्ष उपनिषदाच्याच पुढाकाराने व अनुग्रहाने जे परादर्शन त्यांना घडले, तेच त्यांनी यात शब्दबद्ध केले आहे.

आपला अनुभवविषय होत असलेले व आपल्या दृष्टीच्या पल्याड असणारे नित्य स्पंदनशील असे हे जग, ईश्वरी तत्त्वाने ओतप्रोत व्यापून टाकलेले आहे हे एकदा ओळखले की, आपला उपभोग्य-उपभोक्ता संबंधाबद्दलचा अहंगार गळून पडतो आणि ईशकृपेने जेवढे मिळेल तेवढ्यावरच संतुष्ट राहण्याची कला आपण शिकवून घेतो. जे आपल्याला आवडते व हवेहवेसे वाटते, ते आपल्या कर्मातून उद्भवलेले नसेल, तर त्याबद्दल निरभिलाष राहण्याची ही शक्ती त्या आत्मश्रद्धेतून आपल्याला मिळते. सध्याच्या ऐहिक संपत्ती विनाकष्ट मिळविण्याच्या वाढत्या हव्यासाचा माज उतरविण्यास, पहिल्या मंत्राचा व्यावहारिक अर्थही पुरेसा समर्थ आहे.

यासाठी मानवाला सावधानतेचा इषारा देताना मंत्राचा अर्थ श्रीबाबामहाराज सांगतात, 'ज्याची जेवढी सत्ता म्हणजे केंद्रीय अशा ईशसत्तेशी ज्याचा जेवढा संबंध तेवढा तो सुखी. म्हणूनच सुखाचा वाटा ज्याला जेवढा मिळाला तेवढा त्याला देवाने दिलेला आहे. पण हे न ओळखता मनुष्य जर दुसऱ्याचेही सुख आपणच उपभोगण्याचे कर्म करू लागला, तर त्याला त्याच्यापेक्षा श्रेष्ठ असणाऱ्या सत्ता ज्या कुटुंब, समाज, राष्ट्र, विश्व व शेवटी केंद्रीय सत्ता की जी परमात्मरूपिणी होय; ह्या सत्ता मनुष्याला शासन केल्याशिवाय राहणार नाहीत. आणि अशा अनधिकाराने वागण्याचा व भोगलोलुपतेचा परिणाम सर्व प्रकारच्या जीवन-पातळ्यांवर झाल्याशिवाय राहणार नाही.'

परमेष्टीच्या राजवटीतील व्यष्टी व समष्टीच्या सीमारेषाही बाबामहाराजांनी ठळक केल्या आहेत. समष्टीच्या कल्याणाबाबत बेदरकार असणारा व्यक्तिवाद व व्यष्टीच्या विकास क्षमतेकडे निर्दय दुर्लक्ष करणारा समष्टिवाद, या दोहोंच्याही मर्यादा महाराजांनी स्पष्ट केल्या आहेत. हे स्पष्ट करताना बाबामहाराज म्हणतात, 'वास्तविक व्यक्तीचे हित व समाजहित यात असा एक निसर्ग-दुवा आहे की, ज्यामुळे व्यक्तीच्या कर्माची पवित्र कर्मवाट, हीच सर्व समाजाच्याही कल्याणाची वाट ठरते. पण आज मात्र याच्या अगदी उलट असे चित्र दिसते. कुठे समाजहिताच्या नावाखाली व्यक्तीच्या जीवनस्वातंत्र्याला मूठमाती मिळत आहे, तर कुठे व्यक्तिस्वातंत्र्याच्या भ्रामक विचाराने समाजस्वास्थ्यच धुळीला मिळविले जात आहे. या अखिल ब्रह्मांडाचा एक नियम असतो व तोच जगातील सर्व सूत्रे आपल्या शक्तीने हलवितो. तोच जगाचा कर्ता, धर्ता, भर्ता व हर्ता आहे हे अनुपम तत्त्व लोक आज विसरून गेले आहेत. जीवनाच्या सर्व स्तरांवर निर्माण झालेली अनिष्टता दूर सारण्यासाठी, ईशावास्योपनिषदाने घोषित केलेला विचार अभ्यासणे व लक्षात घेणे मोठेच हिताचे आहे.' अशा प्रकारे त्या जगन्नियंत्याच्या अध्यक्षतेखाली चाललेल्या नाट्यातील आपापल्या भूमिका नीट ओळखण्याची व दक्षतेने पार पाडण्याची निकडही महाराजांनी या भाष्यात अधोरेखित केली आहे.

मानव इहलोकातील आपले अस्तित्व केवळ ऐहिक अभ्युदयासाठीच पणाला लावीत असतो. या पलीकडचे आपले दायित्व लक्षात न आल्याने दोहोंचे प्रमाण संतुलित राखल्याखेरीज आपल्या हातून धर्माचरण संभवत नाही. आपली कर्मप्रेरणा ईश्वरनियंत्रित असते. कर्मासाठी आवश्यक असणारी शक्तीही ईश्वर पुरस्कृत असते. हे जाणून घेतले तर ईश्वराचे जगरहाटीमागचे मूळ उद्दिष्ट पूर्ण करण्यासाठीच कर्म करण्याची प्रवृत्ती वाढीला लागेल. अशी कर्मे अहर्निश करीत शतायुषी होण्याचाच या उपनिषदाचा संदेश आहे.

याचे विवेचन करताना बाबामहाराजांनी म्हटले आहे, 'भोगलोलुपतेने केलेल्या कर्माचे बंधनच पडेल आणि दुःख व दारिद्र्यात आत्मनाशच होईल. म्हणूनच मंत्रद्रष्टे ऋषी म्हणतात की लोकहो, सर्व विश्वाचा धनी व सत्ताधीश असलेल्या ईश्वरासाठीच, म्हणजे त्याला प्राप्त करून घेण्यासाठीच तुम्ही सर्व कर्मे करा. तुमच्याकडे स्वभावाने जे कर्म आले असेल ते विहित कर्म जगदात्म्यास स्मरून व त्याच्या प्रकाश निर्मितीस्तव करा. सर्वांनी मिळून आपापले कर्म चोख केले तर प्रेमाच्या व सहानुभूतीच्या जाणिवेने सारा समाज प्रगत होईल.'

अर्थविवरणासाठी पूज्य बाबामहाराजांनी 'ब्रह्मवाणी' मध्ये उपयोगात आणलेली शैली व भाषा उपनिषदातील गहन अर्थावर समर्पकतेबरोबरच लालित्याचेही सिंचन करते. विवेचनातील शास्त्रीय संज्ञा व पारिभाषिक शब्द अर्थप्रतीतीसाठी वाचकांची आकलनशक्ती वाढण्यास मदत करतात.

ईश्वरी तत्त्वाच्या निश्चलतेचे व निष्कंपतेचे वर्णन करताना या दोन्ही, सारख्या भासणाऱ्या शब्दांमधील सूक्ष्म अर्थभेद स्पष्ट करण्याचे बाबामहाराजांचे विवेचन कौशल्य स्तिमित करणारे आहे. असे हे ईशावास्याचे मर्मग्राही ललितमधुर भाष्य माझ्याप्रमाणेच तुम्हा सर्वांनाही निश्चित भावेल असा मला विश्वास वाटतो.

**प्राचार्य श्रीराम शेवाळकर**
'पर्णकुटी'जवळ, उत्तर अंबाझरी मार्ग, नागपूर.

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

''प.पू. बाबा महाराजांना प्रणाम''

(वृत्त-दिण्डी)

**प**दीं ज्यांच्या अति आदरें नमावें ।
व **पू** झिजली सत्कार्यी जी स्वभावें ॥
जणू **बा**गेमधिं फुलें सद्गुणांची ।
फुलली **बा**, **ही** जी पूज्य भावनांची ॥१॥
दिव्य शक्ति **म**नीं ध्यास अंतरांत ।
क्रियायोगाचा **हा**र नित गळ्यांत ॥
कथन गीतेचें **रा**जयोग गाती ।
सहजयोगाची **ध्वजा** उभारीती ॥२॥
सतत आनंदी मनीं **ना**ही खंत ।
दृष्टी ध्येयावरी दृढ ती **प्र**शांत ॥
करित नम्रत्वें **'विष्णु'** हा **प्रणाम** ।
थके वाणी किती वर्णू वंघना**म** ॥३॥

**वि. ल. शिंत्रे**
सी/२/५, ६ वा मजला, तीर्थजल कॉम्प्लेक्स,
सॅटेलाईट रोड, १३२ रिंग रोड, अहमदाबाद - ३८० ०१५.

# ब्रह्मकमळीचा सुगंध
# श्रीसंत बाबामहाराजांची साधनादृष्टी

के. डॉ. ज. बा. जोशी

एम.ए.पीएच.डी.एम.एम.एस. सेवानिवृत्त प्रमुख. तत्त्वज्ञान विद्यापीठ अमळनेर प्रपाठक तत्त्वज्ञान विभाग, पुणे [illegible]
शैक्षणिक सन्मान. प्राचार्य श. वा. दांडेकर शिष्यवृत्ती. दक्षिणा फेलोशिप. गुरुदेव रानडे-दामले पारितोषिक. गीतागौरव [illegible]
[illegible]

## अनंताचे आनंदयात्री

भारतीय संस्कृतीचा आत्मा ऋषी आणि संत यांनी विकसित केलेली मोक्षविद्या आहे. प्राचीन, मध्ययुगीन आणि अर्वाचीन अशा सर्व कालखंडात या मोक्षविद्येची सजीव रूपे महापुरुषांचे जीवन, उपासना, वाङ्मय यामधून व्यक्त झाली आहेत. वेद आणि उपनिषदांच्या मंत्रद्रष्ट्या ऋषींप्रमाणेच व्यास, वाल्मिकी, वसिष्ठ यांचे अक्षर वाङ्मय हे या मोक्षविद्येचे उत्तुंग शिखर आहे. मध्ययुगीन इतिहासातील संतांचे भक्ति-आंदोलन हे पहिले प्रबोधन युग ठरले. कर्मठ सनातनीवृत्ती, सामाजिक भेदबुद्धी, पोटार्थी परमार्थ या प्रदूषणांनी श्रुती-स्मृती-पुराणोक्त धर्मदृष्टी ग्रस्त झाली होती. अशा वेळी संतांनी चित्तशुद्धीला पोषक अशी नवविधा सगुणभक्ती, प्रेमलक्षणा उत्कट भक्तीची भावसाधना आणि 'सर्वाभूती भगवद्‌भाव' वृत्तीतून उमलणारी भागवतदृष्टी प्रगट केली. श्रीमत् शंकराचार्यांची अद्वैत भूमिका, श्रीगोरक्षनाथ आणि इतर नाथांच्या कार्यातून, साहित्यातून प्रगट झालेला सामरस्ययोग, आणि श्रीज्ञानेश्वरांच्या जीवनकार्यातून, साहित्यातून प्रवाहित झालेला, ज्ञानभक्तीचा अमृतप्रवाह यामुळे भारतीय मोक्षविद्येला प्राणसंजीवन लाभले. अर्वाचीन काळातही ऋषी आणि संत यांचे कार्य, साहित्य, जीवनदृष्टी यांची थोर परंपरा प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंबे स्वामी), श्रीगुलाबराव महाराज, श्रीतुकडोजी महाराज अशांच्या स्वरूपात व्यक्त झाली.

केवळ शब्दपंडिती शास्त्राभ्यास, स्वार्थ आणि अहंकार यांना प्रोत्साहन देणारी नीती, स्वर्गप्राप्तीसाठी धर्माचरण यांना भारतीय मोक्षविद्येत स्थान नाही. साक्षात्कार ही या मोक्षविद्येची प्रेरणा आहे. साक्षात्कार दर्शनाची प्रमेयदृष्टी आणि प्रचीतीची साधना ऋषी आणि संत यांनी प्रगट केली आहे. ते अनंताचे आनंदयात्री आहेत. 'आनंदाचे डोहीं आनंद तरंग' ही स्वात्मप्रचीती, 'आनंदे भरीन तिन्ही लोक' ही व्यापक दृष्टी हा साक्षात्कार साधनेचा प्राण आहे. प. पू. श्रीबाबामहाराज आर्वीकर हे या भारतीय मोक्षविद्येच्या उत्तुंग परंपरेतील आनंदयात्री आहेत. 'दिव्यामृतधारा' ग्रंथाद्वारे त्यांनी भारतीय साक्षात्कार-दर्शनाची प्रमेयदृष्टी सर्वस्पर्शी स्वरूपात, प्रभावीपणे मांडली आहे. त्यांची 'साधना-संहिता' हे साक्षात्काराच्या दिव्य अनुभूतींचे दर्शन आहे.

त्यांनी लिहिलेले 'साधनाकाळातील वर्णन' हे जसे भगवत्प्राप्तीसाठी घडलेल्या अपार कष्टांचे, सुखदुःखात्मक अनुभवांचे, यातनांचे वर्णन आहे, त्याचप्रमाणे एका स्थितप्रज्ञ ज्ञानीभक्ताच्या अंतरंग स्थितीचे ते पारदर्शी चित्रण आहे. 'स्वानंदे भरलो माझ्या अंगे' अशा कृतार्थ अवस्थेत ही स्मरणगाथा सफल झाली.

देवाच्या सख्यत्वासाठी त्यांनी घरदार, जिवलग सोडले. खडतर तपश्चर्या केली. प्रखर साधना केली. ॐकारेश्वरासारख्या महापुण्य क्षेत्रात भगवत्कृपेच्या दिव्यअनुभूतींचा त्यांच्यावर वर्षाव झाला. मोक्षधाम, ब्रह्मपुरी, माचणूर क्षेत्रात त्यांनी 'ईश्वरनिष्ठांची मांदियाळी' उभारली. ईश्वरी प्रेरणेतून लिहिलेले त्यांचे ग्रंथ, साधना शिबिरे, धर्मप्रबोधन याद्वारा त्यांनी अर्वाचीन काळात 'ब्रह्मविद्येचा सुकाळू' घडविला. आपले जीवन, कार्य, साहित्य या रूपाने मोक्षविद्येचे साधक, उपासक, अभ्यासक या सर्वांना प्रेरणा आणि मार्गदर्शन देणारा ज्ञानप्रदीप त्यांनी प्रकाशित केला आहे. त्यांच्यासारख्या क्रान्तदर्शी रससिद्ध संतांचे जीवन, साधना, कार्य, साहित्य ही मृत्युंजयी यशःकाया आहे. 'उत्तिष्ठत जाग्रत ! प्राप्यवरान्निबोधत ! -' अशी मृत्युंजयी जीवननिष्ठा त्यामधून सर्वांना लाभत राहते. ते अनंताच्या आनंदयात्रेचे पाथेय समजून घेणे आणि आपला पूर्णत्वाचा प्रवास त्या आधारे चालू ठेवणे अगत्याचे ठरते.

## साधनेची प्रमेयदृष्टी

वेदविद्या हा भारतीय साधनेचा आदिस्रोत आहे. दुर्दैवाने वैदिक देवतांच्या सकाम उपासनेच्या भूमिकेत यज्ञीय कर्मकांड वाढत गेले. साक्षात्कारास पायाभूत 'अंतर्यागदृष्टी' विसरली गेली. 'सर्वक्रतु याजिनः आत्मयाजी विशिष्यते' ही आत्मयाग संकल्पना, जीवनयज्ञ भूमिका साक्षात्कार साधनेस प्राणभूत आहे.

उपनिषदातील ब्रह्मानुभूती साधनेकडे दुर्लक्ष झाले. वेदान्त ही तार्किक वादविवाद, पंडिती शब्दज्ञान, भाष्ये आणि विवरणे यांची रणभूमी झाली. संवित्ति, ज्ञप्ति, देवात्मशक्ती या उपनिषद् संकल्पना ब्रह्मरसानुभूतीच्या साधनेची भूमिका समजण्यास महत्त्वाच्या आहेत.

आगमोक्त तंत्रविद्या मध्ययुगीन कालात पंचमकारात्मक वामाचार साधनेच्या प्रभावाने प्रदूषित झाली. कर्तृभावयुक्त भूमिकेतून घडणारी चित्तशुद्धीस उपकारक अशी 'आणवोपाद' अवस्थेतील साधना; भगवद्‌कृपा स्वरूपात कुंडलिनीची जागृती आणि शाक्त्योपाय अवस्थेतील अंतरंग साधना, आणि शिव-शक्ती सामरस्याची 'शांभवोपाय' अवस्थेतील जीवनमुक्त स्थिती या भूमिका शिवसूत्र या ग्रंथात आल्या आहेत. काश्मीर शैवदर्शन परंपरेत त्यांचा विस्तार आहे. हा शुद्ध आगमोक्त विचार साधनेची मर्मदृष्टी येण्यास महत्त्वाचा आहे.

अष्टांगयोग ही मधल्या काळात कष्टप्रद अशी आसन प्राणायाम यांची कसरत झाली. वस्तुतः 'समाधिसिद्धिः ईश्वरप्रणिधानात्' (यो.सू. २.४५) ही योगसाधनेची भक्तियोगात्मक दृष्टी समजून घ्यावयास हवी. त्याचप्रमाणे साधनेतील सर्व अंतराय, अडथळे दूर करणारी अंतर्जागृत दिव्यशक्ती किंवा प्रत्यक्‌चेतना (यो. सू. १.२९) ही संकल्पनाही योगदर्शनाचा पुनर्विचार होण्यास महत्त्वाची आहे.

पुराणकाळात भक्तिसाधनेचे स्वरूप व्रते-वैकल्ये, जप-पूजा-अनुष्ठान

असे कर्मकांडात्मक झाले. 'देवासाठी संसार' ही भूमिका न राहता 'संसारासाठी देव' अशा सकाम दृष्टीतून भक्ती प्रकट झाली. वस्तुतः चित्तशुद्धीचे प्रभावी साधन म्हणून नवविधा भक्ती घडणे अगत्याचे आहे. मुख्यतः श्रीमद्‌भागवत, भक्तिसूत्रे यामधील 'परमप्रेमरूपा अमृतरूपा' अशा पराभक्तीचा विकास महत्त्वाचा आहे. कारण अशा भक्तीतील भावसाधना हीच ज्ञानभक्तीस पायाभूत आहे.

प. पू. श्रीबाबांनी 'दिव्यामृतधारा' ग्रंथात भारतीय साक्षात्कार दर्शनातील ह्या सर्व विचारप्रवाहांची, मूलग्राही दृष्टीने अभ्यास आणि समीक्षा मांडली आहे. त्या आधारे वेदकालापासून विकसित झालेली योगयुक्त भक्तिसाधनेची, श्रीज्ञानदेवांची साधनादृष्टी स्पष्ट केली आहे. कृपांकितांचा योगपंथ, पंथराज, कुंडलिनीयोग ही भगवत्कृपेतून उमलणारी, भक्तीच्या भावसाधनेतून फुलणारी दिव्य साधना आहे. ज्ञानेश्वरीतील पंथराजचे अंतरंग विशद करताना प. पू. श्रीबाबा म्हणतात -

''भक्तीच्या उजेडातील योगाची वाट आहे ही ! म्हणून ही कृपेच्या आधाराने निश्चित सुखरूपच आहे... कुंडलिनीचा प्रवास सहस्त्रावार कमळाकडे होऊ लागतो तसे तसे अतिदिव्य व उच्च उच्च'' विश्वाचे सूक्ष्मद्रव्य अंतर्बाह्य प्रतीतीला येते... जगदंबारूप कुंडलिनीच्या उर्ध्वगमनशील भक्तिपंथाचा विचार, योगपंथ म्हणून सहाव्या अध्यायात आला आहे. हा भक्तियुक्त योगमार्ग परमार्थाचा राजमार्गच होय. ज्ञानेश याला 'पंथराज' म्हणतात. (दिव्यामृतधारा भा. १ पृ. ४२२-२४).

अशा प्रमेयदृष्टीने घडणाऱ्या साधनेची फलश्रुती म्हणजे पूर्णत्वप्राप्ती होय. तिचे स्वरूप विविध संकल्पनांतून भारतीय विचारात व्यक्त झाले आहे. त्यांचा समन्वयी अभिप्राय व्यक्त करताना स्वामी अखण्डानन्द सरस्वती म्हणतात - ''श्रुतियोंमे श्रोत्रिय, ब्रह्मवित्, ब्राह्मण, ब्रह्मनिष्ठ आदि शब्दोंसे; गीतामें स्थितप्रज्ञ, भक्त तथा गुणातीत के रूपमें; योगवासिष्ठमें जीवन्मुक्त, विदेहमुक्त आदिके रूपमें; पुराणोंमें अतिवर्णाश्रमी आदिके रूपमें जिस अवस्था, स्थितीका संकेत किया है वह विभिन्न प्रकारकी नही है । एकही फलभूत स्थितीका विभिन्न नामोंसे निर्देश किया गया है । सभी परमार्थमें परिनिष्ठित है । (साधना और ब्रह्मानुभूती पृ. ५७) श्रीमद् विद्यारण्यांच्या 'जीवन्मुक्तीविवेक' ग्रंथात या सर्व संकल्पनांचा परामर्श आला आहे. प. पू. श्रीबाबांच्या साधना दृष्टीचा अभ्यास करताना, अशी व्यापक, समन्वयी भूमिका महत्त्वाची ठरते. 'दिव्यामृतधारा' ग्रंथातील प्रमेयदर्शनांचे प्रयोजन, हे साधकदशेतून सिद्धावस्थेकडे, लौकिकाकडून अलौकिकाकडे, पार्थिवाकडून परतत्त्वाकडे जाणारा मोक्षपथ स्पष्ट करणे हे आहे. 'साधनासंहिता' ग्रंथात अशा दिव्य प्रचीतीचे प्रयोगविज्ञान स्पष्ट झाले आहे.

## साधनेचे प्रयोगविज्ञान

जीवन्मुक्त महापुरुषाच्या अंतरंग साधनेचे आत्मचरित्र या दृष्टीने प. पू. श्रीबाबांचा 'साधनासंहिता' हा दिव्य ग्रंथ, जागतिक वाङ्मयाचे अमर लेणे ठरावा असा अपूर्व आहे.

यामधील परमार्थ नीतीचे प्रबोधन, दैवीसंपदेची जोपासना हे चित्तशुद्धी आणि भगवद्‌भक्ती यांचे अधिष्ठान आहे. या संदर्भात केवळ 'गृहतःदेहतः ।' वैराग्यापेक्षा भगवत्प्रेमातून विकसित होणाऱ्या सहज स्वाभाविक अशा 'प्रेमतः वैराग्य' विषयक श्रीबाबांनी मांडलेली भूमिका, हे त्यांचे भारतीय नीतिविचारास महत्त्वाचे योगदान आहे.

*प्रभुप्रमादय होता । स्वभाव [illegible] ।*
***येणे वैराग्य सिद्धता । सहजी लाभे । ॥१.१२७॥***

साधनासंहितेतील आसनमुद्रा, प्राणायाम, बंधत्रय अभ्यास यांचा हेतू चित्तस्थैर्य हा आहे. चित्त शुद्ध, स्थिर आणि उत्कट भगवत्प्रेमयुक्त झाले की भगवत्कृपाप्रसाद रसकल्लोळ निर्माण होतो.

साधकस्थिती आणि सिद्धावस्थेचा प्रारंभ या काळात, सर्व प्रकारच्या मोहापासून सावध रहावे लागते. लोकेषणा, दंभ, स्वार्थ, अहंकार इ. दोषांपासून साधना मुक्त राखावी लागते. त्यादृष्टीने सर्ग १ आणि २ मधील श्रीबाबांचे मार्गदर्शन महत्त्वाचे आहे.

ही भगवत्प्रेमातून उमलणारी सहजयोग साधना आहे. इतर साधनामार्गातील बाह्य अवडंबर, कष्टप्रदता, कर्तृभाव या साधनेत नाही. श्रीबाबा म्हणतात -

***स्वभावें सारेंचि घडे । ज्ञानाचे प्रचीतीकडे ।***
***प्रभुप्रेमें योगचौघडे । सहजी घडे ॥२.६५१॥***

संतांची भावसाधना, उत्कट भक्तिसाधना यामध्ये सर्व प्रकारच्या दिव्यातिदिव्य, योगानुभूती अंतर्भूत आहेत. त्यांची तरल भावानुभूती श्रीबाबांनी 'दिव्यामृतधारा' ग्रंथात योगचक्रांचे उन्मीलन स्पष्ट करताना मांडली आहे. (भाग १) 'साधनासंहिता' ग्रंथात कुंडलिनी जागृती, ऊर्ध्वगमन आणि योगचक्रांच्या उन्मीलनातून येत जाणाऱ्या दिव्यानुभूती यांचे उत्कट, उत्स्फूर्त वर्णन आले आहे.

साधकाच्या व्यक्तिगत साधनेत येणाऱ्या पिण्डांतर्गत अनुभूतींचे वर्णन इतर प्राचीन ग्रंथांत आले असले, तरी श्रीबाबांनी पिण्ड-ब्रह्माण्ड सामरस्यानुभूतीचे केलेले वर्णन हे त्यांचे भारतीय योगदर्शनास, साक्षात्कारदर्शनास महान योगदान आहे.

त्याचप्रमाणे भगवत्प्रतीक अशा ॐकाराची सर्वस्पर्शी साधना, यांमधून विकसित होणारी सोऽहं, शिवोऽहं, विश्वोऽहं ही अधिकाधिक व्यापक भावस्थिती आणि अखेरीस घडणारी परमपदप्राप्ती या संदर्भातील प. पू. श्रीबाबांचे विवेचनही भारतीय साधनेस महान् योगदान आहे. या संदर्भातील त्यांच्या साधनादृष्टीचे सारदर्शन पुढील तक्त्यातून स्पष्ट होते -

### योगचक्रांचे उन्मीलन

| साक्षात्कार अवस्था | पिण्डांतर्गत योगचक्रे | ब्रह्माण्डांतर्गत योगचक्रे |
|---|---|---|
| चित्ताकाश | मूलाधारचक्र | गतिचक्र |
| | स्वाधिष्ठानचक्र | स्थितिचिक्र |
| चिदाकाश | मणिपूरचक्र | रतिचक्र |
| | हृच्चक्र / अनाहत चक्र | कालचक्र |
| | विशुद्धचक्र | ध्वनिचक्र |
| महदाकाश | तालुचक्र | साम्यचक्र |
| | आज्ञाचक्र | प्रकाशचक्र |
| | ललाटचक्र / गोल्हाट | जीवनचक्र / ब्रह्मचक्र |
| | सहस्त्रारचक्र / निर्वाणचक्र | विष्णुचक्र |

## प्रणवसाधना

| प्रणवमात्रा | वाणी | देह | अवस्था | आकाश | सृष्टी |
|---|---|---|---|---|---|
| अ | वैखरी | स्थूल | जागृत | स्थूलाकाश | स्थूल |
| उ | मध्यमा | सूक्ष्म | स्वप्न | चित्ताकाश | सूक्ष्म |
| म | पश्यन्ति | कारण | सुषुप्ती | चिदाकाश | अति-मानस |
| अर्धमात्रा | परा | महा-कारण | तुरीय | महदाकाश | भगव-त्स्वरूप |

(साधनासंहिता भावार्थदर्शन पृ. ७४, ३९९)

श्रीज्ञानदेवांनी परमपदाचे वर्णन ''आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरीयेसी कानडे ।'' असे केले आहे (ज्ञानेश्वरी १२.३१). प्रणवातील अवस्थेचे वर्णन उपनिषदात 'शान्तं शिवं अद्वैतम्' असे आले आहे. 'दिव्यामृतधारा' ग्रंथातील विचारदर्शन आणि 'साधनासंहिता' ग्रंथातील प्रचीतीचे प्रयोगविज्ञान यांचा एकात्म अभ्यास केला, तर प. पू. श्रीबाबांची साधनादृष्टी नीटसपणे समजू शकते. यामध्ये श्रुतिरहस्य स्पष्ट झाले आहे. ज्ञानदेवांची दृष्टी आली आहे. संतांच्या भावानुभूतीचे अंतरंग आले आहे. हे साधनेचे प्रयोगविज्ञान हे मुमुक्षू साधकास लाभलेले बहुमोल ईश्वरी लेणे आहे.

## तमसो मा ज्योतिर्गमय

श्रीबाबांनी साधनासंहिता ग्रंथाच्या प्रारंभी आपल्या साधनादृष्टीचे वर्णन उपासना, ऊर्ध्वपंथ, दिव्यपंथ, दिव्यज्योतिर्मयांग असे केले आहे. भगवद्‌भक्तीच्या पाऊलवाटेने जाताना अज्ञान, कर्मसंस्कार, चित्ताची मलिनता, कर्मबंध यांचे अडथळे भगवद्‌कृपेने दूर होत जातात. षड्विकार मावळतात. देहभाव, जीवभाव, प्रपंचाभास दूर होतात. चिन्मय, आनंदमय, दिव्य अनुभूतींच्या प्रदेशात प्रवेश घडतो. या योगयुक्त भक्तिसाधनेत प्रारंभी भक्त भगवंताचा शोध घेत असतो. भगवद्‌विरहाने व्याकुळ होतो. भगवद्‌कृपेच्या प्रसादरसकल्लोळात योगचक्रांचे उन्मीलन होताना त्याला ज्या दिव्यानुभूती येतात, ती भगवद्‌कृपेची प्रसादचिन्हे असतात. ब्रह्मरसानुभूतीत निमग्न अशा सिद्धावस्थेतील ज्ञानीभक्ताची स्थिती श्रीबाबांनी वर्णन केली आहे -

ऐसा रोकडा प्रचीतिसार । मीचि विश्वसाकार । हा तत्त्व साक्षात्कार । गुरुकृपेचा ।। २.९९० ।। तो विश्व अमूर्तरूप । स्वानंद साम्राज्यभूप । ज्ञानसिद्ध प्रकाश अमूप । आत्मरवीचा ।। २.१०५२ ।।

या स्थितीत देव-भक्त भेद मावळून जातो. भक्तरूपात भगवंताचीच दिव्यलीला सुरू होते. महान् भगवद्‌भक्तांचे जीवन ही अशी भगवत्स्वरूपाची दिव्यलीला असते. अशा वेळी भक्ती ही भक्तरूपात घडणारी भगवंताची लीला होते. हे द्वैताद्वैत विलक्षण अशा भक्तीचे श्रेष्ठ रूप होय. या योगयुक्त भक्तिसाधनेत प्रारंभीचा विरहभाव हा भगवद्‌प्राप्तीसाठी असतो. भक्तीच्या परमोच्च स्थितीत भगवत्स्वरूप झालेला भक्त भक्तिसुखासाठी भगवद्‌भेटीकरिता परम व्याकुळ होतो. ही या भक्तिसाधनेतील परमोच्च अशी महाभाव स्थिती आहे. कृष्णस्वरूप झालेल्या गोपींची कृष्णभेटीची व्याकुळता, श्रीज्ञानदेवांच्या विरहिणी, श्रीरामकृष्ण परमहंसांची मातृरूपिणी जगदंबेच्या भेटीसाठीची परमव्याकुळता ही या परमस्थितीची उदाहरणे आहेत.

मधल्या काळात प्रेमलक्षणा भक्तीचे हे शुद्ध, विशाल, परममङ्गल रूप हरवले. श्रीतुकाराम महाराजांनी 'आम्ही वैकुंठवासी ।' या प्रख्यात अभंगात म्हटले आहे -

*अर्थे लोपली पुराणें । नाश केला शब्दज्ञानें ।*
*विषयलोभी मनें । साधने बुडविलीं ॥*

ते मध्ययुगीन चित्र आजही तितकेच विदारक सत्य आहे. साधनाक्षेत्रातील दुष्प्रवृत्तींचा अंधार स्पष्ट करताना प. पू. श्रीबाबांनी 'साधनेचें हृद्‌गत' मध्ये धर्मक्षेत्रातील धार्मिकतेची भुताटकी, स्वार्थ-लोलुपता, सांप्रदायिकता, प्रचारीवृत्ती, सत्याची वंचना इ. दोषांचा निर्देश केला आहे. 'उपासना खंडिली गेली. तीर्थे व मने भ्रष्ट झाली.' अशा शब्दांत साधनाक्षेत्राची दुरवस्था व्यक्त केली आहे. ती दूर होण्यासाठी त्यांनी भगवद् प्रेरणेतून साधनांग प्रगट केले आहे. 'साधना संहिता' ग्रंथास त्यांनी 'सद्‌गुरूप्रसादसार' म्हटले आहे. 'हें करी तो सर्वेश्वर । कृष्णनाथ ।' - या शब्दांत त्यांनी भगवद्‌प्रेरणा स्पष्ट केली आहे.

*मी जैसा वर्तलो । वर्ततां जें पावलो ।*
*अनुभवेंचि बोललो । एकेक खूण ॥ १.२५३ ॥*
*आतां जे आचरती । ते विमुक्तचि निश्चितीं ।*
*घ्यावी साधकें प्रचीती । शब्दांची या ॥१.२६२॥*

या प. पू. श्रीबाबांच्या शब्दांतून व्यक्त झालेले साधनादृष्टीमागील स्वानुभूतीचे अधिष्ठान महत्त्वाचे आहे. त्याचप्रमाणे या साधनमार्गाच्या संदर्भातील दृढ श्रद्धा आणि आश्वासनही महत्त्वाचे आहे.

आज परमार्थ क्षेत्रात होतकरू अभ्यासक, गाढे विद्वान, ह. भ. प., गुरू, महाराज, महंत, पुराणिक, प्रवचनकार, व्याख्याते यांची भाऊगर्दी झाली आहे. परंतु शब्दवेल्हाळ विद्वत्ता आणि पढिक परमार्थ यांच्यापेक्षा प्रत्यक्ष साधना, अंतरानुभव यांना महत्त्व आहे. त्यादृष्टीने श्रीबाबांनी आपल्या ग्रंथातून घडविलेले साधनादृष्टीचे प्रमेयदर्शन आणि प्रचीतीचे प्रयोगविज्ञान आजचा अंधार दूर होण्यास प्रभावी ठरेल. अन्यथा 'न च कश्चित् श्रुणोति मां ।-' हा व्यासांचा आक्रोश हेच ऋषी आणि संत यांचेही प्राक्तन ठरेल. परमार्थ क्षेत्रातील मुमुक्षू, साधक यांनी, अभ्यासक आणि संशोधक यांनी त्या संदर्भात आवश्यक ते सावधपण आणि सापेक्ष यांचा सांभाळ करावयास हवा.

## श्रीगुरु-श्रीशक्ती आणि भगवद्‌कृपा

साक्षात्कार साधनेत गुरुतत्त्व, गुरुकृपा, गुरुभक्ती यांचे अनन्य महत्त्व आहे. मात्र मधल्या काळात या संदर्भात अनेक प्रकारची प्रदूषणे निर्माण झाली. श्रीबाबांनी आपल्या ग्रंथाद्वारे या प्रदूषणांचे निवारण प्रभावीपणे केले आहे. हे त्यांचे भारतीय साक्षात्कारदर्शनास महान् योगदान आहे.

साधनासंहिता ग्रंथात कोठेही गुरू, दीक्षा यांचा निर्देश नाही. भगवान श्रीकृष्ण आणि श्रीज्ञानदेव यांच्या संदर्भातील त्यांचा उत्कट गुरुभाव व्यक्त झाला असला, तरी त्यामागची साधनादृष्टी रूढ भूमिकेपेक्षा वेगळी आहे. वस्तुतः 'देव हाच गुरु' ही भारतीय भूमिका आहे.

श्रीतुकाराम महाराज म्हणतात -

*माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव ।*
*आपणचि देव होय गुरू ॥*

गुरुकृपा ही भगवत्कृपा असते. श्रीशक्ती कुंडलिनी ही भगवंताची अनुग्राहिका शक्ती आहे. या एकात्मदृष्टीतून श्रीज्ञानदेवांनी 'देवो-देवी' असा 'अनुभवामृत' ग्रंथात गुरुतत्त्व आणि शक्तितत्त्व यांचा निर्देश केला.

मधल्या काळात 'गुरु हाच देव' अशा भूमिका दृढ झाली. त्यामुळे व्यक्तिपूजा, व्यक्तिगत सांप्रदायिकता यांची प्रदूषणे वाढत गेली. माझा गुरु - तुझा गुरु, माझा संप्रदाय - तुझा संप्रदाय अशी भेदबुद्धी वाढत गेली. वस्तुतः ही ईश्वरी स्वरूपाची अनेकता नसून आपल्या मलिन चित्तातून स्फुरणारे अशुद्ध बुद्धीचे वैचित्र्य आहे. भारतीय भक्तिशास्त्र, संतदृष्टी, श्रीज्ञानदेवांची भूमिका यांचा एकात्म विचार करून श्रीबाबांनी स्वाश्रयी, भगवत्कृपाश्रयी साधना मांडली आहे. उत्कट भक्ती, भगवदार्पित वृत्ती असणारा कोणताही साधक ही साधना करू शकतो. हा भगवत्कृपायोग, कृपांकितांचा योगपंथ सर्वांना खुला आहे. त्याकरता पाद्यपूजा वा गंडा बांधण्याचे अवडंबर आवश्यक नाही.

आज साधक-उपासक यांच्यापेक्षा गुरूंची संख्याच अधिक दिसते. परमार्थाचे व्यापारीकरण वाढत चालले आहे. योगसाधना, ध्यानधारणा यांचे 'वातानुकूलित वर्ग' वाढत आहेत. मंत्रयोग, लययोग, हठयोग, राजयोग, पातंजलयोग, कुंडलिनी जागृती, शक्तिपात साधना इ. संदर्भातील गुरुशिष्यांचे उदंड पीक वाढत चालले आहे. अशा वेळी शुद्ध परमार्थ दृष्टी, उत्कट प्रभुभक्ती आणि स्वाश्रयी साधना यांचे श्रीबाबांचे योगदान सर्वांनाच मार्गदर्शक आहे. भगवत्कृपायोग, भक्तिसाधना यांचे वैशिष्ट्य स्पष्ट करताना श्रीबाबा म्हणतात - ''या साधनेत भक्ताची जीवदशा न मोडता, आत्म्याचा जो सच्चिदानंद धर्म त्याची सर्वव्यापकता, सर्वगत धारणा अनुभूतीस येते. एकात्मता, अनेकता आणि पूर्णता राखून प्रसादरसकल्लोळ अनुभूतीस येतो'' (दिव्यामृतधारा भा. १ पृ. १७३)

गुरूतत्त्व विषयक साधनादृष्टी स्पष्ट करताना श्रीबाबा म्हणतात -

''श्रीगुरू व भगवंत हे एकच. म्हणून जेव्हा 'कृपा' शब्द आम्ही वापरतो, तेव्हा तो 'भगवंत-कृपा' या बोधाने जाणावा.'' (पूर्वोक्त पृ. १६४-६६)... श्रीगुरू हे सर्वप्रकाशक तत्त्व आहे. श्रीगुरूंचे स्थान हे ब्रह्मरूपाने आहे (पूर्वोक्त पृ. ३५६-६३)... गुरुकृपा, आत्मप्रसाद वा ईशकृपा हे एकार्थाचेच प्रयोग आहेत. (पूर्वोक्त भा. २ पृ. ३२८)

भावनोपनिषदात 'श्रीगुरू : सर्वकारणभूता शक्तिः ।' अशा सूत्रात गुरुतत्त्व आणि शक्तितत्त्व यांची एकात्मता व्यक्त झाली आहे. अशा एकात्मदृष्टीने श्रीज्ञानदेवांनी श्रीगुरूंचे वर्णन 'शांकरीविद्या' असे केले आहे. श्रीबाबांची 'ब्रह्मात्मशक्ती श्रीगुरु' ही संकल्पना या संदर्भात अर्थपूर्ण आणि महत्त्वाची आहे. अशा एकात्म स्वरूपाच्या परमात्मकृपेचा आनंदवर्षाव भक्तसाधकास लाभतो. त्यामुळे साधकाचे जीवन 'आनंदपौर्णिमा' होते.

भारतीय विचारात शक्तितत्त्वाचा निर्देश वेदवेदान्त परंपरा आणि आगमोक्त तंत्रविद्या असा सर्वत्र आला आहे. स्वामी विष्णुतीर्थ यांनी 'वैदिक योगपरिचय' ग्रंथात वैदिक सूत्रातील अदिती, सुभगा, सरस्वती या संज्ञांचा अर्थ कुंडलिनी वाचक असल्याचे स्पष्ट केले आहे. श्रीगौडपाद यांचे 'सुभगोदयम्' स्तोत्र, श्रीगोविन्दपाद यांची 'रसहृदयतन्त्रम्' ही रचना, श्रीमत् शंकराचार्यांची 'सौंदर्यलहरी' ही रचना या सर्वातून शक्तिसाधनेचे अभिप्राय तरलपणे आले आहेत. दुर्दैवाने शब्दपंडिती वेदान्त अभ्यासात या अंतरंग साधनादृष्टी दुर्लक्ष झाले आहे. साक्षात्कार साधनादृष्टी लक्षात घेऊन वेदवेदान्त परंपरेचा मूलग्राही नव्याने अभ्यास होण्याची, मांडण्याची आवश्यकता आहे. त्यामुळे वेदवेदान्त, आगम, संतविचार यांची एकात्म साक्षात्कार दृष्टी विकसित होण्यास बहुमोल मदत लाभेल.

श्वेताश्वेतर उपनिषदात 'देवात्मशक्ती', काश्मीर शैवदर्शनात 'चिती' अशा विविध [illegible]

पिण्ड-ब्रह्माण्ड सामरस्य अनुभूतीची साधना हे श्रीनाथपंथाचे महान् योगदान आहे. विशेषतः श्रीगोरक्षनाथ यांच्या सिद्धसिद्धान्तपद्धती ग्रंथात पद-पिण्ड प्रवेश भूमिकेतून शक्तीचा प्रसव म्हणजे सृष्टी प्रक्रिया आणि प्रतिप्रसव या अर्थाने मोक्षप्राप्तीची प्रक्रिया आली आहे. श्रीज्ञानदेवांनी 'पिण्डे पिण्डाचा ग्रासु' अशा शब्दात या प्रतिप्रसव, मोक्षसाधन प्रक्रियेची मांडणी ज्ञानेश्वरीत केली आहे. प. पू. श्रीबाबांनी भारतीय विचारातील हे मौलिक साधना - धन आपल्या 'साधनासंहिता' ग्रंथात स्वानुभव-प्रचीती-स्वरूपात सुस्पष्ट केले आहे. त्यांनी दिव्यामृतधारा ग्रंथात कुंडलिनी मार्गातील धोके, अपरिपक्व अनधिकारी व्यक्तींच्याद्वारा होणारा दुष्परिणाम यांचीही परखड मीमांसा केली आहे. श्रीगुरूकृपा, भगवत्कृपा याचा अर्थ अंतर्यामी असणाऱ्या दिव्य आत्मशक्तीची जागृती हा आहे. यामुळे आणवोपाय ही कर्तृभावयुक्त साधनेची अवस्था संपते. अंतरंग साधना सुरू होते. सर्व योगानुभूती कृपाश्रयी भूमिकेतून येत जातात. शाक्तोपाय अवस्थेतून क्रमशः जीवन्मुक्त अशा शांभवोपाय अवस्थेत पदार्पण घडते.

भगवत्कृपेची महात्मता आणि अनुग्राहिका शक्तीच्या जागरणाने होणारी परमपदप्राप्ती लक्षात घेऊन, श्रीज्ञानदेवांनी या साधनमार्गाची श्रेष्ठता 'पंथराज' शब्दाने व्यक्त केली आहे -

***इयें अभ्यासी जे दृढ होती ।***
***तें भरवंसेनि ब्रह्मत्वा येती ॥ ज्ञानेश्वरी ६.३३०***

भारतीय साक्षात्कार दर्शनातील साधनाप्रणालींचे एकात्म स्वरूप श्रीज्ञानदेवांनी सांगितले आहे - ज्ञानी इयेतें स्वसंवित्ति । शैव म्हणती शक्ति । आम्ही परमभक्ति । आपुली म्हणों ॥ - ज्ञानेश्वरी १८.११३३

या ठिकाणी संवित्, शक्ती आणि परमप्रेमरूपा भक्ती हे समानार्थी शब्द आहेत. स्वस्वरूपानुसंधानातून अपरोक्षानुभूती घडते. शक्तिजागृतीद्वारा ब्राह्मीस्थिती प्राप्त होते. भगवद् भक्ताला भावसाधनेतून योगसुखाचे सोहळे अनुभवत परमपदप्राप्ती होते. प. पू. श्रीबाबांनी दिव्यामृतधारा ग्रंथात भारतीय साक्षात्कारदर्शन आणि श्रीज्ञानेश्वरांची जीवनदृष्टी यांचे सम्यक्, एकात्म दर्शन घडविले आहे. त्यांची साधनासंहिता हे त्यानुसार घडलेल्या त्यांच्या अंतरंग साधनेचे दिव्यदर्शन आहे.

या उभय ग्रंथांचा एकत्र अभ्यास घडला तर प्रमेय आणि प्रचीती, सिद्धान्त आणि साधना या उभय भूमिकेतून प. पू. श्रीबाबांच्या साधनादृष्टीचे दर्शन होते. विविध मोक्षसाधन मार्गाविषयीची भेदबुद्धी नाहीशी होते. प. पू. श्रीबाबांचे हे विराट प्रमेयदर्शन आणि साधनेचा अमृतानुभव हे मोक्षप्राप्तीविषयी आस्था असणाऱ्या सर्वांना लाभलेले आनंदपाथेय आहे.

## इत्येषा वाङ्मयी पूजा

प. पू. श्रीबाबांनी १९६८ साली सुरू केलेल्या 'सांगाति' चा रौप्यमहोत्सव १९९२-९३ या काळात पूर्ण झाला. त्यांचे पार्थिव शरीर १९७१ साली भगवत्पदी विलीन झाले. त्यांचे १९९६-९७ हे २५ वे पुण्यस्मरण वर्ष आहे. त्यांची कृपा मोठी आहे. या प्रदीर्घ काळात 'सांगाति' आणि अन्य वाङ्मयीन माध्यमातून प. पू. श्रीबाबांची दिव्यग्रंथसंपदा, कार्य आणि अंतरानुभव संपन्नसाधना यांचा अभ्यास मांडण्याची संधी लाभली.

प्राचीन भारतीय विचार आणि संतजीवन यांचा गाभा 'साक्षात्कार साधना' हा आहे. त्यानुसार प्रारंभीच्या काळात सांगातिमधून 'सद्गुरु

आणि साक्षात्कार' अशा लेखमालेच्या स्वरूपात भारतीय साधनेचा मूलग्राही विचार मांडण्यास प्रारंभ झाला. या लेखमालेत निवृत्तिनाथ-ज्ञानदेव, जनार्दन-एकनाथ या ख्यातनाम गुरुशिष्यांच्या अंतरंग सौहार्दाचा साधनेच्या अंगाने विचार आहे. त्यानंतर प. पू. श्रीबाबांचे दिव्यग्रंथ आणि त्यामधील साक्षात्कार साधनेचे चिंतन सुरू झाले. १९७४ साली त्यांच्या 'साधनासंहिता' या अपूर्व अनन्यसाधारण ग्रंथाचा अंतरंग परिचय घडवणारा प्रदीर्घ परिचय लेख 'सांगाति' ने प्रकाशित केला. 'सांगाति' आणि श्री. शरद भगत यांच्याशी झालेला हा स्नेहसौहार्दाचा ऋणानुबंध २५ वर्षे अखंड राहिला आहे.

मधल्या काळात माचणूर येथील मोक्षधाम मधील एका साधना शिबिरात सहभागी होता आले. प. पू. श्रीबाबांच्या परमपावन समाधीची सगुणपूजाही पूर्ण झाली आणि त्यांच्या भावदृष्टीचा परिचय करून देणारा 'वाक्यपुष्पोपहारम्' ही त्यांना 'सांगाति'च्या विशेषांकाच्या निमित्ताने प. पू. श्रीबाबांच्या जीवनदृष्टीचा पुनर्वेध मांडता आला. सांगाति मधील इतर लेखनात त्यांच्या 'दिव्यामृतधारा' या बृहद्भाष्य ग्रंथाचा रूपरेखात्मक अभ्यास प्रकाशित झाला.

प. पू. श्रीबाबांच्या स्फूटलेखनात त्यांची पदे, अभंग यांना महत्त्वाचे स्थान आहे. संतमनाच्या भावऊर्मी, अंतरानुभूती यांचे उत्स्फूर्त दर्शन म्हणजे संतकाव्य असते. 'अर्वाचीन संतगाथा' ग्रंथाचे संपादन पूर्ण झाले. त्यामध्ये प. पू. श्रीबाबांची अभंगवाणी अर्वाचीन संतकाव्याच्या श्रेयनामावलीत आदराने अंतर्भूत झाली. 'धर्मभास्कर' संत बाबामहाराज आर्वीकर विशेषांकामध्ये त्यांच्या परतत्त्वस्पर्शी काव्यसंपदेचा अंतरंग परिचय अधिक विस्ताराने देता आला.

सुमारे २५ वर्षांचे प. पू. श्रीबाबांच्या ग्रंथांचे, कार्याचे आणि साधना विचारांचे हे प्रदीर्घ अभ्यास-चिंतन, नीटसपणे ग्रंथरूपात येणे इष्ट होते. 'साधनासंहिता' दुसऱ्या आवृत्तीत मोक्षधाम प्रकाशन मंडळाने सांगातिमधील पूर्वीचा प्रदीर्घ परिचय लेख आवश्यक त्या संक्षेपानुसार प्रकाशित केला. मुमुक्षू, साधक, उपासक, अभ्यासक अशा सर्वांना या अपूर्व ग्रंथाची नीटस माहिती व्हावी यादृष्टीने मोक्षधाम प्रकाशन मंडळ आणि प्रियांक प्रकाशन यांच्या समन्वयी सहकार्यामुळे 'साधना संहिताः भावार्थदर्शन' हा बृहद् भाष्यग्रंथ प्रकाशित झाला. त्याची 'भावदर्शन' घडविणारी विश्लेषक प्रस्तावना, मूळ ओव्यांवरील 'भावार्थ' आणि विशेष अभ्यासास पायाभूत अशा व्यापक 'संदर्भ टीपा' या सर्वातून या ग्रंथाचे आणि साधनासंहिता ग्रंथातील प. पू. श्रीबाबांच्या साधनादृष्टीचे अभ्यासचिंतन मांडणे शक्य झाले. भारतीय विचारातील सर्व प्रमुख प्रणालींच्या संदर्भात प. पू. श्रीबाबांच्या साधनादृष्टीचे वैशिष्ट्य, महात्मता समजून घेणे यामुळे शक्य झाले. या ग्रंथावरील आपला सौहार्दपूर्ण अभिप्राय व्यक्त करताना ज्येष्ठ स्नेही आणि संतसाहित्याचे ख्यातनाम समीक्षक मा. प्रा. डॉ. व. दि. कुलकर्णी आपल्या दि. १-६-१९९५ च्या पत्रात लिहितात -

"आपण संपादित केलेले प. पू. बाबा महाराज आर्वीकर यांचे 'साधना-संहिता' हे पुस्तक मिळाले. हाती आल्यापासून मी त्यातच आहे. मूळ संहिता अपूर्व, आपले भाष्यही तसेच ! फार महत्त्वाचे आणि अत्यंत आवश्यक असे कार्य आपल्या हातून घडून गेले आहे. विसाव्या शतकातील सर्वोत्कृष्ट मराठी ग्रंथांची नामावली करताना 'साधना-संहिता' या ग्रंथाला पहिले स्थान द्यावे लागेल. 'श्री ज्ञानेश्वरी' च्या बरोबरीने 'साधना-संहिता' या मंत्राक्षरी ग्रंथाचा अभ्यास उद्या सुरू होईल. आपल्या 'भावार्थदर्शना'मुळे या कार्यास प्रारंभ होईल. अखंड चालना मिळेल. आपले हे सर्वश्रेष्ठ धर्मकार्य होय."

वस्तुतः अशा प्रकारचे चिंतन, लेखन हा आपल्या कर्तृत्वाचा, श्रेयाचा भाग नसतोच. प. पू. श्रीबाबांच्या सारख्या स्वानुभूतीसंपन्न संतांची प्रेरणा, भगवत्संकल्प यातून देवकार्य घडत असते. सारे संबंधित जन त्या प्रेरणामूर्तीचे माध्यम असते, संकल्पपूर्तीस निमित्तमात्र असतात. सांगाति, मोक्षधाम प्रकाशन, प्रियांक प्रकाशन अशा माध्यमातून प. पू. श्रीबाबांच्या साधनादृष्टीचा अंतरंग परिचय करून घेण्याची संधी लाभत राहिली ही त्यांचीच श्रीकृपा आहे. 'इत्येषा वाङ्मयीपूजा' आणि त्याद्वारा जे त्यांच्या अक्षर साहित्य संदर्भातील धर्मसंकीर्तन घडले, हे त्यांच्याच चरणकमली समर्पित करणे ही त्यांच्या २५ व्या पुण्यस्मरण निमित्ताची वाक्पुष्पांजली आहे.

प. पू. श्रीबाबांचे जीवन आणि साहित्य यांमधून जी साधनादृष्टी व्यक्त होते, जो ब्रह्मरसानुभूतींचा सुगंध दरवळतो, त्या ब्रह्मकमळाचा संस्पर्श सर्वांना व्हायला हवा. अभ्यासकांना या अभ्यासातून ऋषींचे प्रज्ञान आणि संतजीवन समजून घेण्याची यथार्थदृष्टी लाभावी, मुमुक्षू साधकांना भगवत्कृपेचा प्रसादरसकल्लोळ प्राप्त व्हावा, उत्कट भक्तीच्या साधनेतून योगसुखाचे सोहळे प्राप्त व्हावेत, आणि सर्वांचे जीवन पूर्णत्वाचे प्रवासी, आनंदयात्री म्हणून धन्य व्हावे, ही श्रीचरणी प्रार्थना !

*(डॉ. सुनीता जोशी यांच्या सौजन्याने)*

**कै. डॉ. ज. वा. जोशी**
'संवाद' २८/३२७, गंगानगर, प्राधिकरण, निगडी, पुणे ४११०४४.



## तोचि खरा संत

"तन मन शुद्ध ज्याचे तोचि खरा संत"
जयाच्या हृदयी नित्य राही भगवंत
तन मन शुद्ध ज्याचे तोचि खरा संत ॥ धृ. ॥

दया, क्षमा, सौजन्याची असे जणू मूर्ती
तेज ईश्वराचे प्रकटे दिव्य अशी कांती
अविष्कार कारूण्याचा जणू मूर्तीमंत ॥ १ ॥ तन मन...

मन विश्वरूप ज्याचे सर्वाभूती प्रेम
रामनाम वाचे वदता भरे रोमरोम
शोभतो विदेही परितो राहुनी देहात ॥ २ ॥ तन मन...

शुभवासना जागते संतांच्या संगती
बोध करुनी सत्याचा जना उद्धरी ती
प्रसन्नता चित्ती ज्याच्या सोसूनी आघात ॥ ३ ॥ तन मन...

बोलणे तयाचे साधे परी तो वेदांत
माऊलीहूनी प्रेमळ परी तो विरक्त
जना माजी राहूनिया साधतो एकांत ॥ ५ ॥ तन मन...

**सौ. प्रभा टेंभेकर**

# म्हणोनी साधका तूं माऊली

**प्रा. विजय पागे**

*एम.ए., उज्जयिनी कॉलेजमध्ये मराठीचे प्राध्यापक. संत साहित्याचे व्यासंगी अभ्यासक. श्रीबाबा महाराजांच्या साहित्याचा व जीवनाचा स्पर्श त्यांच्या वाणी-लेखणीला झाला आहे.*

काही व्यक्ति आयुष्यात फार थोडा वेळ येतात अन् फार सखोल जाऊन बसतात, रुजतात. त्याही अशा की जनमान्तरीच्या सुहृदासारख्या ! माझ्या चिमुकल्या आयुष्यात अनेक विभूतींची दर्शने सद्गुरुकृपेने घडली. सहवास, चर्चा इत्यादी रूपांनी त्यांचे सान्निध्य अनुभवले. पूज्य बाबांचे पुण्यदर्शन मला प्रथम घडले ते इंदूरला. त्यांची प्रवचने होती म्हणून ते आले होते.

पांढरा शुभ्र रूमाल त्यांनी श्रीसाईबाबांसारखा डोक्याला बांधला होता. अंगात केसरी सैलसा बंगाली कुडता व लुंगी घातलेला धिप्पाड देह. भरदार दाढी, मानेवर रुळणारे रेशमासारखे काळेभोर केस, प्रशांत डोळे, रंगाने सावळे, रेखीव भुवया, विचारमग्न मुद्रा ! वर्तमानांत जगूनही मधेच अल्याड-पल्याड जाऊन यावेत असे वाटावे अशी आत्मतंद्रावस्था असे काहीसे चित्र माझ्या मनी आजही तरळते ! हे व्यक्तिमत्त्व पाहिल्यावर प्रथम क्षणभर उग्र भासावे. पण बाबांनी एकदाच हसावे आणि कळून येई की निर्मळ, निरामय प्रसन्नतेचा हा खळखळता प्रवाह आहे.

***श्रीबाबा म्हणजे सगुण चैतन्याचा रसरशीत जिव्हाळा ! ज्ञानेशांच्या ओवीचे हृदय बोलण्यास भक्तीचा उमाळा ! समाजाच्या आध्यात्मिक उन्नतीची करुणा अंतरी बाळगणारा मूर्तिमंत कळवळा !***

त्या दिवशी पूज्य बाबांशी बोलताना अत्यंत जिव्हाळ्याने ऋजू मनाने अंतरीच्या अवघ्या व्यथा मी त्यांचेकडे उलगडल्या ! गंभीर वाणीच्या त्या तपस्येच्या मुखी त्या वेळी जी शब्दफुले अवतरली ती मी आजवर अजून माझ्या हृदयाच्या ओंजळीत श्रद्धेने सांभाळून ठेवली आहेत.

आज ही **'मोरेश्वर'** नावाची साधकांची माऊली आम्हाला लोकांतात ठेवून स्वतः 'निवांतात' चालली गेली ! अंतर्मन म्हणते, 'गेले' म्हणजे फक्त 'पाचांचा मेळा' एके ठायी जमला होता तो विखुरला ! पण त्या मेळ्यातही 'एक तत्त्वी' असणाऱ्या बाबांचे दर्शन मला का घडू नये ? श्रीकृष्ण जसा गीतेतून-भागवतातून 'दिसू' शकतो; अजूनही इथे 'असू' शकतो, हृदयी सर्वांच्या 'वसू' शकतो. तसे का घडू नये ? आणि तसेच घडत असते... ! 'ये यथा मा प्रपद्यन्ते ।' श्रीमंत पूर्वप्राक्तनाचे लेणे ल्यायलेला कोणताही शिवस्वरूपी जीव सद्गुरुंच्या कृपासलिला 'तरंग' म्हणून जेव्हा या जगी जगत असतो तेव्हा त्या चैतन्याला अवयवांचे अंकुर फुटतात व त्यातून ज्ञानाची कोटी कोटी किरणे प्रस्फुरत राहतात ! ती किरणे अव्यक्त शब्दामध्ये प्राणमंत्र फुंकल्यासारखी तो सद्गुरुस्वरूप असलेला महापुरुष ओततो आणि लक्षावधी अज्ञानी जीवांना उपदेशाने 'सोडवतो' तो स्वतःसुद्धा 'भोग' सरताच आपल्या 'स्वरूपी' मिळून जातो.

असाच एक श्रीगुरुंचा लाडका लेक 'मोरेश्वर' हे अभिधान धारण करून वऱ्हाडी मातीतल्या एका शुचिसंपन्नगृही अवतरला... ज्याला लोकपावन गंगा-जमुना-नर्मदा-प्रवरा यांनी सांभाळले... जो विठूमायच्या काळ्या भोळ्या मातीत रमला... समाजाच्या अभ्युदयासाठी धर्म कीर्तनात रंगला... अनेकांचा 'सांगाती' झाला... लक्षावधींनी लक्षात ठेवावे अन् प्राशन करावे असे किरण शब्दोशब्दी भरून साधकरूपी चकोर पिलांपुढे ते 'दिव्यामृत' त्याने वोगरिले... नाव पुसले तर कृष्ण-ज्ञानाईचे कुळ सांगितले... संत-धर्ममंडळाची मुहूर्तमेढ रोवली... काया आणि वाणी शक्य तेवढी शिणवली, उधळली ! लौकिक शिक्षणाचे कुठेही नटवे मोरपिस मस्तकी न खोवता भक्ति व ज्ञान यांची महारासक्रीडा खेळून ही मूर्ती नव्हे शक्ति स्वस्वरूपी सायुज्यता पावली ! श्रीबाबांनी जसा बारावा अध्याय निरूपणाला निवडला तसेच त्यांचेही दर्शन कुणाला घ्यावेसे वाटले तर ते बाराव्या अध्यायालाच पुसावे !! तो सांगेल निःशंकपणे की बाबा इथे बोलत आहेत...

*भवसिंधूचे नि माजे । कवण्यासि भाकु जुपजे ।*
*तेथ जरी की माझे । बिहिती हन ॥८८*
*म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ।*
*करुनि त्यांचिया गांवा । धावतु आलो ॥८९॥*
*नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारी ।*
*सजुनिया संसारी । तारू जाहलो ॥९०॥*

अभिवनगुप्ताने शब्द शक्तीचा महिमा मोठ्या अधिकार वाणीने सांगितला आहे. साहित्य-शास्त्रज्ञांनी शब्दांच्या अंतःकरणातली सारगर्भ शक्ति आणि तिच्या विविध कक्षांची समीक्षा करण्याचा प्रयत्न केला. पण 'बिंब जरी बचकेचि एवढे । परी प्रकाशा त्रैलोक्य थोकडे' अशा व्यापक सामर्थ्याचे : संजीव, चैतन्यमयी, शब्दांचे 'अर्णव' निर्मिणाऱ्या 'शब्दशक्तीच्या ईश्वराचे' दर्शन-यथार्थ दर्शन घडावे कुठे ! मला ते दर्शन त्यांच्या शब्दांच्या संगतीत घडते. ज्ञानोबांचे दर्शन ओवीच्या अक्षरा-अक्षराला एका नितळ निर्मळ-मवाळ-मधुर नादांत लपलेले असावे असा भास होतो !! लखलखीत, रोखठोक, राकट, बलदंड आणि तरी जिव्हाळ्याने रसरसलेले एक अद्भुत दर्शन मला दासबोधातल्या ओव्यांच्या सोबतीत समर्थ देत आहेत, असं वाटते ! तसेच श्रीबाबाही मला दिसू लागतात. 'दिव्यामृतधारा' वाचता वाचता मन मध्येच ओळींच्या रांगांमधून उडून तिथे बाबांना पाहू लागतं ! प्रसन्न, शांत, स्निग्ध, भाव ल्यालेली एका विरागी छटेची आत्मरंगी बुडालेली मुद्रा मला तिथे हसताना दिसू लागते ! इतकं कोवळं अंतःकरण असलेले हे व्यक्तित्व होतं, हे त्यांची भव्य गंभीर मूर्ती पाहून पटत नसे. पण 'जय जय हो शुद्धें, उदारें प्रसिद्धें' यांतील 'हो' शब्दावरील बाबांचे विवरण पाहावे. 'श्रीगुरुमाय' हा जणू बाबांच्या हृदयीचे जळ उचंबळविणारा,

भक्तिप्रेमाचे कल्लोळ उसळविणारा परवलीचा शब्द वाटतो. जिथं जिथं हा शब्द बाबांना भेटतो, अगर या शब्दांशी नाते असलेला अर्थसंकेत भेटतो, तिथं तिथं बाबांची वाणी रसाळ लेणी लेवून मिरविताना दिसते. 'रंगे नृत्यचि भारती' असा भास होतो. बाबांचे शब्द 'लिहिलेले' वाटतात पण असतात मात्र बोललेले अमृताचे कल्लोळ. श्रीकृष्णाच्या गीतेचे हृदयभांगार उजळले ज्ञानाईने आपल्या दीपिकेने पण बाबांनी त्या दीपिकेची अंतरचैतन्य शक्ति शोधण्याचा, उकलून दाखविण्याचा समर्थ यत्न केला. तोही अशा गोमटेपणाने की 'तेथ अलंकारिले कवणे कवणे' असा संभ्रम पडावा क्षणभर ! बाबांची प्रवचने ज्यांच्या कानी-मनी पडली असतील त्यांना आठवेल की वाणीमागून अर्थ अक्षरशः धावत होता. तो पकडताना श्रोत्यांची अंतकरणे 'ओंजळ' सावरताना धडपडत होती !

पण हीच वाणी जेव्हा अक्षर, अमर झाली तेव्हा तिच्यातले दिव्य अमृत मनाने आस्वादायला व रिचवायला जे रसिकभक्त लागले असतील त्यांना ***बाबांच्या शब्दांचे, विचारांचे, चिंतनाचे एक लावण्य भांडार गवसल्याचा आनंद होत असेल. बाबांनी गीतेने सांगितलेली तीनही तपे आचरलेली आढळतात.*** शारीर, वाङ्मय व मानसिक या त्रिविध तपस्येतून लखलखून बाहेर आलेल्या या उदात्त वाङ्मयाच्या तपस्वी कृपांकिताने, आपल्या शब्दोशब्दी 'प्रसाद' भरला नाही तरच नवल ! माझ्या भाबड्या भक्तिमनाला तर बाबांच्या प्रसन्न, गंभीर वाणीच्या संगतीत वाटू लागलं की, ***धवलशुभ्र घोड्यांच्या सुरेख ऐटदार कनकरथावर बसलेला मेघश्यामल श्रीहरी, आपल्या गंभीर वाणीने आपल्या हृदयीचे हितगुज तर गुणगुणत नाही ना !*** गंभीर ज्ञानमूर्तीला सौंदर्याची स्वप्ने पडावीत. स्वर्गीय गळ्याच्या अलौकिक गंधर्वाने वेदांच्या ऋचांचे अचूक सामगायन करावे; अपार निळ्या आकाशाने लावण्याचे लोभस रूपडे होऊन यावे, तशी बाबांची शब्दकळा अंतरी ज्ञान व बाहेरी भक्तिप्रेममुद्रा घेऊन पदन्यास करताना दिसते. ज्ञानोबा म्हणतात तसे, 'ब्रह्मरससुस्वादे' बाबांनीही आपली अक्षरे मागच्या काळातल्या अवघ्या अमृतपुत्राने 'वाट पुसतु' लिहिली असावीत. लावण्यगुणयुवती आणि पतिव्रता अशी ही शैली पंडितांचे पांडित्य, पतिव्रतेचे तेजस्वी सौंदर्य, अभिजात कुल स्त्रीसीजन्य व पावित्र्य आणि माऊलीचे वात्सल्य या सकळ मुळांसह रसिक भक्तांना भेटते. बाबांच्या या सरस शब्दरूपी 'कल्पतरूंच्या आरवी' साक्षात्कार देते. एखाद्या प्रबंध लेखकाने घ्यावी तितकीच किंबहुना अधिक काळजी बाबा आपल्या लिखाणात घेत असतात. आपल्या विवरणांना संदर्भ श्रीमंतता देऊन ते जणू सांगतात, ***'प्रबंधाचे' मी माझे इवले या विश्वात्मकाच्या लोकविद्यापीठाला सादर करीत आहे.'*** हे करतानाही विनम्रता अशी की, हे ऋण पूर्वसुरींचे, शब्द ज्ञानोबांचे, मी तो मापाडे केवळ ! योगातल्या रूढ सांकेतिक संज्ञाचे स्पष्टीकरण, उपनिषदांतल्या वचनापासून तर संत कवि - मग ते हिंदी-मराठी कुठल्याही का भाषेत बोलणारे असोत- या सर्वांपर्यंतचा आधार घेत करीत असतात. बाबांच्या मनाने अत्यंत संयमित आविष्करण त्यांच्या वाणीत घडताना दिसते. विवेचन करताना भावोत्कट ठिकाणीही संयमाची सहजसमाधी लागलेले त्याचे चिंतन, ज्ञान, भक्ति, साधना व सामरस्य या चार पाकळ्यांच्या कमळावरच अधिष्ठित आहे हे सतत जाणवत असते.

व्यक्तीतल्या आत्मशक्तीपासून तो ब्रह्मांडातल्या विराट चैतन्य शक्तीपर्यंतचा अन्वय, साक्षात्कार व विलास यांचा बाबांच्या प्रतिभेने सुंदर, भव्य आलेख काढला आहे. या 'अमृताचिया अभिषेका'ना ओवी म्हणावे ? या अभिषेकातले बिंदु, बिंदुबिंदुतूर एकंकार होणारी 'धारा' व या 'धारे'चा अनवरत दिव्य प्रवाह आपल्यासाठी पूज्य बाबांनी वाहविला आहे. तो प्रवाह घरोघरी पोहोचावा म्हणून बाबा 'सांगाति'च्या मिषाने आपल्या सर्वांशी सख्य जोडून आहेत. त्यांचे इतर वाङ्मय व त्यातही 'साधनासंहिता' हे तर त्यांचे आध्यात्मिक आत्मचरित्र वाटावे असे गूढरम्य आहे. समर्थांनी म्हटल्याप्रमाणे आपल्याला या वंदनीय विभूतीचे रूप, प्रताप, साक्षेप, चालणे, बोलणे हे सारे सारे आठवावे असे आहे. पूज्य बाबांची प्रेरणा या सगळ्यातून अनंत साधकांशी 'बोलणार आहे' सातव्या अध्यायात ज्ञानी महात्म्याबद्दल बोलताना ज्ञानोबा म्हणतात,

***'हे समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीति रसाचा वोतला भावो ।***
***म्हणौनि भक्तांमाजी रावो । आणि ज्ञानिया तोचि ॥'***

हेच शब्द बाबांबद्दल आम्ही सर्व म्हणू शकतो असे वाटते. थबकलेल्या साधकाला बाबा आपल्या ग्रंथातील वचनांचा आधार देऊन चालवणार आहेत आणि उदासलेल्या अंतःकरणी उल्हास, शांति व प्रसन्नता यांचे चांदणे शिंपणार आहेत... अशा वेळी जर बाबांच्या चिंतनात दंगलेल्या एखाद्या साधकाने जुळलेल्या करांनी व मिटलेल्या लोचनांनी त्यांच्या मूर्तीला वंदन करून म्हटलं...

'म्हणौनि साधका तूं माऊली'... तर त्यात आश्चर्य कसलं ?

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

**प्रा. विजय पागे**
उज्जयिनी

---

## श्रीक्षेत्र माचणूर

माझे पुण्य फळा आले
आज मी माचणूर पाहिले ॥धृ.॥
समाधी मंदीर मोरेशाचे
अधिष्ठान जणू सांब शिवाचे
भक्त रंगुनी भक्ति नाचे
सार्थक जन्माचे झाले ॥१॥
मंदिर सन्निध औदुंबर तो
श्री दत्तगुरू तरुतळी वसतो
आशीर्वचनी भक्त नांदतो
अवचित भाग्यचि की फळले ॥२॥
जरा बाजुला उभा ठाकला
वीर मारुती करी गर्जना
प्रभु सेवेचा मांड मांडीला
गर्जनी अथांग नभ घुमले ॥३॥
सारा परिसर दिव्य भासतो
वाळवंटी या विठू नाचतो
आनंदाने कणकण स्फुरतो
भूदरि वैकुंठची आले ॥४॥

**श्री. के. पुसाळकर**



# प पू. सद्गुरू संत बाबामहाराजांची साधनादृष्टी


**श्री. दास नारायण**

दास नारायण तथा नारायण केशव देव. ३६ वर्षे पोस्टात निरनिराळ्या अधिकार पदावर नोकरी. १९९१ मध्ये डायरेक्टर मुंबई, जी.पी.ओ. पदावरून व्हॉलंटरी रिटायर्ड. प. पू. बाबांचा सहवास १० वे वर्षापासून सद्गुरु बोध. १९६५ प्रवचन सेवा. १९९७ नंतर पुस्तके प्रकाशित. १) श्रीरामस्तोत्र (रामायणावर आधारीत), २) सद्गुरुस्तोत्र (शिवपार्वती संवादावर आधारीत), ३) श्रीमद्भागवत कथामृत ग्रंथ, ४) श्रीमद्वाल्मीकी रामायणामृत ग्रंथ, ५) सद्गुरु महात्म्य आणि पारमार्थिक पारमार्थ ग्रंथ, ६) [illegible] ग्रंथ, ७) करुणाष्टकामृत (श्रीसमर्थ रामदासस्वामी करुणाष्टकावर आधारीत).


प. पू. बाबामहाराज पुराण पुरुष पुरुषोत्तमालाच गुरूदेव, गुरू वा गुरूतत्त्व, जे सर्वाधिक, सर्वोच्च, पूर्ण विकसित आणि विलसणारे, सगुण, निर्गुण या गुणांना सर्व व्यापक आणि संपूर्ण चराचरास व्यापून असलेले एकमेव दर्शन, एकनिष्ठतेत मानीत होते. अशा या गुरुदेवाचा आकार आकलन करण्यास जो प्रयत्न करावा लागतो व त्याकरता मानवात स्थित असलेल्या शक्तींचा वापर करावा लागतो, याचेच नाव 'साधना' असा प. पू. बाबांचा निश्चियात्मक निर्णय होता. परमेश्वरप्राप्ती, आत्मरूपदर्शन, ब्रह्मदर्शन, आत्मसाक्षात्कार, मोक्ष इत्यादी शब्दांचा भारतीय शब्दज्ञानामध्ये वापर करण्यात येतो. याचाच अर्थ साधकास अशा एका पुरुषाचे दर्शन अपेक्षित आहे की ज्याचा आकार वा स्वरूप त्याला पूर्णांशाने समजले नाही. अशा या पूर्णांशाचे ज्या साधकास दर्शन घडते त्यालाच 'मोक्ष' असे म्हणतात.

व्यवहार्य जगात व्यक्तिचा संबंध, काका, मामा, वडील, भाऊ, मित्र आदी नात्यात गुंतलेला असतो पण ती व्यक्ती स्वतःस मीच म्हणत असते. त्याचा 'मी' जाणण्याचा प्रयत्न कोणीही केलेला नसतो. तद्वत् 'गुरूदेव' या शाश्वत मूल्य विकसित असलेल्या महापुरुषाचे एक-एक अंग जाणल्यावर जी जाणीव होते ती अपूर्णच असते. त्या पूर्णाकाच्या दर्शनासाठीच / प्राप्तीसाठीच सर्वांना प्रयत्न करावयाचे आहेत व त्यासाठी आपली सर्व जिज्ञासा, तळमळ, तगमग क्रियाशील ठेवावयाची आहे, असा विचार तसा गंभीरच आहे.

प्रत्येक जीव मानवापासून तो कीडामुंगीपर्यंत आहार, निद्रा, भय व मैथुन या जाणिवेत सिद्ध आहे. अशी शक्ती जीवात निर्माण होण्याचे कार्य गुरूदेवाचे विशिष्ट स्वभावदर्शनातून प्रत्येक जीवात प्रेरित होत असते. याप्रमाणे ज्याला जेवढे कळले तसे त्याचे ईश्वराचे दर्शन असते. याचा अर्थ विश्वामधील प्रत्येक रूपमात्रामध्ये जे काही उत्स्फूर्त म्हणून आहे, ते त्या विराट पुरुषाचेच अंगप्रत्यंग दर्शन असते. यातूनच विश्व ब्रह्मरूप असल्याची साक्ष पटते. ब्रह्म पूर्णत्वाने क्रियाशील, पौरुषपूर्ण, सामर्थ्ययुक्त, अद्वितीय कुठल्याही अवस्थेत गतिमान आहे. याचे तुलनेत दुसरे असणे संभवत नाही. अर्थात हा चिंतनाचा विषय आहे. याचेच चिंतन व्हावे असा सर्व साधकांना प. पू. बाबांचा उपदेश आहे.

प. पू. बाबा तत्वतः मूर्तिपूजक नव्हते तथापी ते रामकृष्णाचे पूजन आनंदाने व प्रेमाने करीत असत. त्यांना ते गुरूदेवच मानीत असत. सर्वांमधून रामकृष्णच क्रीडायमान आहेत असा त्यांचा दृढविश्वास होता. सर्व अवतार श्रीगुरुंचेच आविर्भाव आहेत असे ते जाणत असत. सामान्य मानव त्रिगुणात्मक मायेत बद्ध असल्याने त्याची जाण, त्याचे मन, बुद्धी आणि इंद्रियांचे व्याप्तीएवढीच असते. ज्याची जशी जाण त्याप्रमाणेच त्याची ईश्वराची भक्ती असते. पण जीवास त्याचे स्फुरण व वेदना ह्या श्रीगुरूदेव / ईश्वर यांचीच आहे हे कळत नसते. जीव मी कोण आहे याचे शोधात कधीच नसतो. अज्ञानग्रस्त अवस्थेत तो देहालाच मी समजत असतो व त्यातच बद्ध असतो. वास्तविक 'मी' हे एक भावनात्मक रूप आहे. हा 'मी' ज्यावेळी लीन होतो तेव्हा नाहीसा होतो आणि असे ज्या काळी अनुभवास येईल ते त्याचे मूळ रूप असते.

विश्वातले ज्ञान ज्या अणू-परमाणूंना होत असेल ते एकाच पुरुषाचे ज्ञान आहे. यात सुष्ट, दुष्ट, जातपात, धर्म वा कर्म याचा संबंध नाही. सर्वव्याप्त श्रीगुरूदेवाचाच एकमात्र विहार आहे पण सामान्य जीवास अज्ञानावस्थेत कळत नसते. अशा या अज्ञानग्रस्त अवस्थेतून मानवास मुक्त करण्याचे कार्य संत अव्याहतपणे करीत असतात. अशा ह्या अज्ञानग्रस्त अवस्थेतून मुक्ती मिळाल्याशिवाय मानवाची सुख, दुःख, जन्म-मृत्यू यातून सुटका होणे संभवनीय नाही. केवळ कल्पनेतून मुक्त होता येत नाही. मी ब्रह्म आहे, ईश्वरभक्त आहे, सिद्ध आहे अशा समजूतीतून मुक्तावस्था साध्य होत नाही. मी सेवक आहे असे भान जोवर आहे तोवर अशी सेवा देहतादात्म्यभावात आणि स्वप्रतिष्ठा सांभाळण्यातच बद्ध राहील. आज आपण अनेक मंदिरे, तीर्थक्षेत्रे, अनेक संप्रदाय भक्तीभावात कार्य करीत असलेले पाहतो. अनेक भाडोत्री पुजारीही अशा ठिकाणी धार्मिक कृत्य करवून घेण्यास कार्यरत असतात. एवढा सर्व व्याप असताना सुद्धा आज समाजात द्वेष, मत्सर, अशांतता, अस्थिरता कमी झालेली दिसत नाही - उलट ती सतत वाढत असलेलीच प्रत्ययास येत आहे. मृत्यू निसर्ग आहे तर त्याचे भय का वाटावे ? आमचा निसर्ग तर अमरत्वाची जाण देतो, म्हणूनच साधुसंतांनी निश्चयाने सांगितले की अमृताकडे पाहा. तुम्ही अमर होऊ शकता, मुक्त होऊ शकता, मृत्यूचे आक्रमण परतवून लावू शकता. तुम्ही त्या विराट पुरुषास शरण व्हा, समर्पित व्हा म्हणजे तुमचेत आवश्यक सामर्थ्य निश्चित निर्माण होईल.

आज आमच्या भावनेचा विचार करता असे दिसेल की ती मृतप्रायच आहे. आम्ही राम, कृष्ण, ज्ञानदेव, तुकारामादी महापुरुषांना मूर्तित बद्ध करून ठेवले. त्या मूर्तित ते प्रत्यक्ष प्रकट आहेत, विराजमान आहेत असा आमचा जिवंत भाव-अनुभव नाही. त्यामुळे ती मूर्ति ज्या धातूची असेल वा दगडाची असेल तसाच भाव आमचे मनात स्थिर होणार. ह्या मूर्ति निर्जीव आहेत या भावातच आमचे नामस्मरण होणार. आपण एखाद्या ठिकाणावरून घरी परत गेलो म्हणजे आपण त्या ठिकाणाला मेलो काय ? स्वतःचे घरी परत जाणे ही जी क्रिया आहे तसेच स्वस्वरूपात जाणे होय. यालाच

ललाततत्त्व म्हणतात. आम्ही रामकृष्ण का मानतो तर त्या पुराणपुरुषाचा आमचेत पूर्ण परिचय निर्माण झाला. आमचेत तसा तो झालेला नाही म्हणून देहानेच आम्ही त्यांचेकडे जाण्याचा प्रयत्न करतो. या पुराण पुरुषाला जाणण्याची क्रिया उद्योग वा प्रयत्न करणे याचेच नाव साधना.

साधना ही सहजगतिक भावना आहे. क्रियाशून्यता यात अभिप्रेत नाही. परमेश्वराचे सान्निध्यात सतत राहणे असा सहज प्रयोग या भावात आहे. ते मग ध्यानातून असो, जपातून असो, वा अन्य कोणत्याही भक्ती वा योग मार्गाचे असो पण त्यात सहजता असावी जसे जिवन्त राहण्यास आपण अन्नसेवन करतो. अन्नसेवनात जी सहजता आहे तशीच साधनेत असावी. ध्यानाची अवस्था सहजतेत निर्माण व्हावयास पाहिजे. जुलूमजबरीने ध्यान स्थिर होत नसते तसे स्थिर करण्याचा प्रयत्न करणे म्हणजे भूक लागण्यास औषध घेण्यासारखे आहे. साधनेत व्यभिचारी भाव नको. पातिव्रत्य धर्मनिष्ठेने स्विकारणे, एकनिष्ठ राहणे, स्विकारलेल्या मार्गात धरसोड न करणे, शरण्य, निष्कामभाव आणि सद्‌गुरुवर पूर्ण विश्वास इत्यादी भाग आचरणात आले की साधनेत सहजप्रगती होते. यात स्वार्थ निर्माण झाला की भ्रष्टता वा पतन निर्माण होईल.

श्रीगुरुकृपादृष्टी शिवाय ज्ञानप्राप्ती कदापी शक्य नाही. मुमुक्षुला मोक्षाची वाट दाखविणारी समर्थ, शांत, निरहंकारी, ईश्वराची प्रतिमा म्हणजेच सद्‌गुरू. त्यांची कृपा संपादन करणे हाच परम पुरुषार्थ उपनिषदे, श्रीमद् भगवतगीता, ज्ञानेश्वरी, दासबोध, योगवासिष्ठ यातून दुमदुमत आहे. कुठल्याही क्षेत्रात ते व्यवहारिक असो वा पारमार्थिक. समर्थ सद्‌गुरू भेटल्याशिवाय सामान्य जीवाची प्रगती संभवत नाही. केवळ पुस्तकी ज्ञान-पाठांतराने बौद्धिकसामर्थ्य वाढेलही पण ते अनुभवशून्य असल्याने स्वउत्कर्ष साधू शकत नाही. आत्मानुभवाची वाटचाल करताना तर योग्य मार्गदर्शनाची नितांत आवश्यकता आहे.

सामान्य व्यवहारात आणि शास्त्रीय चिकित्सेत सामान्य मानव दुसऱ्याने संपादन केलेल्या ज्ञानाचा परिचय करून घेत असतो वा त्याचे परिशीलन करीत असतो; पण आत्मानुभूति येण्यास आपल्यास कोणता मार्ग श्रेयस्कर आहे याची निवड प्रत्येकास त्याचे स्वाभाविक आवडीनुसारच करावी लागते. तशी एकदा निवड – त्या अनुषंगाने वाटचाल व्हावी लागते. यात दुसऱ्याचा अनुभव उपयोगाचा ठरत नाही; केवळ मार्गदर्शक व प्रेरणा एवढाच त्याचा फायदा आहे. आत्मानुभूति अनुभवासाठी, आत्मसाक्षात्कारी सद्‌गुरूलाच सर्वेन्द्रियासहित देहार्पणभावात शरव्य स्विकारावे लागते. भगवद् गीता २/७ मध्ये अर्जुनाचे सख्य सद्‌गुरू श्रीकृष्ण माहात्म्याने स्विकारल्यावरच आत्मज्ञानाचा उपदेश केला व त्याप्रमाणे त्याचेकडून साधना करवून घेतली. उपनिषदात सद्‌गुरू व सत्शिष्य यांचेतील ब्रह्म, जगत, जीव, ईश्वर, ज्ञान, अज्ञान व मोक्ष या अत्यंत महत्त्वाचे प्रश्नाविषयीचे उद्‌बोधक संवाद आहेत. यात नचिकेत-यम, मैत्रेयी-याज्ञवल्क्य, श्वेतकेतू - आरुणी इत्यादी मुमुक्षूंना लाभलेले अमोल पाथेय होय.

"नायमात्मा प्रवचनेन लभ्यो, न मेधया, न बहुदाश्रुतेन" (कठ १-२-२२) असे सांगून आत्मानुभवाचे प्राप्तीसाठी "तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्" (मुंडक १-२१२) असा आदेश उपनिषदात दिला आहे. इतर कोणतेही ज्ञान संपादण्यास सामान्य शिक्षक काम करू शकेल कारण त्या ठिकाणी शिक्षक व विद्यार्थी दोघेही परप्रकाशी असतात. ससंवेद्य आणि स्वयंप्रकाशी असणाऱ्या आत्मशक्तिचे जागरणास स्वयंप्रकाशी आणि समर्थ सद्‌गुरुचीच आवश्यकता आहे. या न्यायानेच "आचार्याद्धैव विद्या विदितासांधिष्ठं प्रापयतीति" (छान्दोग्य ४-९-३) असे उपनिषदांनी म्हटले आहे.

आत्मानुभव संपादन करणे हाच परमपुरुषार्थ होय. वाट बिकट असली तरी "उत्तिष्ठत जाग्रत प्राप्यदशन्निबोधात" (कठ १-३-१४) असा उपनिषदाचा आदेश आहे. विद्या व अविद्या यांपैकी विद्येचा स्विकार करून मोक्षसाधनेचा अंगिकार मानवाने करावयास पाहिजे. (मुंडक १-१-४/५) ईश (९-११). यात पूर्णत्व संपादन करण्यास सद्‌गुरुस अनन्यतेत शरणता आवश्यक आहे. सद्‌गुरूस ईश्वरस्वरूपच निष्ठेने जाणले पाहिजे. "गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णो" हे तत्त्व निष्ठेने मन-बुद्धीत दृढ व्हावयास पाहिजे.

सद्‌गुरूची शरणता (१) नित्यानित्यवस्तुविवेक (२) शम-दमादिसाधनसंपदा (३) ईहामुत्रफलभोग वैराग्य आणि (४) मुमुक्षुत्व हे साधन चतुष्ट्य पूर्ण व्हावयास पाहिजे. वासना, विकार, ऐहिक व व्यावहारीक जीवनाची ओढ, भवपाशातून सुटण्याची तीव्र इच्छा इत्यादीवर प्रभुत्व आल्याशिवाय सद्‌गुरुशरण्य सिद्ध होत नाही आणि पारमार्थिक आत्मानुभव येत नाहीत. सद्‌गुरू व शिष्य दोघेही योग्यतेचे असले तरच आत्मानुभव येऊ शकेल. यास्तव यम-नियम अभ्यास आत्मसात करणे भक्तीतही अत्यावश्यक आहे, तरच सद्‌गुरुकृपेतून आत्मिक विकासास गती मिळेल. (छांदोग्य ३-१७-४, ५-१०-९ तैत्तिरीय १-९-१-२-१/३०).

धर्मग्रंथ अभ्यासात जिज्ञासा निर्माण होते पण आचरणीय भाग न साधल्याने परीक्षी ज्ञानापलीकडे साधकाची प्रगती होत नाही. जीवनाची पुनर्रचना आचरणीय साधनेतून सर्व येणाऱ्या संकटांना धीर-धैर्याने सामोरे जात साधना झाल्याशिवाय आत्मज्ञानाकडे वाटचाल होत नाही. तुकारामांचा अनुभव यात बोलका आहे. "रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग अंतर्बाह्य जग आणि मन ।" साधनेत धीराची नितांत आवश्यकता आहे. साधनेत अनेक प्रकारची विघ्ने निर्माण होतात, (आधिभौतिक, आधिदैविक, आध्यात्मिक) व त्या सर्वांवर धीराने मात करावी लागते; तरच स्वतःतील अपूर्णता दूर होत जाऊन स्वरूप साक्षात्काराकडे साधकाची वाटचाल होते. पुढे जसजशी प्रगती होईल तसतसे अज्ञान व अपूर्णता दूर सारली जाते; आणि ज्ञानमय व आनंदमय स्वरूपाची प्रचीती येते. तसेच अद्वैतानुभूति साध्यतेकडे वाटचाल सुरू होते व समसिद्धी प्राप्त होते. 'सुख, दुःख, समेकृत्वा लाभालाभो जयाजयौ' हा अनुभव सिद्ध होतो. ही अवस्था आहे. मनोमन समजण्याने हा कार्यभाग साधीत नाही तर तो एक दंभाचार ढोंग नाटक, अहंकाराचा भाग ठरतो. असा अहंकार आपण स्वतःस प्रतिष्ठित समजणाऱ्यांचे बोलण्यातून नेहमीच अनुभवतो. ही सिद्धि प्राप्त झाल्यावरच कर्म अकर्म ठरते. तो आत्मनिष्ठता व शांती अनुभवतो. यालाच शाश्वत सुख म्हणतात. सद्‌गुरू कृपादृष्टिशिवाय अशी शाश्वतानंदाची प्राप्ति असंभवनीय आहे.

सद्‌गुरू दोन प्रकारची कामे करतात. अज्ञान व अधर्म यांनी ग्रस्त झालेल्या समाजाला प्रज्ञा आणि सामर्थ्य देण्याचे ऐतिहासिक, युगप्रवर्तक कार्य सद्‌गुरू करतात. दुर्जनांचा नाश, धर्मस्थापना, धर्मसंरक्षण ही या भूमिकेतील कार्ये होत. तसेच अधिकारी शिष्याला योगदान त्याचेवर अनुग्रह करून आत्मवत करणे, जन्ममृत्यूचे पराधिनतेतून मुक्त करणे, हीही भूमिका ते पार पाडतात. या संबंधात आपणास अनेक दाखले देता येतील. जसे श्रीकृष्ण-अर्जुन, उद्धव-श्रीकृष्ण, रामदास-कल्याण स्वामी, नामदेव-जनाबाई,

गजानन महाराज-भास्कर महाराज, रामकृष्ण-विवेकानंद, जनार्दनस्वामी-एकनाथ, निवृत्ति-ज्ञानदेव आदी.

साधकाची प्रारंभिक पूर्ण तयारी झाल्याशिवाय सद्गुरू भेटी संभवत नाही. कारण अशी भेटी ईश्वर प्रेरणेतूनच लाभते. याला श्रीमद् भागवतातील परिक्षित-शुकदेवाचे सुंदर उदाहरण आहे. परिक्षिताचे वैराग्य सिद्ध झाल्यावरच प्रभुकृष्ण प्रेरणेने शुकदेवासारखे सद्गुरू लाभलेत.

साधकास परोक्षज्ञान असावे पण त्याचा उपयोग सद्गुरूचे उलट तपासणीस होऊ नये. समाजात संतांची परिक्षा घेणारे विद्वान बरेच आहेत. पण असे विद्वान आत्मसाक्षात्कारी झाल्याचे एकही उदाहरण नाही. सध्या या क्षेत्रात अंधःश्रद्धा बरीच आहे व त्यामुळे बाजारी गुरू आणि त्यांचे बाजारी चेले यांचे पीक भरपूर आहे. खऱ्या मुमुक्षुने सावध असावे. संतांजवळ कसे वागावे, कसे बोलावे हेही दुर्दैवाने बऱ्याच जणांना कळत नाही. त्यांचे पुढे सांसारिक सुखदुःखाचाच पाढा वाचला जातो, सांसारिक सुखे मागितली जातात. मुक्त होण्यापेक्षा बद्ध होणाऱ्यांची संख्या बरीच आहे. त्यांनी बायकापोरांचे सुख मागून जन्म मरणाचे चक्रात सूज्ञाने पडू नये. संत-सद्गुरू तुम्ही जे मागाल ते देतात. पण तो माग सुखदुःखकारकच आहे याची जाण असावी.

बरेच वेळा सद्गुरुसेवेचाही विपरीत अर्थ काढला जातो. त्यांची शारिरीक सेवा करणे म्हणजेच मोक्षाप्राप्तीचा उपाय समजला जातो. असे अनेक भक्त अशा सेवेत असतात पण त्यांचा उद्धार होत नाही कारण त्यांचे आचरण मोक्षप्राप्तीच्या वाटेवरून वाटचाल करणारे नसते. या उलट असे भक्त दंभी, अहंकारी, संतापी असेच होतात व सान्निध्यात राहूनही नर्मदेतील पाषाणाप्रमाणे अंतरंगात कोरडेच असतात. संतांची कृपा सर्वावरच असते पण त्यांचे त्यांचे योग्यतेप्रमाणेच हे विसरता कामा नये. संतबोधाप्रमाणेच आचरणाचा भाग साधून संतसेवा घडावी लागते, तरच त्याचा उपयोग होतो. प्रामाणिक भाव व आचरण हे महत्त्वाचे भाग आहेत.

साधकास आत्मिक विकासासाठी सद्गुणाचा आश्रय व शुद्ध आचरण यावर भर देणे अत्यावश्यक आहे. भ. गीता १३/७ मध्ये याला श्रेष्ठ स्थान दिले आहे. संपूर्ण जीवनच सद्गुरूस समर्पित व्हावयास पाहिजे. सद्गुरूच माझे सर्वस्व आहेत त्याचा अभ्यास ज्ञानेश्वरी अ. १३, ओव्या ३६८ ते ४५८ प्रमाणेच होणे आवश्यक आहे, तरच 'सद्गुरू कृपादृष्टी' लाभ संभवतो. कृपा व कृपादृष्टी प्राप्तव्याचे दृष्टीने अगदी भिन्न आहेत. गुरुगीतेत एका श्लोकांत याचे सुंदर वर्णन आहे.

> ***"ध्यानमूलं गुरोर्मूर्ति पूजामूलं गुरोः पदम् ।***
> ***मंत्रमूलं गुरोर्वाक्यं मोक्षमूलं गुरोःकृपा ॥"***

श्रीमद् भगवत गीतेचा यथार्थतेत अभ्यास करून आपणात काय त्रुटी आहेत याचे आत्मनिरिक्षण साधकाने करून त्या त्रुटी दूर करण्याचा प्रामाणिक प्रयत्न करावा. केवळ पारायणे करून हा कार्यभाग साधत नाही.

मोक्षाबद्दलही सामान्य जीवांच्या कल्पना विचित्र आहेत. मोक्ष म्हणजे स्वर्गात, कैलासात वा वैकुंठात जाणे, अंतराळात राहून कुठेतरी आनंदाचे राज्य भोगणे असे नाना गैरसमज प्रचारात आहेत. वस्तुतः मोक्ष म्हणजे आत्मस्वरूपाची प्रचिती आहे. ती याची देही याची डोळा अनुभवावयाची आहे. योग वासिष्ठात म्हटले आहे "न मोक्षो नभसः पृष्ठे न पाताले न भूतले । मोक्षोहि चेतो विमलं सम्यग्ज्ञानविबोधितम् ॥ (यो.वा. ७३-५.५) चित्ताची निर्मलता आणि सम्यग्ज्ञान हेच मोक्षाचे स्वरूप होय. ज्ञान व कर्म याची त्यासाठी आवश्यकता आहे. असे योगवासिष्ठात प्रतिपादन केले आहे. "केवलात्कर्मणो ज्ञानान्नहि मोक्षोऽभिजायते ।" (१-१-८) आणि याकरिता साधने सांगितली आहेत. संतोष, सत्संग, सुविचार, शम, समत्ववृत्तिचा अंगिकार, निष्काम, निस्पृह साक्षी भावात व्यवहार, सत्वशुद्धी इत्यादी (यो. वा - २-१६-१८-१९, ३/८-६, ५/६१-४८) शरीर, मन, बुद्धी याची शुद्धी आणि निरहंकारित्व जाणल्याशिवाय आत्मज्ञान संभवत नाही.

सध्या समाजात पुस्तकी ज्ञानाचे प्रचाराने जो तो योग, ध्यान, धारणा, समाधीवरच बोलतो. अंतःशुद्धी साधल्याशिवाय हे उपाय मोक्षसाधनेत उपयुक्त तर ठरत नाहीतच उलट त्यातून दंभाचार मात्र निर्माण होतो. तसेच ह्या साधनेत सिद्ध होण्यास सद्गुरूकृपा दृष्टीची आवश्यकता आहे. साधकातही योग्यतेची आवश्यकता पूर्व पुण्याईतून असावी लागते. येथे शैक्षणिक योग्यतेचा प्रश्न नसून अध्यात्मिक योग्यतेचा आहे. योगसाधनेचा धडा शिकविणारे शिक्षक आणि त्यांचे विद्यार्थी हे वासनेचे किडेच असतात. मी इतरांपेक्षा वेगळा आहे हे सिद्ध करण्याचाच यात हव्यास असल्याने दोघेही परमार्थास मुकतात हे सांगणे नलगे. योगवासिष्ठात अशा वासनामय भक्तांना उपदेश करू नये असा आदेश आहे. (यो.वा. २-२-२१) सद्गुरूंनी शिष्याची योग्यता पाहणे आवश्यक आहे असाही बोध यात आहे. (यो.वा. ४-३९-२६)

कथा, कीर्तन, प्रवचनात आलेल्या सर्व भाविकांना "ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैवनापरः" असा उपदेश काहीच फायद्याचा नसतो. त्यातून श्रोत्यांना भ्रामक शब्दज्ञान होण्यापलीकडे काहीच साध्य होत नाही. कथा, कीर्तन, प्रवचनादी भागातून अंधश्रद्धा निर्मूलन साधावयाचे असते. पण नुसता तत्त्वज्ञानबोध उपयुक्त ठरत नाही. यातून भ्रामक पांडित्याचीच वाढ होते व प्रगतीस रोध लागतो. ही जाण ह्या क्षेत्रात कार्यरत असणारांनी ठेवणे आवश्यक आहे, तरच सामान्यांना भक्तिमार्गास लावण्याचे महान कार्य घडेल आणि समाजात सुव्यवस्था प्रस्थापित होईल.

गुरू, ईश्वर आणि आत्मा (तत्त्वतः त्यात भेद नाही) यांना एकात्मभावात शरण जाऊन उपासना करणे हा चित्त शुद्धीचा आणि मोक्षोपाय आहे असे भागवत शास्त्र सांगते. (श्री. भा. ११-२-३७) यावर महान संत एकनाथ महाराज म्हणतात -

> ***भक्तीचे अगाध महिमान । तेथे रिघेनाभवबंधन ।***
> ***ते करावया भगवत भजन । सद्‌गुरु चरण सेवावे ॥ (ए.भा. ४७८)***
> ***ब्रह्म सर्वांचे प्रकाशक । सद्‌गुरू तयाचाही प्रकाशक ।***
> ***एवं गुरुहूनि अधिक । नाही आणि पूज्यत्वे ॥ (४९१)***
> ***या लागे गुरुते मनुष्यबुद्धि । पाहो नयेगा त्रिशुद्धि ।***
> ***ऐशिये भावार्थ बुद्धि । सहजे चित्तशुद्धि तत्शिष्या ॥ (४९२)***

सद्गुरू म्हणजे त्या निर्गुण निराकाराचे साकाररूपच. ते सगुण, निर्गुण कसेही असू शकते. हाच भाव यात आहे. जीवात्म्यास सद्गुरू स्वरूपातून ईश्वराचा बोध होतो व जीव बंधमुक्त होतो. सद्गुरु भजन / ईश्वरभजन अभेद आहे. सद्गुरूच परब्रह्म असा निष्ठावन्त भाव जागृत झाल्याशिवाय मुक्तिचा मार्ग गवसत नाही. सद्गुरू कोणास म्हणावे यावर भागवतकार म्हणतात - "तस्माद्‌गुरुं प्रपद्येतजिज्ञासुः श्रेय उत्तमम् । शाब्दे परे च निष्णातम् ब्रह्मण्युपसमाश्रयम् ॥ (श्री. भा. ११-३-२१). व्यक्तिपूजेचे

अध्यात्मात महत्त्व वाढावणाऱ्या बाजारू गुरूंचा, बुवाबाजी करणाऱ्या वैराग्यांचा नाथांनी कडक शब्दात निषेध केला आहे. (ए.भा. २७६-२८४)

जो कायावाचामने । अती कृपाळू दीनाकारणे । तोडी शिष्याची बंधने । उठवी ठाणे अहंकाराचे ।। जो शब्दज्ञाने पारंगतू । ब्रह्मानंदे सदा डुल्लतू । शिष्य प्रबोधनी समर्थू । यथोचित मनोभावे ।। (२९७-२९८) अशांनाच सद्गुरू म्हणावे बाकी सर्व दंभीढोंगीच समजावेत. श्रीभागवताचे ११ वे स्कंधातील सातवे अध्यायात यदू-अवधूत संवादामध्ये साक्षात्कारातील संदर्भात सद्गुरुची आवश्यकता स्वरूप आणि कार्य व महत्त्व याचे सविस्तर विवेचन आहे. नाथ म्हणतात, "जो जो ज्याचा घेतला गुण । तो तो म्या गुरु केला जाण । गुरुसी आले अपारपण । जग संपूर्ण गुरु दिसे ।।" (ए.भा. ३४१) अर्थात असा भाव स्वसंवेद्य अवस्थेशिवाय संभवत नाही. चोवीस गुरूंपासून काय काय बोध घेतला याचे सविस्तर वर्णन यात आहे. दत्त अवतार समजणाऱ्यांनी हे सर्व गुण आपल्यात आहेत काय याचा विचार करणे स्वहिताचे आहे. वरील सर्व गुण आपल्यात नसताना बुवाबाजी करून स्वतःची पूजा करवून घेणे म्हणजे घोर नरकाचा वाटेकरी होण्यासारखे आहे. भाविकांनी अशा भोंदू गुरूपासून सावध असावे हाच बोध भागवतात आहे. नाथ महाराज स्वानुभवात म्हणतात, "निज गुरु तो एकची जाण । इतर गुरु साधकत्वे साधन ।।" (ए.भा. ४१५). हा महत्त्वाचा बोध साधकांनी विसरू नये. अधिकारी मुमुक्षू भक्तास सद्गुरु आपणासारखे तात्काळ करतात. असा सर्व संतांचा बोध आहे. सर्वच संतमहात्मे वेगवेगळे दिसत असले, त्यांच्या क्रिया वेगवेगळ्या असल्यात तरी अंतर्यामी सर्वांच्या एकच सद्गुरूभाव असतो, त्यात भेद असूच शकत नाही. कारण परमेश्वर एकमेवएकच आहे, हे सत्य साधकाने हृदयस्थ निष्ठेने सांभाळणे आवश्यक आहे. त्याशिवाय अभेदसिद्धि प्राप्ती संभवनीय नाही.

प. पू. बाबांनी आपला वेगळा असा संप्रदाय निर्माण केला नाही. मी सर्वच संप्रदायांचा व सर्वच संप्रदाय माझे अशा आकाशवत व्यापक भावातच त्यांचे कार्य समाजात झाले. त्यांची साधनादृष्टीही या भावात व्यापकच होती. कुठलाही साधना धर्म स्विकारा पण स्विकारलेल्या मार्गातून एकनिष्ठ प्रामाणिक भाव स्थिर करून प्रवास साधा हाच त्यांचा सर्वसामान्य भाविकांना उपदेश होता. समाजात केवळ बुद्धिज्ञानातून प्रवचने देऊन समाजकार्य साध्य होत नाही, ह्या जाणिवेने अशा बुद्धीपंडितांना योग्य ते मार्गदर्शन घडावे या तत्त्वचिंतनातूनच "दिव्यामृतधारा" हा ग्रंथ निर्माण झाला. प. पू. बाबांचे मते, बुद्धिजीवी भक्त जर यथार्थतेने ज्ञानसंपन्न झाला तर तो अनेकांचा उद्धार करू शकतो. ह्या जाणिवेत त्यांनी बुद्धीवादी जीव विशेषत्वाने जवळ केले होते व त्यांचेकडून समाजातील भक्तीमार्गात निर्माण झालेली भ्रष्टता दूर सारण्याचा त्यांचे प्रकटावस्थेत अव्याहत प्रयत्न केला.

प. पू. बाबांची साधनादृष्टी आकाशावत् व्याप्त आहे. त्याचे थोडक्यात त्यांनी दिलेल्या प्रेरणेतून त्यांचेच शब्दात वर्णन करण्याचा प्रयत्न झाला. सत्य हेच की त्यांनी सांगितले आणि माझे देहातून पूर्ण करवून घेतले. त्यात 'मीत्व' भाव नाही यास्तव त्यांचे त्यांना समर्पण करून लेखणीस विराम देतो.


**दास नारायण**

द्वारा श्री. ना. के. देव

२३० हरिकृपा, सहकार नगर, खामला,

नागपूर ४४००२५ फोन २२८९८००



# श्रीबाबामहाराज प्रणीत सृष्टियोग एक – नवदर्शन


**डॉ. अ. ग. जावडेकर**

*भारतातील तत्त्वज्ञान विषयाचे पहिले डी.लिट. अखिल भारतीय तत्त्वज्ञान कॉंग्रेसचे बरेच वर्ष अध्यक्ष. श्रीबाबामहाराजांच्या वाङ्मयाचे सखोल अभ्यासक. 'दिव्यामृतधारा' ग्रंथाला विवेचक प्रस्तावना.*


## नवीन सृष्टियोगाचा दार्शनिक आधार

'दिव्यामृतधारा' प्रथम खंड 'वर्षा उद्‌गीथ' मध्ये १६६ व्या पृष्ठावर श्रीबाबामहाराज लिहितात, 'आता येथे एका स्वतंत्र विषयाचे पान आम्ही उघडीत आहोत. परमार्थक्षेत्रात विशेष परिचित नसलेला हा विचार आम्ही अनुभवाने दाखल करीत आहोत. तो विचार म्हणजे 'सृष्टियोग' होय.' पिंड-ब्रह्मांडाचे ऐक्य किंवा अद्वैत सृष्टियोगाचा आधार आहे.

हा सृष्टियोगाचा विचार नीटपणे समजून घ्यावयाचा असेल, तर तो ज्या तीन आधारांवर उभा आहे, ते आधी समजून घेणे अगत्याचे आहे. ज्यांचा उपयोग श्रीबाबांनी त्या सृष्टियोगाचे विशदीकरण करताना केला आहे, हे तीन आधार म्हणजे सृष्टीचे स्वरूप काय आहे, जीवाचे किंवा आत्म्याचे स्वरूप काय आहे, आणि मूळ सत्तेचे स्वरूप काय आहे हे होत.

वरील तीन प्रश्न हे तत्त्वज्ञानाचे मुख्य मूळ प्रश्न आहेत. त्यांच्या सम्यग् अवधारणेवरच बाबांना सांगावयाचा तो सृष्टियोग सिद्ध होऊ शकतो. भारतीय दार्शनिकांनी त्या तीन प्रश्नांविषयी जो विचार केला आहे, तो पाहणे अनिवार्य आहे. त्यातील कोणता विचार ग्राह्य व कोणता त्याज्य ते समजणे आवश्यक आहे.

## न्याय-वैशेषिकांचा सृष्टिविषयक विचार

एक विचार न्याय-वैशेषिकांचा आहे. सृष्टी ही नऊ मूलद्रव्यांची घडवलेली आहे. ती मूलद्रव्ये म्हणजे पाच महाभूते, दिक्, काल, मन आणि आत्मा होत. यातील आकाश या महाभूताशिवाय बाकीची जी चार महाभूते, त्यांचे चार प्रकारचे निरनिराळे गुण असणारे अणू-परमाणू आहेत. ते नित्य आहेत. त्यांची उत्पत्ती किंवा नाश होऊ शकत नाही. मन हे स्वतंत्र द्रव्य आहे. ते अणुरूप व नित्य आहे. ते प्रत्येक शरीरात निराळे आहे. प्रत्येक जीवात्म्यामध्ये त्याचे त्याचे असे मन निराळे असते. ते इतर इन्द्रियांप्रमाणे जड असून, आत्म्याच्या ठिकाणी ज्ञान उत्पन्न करण्याचे एक साधन आहे. आत्मा हेही एक द्रव्य आहे. आत्मे अनन्त आहेत. प्रत्येक आत्मा विभू म्हणजे व्यापक आहे. त्याचे ठिकाणी मनाच्या संयोगाने ज्ञान उत्पन्न होण्याची पात्रता आहे. एवढ्याच कारणाने तो इतर अचेतन सृष्टीपेक्षा निराळा आहे. आत्म्याचे ठिकाणी आगन्तुकपणे ज्ञान हा अनित्य गुण उत्पन्न होतो. त्याचप्रमाणे इच्छा, सुखदुःख, कर्तृत्व, भोक्तृत्व तात्पुरते आत्म्याच्या ठिकाणी उत्पन्न होते. शरीराशी संबंध सुटल्यावर आत्म्याच्या ठिकाणी ज्ञानासकट कोणताच गुण नसतो. मोक्षातही अशीच ज्ञानहीन, जाणीवहीन स्थिती आत्म्याची असते. सुखही नाही व दुःखही नाही.

परमात्मा हा आत्म्याचाच एक प्रकार आहे, तो एकच आहे. तो नित्य आहे. तो सृष्टी उत्पन्न करतो. म्हणजे तो आधीपासूनच उपलब्ध असलेली जी नित्य द्रव्ये आहेत, त्यांच्यामध्ये तो जडणघडण करतो. तो सृष्टीचे केवळ निमित्त कारण आहे, उपादान कारण नाही. म्हणजे तो त्या कारणांवर अवलंबून असतो. अर्थातच तो सर्वशक्तिमान नाही. शिवाय सृष्टी घडविताना आत्म्याच्या ठिकाणी जे त्यांचे अदृष्टकर्म आहे. त्याला अनुरूप असे भोग त्यांना मिळतील अशी तो योजना करतो. म्हणजे यथानुरूप कर्मफलदाता मात्र तो असल्याने, त्याची योजकता ही स्वतंत्र निर्मिती नसून अदृष्टानुसारी असते. असा ईश्वर हा मर्यादित स्वरूपाचाच असणार. तरीही न्यायवैशेषिक ईश्वर हा सर्वज्ञ, सर्वशक्तिमान समजतात. ईश्वराच्या अस्तित्वाचे एवढेच महत्त्व आहे की, तो एकच चेतनगुण असलेला आहे, बाकी आत्म्यासकट सर्व सृष्टी अचेतनच आहे. म्हणून अचेतनाला प्रेरणा देणारे तत्त्व म्हणून ईश्वराची गरज आहे इतकेच. चार्वाक, जैन आणि बौद्धांच्या निरीश्वरवादाला उत्तर देण्यासाठी म्हणूनच, न्यायवैशेषिक ईश्वराच्या अस्तित्वाचे समर्थन करतात. त्यात गौतम आणि कणाद या अनुक्रमे न्याय आणि वैशेषिक सूत्रकारांपेक्षा उदयनाचार्य यांनीच त्यांच्या 'कुसुमांजलि' या ग्रंथात हिरीरीने ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करणारी प्रमाणे दिली आहेत. म्हणून ते प्रसिद्ध आहेत.

परंतु एकूण विचार करता सृष्टियोगाला अनुकूल असे विचार न्याय-वैशेषिक दर्शनामध्ये नाहीतच. 'यत् पिण्डे तत् ब्रह्माण्डे' असा पिण्डब्रह्माण्डाच्या ऐक्याचा विचार जेथे नाही, तेथे सृष्टियोग अशक्यच आहे. न्याय-वैशेषिक हे बहुतत्त्ववादी, परमाणुवादी मूळ पदार्थांची स्वतंत्र नित्य सत्ता मानणारे व अनेकानेक आत्मे व तेही मूळ स्वरूपात अचेतन स्वरूपाचे मानणारे आहेत. बाबामहाराज म्हणतात त्याप्रमाणे 'पिण्ड व ब्रह्माण्ड या दोहोंच्या ठायी आत्मशक्तीचा अवस्थाभाव समत्वानेच आहे' हा विचार सृष्टियोग साधणारा आहे. त्याचा संपूर्ण अभावच या न्यायवैशेषिक दर्शनामध्ये आहे.

## सांख्य-योगदर्शनांचा सृष्टिविचार

१) सांख्य : आता सांख्य-योग दर्शनामध्ये दार्शनिक तीन प्रमुख समस्यांचे काय उत्तर आहे ते पाहू. कारण सृष्टिविचारांसंबंधी त्यांचे योगदान महत्त्वाचे समजतात. कपिलमुनींनी सांख्य दर्शनाची रचना केली म्हणतात. पण त्यांची सांख्य-सूत्रे उपलब्ध नाहीत. ईश्वरकृष्ण यांनी रचिलेली 'सांख्यकारिका' हा सत्तर कारिकांचा एकमेव जुन्यात जुना ग्रंथ उपलब्ध आहे तेवढाच. बाकीचे सांख्य विचार अतिप्राचीन व त्यामानाने अर्वाचीन जे आहेत, त्यामध्ये ईश्वराचे अस्तित्व मान्य आहे. कारिकेमध्ये मात्र ईश्वर मान्य नाही. असेच सर्वप्रचलित मत आहे. म्हणून सांख्यांचे दोन भाग प्रसिद्ध आहेत. एक सेश्वर सांख्य आणि दुसरे निरीश्वर सांख्य.

सांख्यकारिका निरीश्वरवादी म्हणून प्रसिद्ध आहे. (प्रस्तुत लेखकाचे मत मात्र कारिका देखील ईश्वरवादीच केवल नव्हे, पण ती प्रच्छन्नपणे अद्वैतमताचे प्रतिपादन करणारी आहे, असे आहे व ते इतरत्र प्रकाशित केले आहे.)

सेश्वर सांख्य म्हणून योगदर्शनालाही मान्यता आहे. कारण योगदर्शनात ईश्वर स्पष्टपणे उल्लेखिला आहे. येथे प्रथम निरीश्वर सांख्यांचा विचार, सृ ष्टी आणि आत्मा किंवा जीव यांचे संबंधात काय आहे ते पाहू.

कपिलांचे सांख्य स्पष्टपणे द्वैती आहे. प्रकृती आणि पुरुष ही मूळ दोन स्वतंत्र पण परस्पर भिन्न स्वरूपाची तत्त्वे आहेत असे ते मानतात. प्रकृती ही अचेतन अनादि अनंत सर्वव्यापी मूलतः अक्रिय असे पण क्रियाशील होऊ शकणारे सगुण तत्त्व आहे. याचप्रमाणे पुरुष किंवा आत्मा हे चेतना असलेले नित्य तत्त्व आहे. ते अगुण आणि अक्रियच राहणारे अगुण तत्त्व आहे. प्रकृती एकमेव आहे पण पुरुष मात्र अनन्त संख्येने आहेत. ते सर्व विभू आहेत.

प्रकृती पुरुष यांच्या सान्निध्याने सृष्टीची उत्पत्ती होते. सचेतन पुरुषाच्या सान्निध्याने अचेतन प्रकृती जणू काही अनुप्राणित होते, आणि तिच्यामधून महत्, अहंकार आणि पंचतन्मात्रा निर्माण होतात. ह्याच सात 'प्रकृतिविकृती' म्हणून समजल्या जातात. यांच्यापासून पुन्हा सोळा केवळ विकृती उत्पन्न होतात. त्या विकृती म्हणजे पंचमहाभूते, पंचज्ञानेंद्रिये व पंचकर्मेन्द्रिये आणि मन होत. हीच सर्व सृष्टी होय. म्हणजे एकूण पंचवीस तत्त्वे या सृष्टीमध्ये विराजमान आहेत. प्रकृती व पुरुष ही दोन मूलतत्त्वे. त्यांच्या मीलनातून सात प्रकृती आणि विकृती आणि नंतर सोळा नुसत्या विकृती उत्पन्न होतात. प्रकृती एकटी किंवा पुरुष एकटा सृष्टी उत्पन्न करूच शकत नाही. प्रकृती प्रसवशील आहे, ती सक्रिय होऊ शकते पण तिला पुरुषाची चोदना लागते. मुळात ती त्रिगुणात्मिका असली तरी ते गुण साम्यावस्थेमध्ये राहून अंतर्गतरीत्या सक्रिय असतात. पुरुषाच्या सान्निध्याने ही प्रकृतीची साम्यावस्था ढळून ती वैषम्यमय सृष्टी प्रसवते. पुरुषाची मूलभूत अगुणता व निष्क्रियता मात्र ढळत नाही. तरीही प्रकृतीच्या माध्यमातून तोही या बाबतीत ढळल्यासारखा वागतो व वैविध्य सृष्टीचा भोक्ता बनतो. प्रकृतीपासून तो निराळा आहे हा त्याचा मूळचा विवेक त्याला राहात नाही व तो मूलतः मुक्त स्वतंत्र असूनही, तो स्वतःला अविवेकाने बंधनात पाडून घेतो. प्रकृती त्याला भोग भोगवते. 'अंबुला जोडे आंबुळी हा खाये' अशी त्याची स्थिती होते. पुन्हा त्याला आपण निराळे असल्याचे भान होईपर्यंत तो खोटाच अडकलेला राहतो. भानावर यावयासही प्रकृती त्याला सहाय्य करते व तो मूळ स्वतंत्र किंवा मुक्त स्थितीला प्राप्त होतो. प्रकृतीमुळे तो आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक दुःख बद्धस्थितीत भोगत असतो. त्याच्या स्वतःच्या केवल स्थितीचे विवेकज्ञान होताक्षणीच तो दुःखमुक्त होतो. पण त्याचे स्वरूपी आनंद नसल्याने तो मुक्तस्थितीमध्ये आनंद अनुभवीत नाही. या प्रमाणे न्याय-वैशेषिकांच्या अचेतन मुक्तीपेक्षा (दगडासारख्या जणू) दुःखराहित्याचा अनुभव तो त्याच्या जाणतेपणामुळे घेऊ शकतो, एवढ्या अर्थाने ही स्थिती अधिक बरी म्हणावयाची.

या सांख्य दर्शनात प्रकृती व पुरुष (किंवा आत्मा) यांचे द्वैत कधी भंग पावत नाही. इतकेच काय, हे दर्शन चेतन पुरुषांचे बहुत्व स्वीकारते. त्यांच्यामध्ये समरसता कधीच निर्माण होऊ शकणार नाही. तेव्हा श्रीबाबामहाराजांना अभिप्रेत असलेले सृष्टियोगातील साहजिक सामरस्य येथे परस्पर जीवांत किंवा आत्म्यांमध्ये नाही, तसेच प्रकृतीकृत सृष्टीशीही पुरुषांचे तादात्म्य होऊ शकत नाही. विवेक म्हणजे वेगळेपणा हेच महामूल्य असल्याने, योगापेक्षा वियोगातच येथे साफल्य समजले जाते. तथापि सांख्यांच्या सृष्टीसंबंधीच्या प्रकृतीच्या विकासवादाची व त्रैगुण्यवादाची विचारसरणी वेदान्ताने स्वीकृत केली आहे. काही अंशापर्यंत सांख्यदर्शन हे वेदान्ताचे महत्त्वाचे अंग बनून गेले आहे, हे सांख्याचे महत्त्व वाखाणण्याजोगे आहे.

२) **योग** : आता सेश्वर सांख्य म्हणून गणले गेलेल्या योगदर्शनाचा विचार पाहू. प्रथमतःच हे लक्षात घ्यावे की, सांख्यदर्शनाचे वरील सर्व विचार योगामध्ये पतंजलीने सूत्रात स्वीकारलेच आहेत. सत्ताशास्त्राच्या दृष्टीने योगही द्वैती व पुरुष बहुत्ववादी आहेच. मात्र या दर्शनाची तात्त्विक मानसशास्त्राला आणि आध्यात्मिक साधनेला अष्टांगयोगाची अतिमहत्त्वाची देण आहे. ती देण इतकी महत्त्वाची आहे की, जी वेदासंबंधी आस्तिक दर्शने सांख्य-योगप्रणीत सत्ताशास्त्र स्वीकारीत नाहीत, तीसुद्धा योग-प्रणीत साधना विचार-आचारामध्ये स्वीकारतात. त्याचप्रमाणे जैन व बौद्धांसारखी वेदान्त व ईश्वराला न मानणारी अशी दुहेरी नास्तिक दर्शनेही योगप्रक्रियेचा साधनासाठी उपयोग करतात. यावरून योगाचे महत्त्व सिद्ध होते, इतकेच काय, निव्वळ जडवादी सुद्धा शरीरस्वास्थ्य व मनःशान्तीसाठी योगाचा स्वीकार करतात.

योगाचा सांख्यांपेक्षा विशेष हाच की, ते ईश्वराचे अस्तित्व स्वीकारतात. हा ईश्वर म्हणजे असंख्य पुरुषांपैकीच एक पुरुषविशेष. त्याचे वैशिष्ट्य हे की, सामान्य पुरुषाप्रमाणे त्याच्या ठिकाणी क्लेश किंवा दुःख नसते. 'क्लेशकर्मविपाकाशयैः अपरागृष्टः पुरुषविशेषः ईश्वरः ।' असे योगसूत्र आहे. अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश असे क्लेश आहेत असे एक सूत्र सांगते. ईश्वर हा आद्यगुरू किंवा गुरूंचाही गुरू आहे. 'एष पूर्वेषामपि गुरुः कालेन अनवच्छेदात् ।' कर्मविपाकाच्या नियमाच्या आधीन तो इतर पुरुषांप्रमाणे नसतो. तो कोणत्याही कर्माची प्रेरणी करीत नाही. ईश्वराचे ठिकाणी सर्वज्ञत्व आहे. 'तत्र निरतिशयं सर्वज्ञत्वबीजम् ।' त्याचे वाचक नाम प्रणव म्हणजे ॐकार आहे. 'तज्जपः तदर्थभावनम् ।' याप्रमाणे अर्थासकट प्रणवाचा जप करण्यासही महत्त्व दिले आहे.

ध्यान करण्यासाठी ईश्वर हा एक चांगला विषय आहे. पांच नियमांपैकी ईश्वर प्रणिधान हा एक नियम सांगितला आहे. परंतु 'ईश्वरप्रणिधानाद् वा ।' या सूत्रावरून धारणा ध्यान करण्यासाठी कोणताही विषय चालतो. ईश्वरच पाहिजे असे नाही. याप्रमाणे ईश्वराचे स्थान गौणच आहे. अनिवार्य नाही. शिवाय तो सृष्टिकर्ता आहे, किंवा तिची धारणा करणारा इत्यादी आहे असेही म्हटले नाही. तेव्हा सांख्याने न मानलेला ईश्वर योगाने मानल्याने खरोखरी काही मोठ्या मोलाची भर घातली असे होत नाही. ईश्वरामुळे प्रकृतीमध्ये सृष्टी उत्पन्न करण्याची प्रेरणा होते.

मात्र योगाचे जे अष्टांग आहे ते महत्त्वाचे आहे. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी. या यंत्रणेद्वारा एका बाजूला माकड घालावे व दुसऱ्या बाजूला मुक्त आत्मा किंवा ईश्वर काढावा, अशी ही पद्धतशीर योजना आहे. चित्तवृत्तींचा निरोध ज्यामध्ये होतो तो योग अशी योगाची व्याख्या आहे. आणि ही वृत्तिनिरोधाची स्थिती म्हणजे आत्म्याच्या मूळ स्वरूपाला प्राप्त करणे होय. चित्ताचे इतर विषयांशी सदैव सारूप्य पावण्यामुळे सर्व समस्या उत्पन्न होतात. त्या

मिटवणे व चित्ताचे समत्व स्थापन करणे हेच योगाचे ध्येय आहे. हीच आत्म्याची प्रकृतीपासून सुटका किंवा मुक्तावस्था होय. अष्टांगयोग साधत असताना योग्याला अनेक आश्चर्यकारक सिद्धी प्राप्त होतात. हेच योगाचे सामर्थ्य आहे व त्यायोगे योग्याला अशी अपूर्व प्रज्ञा प्राप्त होते की, ज्यामुळे सर्व विद्यांची द्वारे त्याला आपसूक उघडी होतात. योग्याची प्रज्ञा ऋतंभरा होते. म्हणजे सत्याने पूर्ण भरली जाते. कोणतेही बाह्य प्रयोग सृष्टीमध्ये न करता, बसल्याठिकाणी सर्वज्ञता येणे ही काही साधीसुधी गोष्ट नाही. पूर्वीच्या ऋषिमुनींनी जे ज्ञान प्राप्त करून पुढील पिढ्यांसाठी जपून ठेवले, ते त्यांचे आपल्यावर अनंत उपकार आहेत. असे असूनही सृष्टियोग संपन्न करण्यासाठी आत्मा, परमात्मा आणि सृष्टी यांच्यामध्ये जी एकता अनुभवावयास यायला पाहिजे, ती या योगाद्वारे प्राप्त होत नाही. एक आत्मा आपले उच्च पद प्राप्त करूनही इतर आत्म्यांपेक्षा अलिप्तच राहतो. ईश्वर हाही आत्म्यांपैकीच एक असून इतरांपेक्षा त्याचे भिन्नत्व कायम राहात असल्याने तेथेही तादात्म्य नाही. शिवाय सर्व सृष्टीपासून-प्रकृतीपासून तो आपल्यास सृष्टियोग असंभाव्य होतो. तेथे तर योग म्हणजे वियोगस्थिती आहे, आणि हा वियोग ईश्वरापासूनही आहे, कारण तो ईश्वर एक आदर्श पुरुष असूनही निराळेच तत्त्व आहे.

## पूर्वमीमांसादर्शनाचा विचार

जैमिनींच्या मीमांसादर्शनाने सत्ताशास्त्रीय फारशी चिकित्सा केलेली नाही. सृष्टी म्हणजे सर्जन झालेली, उत्पन्न झालेली अशी ते मानीतच नाहीत. सृष्टी किंवा जगत् हे नित्य आहे, ते कोणी उत्पन्न केलेले नाही व त्याचा विनाशही कधी होणार नाही असे ते मानतात. चार भूतांचे नित्य परमाणू ते मानतात. अनन्त आत्मेही ते मानतात. आणि न्यायवैशेषिकांप्रमाणेच मनाच्या संयोगाने आगंतुकपणे आत्म्याच्या ठिकाणी ज्ञान उत्पन्न होते असे मीमांसक मानतात. ते जगत्कर्ता ईश्वर मानीत नसले तरी इंद्र-वरुणादि अनेक देवतांचे मंत्ररूप अस्तित्व ते स्वीकारतात. वेदांवर त्यांची आत्यंतिक निष्ठा आहे व वेदांप्रमाणे विधिनिषेध मानून जीवाने त्याप्रमाणे आजीवन वर्तन करणे, यज्ञ करणे यावर त्यांचा भर आहे. कर्मासाठी कर्म किंवा कर्तव्यासाठी कर्तव्य करण्यावर त्यांचा भर आहे. ते निष्काम कर्मकाण्डाचे प्रतिपादन करतात. कर्मामध्ये स्वयंभू अशी शक्ती आहे की ते बिनचूक केल्याने त्यापासून आपोआप फल निष्पन्न होते. कर्मफलदात्या अशा कोणा ईश्वररूपी अध्यक्षाची आवश्यकता त्यांना वाटत नाही. कर्मामधील ही शक्ती अदृष्ट आहे. त्या शक्तीस ते अपूर्व म्हणतात व योग्य वेळी कर्म स्वयं फलदायी होते. 'स्वर्गकामो यजेत ।' स्वर्ग हे अंतिम श्रेय आहे व ते मिळविण्यासाठी यज्ञ करावा अशी त्यांची शिकवण आहे. नंतर नंतरचे मीमांसक निःश्रेयस् म्हणून मोक्षाचाही स्वीकार करतात. ब्रह्माचाही नित्यपदार्थ म्हणून स्वीकार करतात. वेदांना ते अपौरुषेय समजतात. त्या संबंधीची स्वतःप्रामाण्यवादी ज्ञानमीमांसा वाखाणण्याजोगी आहे. ग्रंथाचे तात्पर्य काढण्याची त्यांची रीती सर्वमान्य आहे.

मीमांसेला पूर्वमीमांसा आणि वेदान्ताला उत्तर मीमांसा म्हणतात. त्याचा अर्थ कालवाचक पौर्वापर्याचा नसून तार्किक समन्वयाचा आहे. म्हणजे वेदान्ताने जरी वेदांतील ज्ञानकाण्डाचा विचार करून मोक्षशास्त्र सांगण्यासाठी ब्रह्मजिज्ञासा केली आहे, तरी या जगात जीवाने कसे वागावे याची धर्मशास्त्राची रचना मीमांसकांनी केली आहे. शंकराचार्यासारखे अद्वैती जरी झाले तरी त्यांना या जगात जीवाला कर्तव्ये पार पाडावयाची असतात व त्यासाठी कुमारिलभट्टांची शिकवण स्वीकारावी लागते. म्हणूनच धर्माचे दोन भाग पडतात - ऐहिक अभ्युदय आणि पारमार्थिक निःश्रेयस्, किंवा प्रवृत्ती आणि निवृत्ती. या दोन्ही गोष्टींचा समन्वय जीवनात अनिवार्य आहे.

पूर्वमीमांसेचे महत्त्व स्वीकारूनही जीवनाचे परिपूर्ण तत्त्वज्ञान त्यात मिळत नाही. अत्यंत सनातनी अशी त्यांची वैदिकनिष्ठा असून देखील ते यथार्थवादी, बहुतत्त्ववादी व काहीसे जडवादीही आहेत. कारण ईश्वराला तर ते मानीत नाहीतच पण आत्मतत्त्वही न्यायवैशेषिकांप्रमाणे ज्ञानविरहितच असते. या असल्या दर्शनाच्या स्वीकृतीने सृष्टियोगाची अनुभूती कदापि येणार नाही. जोपर्यंत जीव, जगत् आणि ईश्वर किंवा ब्रह्म यांच्यामध्ये सामरस्य होण्याची शक्यता नाही, तोपर्यंत पिण्ड-ब्रह्माण्डाचे ऐक्य साधणार नाही. तसा प्रयत्न वेदान्तदर्शनांनी इतर दर्शनांपेक्षा विशेष केला आहे. ते यापुढे पाहू.

## वेदान्ताचे निरनिराळे आचार्य

वेदान्तामध्ये अनेक आचार्य प्रसिद्ध आहेत. त्यातील सर्वांच्या आधीचे शंकराचार्य हे केवलाद्वैत मताचे समर्थक आहेत. त्यानंतरच्या आचार्यांनी शंकराचार्यांचे मत न स्वीकारता आपापली अद्वैते मांडली आहेत. रामानुजाचार्य हे विशिष्टाद्वैती, वल्लभाचार्य हे शुद्धाद्वैती, मध्वाचार्य हे स्वतंत्राद्वैती व निम्बार्काचार्य हे द्वैताद्वैती मताचे समर्थक आहेत. वेदान्तविरहित इतर दर्शनांचा जो वर विचार केला, त्यात कोणीही अद्वैतवादी नाहीत म्हणून त्यांच्या विचारसरणीप्रमाणे पिंड-ब्रह्मांड-ऐक्य कदापि साधणे शक्य होणार नाही. म्हणून ते नेहमीच सृष्टियोगाच्या सिद्धीपासून दूर राहणार. परंतु उपरिनिर्दिष्ट आचार्य हे कोणत्या ना कोणत्या प्रकारे अद्वैताचे समर्थन करीत असल्याने, ते सृष्टियोगाच्या कल्पनेच्या कितपत जवळ येऊ शकतात, म्हणून त्यांचा विचार पहाणे अगत्याचे ठरते. तरीही यापुढील विवरणाने असे दृष्टोपत्तीस येईल की, शंकराचार्यांच्या नंतरच्या आचार्यांचे विचारही बाबामहाराजप्रणीत सृष्टियोगाच्या जवळपास येऊ शकत नाहीत. त्यांच्या अद्वैतप्रकारात असे काही वैगुण्य राहाते की, यथार्थाने ते अद्वैतवादी ठरतच नाहीत. ते नाममात्र अद्वैती असून द्वैतवादी विचारसरणीच त्यांच्यामध्ये ठासून भरल्याचे दिसून येते. द्वैतात्मक विचारसरणी सृष्टियोगाची साधक नसून मारक होते. ह्या वैष्णवाचार्यांची प्रत्येकाची विचारसरणी फार खोलवर जाऊन पहाण्याची तितकीशी आवश्यकता नाही. त्यांचे मुख्य सिद्धान्त समजले म्हणजे पुरे. हे सर्व आचार्य प्रखर ईश्वरवादी आहेत हा सर्वांत महत्त्वाचा भाग. याचा अर्थ असा की ते सर्व सगुण ब्रह्म हेच अंतिमतत्त्व मानतात व तेच त्यांच्या मते ईश्वरतत्त्व-विष्णू, नारायण किंवा श्रीकृष्ण-परब्रह्म आहे. शंकराचार्य म्हणतात त्याप्रमाणे केवळ निर्गुण ब्रह्म हे परब्रह्म नव्हे. ईश्वर हा अनन्त कल्याणकारी गुणांचे अधिष्ठान आहे. त्याच्यामध्ये सामान्य प्राकृतिक वा लौकिक गुण नाहीत, कोणताही दोष नाही, या अर्थी ईश्वर हा निर्गुण आहे. त्याच्यासारखा तोच आहे, आणि त्याच्याहून निराळे असे दुसरे कोणतेच श्रेष्ठ तत्त्व नाही, या अर्थी ते स्वतःला अद्वैती समजतात.

प्रथम रामानुजाचार्यांनी शंकराचार्यांच्या मायावादाचे खंडन केले. मायेची सात निरनिराळ्या कारणास्तव उपपत्ती लागत नाही हे त्यांनी जोरदारपणे मांडले आहे. त्याचा मुख्य उद्देश शंकराचार्यप्रणीत जगाचे मिथ्यत्व त्यांना पसंत नाही. तर त्याच मायावादाचे खंडन इतर आचार्यांनीही उचलून धरले

आहे. त्या सर्व आचार्यांप्रमाणे जगत् किंवा सृष्टी ही यथार्थपणे आपल्या अनुभवास येते तशी सत्य आहे. एवढेच नव्हे तर जीवही अनन्त असून तेही खरेच आहेत व नित्य आहेत. ते ईश्वरापेक्षा निराळे आहेत. शंकराचार्यांनी जीव हा ब्रह्मच आहे असे म्हटलेले आहे ते इतर आचार्यांना मुळीच स्वीकार्य नाही. जीव हा ईश्वराचा भक्त असून अत्यंत दीन आहे. तो ईश्वराचे दास्य करण्यात स्वतःला धन्य समजतो. ईश्वरावर तो सर्वस्वी अवलंबून असतो. ईश्वर हा त्याच्या मानाने केवढा तरी महान्. त्याचे माहात्म्य जाणण्यातच त्याची अनन्य पराभक्ती जीवाला करता येते. तो सर्वस्वी त्याला आत्मसमर्पण करतो, शरणागती पत्करतो. यालाच रामानुजाचार्य 'प्रपत्ति भक्ती' म्हणतात. वल्लभाचार्य 'पुष्टि भक्ती' म्हणतात. ती श्रेष्ठ भक्ती ईश्वराच्या कृपेमुळेच भक्ताला प्राप्त होते. या भक्तीनेच भक्ताचे पोषण होते. शंकराचार्यांप्रमाणे जीवानेच शिव होणे, ईश्वररूप होणे किंवा ब्रह्मरूप होण्याची सायुज्यमुक्ती प्राप्त करणे हे ईश्वराचे ईश्वरतत्त्वच न मानण्यासारखे आहे. हा धर्म नसून अधर्म आहे, पाखंड आहे. भक्ती तर नाहीच नाही, असे त्यांचे मत आहे.

ईश्वर आणि जगत्, ईश्वर आणि जीव हा भेद राहिलाच पाहिजे. नव्हे असा भेदच खरा. मध्वाचार्य या भेदाशिवाय आणखी तीन भेद खरे मानतात. जीव आणि जगत् यामधील भेद, जगतातील प्रत्येक वस्तूंमध्ये भेद, जीवाजीवामध्ये भेद. हे सर्व अंतिम आणि खरे भेद आहेत. ईश्वर आणि जीव यामध्ये अभेद समजणे म्हणजे पापाचेच धनी होणे आहे. स्पष्ट बोलावयाचे म्हणजे ईश्वर नाकारणेच होय. असे इतर आचार्यांचे मत आहे. हे सर्व आचार्य शंकराचार्य हे निर्गुणब्रह्मवादी, म्हणून सगुणब्रह्म म्हणजेच ईश्वर नाकारणारे, निरीश्वरवादी आहेत असे समजतात. शंकराचार्यांनीच ईश्वर म्हणजे माया-विशिष्ट चैतन्य म्हटले आहे. अर्थात् मायिक ईश्वर हा खोटाच ईश्वर झाला. त्यामुळे शंकराचार्यांचा ज्ञानयोग हे कोरडे, नीरस, शुष्क ब्रह्मज्ञान आहे व भक्तीला गौण किंवा मुख्य, साधनरूप किंवा साध्यरूप, अपरा किंवा परा-त्यांच्या दर्शनात स्थानच नाही. जो जीव स्वतःलाच ब्रह्म मानतो, ईश्वराला मानीतच नाही तो भक्ती म्हणजे काय ते मुळीच जाणू शकत नाही. खोट्या ईश्वराची मनापासून खरी भक्ती अशक्य होय असे त्यांचे मत आहे.

वल्लभाचार्य जीवाजीवांमध्ये तरतमभाव मानतात. मायारहित ब्रह्म किंवा ईश्वर असून, त्याच्यामध्ये विकृती न येता खरे जगत् निर्माण होते. ईश्वराचे ठिकाणी सत् चित् आनंद हे तीनही धर्म असतात, जीवाच्या ठिकाणी आनंद तिरोभूत होतो, पण चेतनत्व आविर्भूत असते. सृष्टी किंवा जगताच्या ठिकाणी फक्त सत् आविर्भूत असते. व चित् आणि आनंद तिरोभूत होतात. खरे तर हा आडवळणाने स्वीकारलेला मायावादच आहे. कारण मायेच्या दोन शक्ती शांकरतत्त्वज्ञानात सांगितल्या आहेत-आवरण आणि विक्षेप. आवरण म्हणजे तिरोभावच होय, आणि विक्षेप म्हणजे आविर्भाव होय.

निंबार्काचार्य शंकराचार्यांचे अद्वैत किंवा अभेदतत्त्व हे खरे आहे म्हणतात. पण त्याचबरोबर इतर आचार्यांनी स्वीकारलेले भेदतत्त्वही तितकेच खरे आहे असे समजतात. प्रसंगोपात्त, किंवा विवक्षित दृष्टिकोणातून भेद व अभेद या दोन्हीला स्थान आहे. ब्रह्माचा जीव हा अंश आहे म्हणून त्या दोघांमध्ये भेद खराच आहे, परंतु तो ब्रह्माचाच अंश असल्याने त्या दोघांमध्ये अभेदही मानलाच पाहिजे, असे निंबार्काचार्य म्हणतात.

त्यांच्या मते ईश्वर जीव आणि जगत् हे तीनही आपापल्यापरी खरे आहेत. फक्त ईश्वर हे सर्वश्रेष्ठ, स्वतंत्र तत्त्व असून जीव आणि जगत्सृष्टी त्याच्यावर सर्वस्वी अवलंबून म्हणून परतंत्र आहे. हे तिन्ही तत्त्वांचे खरे पण जीवास मोक्ष मिळाल्यानंतरही बाधित होत नाही. तरीही हे इतर आचार्य एकेश्वरवादी आहेत एवढ्याच कारणास्तव स्वतःस कोणत्या ना कोणत्या अर्थाने अद्वैती म्हणवितात. लक्षात हेच घ्यावयास पाहिजे की, शंकराचार्य हे निरपेक्ष, निर्गुण ब्रह्मवादी आहेत. ते अशा ब्रह्मालाच एकमेव अद्वितीय मानतात व जगत् आणि जीव ही ब्रह्मापेक्षा मुळीच निराळी तत्त्वे नाहीत म्हणून ते केवल अद्वैतवादी आहेत.

शंकराचार्यांचा मायावाद ही त्यांची मुख्य शिकवण नाही. परमार्थतः ब्रह्माशिवाय काहीही नाही हा त्यांचा आग्रह आहे. परंतु हा परमार्थ गळी उतरत नाही, म्हणून सामान्यांसाठी जगताच्या आणि अनेक जीवांच्या आपल्या व्यवहारातील अनुभवांचे स्पष्टीकरण देण्यासाठी, मायावादाची किंवा सार्वत्रिक अज्ञान किंवा अविद्येच्या अनुभवाची मांडणी त्यांनी केली आहे. त्यातून त्यांना हेच दाखवावयाचे आहे की, केवळ एका ब्रह्माचीच सत्ता असल्यामुळे आपल्या प्रत्यक्ष अनुभवामध्ये येणाऱ्या बहुत्वाची, वैविध्याची अंतिम सत्ता असणे शक्य नाही. ते कोणत्या ना कोणत्या अर्थाने खोटे असणारच. आपण स्वतःला जर खरे मानत असू तर ब्रह्माचीच एकमेव सत्ता असल्या कारणाने आपणही ब्रह्मच असणार, पण अंगभूत अज्ञानामुळे स्वतःच्या ब्रह्मत्वाचा अनुभव आपणांस येत नाही. ह्या अज्ञानाचे किंवा मायेचे निराकरण झाल्याशिवाय ब्रह्माचे ज्ञान होणार नाही. तसे होणे यासच ज्ञानयोग म्हणतात. अर्थात् हे पुस्तकी किंवा शाब्दिक किंवा केवळ बौद्धिक ज्ञान नसून, ब्रह्माची साक्षात् अपरोक्षानुभूती होणे होय.

## शांकर-अद्वैतातील ईश्वराचे माहात्म्य

शंकराचार्यांच्या मते मनुष्यास जे ब्रह्माचे ज्ञान होते, ते मानवाच्या मर्यादित शक्तीप्रमाणे होते. मानवामधील श्रेष्ठ ज्ञात्याकडून जरी ब्रह्माचे ज्ञान झाले तरी ते मानवसापेक्षच होय. हे ब्रह्माचे सापेक्ष ज्ञान म्हणजे सगुण ब्रह्माचे ज्ञान. मानवाच्या भावनिक उपासना वृत्तीस जोपासणारे हे सगुण ब्रह्म म्हणजे ईश्वर होय. ईश्वरनिष्ठांनी त्याला अनंत मंगल गुणांनी मंडित करण्यात काहीही गैर नाही. सच्चिदानन्द हेच त्याचे मानवसापेक्ष सर्वश्रेष्ठ रूप होय. हे ब्रह्माचेच ज्ञान आहे यात शंका नाही. परंतु मानवाच्या मर्यादित शक्तीने ब्रह्माचे स्वरूप मर्यादित करणे, म्हणजे ब्रह्माचे सर्वश्रेष्ठ खरे रूप समजणे नाही. मानवव्यवहारातील व्यावहारिक दृष्टिकोणातून सापेक्षरीतीने झालेले ब्रह्माचे ज्ञान, म्हणजे ब्रह्माचे ब्रह्माच्या बाजूने, ब्रह्माच्या त्याच्या स्वतःच्या बाजूने झालेले, ज्ञान म्हणता येणार नाही. मानवाने नम्रपणे ईश्वरस्वरूप ब्रह्माचे ज्ञान करून घेण्याने, ईश्वराचे ईश्वराच्या दृष्टिकोणातून ज्ञान होणे नव्हे. मानवाच्या आवाक्यात न येणारे, मानवाच्या मोजमापात न सामावणारे असे जे ईश्वराचे स्वरूप, ते सगुणाच्या पलिकडचे निर्गुणरूप होय. जे मानवाच्या अनुभवाच्या गवसणीत येत नाही, असे ईश्वराचे परात्परस्वरूप ते आपल्या समजण्यात येणारे नाही. या अर्थाने ते निर्गुण म्हणजे खरे पाहता अचिन्त्य-रूप होय. निराळ्या शब्दांत हे सांगावयाचे म्हणजे असे की, एकाच ईश्वराची रूपे दोन, एक सगुण आणि दुसरे निर्गुण. शंकराचार्यांचे म्हणणे एवढेच की, ईश्वर मानणारे सगुणब्रह्माचे स्वरूप हेच परब्रह्माचे सर्वश्रेष्ठ स्वरूप समजतात, ते बरोबर नाही. त्याचे

निर्गुणरूप हे आपल्या आवाक्यात नाही, पण तेच त्याचे श्रेष्ठरूप असणार ही मानवाची नम्र धारणा असावयास हवी. वैष्णवांच्या ईश्वराच्या माहात्म्यापेक्षा निर्गुणाचे माहात्म्य अधिक आहे यात काही संशय नाही. त्याशिवाय शंकराचार्यांच्या मताप्रमाणे ह्या ईश्वराची किंवा ब्रह्माचीच एकमेव अद्वितीय सत्ता आहे. त्याला मर्यादा घालणारी त्याच्यापेक्षा भिन्न अशा सृष्टीची आणि अनंत जीवांची सत्ता मानल्याने ईश्वराला गौणत्व येते. त्याचे माहात्म्य कमी होते. जगतूही नाही, जीवही नाहीत, आहे ती एकमेव ईश्वराचीच सत्ता आहे, असे मानण्याने, फक्त ईश्वराचेच माहात्म्य राहाते. 'वासुदेवः सर्वम्', 'सर्वं खलु इदं ब्रह्म' असा अनुभव येणे हे भक्तीचे व त्याच स्वरूपाच्या ज्ञानाचे सर्वश्रेष्ठ रूप होय. यावरूनच शंकराचार्यांच्या भक्तिस्तोत्रांचे व वैदिक सनातन धर्माच्या पुनःस्थापनेच्या अद्वितीय कर्मयोगाचे रहस्य समजते. ते एकाच वेळी कर्म, ज्ञान व भक्ती यांच्या आचरणाने आदर्शरूप आपणापुढे ठेवतात. हेही त्यांनी बत्तीस वर्षांच्या अल्पायुषात करून दाखविले हे विशेषच.

यावरून ध्यानात येईलच की शंकराचार्यांच्या शिवाय बाकीच्या आचार्यांच्या दार्शनिक विचारांमध्ये, खऱ्या अद्वैताचा मागमूसही नसल्याने केवळ द्वैतात्मक भक्तीच्या जोरावर, श्रीबाबामहाराजांना अपेक्षित असलेल्या सृष्टियोगाची शक्यता कल्पिताही येणार नाही. ईश्वर, सृष्टी व जीवात्मे परस्परांपासून भिन्न राहून 'जे पिंडी ते ब्रह्मांडी' या तथ्याच्या जवळपासही येऊ शकणार नाहीत. जीवाच्या पिंडाला अणुरूप किंवा अंशरूप प्रदान करून पिंडामध्ये ब्रह्माण्डाची महत्ता स्थापणे ही केवळ कपोलकल्पनाच ठरू शकेल.

या उलट शंकराचार्यांच्या केवल अद्वैतात सृष्टीमध्ये व जीवात्म्यांमध्ये एक ब्रह्मच किंवा ईश्वरच विद्यमान असल्याने, सृष्टियोग आणि पिण्ड ब्रह्माण्डाचे ऐक्य सहजच घडून येते. सृष्टी किंवा विश्व यांच्यामध्ये जसा विश्वात्मक ईश्वर आहे, तसाच आत्म्याच्या ठिकाणी ब्रह्माचा किंवा ईश्वराचा संपूर्ण आविष्कार, याच शांकर अद्वैतामध्ये होत असल्याने, पिण्डब्रह्माण्ड ऐक्याची नव्याने स्थापना करावीच लागत नाही. ती आपसूकच तेथे आहे.

## आत्मस्वरूप-ज्ञानाचा आरोहक्रम

या दृष्टीने आत्म्याच्या स्वरूपाविषयी भिन्न भिन्न दार्शनिकांचे विचार थोडक्यात पहाण्याजोगे आहेत.

अहमृचे ज्या पदार्थाशी तादात्म्य होते व असते त्याप्रमाणे आत्म्याचे स्वरूप असते. सामान्यतः माणसांचा जीव ज्यामध्ये गुंतलेला राहातो, त्यामधे त्याचे आत्मरूप पाहता येते. मोठी धनदौलत चोरीला जाऊन किंवा आगीच्या भक्ष्यस्थानी पडून एखाद्या माणसाला तात्काल मरण येते. त्यावरून स्थूलरूपाने असे म्हणता येईल की, त्याचा आत्मा म्हणजे त्याची धनदौलत होय. किंवा एखाद्या पुरुषास मृत्यू आल्यावर तात्काल त्याच्या पत्नीसही मृत्यू आला, तर म्हणता येईल की तिचा आत्मा की प्राण म्हणजे तिचा पती होय. म्हणजे शरीराच्या बाहेरही आत्मा असल्याची ही विचित्र वाटणारी पण खरी स्थिती असू शकते. याला बहिरात्मवाद किंवा विषयात्मवाद म्हणता येईल. तो हिरीरीने एक स्वतंत्र वाद म्हणून कोणी पुरस्कारला नाही इतकेच.

परंतु शंकराचार्यांनी सूत्रभाष्यातील सुरुवातीच्या अध्यासप्रकरणात याची उदाहरणे दिली आहेत. स्त्रीपुत्रादिकांच्या दुःखाने जीव स्वतःच आपणास दुःखी समजतो. ही आत्म्याची 'विषयमय' स्थिती.

याचप्रमाणे देहालाच आत्मा समजणारे देहात्मवादी, जसे चार्वाकादि जडवादी. त्यापुढे प्राण म्हणजे आत्मा, मन म्हणजे आत्मा, विज्ञान किंवा बुद्धी म्हणजे आत्मा समजणारे तत्त्वज्ञानी आहेत. वेदान्तात कोशाची कल्पना आहे. त्या कल्पनेचा आश्रय घेऊन म्हणता येईल की, त्या त्या कोशालाच कोश न समजता तेच आत्म्याचे रूप समजले जाते. म्हणजे 'अन्नमय' आत्मा, 'प्राणमय' आत्मा, 'मनोमय' आत्मा, 'विज्ञानमय' आत्मा अशा आत्म्याच्या स्वरूपाच्या वरच्या वरच्या पायऱ्या आहेत. ह्या सर्व विचारसरणी अचेतनस्वरूप आत्म्याच्या आहेत. अचेतन किंवा जडद्रव्यापेक्षा निराळे असे अस्तित्वात असणारे आत्मतत्त्व प्रथम ओळखणारे म्हणजे न्याय वैशेषिक दर्शने होत. त्यांच्या मते आपण वर पाहिले त्याप्रमाणे भौतिकद्रव्यापेक्षा निराळे असे आत्मा म्हणून द्रव्य आहे. ते मुळात अचेतन असले तरी मन या दुसऱ्या द्रव्याशी संयोग प्राप्त झाल्यावर ज्ञान गुणधर्माने युक्त होते. भौतिकापेक्षा निराळ्या आत्मतत्त्वाची जाणीव किंवा ज्ञान झाल्याची स्थिती सांगणारी ही आत्म्याची 'ज्ञानमय' धारणा होय. वरील विज्ञानमय आत्म्यापेक्षा ही पुढील पायरी होय. आत्मा हा आगंतुकपणे ज्ञानाचा गुण प्राप्त करतो या म्हणण्यापेक्षा, ज्ञान किंवा चैतन्य हा त्याचा नित्य धर्म आहे असे सांख्य-योग दार्शनिकांनी प्रथम मांडले. म्हणजे अचेतन प्रकृतीपेक्षा वेगळा पुरुष किंवा आत्मा हा सचेतन नित्य पदार्थ आहे, या स्थितीला 'चिन्मय' आत्मा असे नाव आहे. परंतु आत्मा हा केवळ चिन्मय नसून, तो आनंद धर्माने युक्त आहे हे प्रथम वेदान्तामध्ये जाणले गेले आहे. याला 'आनंदमय' आत्मा असे नाव आहे.

म्हणजे ज्ञानमय, चिन्मय आणि आनंदमय असे आत्म्याचे स्वरूप जाणणे, हेच त्याचे सत् + चित् + आनंद स्वरूप जाणणे होय. परंतु ही एका जीवाच्या ठिकाणी असणाऱ्या त्याच्या आत्म्याच्या वास्तव स्वरूपाची जाण होय. असा आत्मा प्रत्येक जीवाच्या ठिकाणी भिन्न रूपाने समजणे ही शांकर अद्वैताशिवायच्या इतर आचार्यांची भूमिका कमी-अधिक प्रमाणात आहे. परंतु एकच आत्मा सर्व जीवांचे ठिकाणी व सृष्टीला व्यापून आहे अशी जाण फक्त शांकर वेदान्तामध्येच आहे. आनन्दमय आत्म्याच्या वरची ही पायरी असून 'ब्रह्ममय' आत्मा हे त्याचे नाव आहे. लक्षात घेण्याचा भाग हाच आहे की, आत्म्याचे एकत्व स्थापणे म्हणजेच ब्रह्माचे अद्वैत स्थापणे होय. हीच सत्ताशास्त्रीय भूमिका पिण्डब्रह्मांड ऐक्याची किंवा ईश्वर योगाची आधारभूत होय. हा आधार श्रीबाबामहाराजांनी घेतला आहे, हेच महत्त्वाचे सांगणे आहे. एकत्रितपणे आत्म्याच्या निरनिराळ्या स्वरूपाची उजळणी करून पुढे जाऊ. आरोहक्रमाने विषयमय, अन्नमय, (अन्न=शरीर=आत्मा) प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, ज्ञानमय, चिन्मय, आनन्दमय, ब्रह्ममय अशी आत्म्याची जाण होते. (ब्रह्मम्यापूर्वी कोणी 'वाङ्मय' म्हणजे शब्द हेच ब्रह्म अशी भूमिका मांडतात. ही आत्मतत्त्वापेक्षा ब्रह्मालाच बरोबर लागू पडते.) काही योगविचारक वेदान्ताच्या पगड्यामुळे आत्म्याला चेतन धर्माशिवाय आनंद हाही धर्म आहे असे समजतात. परंतु आत्म्याचे ब्रह्ममयत्व मात्र मान्य करीत नाहीत.

आणखी हेही ध्यानात घेण्याजोगे आहे की, सांख्य आणि वैष्णव वेदान्ती आत्म्याला ज्ञाता मानतात, तो ज्ञानस्वरूप आहे असे समजत नाहीत. शांकर वेदान्तामध्ये आत्मा ज्ञानस्वरूप आहे. त्याचे ज्ञाता, कर्ता, भोक्ता हे रूप औपाधिक आहे, खरे नाही.

## शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर

शंकराचार्यांच्या अद्वैताबद्दल वर प्रशस्ती केली व तो चिद्द्वैताचा

विचारच सृष्टियोगाला आधारभूत आहे म्हणून सांगितले. परन्तु श्रीबाबामहाराजांचा 'दिव्यामृतधारा' ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायावरील प्रगतदर्शन आहे. हे लक्षात घेता ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान हेच अधिक आधारभूत आहे असे म्हणण्यात काही वावगे नाही. परन्तु असे करण्यात शांकर अद्वैतात आणि ज्ञानेश्वरीय अद्वैतात काही भेद आहे असे सुचविले जाते, म्हणून काही अपसमज निवारण करण्यासाठी थोडे लिहिणे अगत्याचे आहे. ज्ञानेश्वर हे भाष्यकारांना वाट पुसतात आणि गीतार्थ आपणापुढे ठेवतात हे सर्व विदितच आहे. भाष्यकारांमध्ये शंकराचार्य हे तर प्रमुख आहेतच. रामानुजाचार्यादिकांचा कोठे कोठे अनुवादही त्यांनी केला आहे. नाथपंथीय शिवशक्तिसामरस्याचा विचारही ज्ञानेश्वरांनी घेतला आहेच. परंतु या सर्व विचारांचा मेळ ज्ञानेश्वरांनी घातला आहे. प्रत्येक विचार जसेच्या तसे घेतले आहेत असे नाही. त्या विचारांचा ज्ञानेश्वरांनी आपल्या स्वतःच्या अनुभवातून मागोवा घेतला आहे.

शंकराचार्यांपेक्षा ज्ञानेश्वरांचे वेगळेपण ज्ञानेश्वरभक्त दाखवतात. शंकराचार्य हे निर्गुण ब्रह्मवादी, ज्ञानयोगी, मायावादी, ईश्वराला व भक्तीला गौण स्थान देणारे म्हणून गणले जातात. त्या उलट ज्ञानेश्वर हे निर्गुण-सगुणाला सारखेच महत्त्व देणारे, भक्तियोगी, सर्वत्र ईश्वर आणि चैतन्य पहाणारे, जगाला खरे समजणारे म्हणजे चिद्विलास मानणारे, अज्ञानाचे म्हणजे मायेचे खंडन करणारे आहेत. श्रीबाबाही शंकराचार्यांपेक्षा ज्ञानेश्वरांच्या विचारावरच आपले ध्यान केंद्रित करणारे आहेत. तेव्हा या अर्थाने सृष्टियोगाचा मूलाधार ज्ञानेश्वरप्रणीत तत्त्वज्ञानच होय, हे म्हणणे समजण्यासारखे आहे. जो तो काही विचारावर भर देऊन बोलतो, लिहितो म्हणून त्याचे स्वतःचे वैशिष्ट्य दिसून येते. परंतु शंकराचार्य व ज्ञानेश्वर यांमधील भेद अशा विदारक पद्धतीने मांडण्याने यथार्थज्ञान होण्यापेक्षा अपसमजच अधिक होतात असे मला वाटते.

खरे पाहता शंकराचार्य व ज्ञानेश्वर निर्गुण आणि सगुण या दोन्हींना यथोचित मूल्य देऊनही, परमार्थ सत्य हे या दोन्ही पलीकडील अचिंत्य तत्त्व मानतात. ब्रह्माच्या ठिकाणी अज्ञान किंवा माया नाही हे शंकराचार्यांना ज्ञानेश्वरांइतकेच मान्य आहे. ज्ञानेश्वरांनी केलेले 'अमृतानुभवा'तील अज्ञान खंडन वाचून शंकराचार्यांनी आनंदाने मान डोलावली असती. हे सर्व ब्रह्म आहे, चैतन्य आहे, वासुदेव आहे, अचेतनाला यत्किंचितही कोठे थारा नाही हा विचार उभयतांना सारखाच मान्य आहे. व्यवहारात समजण्यासारखी अद्वैताची प्रतिष्ठापना करण्यासाठी, मायावादाचा विचार जसा शंकराचार्य स्वीकारतात तसाच ज्ञानेश्वरांनीही स्वीकारला आहे व जसा चिद्विलासाचा विचार जागोजागी येतो तसा मायेचाही विचार यथोचितपणे जागोजागी येतोच. दोघेही ज्ञान आणि भक्तीला सारखेच स्थान देतात, असे म्हणण्यापेक्षा शंकराचार्यांचे ज्ञान हे स्वस्वरूपानुसंधानरूप भक्तिमात्र आहे. आणि ज्ञानेश्वरांची भक्ती ही अद्वैत ज्ञानरूप आहे. खरे पहाता दोघांच्याही मते कर्म, भक्ती, ज्ञान आणि ध्यान हे समरसतेने उपस्थित किंवा सिद्ध झाल्याशिवाय जीवनाला पूर्णता येतच नाही. असे समग्रतेचे जीवन दोघेही जगले आहेत. 'साधू दिसती वेगळाले । परी ते स्वरूपी मिळाले ॥' हेच खरे आहे. सर्वदर्शनांपासून अद्वैतापर्यंत जी विचारांची वाटचाल केली ती ब्रह्म किंवा ईश्वर, जगत् किंवा सृष्टी आणि जीव किंवा आत्मा हे तीन पर्यायवाची शब्द एकाच चैतन्य सत्तेचे आहेत व तो अखेरचा सात्त्विक निर्णय आहे हे स्पष्ट करण्यासाठीच केली. हाच सृष्टियोगाचा एकमेव खराखुरा आधार आहे.

## 'वासुदेवः सर्वम्' चा आतबाहेर अनुभव

श्रीबाबांनी असे दाखवून दिले आहे की, दिव्य आत्म्याची शक्तिकेंद्रे जशी देहात किंवा पिंडात सुस्थिर आहेत, तशीच ती ब्रह्मांडातही सुस्थिर असतात. पिंड ही जशी कूटस्थ आत्म्याची प्रकृती तद्वतच 'विश्व' हे त्या विराट पुरुषाचे ईश्वराचे-हिरण्यगर्भाचे शरीरच होय. पिंडात जे पारमार्थिक अनुभव येतील तेच अनुभव, अवस्था भेद न होता, या विराटाच्या स्वरूपात त्याला प्राप्य झाले पाहिजेत. पूर्णतः अद्वैत सिद्ध झाल्याची ती खूण आहे.

सामान्य रूढ योगमार्गाने शरीरातील षट्चक्रे भेदून ब्रह्मरंध्रापावेतो कुंडलिनीदेवीचा जो प्रवास होतो तो अतिदिव्य खराच, पण खरा योग जो बाबांना अभिप्रेत आहे, तो विश्वरूपाच्या ठिकाणी सकल अवस्थेत दिव्य अनुभव देणारा आहे. जर असे होत नसेल तर सर्वत्र आत बाहेर चैतन्यच एक विलसत आहे, हा अनुभव अजून योग्याला आला नाही असेच म्हणावे लागेल. म्हणजे योगमार्गाची अचेतन आणि चेतन अशी द्वैतात्मक विचारसरणी अजून चालूच आहे. सर्वत्र वासुदेव पाहून जगत्कल्याणाच्या विहारात ते योगी मग्न होऊ शकत नाहीत. 'सर्वं खलु इदं ब्रह्म' म्हणविणाऱ्याने आपल्या देहाचे चैतन्यात परिवर्तन अनुभवले पाहिजे. नाहीतर सर्व ब्रह्म खरे पण त्याला जणू तळटीप जोडावी लागते. 'माझे शरीर सोडून', हे हास्यास्पद आहे. हे अद्वैताला पडलेले भगदाडच म्हणावे लागेल. अर्थात् असा योगी हे कच्चे मडकेच होय. भक्तीने न्हालेला योगी मात्र हा दिव्य अनुभव येऊ शकतो. चैतन्याच्या महत्तम योगात तथाकथित जड देहाचे अणुपरमाणूही चिद्रूप व्हावयास पाहिजेत. हा श्रीबाबांचा विचार श्रीअरविंदांच्या 'लाईफ डिव्हाइन' मधेही पहावयास सापडतो. श्रीबाबांच्या मते भगवान् श्रीकृष्ण आणि संत तुकाराम हे परिपूर्ण योग्यांमधील अग्रणी होत. त्यांचे सांगणे हे की, भक्तिपथारूढ गुरुपुत्राचे योगसुखानुभव अशा दिव्य प्रकारचे असतात. ज्या योग्याला बाह्य सृष्टीतही शक्तिकेंद्रे आहेत हे ज्ञान होत नाही, त्याला खरी आनंदाची अनुभूती येणार नाही. त्याचा बोध एकपक्षीय संकुचितच राहातो. जगाचे रहाटचक्र नियतिक्रमाने व कर्मविपाकाच्या अनुशासनाने परमेश्वराने सुस्थिर केले आहे. त्यामध्ये विशिष्ट सामर्थ्यासहित देवतांच्या नेमणुका केलेल्या आहेत. जीवांना स्वप्रयत्नाने शुद्ध, बद्ध व सिद्ध अशा देवतांची स्थाने प्राप्त होऊ शकतात.

## ब्रह्माण्ड विचार

एक ब्रह्माण्ड हे चौदा भुवनांचे मिळून होते. खाली अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल लोक असून वरती भूःभुवर्, स्वर्, महः, जनः, तपः व सत्यम् असे लोक आहेत. यातील भूलोकात आपण आहोत. सर्वच लोकांचे दिक् किंवा देश आणि काल आपल्यासारखे व आपल्याशी निगडित नाहीत. हे पिंडातही आहेत आणि ब्रह्मांडातही आहेत. ज्याप्रमाणे जागृतीतील दिक् काल आणि स्वप्नातील दिक् काल निराळे असतात, व त्या त्या अवस्थेत ते खरेच असतात, त्याचप्रमाणे हे चौदा लोक आणि त्यांच्या उच्च, उच्चतर, उच्चतम अशा देवता त्यांचे व्यवस्थापन करतात. भूलोकाच्या ज्ञानेंद्रियांनी ते निरनिराळे लोक दृश्य होत नाही. त्यांना जाणण्यासाठी सूक्ष्म, सूक्ष्मतर, सूक्ष्मतम अशी निरनिराळ्या स्तरावरच्या चेतनेची दृष्टी लागते. प्रत्येक लोक निरनिराळ्या द्रव्यांचे घडलेले असतात. अशी ब्रह्माण्डे अनंत कोटी आहेत व ईश्वर हा त्या अनंत कोटी

ब्रह्माण्डाचा नायक आहे. त्यावरून त्याच्या सत्तेची, चित् वा ज्ञानाची, सामर्थ्याची आणि आनंदाची कल्पना करावी तितकी तोकडीच पडेल. थिऑसॉफीमध्ये साधकांनी या गोष्टीची सत्यता जाणण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे पूर्वीच्या ऋषिमुनींनी किती अगाध ज्ञान प्राप्त करून आपल्या हाती दिले आहे, त्याची कृतज्ञतापूर्वक जाणीव ठेवणे अगत्याचे आहे.

आश्चर्य वाटण्यासारखी ही गोष्ट आहे की, पाश्चात्त्य भौतिक विज्ञानाला ब्रह्माण्डाचा शोध गेल्या दीड दोनशे वर्षांमध्ये लागला आहे. त्यांतील जेम्स जीन्स म्हणतो की, वादळामध्ये जसे धुळीचे अगणित कण इतस्ततः फिरतात तसे हे असंख्य तारे अंतराळाच्या पोकळीत विहरत आहेत. समुद्रकिनाऱ्यावर जेवढे वाळूचे कण आहेत, किंवा लंडन शहरात जेवढे धुळीचे कण आहेत तेवढे तारे एकेका आकाशगंगेमधे आहेत, आणि अशा आकाशगंगा किती आहेत त्यांची संख्याच करता येत नाही.

पण खरे आश्चर्य ज्ञानेश्वर महाराजांनी विश्वरूपदर्शनात, सातशेवर वर्षांपूर्वी लिहिलेल्या ज्ञानेश्वरीमध्ये वरील प्रमाणेच वर्णन केले आहे, हे आधुनिकांना सांगून सुद्धा न पटणारे रहस्य आहे. ते ज्ञानेश्वरांना कोठून व कसे समजले असेल ?

## पर्यावरण-दृश्य व अदृश्य

आणखी एका आधुनिकतम अशा विषयाकडे मी या बाबतीत लक्ष वेधू इच्छितो. तो विषय म्हणजे पर्यावरण-विज्ञान. कोणत्याही स्तरावरचा जीव आणि त्याच्या भोवतालचा परिसर यांचा परस्परसंबंध अति दाट व जटिल असतो. हे सर्वच विश्व अशा परपरसंबंधांच्या अनंत जाळ्यांनी विणलेले आहे. त्या सर्व संबंधांचे मिळून एक संतुलित विश्व निर्माण होते. हा विचार अद्वैताचे समर्थन करणारा आहे. विश्वाची धारणा करणारा तो धर्म अशी धर्माची मौलिक वैज्ञानिक व्याख्या केलेली आहे. विश्वाची किंवा प्रकृतीची धारणा या संतुलन किंवा साम्यावस्था शब्दाने व्यक्त होते. म्हणजे पर्यावरणविज्ञान हे धर्माचे समर्थन करणारे आहे. मात्र हे विज्ञान भौतिक स्तरावर अवलंबूनच आपल्या अभ्यासाला मर्यादा घालून घेते. इतर विज्ञानाप्रमाणे दृष्ट किंवा प्रत्यक्ष अनुभवाने मर्यादित असे हे शास्त्र बनते. परंतु चिद्वादी अद्वैताचा आणि निरनिराळ्या अदृश्य तथापि आपापल्या परी विद्यमान असलेल्या ब्रह्माण्डातील व पिण्डातील स्तरांचा विचार करणे अनिवार्य आहे. हा अदृष्टाचा विचार भौतिक पर्यावरणविज्ञानात जोपर्यंत केला जात नाही, तोपर्यंत ते विज्ञान कितीही विकसित झाले तरी ते अपुरेच गणले जाईल. अदृश्य पर्यावरणाचा अधिकचा आयाम विद्यमान विज्ञानाला द्यावयास पाहिजे. त्याशिवाय या अद्भुत सृष्टियोगाचे महत्त्व आकलन होणार नाही.

## भक्तियोगाने सृष्टियोगाची दिव्यानुभूती

प्रत्येक जीवाला त्याच्या उच्चनीच कक्षेप्रमाणे कमी अधिक स्वातंत्र्य असते. कर्मपरिमाणाच्या न्यायाधीन राहून ईशकृपाचिन्हित जीव सृष्टीच्या व्यवस्थापनात सहभागी होऊ शकतो. इंद्र, अग्नि, यम, निऋति, वरुण, वायु, कुबेर व ईशान ह्या देवता म्हणजे अष्टदिक्पाल होत. त्यांच्यामध्ये शुद्ध जीव सामील होऊन आपली अधिकाधिक प्रगती साधू शकतात. विश्वसंचालनात सहभागी होण्याचा अधिकार ईशकृपेने प्राप्त होतो. ईशकृपा ईश्वराची विशेषतः दास्य भक्ती केल्याने प्राप्त होते. श्रीबाबा लिहितात, 'जाणिवेचे क्षेत्र जेवढे सूक्ष्म तेवढा तो जीव उच्चस्तरीय ब्रव्याच्या आकाराने घडतो. अर्थात् जाणीव मूळ ईशस्वरूपाशी संलग्न होण्याकडे सामीप्याने असणे म्हणजे सूक्ष्म होणे होय.' (दिव्यामृतधारा १.१६८)

पिंडाच्या व ब्रह्माण्डाच्या ठायी एकाच प्रकारची अवस्था असते. पिंडातील सूक्ष्म व ब्रह्माण्डातील व्यापक फरक एवढाच फरक. 'सिद्धसिद्धान्तपद्धति' या ग्रंथातील षष्ठोपदेशातील शास्त्रीय परिभाषेप्रमाणे पिंडातील व्यवस्था 'कुलशक्ति' पाहते व ब्रह्माण्डातील शिवाशी तद्रूप असलेली ती 'अकुलशक्ति' होय. हा विचार नाथ संप्रदायातील भक्तिप्रधान व गुरुकृपांकित योगामध्ये विशेष येतो. पातंजलयोगाप्रमाणे समाधीचा प्रयोग करून त्याचे विसर्जन करणे एवढेच पुरेसे नाही. नाथांचा हठयोग प्रेम, निष्ठा, निर्द्वंद्वज्ञान, धारणा व गुरुकृपा या अनुभवातून जाणारा व त्यायोगेच जीवन घडविणारा आहे. या भक्तियोगात योगानुभव येतातच, पण त्याही पलिकडील पिंडब्रह्माण्डाचे सामरस्य अनुभवास येते. श्रीबाबा म्हणतात, 'भक्तियोगात पिंडातील शक्तिकेन्द्रे (चक्रे) जेव्हा उमलीत होतात व उच्च आनंदाचा लाभ घडतो, तेव्हाच ब्रह्माण्डातील शक्तिकेंद्रेही उमलीत होऊन विश्वदर्शन बदलत असते.' वर आल्याच्या स्वरूपाचा जो आरोहक्रम दाखविला आहे, त्यातील योगातील सच्चिदानन्दरूप एकट्याचा आत्मा अनुभवात येऊन न थांबता, त्याच्या पुढील सर्वत्र ब्रह्ममयतेची स्थिती अनुभवाने सिद्ध करता येते. पिंडातील अनुभूतीला 'आनंद' म्हणावे. ब्रह्माण्डातील अनुभूतीला 'ज्ञान' व 'सामर्थ्य' म्हणावे. भक्तियोगात ज्ञानानंदाची उत्तरोत्तर वाढ होऊन त्याची परिसीमा गाठता येते. सामर्थ्याची अनुभूती येते. हे सामर्थ्य म्हणजे विश्वाचे दिव्य मांगल्य स्वतः अनुभवणे व सर्वत्र प्रसृत करणे होय. भक्तिरहित योगात स्वार्थ, सत्ता व नष्टभोगेच्छा राहाण्याची शक्यता असते. ती विश्वात्मक एकतेत नष्ट होते. भक्तियोगी अनंत जीवांशी समसंवेदनेने तादात्म्य पावतो. हेच सृष्टियोगाचे अंतिम रहस्य होय.

वरीलप्रमाणे श्रीबाबांची सृष्टियोगाची नवीन विचारसरणी आहे. पातंजलयोगाने किंवा कुंडलिनीयोगाने साधक स्वतःचे आरोहण खालपासून वर अखेरपर्यंत करीत असताना, जे अनुभव त्यास निरनिराळ्या चक्रांतून प्रवास करताना येतात, त्याचप्रमाणे ते अनुभव आपल्या बाहेरच्या सृष्टीमध्येही तेथील चक्रे उमलीत असल्याचे यावयास पाहिजेत. श्रीबाबांच्या मते अशी नऊ चक्रे आहेत, केवळ षट्चक्रेच नव्हेत. त्या ब्रह्माण्डातील नऊ चक्रांची नावे अशी आहेत. गतिचक्र, स्थितिचक्र, रतिचक्र, कालचक्र, ध्वनिचक्र, साम्यचक्र, प्रकाशचक्र, जीवनचक्र, विष्णुचक्र शेवटी निर्वाणचक्रात आत्मा व कूटस्थ त्यांचे सामरस्य होते. हा त्यांच्या अनुभूतीचा विषय असल्याने त्या संबंधाने सामान्य जीवाने तो श्रद्धेनेच ग्रहण करण्यात त्याचे हित आहे. योग हे एक साधन आहे. पतंजलीने जरी सांख्यांचे द्वैती दर्शन स्वीकारले असले, तरी ते सर्वांनी स्वीकारलेच पाहिजे असे नाही. ते साधन इतर तऱ्हेच्या सत्ताशास्त्रज्ञांनी-दार्शनिकांनी त्यांच्या त्यांच्या धारणेप्रमाणे आत्मसात् केले आहे, हे फार महत्त्वाचे आहे. त्याचप्रमाणे अद्वैत भक्तियोग्यानेही त्याची अनुभूती भक्तियोगाद्वारे अनायासे घ्यावी. योगाचा अद्वैताशी आणि ईश्वरगुरुभक्तीशी आंतरिक संबंध मुळातच आहे. ते श्रीबाबांनी यथार्थपणे दाखवून दिले आहे. साधकाने तो विचार आत्मसात् करून त्याप्रमाणे आपले जीवन सर्वांगीण विधायकपणे घडवावे.

**डॉ. अ. ग. जावडेकर**
गणेशकृपा, पटेल कॉलनी, सिद्धनाथ रोड, बडोदे.



# संत सारस्वत स्पष्ट करणारी बाबा महाराजांची वाणी

**डॉ. अशोक कामत**

*एम.ए.पीएच.डी. (मराठी) पीएच.डी. हिंदी. १९८५ पासून प्रमुख - नामदेव अध्यासन, संत अध्ययन व संशोधन, पुणे विद्यापीठ. मराठी संत साहित्याचे अध्ययन, अध्यापन, अनुबंध, लेखन, संशोधन व शोधकार्यासाठी भ्रमण, सामाजिक प्रबोधन व व्याख्याने. एम.फिल, पीएच.डी. पदवीसाठी मार्गदर्शन. ३० प्रबंध पूर्ण. ७५ संशोधन प्रकल्प अभ्यासकांकडून करवून घेतले. अगणित पुरस्कार प्राप्त.*

माचणूरचे महान योगीराज बाबा महाराज आर्वीकर हे भगवद् गीता आणि ज्ञानेश्वरीच्या माध्यमातून सनातन वैदिक धर्माचे / हिंदू धर्मविचाराचे मूळचे विशुद्ध स्वरूप स्पष्ट करणारे या अर्थाने स्वामी विवेकानंदांचेच सत्कार्य पुढे नेणारे एक थोर सत्पुरुष होते.

बाबा महाराजांचा प्रत्यक्ष जीवन काळ (१९२५ ते १९७१) हा असला तरी त्यांच्या अक्षर वाङ्मयातून ते आजही आपल्याला भेटू शकतात. हे त्यांचे वाङ्मय जरी संत साहित्यच असले तरी ते अभंग पदांच्या स्वरूपात स्वानुभूती शब्दबद्ध करणारे नाही. त्यात एकूणच भारतीय संत सारस्वताचा शोध आणि बोध आहे. नेमकेपणाने केलेले विवेचन त्यात आहे. संतांच्या 'साक्षात्कारा'चा तो आजच्या मराठीत सहजपणे घडून गेलेला आत्माविष्कार आहे !

## गीता प्रबोध

हा ग्रंथ म्हणजे बाबा महाराज आर्वीकरांनी आपल्या शिष्याला एका चार वर्षांच्या पत्रशृंखलेद्वारे उत्स्फूर्तपणे कथन केलेला गीतार्थ आहे. त्यात गीतेचे रहस्य आलेले आहे.

हा ग्रंथ गीतेच्या साऱ्या अध्यायांवर आधारीत नाही. अठरापैकी पहिले दोन अध्याय आणि तिसऱ्या अध्यायाचे पहिले सोळा श्लोक यांवरच महाराज लिहितात. पण त्यात गीता ग्रंथनिर्मितीचे कारण, गीतेतील अध्यात्म, तत्त्वदर्शन, व्यावहारिक बोध हे सारे स्पष्ट करण्यात आलेले आहे. यातूनही समग्र गीता आपल्या समोर येते. कारण तशी ती महाराजांसमोर आहे.

गीतेचा आरंभिक अध्याय त्यांना विषादयोग वाटत नाही. 'आवरणयोग' म्हणून त्यातून ते अर्जुनातील 'माणूस' व्यक्त करतात. हा माणूस तुमच्या आमच्या सारखाच भ्रममग्न आहे. किंकर्तव्यमूढ आहे.

आद्य शंकराचार्य, स्वामी विवेकानंद, योगी अरविंद, आचार्य विनोबा, ॲनी बेझंट यांचे विवेचन बाबा महाराजांसमोर आहे. संत कबीरदासांची साखी-वाणी आणि गोस्वामी तुलसीदासांची मानस-वाणी सुद्धा त्यांनी आपल्यापुढे ठेवलेली आहे. 'कर्म' आणि 'यज्ञ' या दोन शब्दांवर त्यांनी विशेष भर दिलेला आहे. रचनात्मक विधायक सत्कर्म म्हणजेच यज्ञ असा त्यांचा सांगावा आहे.

महाराजांच्या या गीताप्रबोधाचा अधिक परिपूर्ण असा 'स्वमत' आविष्कार म्हणजे 'दिव्यामृतधारा' होय.

## आगळा भाष्य ग्रंथ

श्रीमद्भगवद्गीतेवर आजवर वेगवेगळ्या काळात, विविध भाषांतून अनेक भाष्य ग्रंथ लिहिण्यात आले. श्रीज्ञानदेवांनी 'भावार्थ दीपिका' हा यादवकालीन टीकाग्रंथ मराठीतीलच नव्हे, तर आधुनिक भारतीय भाषांतील एक सर्व थोर ग्रंथ होय. तो आद्य तर आहेच. परंतु गीता-भाष्य म्हणून आणि काव्य रचना म्हणूनही तो आगळा-वेगळा ठरतो.

ज्ञानदेवांची भाषा तेराव्या शतकातील यादवकालीन भाषा असल्यामुळे ती आजच्या मराठीला पुष्कळ लांबची ठरते. त्यामुळे आज ज्ञानदेवीच सार्थ आणि सभाष्यही हवी असते. अनेक सांप्रदायिक उपासकांनी आणि आधुनिक अभ्यासकांनी अशा स्वरूपाचे ग्रंथ लिहिलेलेही असतात. यापैकी बहुतेक ग्रंथ टीपा-टिपण्णीचे आणि उच्चशिक्षणाशी संबंधित अभ्यासक्रमोपयोगी आहेत.

ज्ञानदेवांचा गीता-संवाद हा तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, यांचे विवेचन करणारा आणि काव्यालंकार मंडित असा ग्रंथ असून तो आज श्रीविठ्ठल भक्त वारकरी संप्रदायाचा एक पंथ-ग्रंथ आहे. तो 'ग्रंथ गुरू रावो' म्हणून वारकरी भक्त भागवताच्या नित्य पठणाचा आणि मनन चिंतनाचा एक ठळक आधार आहे. त्यांच्या दृष्टीने श्रीकृष्ण भगवानच पुन्हा ज्ञानदेवांच्या रूपाने अवतरले होते.

बाबा महाराज आर्वीकरांनी जी 'दिव्यामृतधारा' सिद्ध केली ते ज्ञानदेवी ग्रंथाच्या बाराव्या अध्यायावरील प्रतिपद भाष्य होय. त्यापूर्वी ज्ञानदेवीवर अशा प्रकारची स्वतंत्र टीका कुणी तयार केलेली नाही. नंतरही होऊ शकली नाही. यातूनही हे सिद्ध होऊ शकते की, बाबा महाराजांचा ज्ञानदेवांच्या ग्रंथराजावर किती मोठा अधिकार होता.

'दिव्यामृतधारा' हे नाच अत्यंत सार्थ आहे. इथे ज्ञानदेवीचा खरा मुख्य अध्याय बारावा आहे. हे गृहीत असून ज्ञानदेवांना त्यातून जे वैश्विक जीवन-दर्शन भक्तिमार्गाच्या स्वरूपात स्पष्ट करावयाचे आहे, त्याचे सखोल चिंतन आहे. त्यांनी मूळ ओव्यांचा आजच्या मराठीत मात्र सरळ सोपा अर्थ दिलेला नाही. तसा तो इतर अनेकांनी दिलेला आहे. बाबा महाराज ज्ञानदेवांच्या एकेका शब्दाचे रहस्य उलगडून दाखवितात. प्रथम ते सामान्य कोशार्थ नोंदवून मग त्या शब्दामागे कोणकोणते 'संकेत' असू शकतात, त्यांचा शोध घेतात. त्यातून त्यांचे विवरण फुलत जाते. साक्षात ज्ञानदेवच आपल्यासमोर ज्ञानदेवीवर प्रवचन करीत आहेत, असा प्रत्यय येतो !

इथे सहज पाठचिकित्सा होत राहते. अर्थनिर्णयही होत जातो. ज्ञानदेवांचे तत्त्वज्ञानही स्पष्ट होत असते. ज्ञानदेवांनी वारंवार आपल्या सद्गुरूंना वंदन केले आहे आणि श्रीगुरुकृपेनेच आपल्याला अद्वयानंद बोध घडू शकला आहे, हे सांगत राहतात. 'दिव्यामृतधारा' वाचीत असताना गुरुकृपा म्हणजे नेमके काय याचा बोध होतो.

### 'सारस्वत' लक्षण

संतांचे साहित्य हे प्राधान्याने आत्मज्ञानात्मक आहे. ते त्यांच्या ईश्वरानुभूतीवर अधिष्ठित आहे. साक्षात्कारसंपन्न आहे. त्याची लक्षणे, आस्वादाची प्रक्रिया, महाराज ज्ञानदेवांच्या वाणीची प्रत्यक्ष प्रमाणे देत विशद करतात. संत वाङ्मयाचे मूळ प्रयोजनही ते स्पष्ट करतात.

सद्गुरूच्या चरण प्रसादाने 'सारस्वत' / संत साहित्य अवतीर्ण होत असते. ज्ञानदेवांनी 'सद्गुरुचिये कृपादृष्टी' ने सकळ विद्यांची सृष्टी होते, आणि 'सारस्वत पिके' असे म्हटले आहे. बीज हे पेरले जाते. मग ते उगवते. वाढत जाते. फळांचा बहर झाडाला येतो. हळूहळू पिके पिकतात. परिपूर्ण होतात. मग त्यातील बीज हे पुन्हा एकदा रोपाला जन्म देते. ही सृष्टीतील एक अखंड प्रक्रिया होय. 'पिके' या शब्दामागे हा सारा भाव आहे. महाराज तो उलगडून दाखवितात.

दिव्यामृतधारेच्या प्रत्येक परिच्छेदामध्ये आपल्याला असे भाव-सौंदर्य दिसते, जे आपल्याला संतवाणीचा यथार्थ बोध घडवीत राहते.

**डॉ. अशोक कामत**
प्राध्यापक व प्रमुख, संत नामदेव अध्यासन.
संत अध्ययन व संशोधन केंद्र, पुणे विद्यापीठ.

---

# श्रीमद् बाबामहाराज आर्वीकर !

परमपूजनीय परमवंदनीय -
नमो नमो श्रीमद् गुरुवर्या,
नाम स्मरता नयनीं प्रकटे
तेजोमय तव प्रसन्न चर्या !

ऋषितुल्य ते ध्यान विरागी
सुशांत सात्त्विक भाव मुखावर,
चारित्र्यासम शुचिर्भूत तव
शुभ्र स्वच्छ वसनें देहावर !

मुक्त घन जटा स्कंधीं रुळती
सशक्त-सुदृढ शरीरयष्टी,
करुणामय चिन्मयी दिठीला
ब्रह्मरूप ही विपुला सृष्टी !

संकल्पाच्या सिद्ध्यर्थ उभा
सदैव पाठीशी सिद्धेश्वर,
अशी अन्तरीं अभंग श्रद्धा
निश्चल निष्ठा निज कार्यावर !

अन्तर्यामीं उजळत होते
निर्गुण-सगुणाचें गुणवैभव,
गोरक्षांचा ध्वज मिरवित नीत
सद्धर्माचा केला गौरव !

काव्यसुरस मधुरसवन्तीला
दिव्य स्पर्श त्या परतत्त्वाचा,
चैतन्याच्या प्रबोधनांतून
सन्देश दिला अमरत्वाचा !

गंगौघापरि भव्य प्रवाहित
उदात्त अभिनव विचारधारा,
चित्तवृत्ती टवटवीत बनल्या
बरसताच दिव्यामृतधारा !

अज्ञानी, गांजले, नाडले
त्यांचा होऊनिया सांगाती,
तुम्ही दाविला सुपंथ त्यांना
हात घेऊनी त्यांचा हातीं !

ध्यास...तुम्हा मन विमल बनावे
विलया जावो बीभत्स, भोंगळ
आर्षप्रणीत तत्त्वज्ञानबोधें
लाभो सकलां श्रेयस मंगल !

चित्तीं ठसवावी, तव वचनें
जिवाजिवांतिल शिव उमजावे,
माणुसकीला उरीं वागवीत
'शाश्वत' ते स्वान्तरीं भजावे !

हृदयीची ही आर्त आपुल्या
जन-जीवन हो सचेत उन्नत,
आद्य सनातन स्वधर्म तेजें
झळकावा नित जगतीं भारत !

धर्मधुरंधर ! दीनोद्धारक !
सिद्धसाधवा ! प्राज्ञ प्रबुद्धा !
समर्पुनी हे भावमृदुलदल
अभिवादन तव पदारविन्दा !!

**विश्वनाथ जोशी**
२, श्रीराम अपार्टमेंट, बी-२१, इचलकरंजी.



# जगद्गुरू श्री. जे. कृष्णमूर्ति व श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर तत्त्वज्ञानांतील काही साम्यस्थळे


श्री. श्री. के. पुसाळकर

*बी.एस्सी., मुंबई. माजी अंडर सेक्रेटरी होम डिपार्टमेंट महाराष्ट्र राज्य. श्रीबाबामहाराज आर्वीकरांचे ज्येष्ठ व श्रेष्ठ साधक. सामयिक प्रपंचाचे एक हजार प्रयोग महाराष्ट्रभर घडवून आणले.*


श्री. कृष्णमूर्ति व श्री. बाबामहाराज या दोन महापुरुषांनी साधकांना केलेले मार्गदर्शन अतिशय महत्त्वाचे व बहुमोलाचे आहे. त्या दोघांच्या तत्त्वविचारांत अभिनवता व बरेच साम्य आढळून येते. एका अभ्यासू साधकाने अशी काही साम्यस्थळे दाखविण्याचा केलेला हा नम्र उपक्रम !

*'साधु दिसती वेगळाले । परी ते स्वरूपीं मिळाले ।*
*अवघे मिळुनी एकचि झाले । देहातीत वस्तु ॥'*

या समर्थउक्तीनुसार, सर्व साक्षात्कारी विभूतींचा बाह्य आविष्कार जरी काही अंशी भिन्न वाटला, तरी त्यांचे अंतरंगीय दर्शन एकच असते. एकाच चिरंतन वस्तूचा बोध करून द्यावा हीच या सर्व वंदनीय व्यक्तींची मनीषा असते. सध्याच्या काळात श्री. जे. कृष्णमूर्ति व श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर (माचणूर) यांचे तत्त्वज्ञान अनेक साधकांना मार्गदर्शक झाले आहे. कोणत्याही विशिष्ट पंथाचा वा धर्माचा आग्रह न धरता विश्वोद्धारासाठी जीवननिष्ठ तत्त्वज्ञान या दोन्ही थोर पुरुषांनी सांगितले आहे. दोघांच्या तत्त्वज्ञानांत अनेक साम्यस्थळे आढळतात. त्यांतील काही साम्यस्थळे त्रोटकपणे दाखविण्याचा प्रयत्न या लेखांत केला आहे. श्री. कृष्णमूर्ति व श्री. बाबामहाराज यांनी विपुल ग्रंथलेखन केले आहे. हा लेख त्यांच्या ग्रंथांचे समग्र दर्शन नव्हे; तसेच हा तौलनिक अभ्यासही नाही. त्यांच्या तत्त्वविचारांतील सारखेपणा दाखविण्याचा मर्यादित हेतु या लेखामागे आहे.

## १. व्यष्टि व समष्टि

श्रीबाबांच्या मते व्यक्तिगत उद्धार व जगदोद्धार या क्रिया एकाच वेळी घडल्या पाहिजेत. व्यक्तिगत साधना विश्वजीवनातून झाली पाहिजे असा त्यांचा सांगावा आहे. व्यष्टि (व्यक्ति) व समष्टि (विश्व) यांचा संबंध विशद करताना ते म्हणतात, ''व्यष्टि व समष्टि यांचे नित्य सामरस्य असते. व्यष्टि जेवढी समष्टिरूप होईल तेवढी ती व्यक्ति पूर्ण होत असते. अपूर्णाकडून पूर्णाकडे होणारा हा प्रवास आहे. व्यष्टीचे समष्टीत रूपांतर म्हणजे व्यष्टि नष्ट होणे नसून प्रगत होणे, पूर्ण होणे होय. एकट्या व्यक्तीचा मोक्ष संतांना अभिप्रेत नाही. हे अखिल विश्व वैकुंठाप्रत कसे जाईल या ध्यासानेच साधु-संतांचे सारे वर्तणे असते'. ('सागाति' डिसेंबर १९८०, पृष्ठ २३) श्रीबाबांनी व्यष्टि व समष्टीचे अभेदत्व दर्शविले असून, ही सामरस्य दशा प्राप्त करण्यासाठी भक्तीचा तेजस्वी पथ आपल्या 'दिव्यामृतधारा' या ग्रंथांत स्पष्टपणे उलगडून दाखविला आहे.

व्यक्ति व समाज यांचे अतूट नाते विशद करताना श्री. कृष्णमूर्ति म्हणतात, 'व्यक्ति ही मुख्यतः सामूहिक (Mass) स्वरूपाची असते. व्यक्तीनेच समाजाची निर्मिती केलेली असते. व्यक्ति व समाज यांचे परस्पर संबद्ध असतात. व्यक्ति हीच समाजाची रचना करीत असते; तसेच समाजही व्यक्ति-जीवनाला वळण देत असतो. परिस्थिति जरी व्यक्तीला संस्कारबद्ध करीत असली तरी परिस्थितीपासून स्वतःची मुक्तता करून घेणे व परिस्थितीच्या बंधनाचे पाश तोडून टाकणे हे व्यक्तीला केव्हाही शक्य असते. आपल्या संस्कारबद्धतेतून (Conditioning) स्वतःला विमुक्त करण्याची व सत्य आकलून घेण्याची क्षमता व्यक्तींमध्ये असते म्हणूनच व्यक्ति ही अधिक महत्त्वाची ठरते. (जीवन भाष्ये - पृष्ठ ११६) व्यक्तींचं सार्वभौम स्वातंत्र्य श्रीकृष्णमूर्तींना अभिप्रेत आहे. व्यक्तीचा भूतकाळ कितीही अंधःकारमय असला तरी आपल्यात आमूलाग्र परिवर्तन घडवून आणण्याचे सामर्थ्य व्यक्तींत असते ही विजिगीषु दृष्टि श्री. कृष्णमूर्ति व श्रीबाबामहाराज या दोघांच्या तत्त्वज्ञानांत आहे. श्रीबाबांनी असे स्पष्टच केले आहे की, व्यक्तीचे दिव्यत्व समाजाचा उद्धार करते. समाजासह दिव्यता घडावी यासाठीच भक्तीचे निर्माण आहे.

## २. मन

व्यक्ति-जीवनात दिव्यता येण्यासाठी निकोप मनाची आवश्यकता आहे. मनाच्या निकोपपणावर भर देताना श्रीबाबामहाराज म्हणतात, 'प्रभुप्राप्तीचे अनंत उपाय आहेत. सकल उपायांचे अधिष्ठान मनाचे निकोपपण व सबलपणच असते. त्यासाठी मनाचा सडका व कुजका भाग निरिक्षित करून कापून काढला पाहिजे. मन निर्मळ भावांचा प्रवाह बनले पाहिजे. मन जोपर्यंत स्वभावरूप निर्मळ होत नाही तोपर्यंत उपासना व साधना राहोच पण जीवनही सुखास्वादीय करता येणार नाही. परंतु यासाठी मन ताब्यात घ्यायचे नाही. कारण ते मनरूपात ताब्यात असणेच संभवत नाही. तो एक उदासवाणा व दुःखदायी प्रयोग ठरतो. या प्रयोगाने बलात्कारी व दुराग्रही स्वभाव बनून, जगाचे प्रेममय सूत्र तोडण्याचे पातकी कर्म मात्र घडते. मन ही ज्याची प्रगट अवस्था आहे त्या आत्मरूपाला आपल्या आत्मभावनेत प्रगट होऊ देण्याचे केले पाहिजे. आपल्या अहंकाराने मन प्रेरित न करता ते प्रभूच्या प्रेममय शुद्ध भावाने स्फुरित होऊ देणेच श्रेयाचे ठरते.' (मनोपदेश - पृष्ठ ४).

मन जबरदस्तीने किंवा हटवादीपणाने ताब्यात घ्यावयाचा प्रयोग श्री. कृष्णमूर्तींनाही पसंत नाही. ते म्हणतात, 'मनातील विचारांचे वा प्रवृत्तीचे जबरीने निरोधन (Suppression) करणे हा त्याला जिंकण्याचा किंवा त्याच्यावर स्वामित्व मिळविण्याचा एक प्रकार आहे. जी गोष्ट एकदा जिंकली ती पुनः पुन्हा जिंकीतच राहावी लागते. काहीही जिंकण्याची

अभिलाषा धरणे म्हणजे अधिकाधिक संघर्षालाच (Confliction) जन्म देणे होय. कोणत्याही अनुशासनात (यम, नियम) जबरदस्ती वा दडपण हेच अभिप्रेत असते. जेथे जेथे जबरदस्ती असते, तेथे तेथे भीती ही असणारच. इकडे साध्य तर प्रेमरूप असते. मग भीतीतून प्रेम उदयास येणे कधीतरी संभवनीय होईल का ? जेव्हा भीति ही कोणत्याही स्तरावर उरत नाही, तेव्हाच प्रेम उदय पावत असते. जेव्हा विचारांचा अभाव घडू लागतो तेव्हाच मन रिते होते. येत असलेल्या प्रत्येक विचाराचे (Thought) अक्रिय सावधानतेने अवलोकन (Passive awareness) करीत राहिलो, तरच विचारांचा अंत घडून येतो. अशा या सावधान अवस्थेत निरिक्षक (Thinker) नसतो. गुणदोष निर्णायकही (Analyser) नसतो. तेथे केवळ अनुभवणे (Experiencing) उरते. अशा अवस्थेत निःस्तब्धता (Silence) नांदत असते. या प्रशांततेत सत्य प्रवेश करते. ते कालातीत असते अनंत असते. (जीवनभाष्ये - पृष्ठ ३५)

## ३. धर्म

धर्माबाबत आज जगात बऱ्याच गैरसमजुती आहेत, धर्माचे स्वरूप सांगताना श्रीबाबा म्हणतात, 'धर्म म्हणजे केवळ कर्मकांड नव्हे, धर्म म्हणजे केवळ कथा-कीर्तन, पुराणे ऐकणे वा वाचणे नव्हे, धर्म म्हणजे दुसऱ्याला भीक घालणे नव्हे, धर्म म्हणजे केवळ शंख, घंटा, तुताऱ्या वाजिवणे नव्हे, धर्म म्हणजे जातीय दैशिक वृथाभिमान नव्हे, धर्म म्हणजे केवळ तीर्थे, व्रते व नेम करीत राहाणे नव्हे; धर्म म्हणजे दगडांच्या देवांना पुजणे व पशुबलिदानाचे समारंभ नव्हेत, धर्म म्हणजे स्पृश्यास्पृश्य व सोवळे-ओवळे नव्हे, धर्म म्हणजे सर्वांच्या सुखाचा समप्रज्ञभाव धरणे होय. धर्म म्हणजे जीवनाचे यथार्थ स्वरूप जाणून उच्च स्तरावर जीवन दिव्यतेने नटविण्याची व्यवस्था होय. धर्म म्हणजे आदर्श जीवन घडविणे होय. जीवनाचे शाश्वत मूल्य काय, जीवनाचे सामर्थ्य म्हणजे काय, दिव्य जीवन कोणते व दिव्यसुखे कशी मिळवावी या संबंधात समाजाच्या प्रत्येक घटकास यथार्थ व स्पष्ट कल्पना देण्याचे काम धर्म करतो. म्हणून समाज सुव्यवस्थित राहावयाचा असेल तर शास्त्र व धर्म यांचे अनुशासन महत्त्वाने स्थिर झाले पाहिजे. (दिव्यामृतधारा - भाग २ पृष्ठे ५३१, ५३२)

श्री. कृष्णमूर्ति धर्माबाबत भाष्य करताना असेच मूलभूत व व्यापक विचार प्रगट करतात. ते म्हणतात, "धर्म हा एक पवित्रतेचा, दयेचा व प्रेमाचा भाव आहे. मनुष्याला द्वेष, महत्त्वाकांक्षा व सत्तेची अभिलाषा यांपासून मुक्त ठेवणारा तोच धर्म होय. दया हे धर्माचे मूळ आहे. जगातील हे जे मूलभूत वास्तव-सत्य अधिष्ठान आहे त्यावर प्रेम करण्यास धर्म शिकवितो. धर्म म्हणजे काही विशिष्ट संकल्पना, (dogmas) संस्कार किंवा अंधश्रद्धा नव्हे. धर्म म्हणजे व्यक्तिगत मुक्तीची आत्मकेंद्रित वृत्ति नव्हे. तर धर्म हा सर्वांगीण जीवनाचा एक वास्तव मार्ग आहे. मानवी मनाच्या कल्पना दूर सारून जगातील यथार्थ सत्य वस्तूचे ज्ञान करून देतो तो धर्म होय." (Commentries on Living Third Series) यामधील विचारांचे मराठीकरण) धर्माबाबत श्रीबाबा व श्री. कृष्णमूर्ति यांनी केलेले हे विवेचन आजच्या धार्मिक जगताला मार्गदर्शक असेच आहे. हे समजून घेतल्यानेच धर्म- विचारांबाबत आज दिसून येत असलेला संकुचित भाव, निरनिराळ्या धर्मानुयायींमध्ये दिसून येत असलेले वैमनस्य व संप्रदायाभिमान या सर्व गोष्टी दूर करता येतील.

## ४. मुक्ति

धार्मिक जगतात सर्वत्र 'मुक्ति' या शब्दाच्या कल्पनेने मोठा प्रभाव पाडलेला दिसतो. पण या मुक्तीचे यथार्थ स्वरूप काय ? या संबंधात श्री. कृष्णमूर्ति व श्रीबाबा यांनी केलेले विवेचन लक्षात येण्यासारखे आहे. श्रीबाबा आपल्या 'दिव्यामृतधारा' ग्रंथांत (भाग - १ पृष्ठ १८६) सांगतात, "मुक्त स्थिति व बद्ध अवस्था ही अज्ञानाचीच सापेक्ष अंगे होत. 'मुक्त' ही जाणीव बंधनासच कारण असते. कारण 'मी' पणाच्या प्रथम स्पंदनेने सर्व बंधनात्मक वृत्तींचा प्रसव केला आहे. म्हणून 'मी' ची मुक्त जाणीव ही धोक्याचीच जागा आहे... मुक्तीचीही जाणीव नष्ट होणे या अवस्थेकडे गेले पाहिजे. जेथे द्वंद्व मिटते तीच खरी मुक्ति. मोक्षार्थ परमार्थ हा संतांचा बोध नव्हे... बंधनाच्या सर्व अवस्थांतून जीव सुटणे हीच परिपूर्ण मुक्ति होय. मुक्तपुरुष स्वरूपस्थिति पावतो. स्वसंवेद्य असा तो सारे चराचर आपल्याच अंगभूत कसे हे उमगतो."

श्री. कृष्णमूर्ति मुक्तीबाबत बोलताना मन विमुक्त असण्याचा आग्रह धरतात. ते म्हणतात, "विमुक्त होण्याची अभिलाषा ही कधीही विमुक्तता मिळवून देत नसते. मुक्त होण्याची अभिलाषा (Desire) व मुक्तीसाठी केला जाणारा प्रयत्न, हेच मुक्तीच्या मार्गातील मोठे अडथळे असतात. जे जे साठविले जाते, मग ते ज्ञानाच्या स्वरूपात असो वा अनुभवाच्या रूपात असो, ते ते विमुक्ततेला अखंडपणे प्रतिबंध करीत असते. जेथे विमुक्तता (Freedom) असते, तेथेच सत्य अवतरते.

## ५. भक्ति

आजच्या समस्त धार्मिक जगास व्यापून असलेल्या भक्तिकल्पनेचे यथार्थ व शुद्ध स्वरूप समजून घेणे अत्यावश्यक होऊन बसलेले आहे. कलियुगात भक्तिपंथालाच प्राधान्य कसे आहे, भक्तिशिवाय समाज, राष्ट्र यांचा उद्धार होणे शक्य नाही याचे भरपूर विश्लेषण आज आपण करीत असतो. तेव्हा या भक्तिविचारांचे मूलभूत स्वरूप काय आहे हे लक्षात घेणे हिताचेच आहे. श्रीबाबा महाराज या भक्तिबाबत लिहितात, "भक्ति ही शुद्ध चित्तात निर्माण झालेली ईश्वरानुरागिणी हृदयकला आहे. भक्तीत सेवेचे नाटक, कारुण्याचे लाघव, भावांचे प्रदर्शन, प्रेमाचा दंभ यांना स्थान नाही. प्रेमाचा सगर्भ संवेगच भक्तीत वर्तत असतो. भजनात करुणरसाचे नाट्य साधणे ही दंगता नव्हे. प्रवचनांत हावभावांनी प्रभुप्रेमाने अश्रु गाळण्याचे लाघव करणे ही हरिनिष्ठा नव्हे... भक्तीत मुख्य प्रेमच आहे. काही लोकांचा भक्तिपथावरील कर्मकांडाचा दुराग्रह हे तर शुद्ध ढोंगच असते...कर्माचे स्तोम भक्तीत माजविणे आवश्यक नाही. कर्मठ आळ्यताखोर लोक भक्तीचे आदर्श कधीच नव्हते व असू शकत नाहीत. भक्तिमार्गात सोडीबाधी करणे हा विशेष महत्त्वाचा विषय नव्हे... विश्वाकार जीवाजीवांच्या भेदरहित अवस्थेस निसर्गाच्या भव्योदात्त प्रासादांत नांदविणारी ईशकला म्हणजे भक्ति. भक्ति ही सकल विश्व सर्वांगीण प्रगतीने निःश्रेयसाकडे येणारी उज्ज्वल वाट आहे. भक्त सर्व प्राणिमात्रांमध्ये आपल्यालाच जाणतो. तो आत्मभावे तोषला व प्रेमभावे मुरला अशा निगूढ ईश्वरप्रेमांत अवस्था घेऊन शांत असतो... तो भक्तिसुखाने इतका समृद्ध असतो की जगात त्याच्यासाठी दुःखाचे कारणच उरत नाही. या पुरुषाचा विश्वसंचार प्रेमाची उर्मि घेऊनच असतो. भक्तीचे अमृत जो प्याला तो बढिया वीर असतो."

भक्ताची सहजस्थिति, भक्तीचे वास्तव स्वरूप श्रीबाबांनी आपल्या अमोघ वाणीने स्पष्ट केले आहे. श्री. कृष्णमूर्ति यांनीही भक्तीच्या वास्तवतेवरच भर दिला आहे व या वास्तवतेपासून दूर जाण्याची कोणतीही क्रिया ही भक्ति असत नाही असे सूचित केले आहे. याबाबत ते प्रश्न करतात. "भक्ति आपल्या दैनंदिन जीवनाहून वेगळी वस्तु आहे का ? भक्ति म्हणजे एखाद्या वस्तूसाठी, विशिष्ट कर्मासाठी, ज्ञानासाठी करण्यात येणारी कृति आहे का ? ('जीवनभाष्ये' पृष्ठ ५७) या गोष्टी म्हणजे भक्ति नव्हे असे त्यांना सांगावयाचे आहे. वास्तवापासून दूर पळणे ही भक्ति नसून भ्रम असल्याचे सांगून, वास्तवाचे यथार्थ आकलन करून घेतले पाहिजे असे श्री. कृष्णमूर्तींचे म्हणणे आहे. त्यासाठी त्यांच्या मते, "मन शांत, निःस्तब्ध झाले पाहिजे. या स्थितीत 'जे आहे' (What is) त्याच्या गर्भातील सत्य (Truth) आपोआप प्रगट होते. हेच ते वास्तवगीत व त्यांत मी-तू भाव उरत नाही. तेथे त्या शाश्वताची निःशब्दताच फक्त नांदत असते. हे गीत ध्वनिलहरींचे गीत नसते. ते निःस्तब्ध गीत असते."

## ६. विश्वैक्यता

पौर्वात्य व पाश्चिमात्त्य असे वर्गीकरण करण्यात कोणतेही मूलभूत तत्त्वज्ञान नसल्याचे सांगून श्रीकृष्णमूर्ति म्हणतात, 'पूर्वेकडे काय किंवा पश्चिमेकडे काय, माणसांना सुख-समृद्धि हवी असते. शांतता हवी असते. विचार हा पौर्वात्यही नाही व पाश्चिमात्यही नाही. पण मनुष्य मात्र आपल्या विशिष्ट संस्कारानुसार तसे दोन भाग पाडीत असतो. प्रीति ही काही भौगोलिक क्षेत्रावर अवलंबून नसते. माणसामाणसामध्ये भेद आर्थिक कारणासाठी पाडले जातात. याचा अर्थ असा नव्हे की, माणसामाणसांत प्रवृत्तींचे व इतर प्रकारचे भेद नसतात. पण मानवामध्ये एक प्रकारचा सारखेपणाही आहे, व तरीही त्यांच्यांत भेद देखील आहे. या भेदाची जाणीव ठेवूनही उभयतांमध्ये मानवनिष्ठ असा सारखेपणा आहे. पाश्चात्यांचे व पौर्वात्यांचे जीवनाविष्कार वेगळे असतीलही पण बाह्य आविष्कारांमागील प्रेरणा, प्रवृत्ति, दडपणे, अभिलाषा आणि भीति उभयतांना समान असते. शाब्दिक भेदांनी फसवणूक होते. ईश्वराविषयीचे व सत्याविषयीचे प्रेम आणि मानवी मनाची विमुक्तता या गोष्टी काही सहजपणाने येत नसतात. पण त्यांच्यावाचून भौतिक सुखसमृद्धीला सार्थकता कधी लाभत नाही.' (जीवनभाष्ये - पृष्ठ २६९)

माणसामाणसांतील प्रवृत्तींचे भेद 'वर्ण' या संज्ञेने विशद करताना श्रीबाबामहाराज म्हणतात, 'वर्ण ही देशातीत, ज्ञातिरहित अशी अधिकारदर्शक संज्ञा आहे. वर्ण ही निसर्गप्रेरणा आहे. वर्ण हा स्वयं सर्वत्र सामान्य प्रवर्तणारा जीवसृष्टीचा एक नैसर्गिक अधिकारदर्शन मात्र आहे. वर्णविचार हा तत्त्वनिष्ठ व देशरहित दशेचा जागतिक विचार आहे. भक्ति ही भारताच्या ओवरीत खेळणाऱ्या बाहुलीची करामत नव्हे. तर विश्वाकार जीवाजीवांच्या भेदरहित अवस्थेस निसर्गाच्या प्रासादात नांदविणारी ईशकला आहे. वर्णाधिकार ना कोणत्या जातिजमातीच्या मोहोरबंद पुडक्यांतून लाभतो, तर तो कर्मतःच प्राप्त असतो. वर्ण हे विश्वमानवाच्या गुणकर्मदर्शने मानवी जीवनाचा आकार घेऊनच जन्मतात. म्हणूनच भक्ति सर्व देशांत खेळली. जगांतील कोणत्याही भागांतील कोणताही जीव असो, तो त्रिगुणात्मक कर्मसृष्टीचाच घटक ठरतो.' (दिव्यामृतधारा भाग २, पृष्ठ ५२३)

## ७. प्रेम

प्रेमाचे रहस्य उकलून दाखविताना श्रीबाबा म्हणतात, 'प्रेमाचा दिव्य साक्षात्कार म्हणजे आत्मानुभूति. प्रेमाशिवाय जी स्थिति ती अज्ञानविवश असून काम, राग, द्वेष, असूया, मत्सर इत्यादी विकारी ज्ञानाचीच ती प्रचीति असते. प्रेम ही अनुभूति वा ऊर्मि ज्ञानाच्या आधीची आहे. प्रेमाशिवाय उपासना नाही व उपासनेशिवाय ज्ञान नाही. मानवी वृत्तीचा असाच निसर्गक्रम असल्यामुळे 'प्रेम' हे सर्व अनुभवांचे आदिबीज ठरते. आधीच असलेले प्रेम काही निमित्ताने प्रगत होते. प्रेम ही वस्तु निर्माण होत नाही.' (दिव्यामृतधारा भाग १ - पृष्ठ ३३७)

प्रेमाबाबत श्री. कृष्णमूर्तिही अशाच प्रकारचे हितगुज करताना दिसतात. ते म्हणतात, 'प्रीति करणे म्हणजे सर्व काही अनुभविणे. पण प्रीतिवाचून काहीही अनुभवणे म्हणजे मात्र जीवन व्यर्थ घालविणे होय. प्रीति ही नेहमी जीवनाभिमुख असते. अशा जीवनाभिमुखतेवाचून काहीही अनुभवणे म्हणजे आपल्या केवळ व्यक्तिगत अभिलाषेला बळ मिळवून देणे होय. अभिलाषा म्हणजे प्रीति मुळीच नव्हे. अभिलाषा लवकरच रिती होऊन जाते. अभिलाषेला मर्यादित ठेवणे हे केवळ प्रीतीलाच शक्य असते. पण प्रीति ही केव्हाही मनाच्या कक्षेत येणारी नसते. ती मनाच्या पार असते. प्रीति ही कोणत्याही साधनाने प्राप्त केली जाऊ शकत नाही. (जीवनभाष्ये पृष्ठ १३४)

## ८. ध्यान

पारमार्थिक जगांत 'ध्यान' ही संज्ञा वा ध्यान करणे याबाबतच्या जाणिवा फारच विपरीत झालेल्या दिसतात. म्हणून हे दोन थोर तत्त्वज्ञ ध्यानाविषयी काय म्हणतात ते आपण पाहू. श्री. कृष्णमूर्ति ध्यानाबाबत आपल्या 'जीवनभाष्यांत' (पृष्ठ २४०) म्हणतात, 'ध्यान म्हणजे सर्व प्रकारच्या बंधनाचा छेद. ध्यानावस्था ही मुक्त अशी अवस्था होय. पण ती कशापासून तरी मिळणारी मुक्ति नव्हे. किंबहुना अनुभवित्याचा (Experiencer) अंत घडून येणे म्हणजेच ध्यान. हा अनुभवित्याचा अंत जाणीवपूर्वक घडवून आणता येत नाही. जाणिवेच्या साहाय्याने जर अंत घडवून आणला तर त्यामुळे इच्छाशक्तीलाच बळ प्राप्त करून दिले जाते. अभिलाषेच्या पोटीच वंचना, आभास यांची निर्मिती होते. मन हे काहीतरी प्राप्त करून घेण्याचा मार्ग शोधीत असते. काहीतरी मिळविणे, साध्य करणे किंवा काहीतरी टाळणे या प्रकारच्या भाषेतच मन विचार करू शकते. विचार हाच बंधनकारक असतो. विचार हा विचाराचा अंत कधीच घडवून आणू शकत नाही. त्यासाठी अनुभवणारा, निवड करणारा 'अहं' नाहीसा झाला पाहिजे. पारितोषिकाची (Reward) कोणतीही आशा न बाळगता स्वेच्छेने अहंची जाणीव नाहीशी झाली पाहिजे. इच्छाशक्तीचा अंत होतो तेव्हाच निःशब्दता उदय पावते व हेच 'ध्यान' असते.'

ध्यानाबाबत निराळ्या शब्दांत श्रीबाबाही हेच गुपित प्रगट करतात. ते म्हणतात, 'सर्वेंद्रियांतील फक्त शुद्ध चैतन्याचेच मीलन 'मी' शी घडविणे हाच ध्यान प्रयोग होय. 'मी ध्याता' व 'मला हवे' या दोन भावनांमुळे, परमात्मा एके ठिकाणी एकपणे प्रगटू शकत नाही. कारण ध्यात्यानेच त्याला त्रिविध केलेले असते. ध्याता जर वृत्तिरूप असेल तर ब्रह्मही वृत्त्याकार होते. म्हणून ध्यान करताना ध्याता 'अहं' जागा न करतां ध्यान करावे. ध्यान हे मनबुद्धिसारखे साधन वा करण नव्हे, तर ती एक प्रक्रिया मात्र आहे.'

'एकं सत् विप्राः बहुधा वदन्ति' याचा अनुभव जगातील श्रेष्ठ तत्त्वचिंतकांच्या साहित्याचा यथार्थ बोध घेतल्यास कुणालाही आढळून येण्यासारखा आहे. अशा अर्थाचे, श्रेष्ठांचे विचार काहीही पूर्वग्रह न ठेवता अभ्यासिले जाणे अत्यंत आवश्यक आहे. कोणत्याही प्रकारचा अभिनिवेष धारण न करता सत्याचे समालोचन करणे ही आजची एक फार मोठी गरज आहे. आपल्या सर्व शास्त्रांचा व साधु-संतांच्या तत्त्वज्ञानाचा असा सापेक्षी व निरपेक्ष अभ्यास, धार्मिक जगांतील गढूळपणा नाहीसा करण्यास निश्चितच उपयोगी पडेल. त्यांतून धार्मिक जगतांत एकता व सामरस्य निर्माण होईल. निरनिराळ्या भेदांच्या तटबंदी त्यामुळे कोसळून पडतील व एकरस नि एकसंघ जीवन निर्माण होईल.

**श्री. श्री. के. पुसाळकर**
३/७७ सागर सोसायटी, माहीम कॉज-वे, माहीम, मुंबई ४०००१६

***भक्तीची व्याख्या करता येत नाही. भक्ताच्या प्रत्येक कर्मात भक्ती प्रगट होत असते. भक्ती ही सहज व स्वाभाविक असते. ती उत्स्फूर्त असते. तुकोबा म्हणतात, 'भक्ति ते नमन।' याचा अर्थ असा की, मनरहित जी क्रिया तिचे नाव भक्ती! 'मन' म्हणजे 'मी'! म्हणून मी-रहित, संकल्परहित क्रिया ती सारी भक्ती!***

## सद्गुरु चरणचि...

सद्गुरु चरणचि वाटे जीवन ।
नच उरले मज काहीच त्याविण ।। धृ. ।।

मम प्राणाचा एक विसावा ।
जगती माझा सुखधन ठेवा ।
चरणांकित सुखसागरी त्या ।
त्याविण सुख हे मजसी निर्धन ।।१।।

उफाळत्या भवसिंधूवरती ।
सद्गुरू नौका माझी नेती ।
भीती हरली विरली माया ।
हळूहळू उगवे माझे मन्मन ।।२।।

मम हृदयीचा प्राणसखा तो ।
मन्मन शमण्या हळूचि शिरतो ।
पाहुनि त्याला सुख मनी वाटे ।
त्याविण माझे निष्प्रभ जीवन ।।३।।

चरणी त्यांचे भाव दृढावे ।
वाटे एकचि पायी बसावे ।
अन्य न उरले मजला जगती ।
मीपण झाकुनि येई स्थिरपण ।।४।।

**— श्रीसंत बाबामहाराज**



# 'दिव्यामृतधारा' : भक्तियोगाचे एक अपूर्व दर्शन


**कै. डॉ. व. दि. कुलकर्णी**

*एम.ए. पीएच.डी. १६ वर्षे २ महाविद्यालयांत प्राध्यापक. निवृत्त विभाग प्रमुख, मुंबई विद्यापीठ १२ वर्षे. ग्रंथसंपदा – समीक्षा-महानुभाव पंथ, अर्वाचीन वाङ्मय इतिहास, चरित्र, आत्मचरित्र इत्यादी. पुरस्कार – महाराष्ट्र राज्य ग्रंथ पुरस्कार, इचलकरंजी फाऊंडेशन, अखिल भारतीय महानुभव परिषद, मुंबई. मराठी साहित्य संघ, महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, मराठी ग्रंथालय पुणे, कालिका प्रकाशन, मडगाव, याज्ञवल्क्य आश्रम पुणे इ. संत वाङ्मयाचे अध्ययन करून महाराष्ट्रात ठिकठिकाणी व्याख्यानमाला गुंफल्या.*


श्रीमद् भगवद्गीतेवर वेगवेगळ्या कालखंडात वेगवेगळ्या तत्त्ववेत्त्यांनी, संत-सज्जनांनी आणि विविध क्षेत्रांतील अभ्यासकांनी भाष्ये लिहिलेली आहेत. मराठीतील अशा भाष्य ग्रंथांत 'श्रीज्ञानेश्वरी' हा ग्रंथ मानाने पहिला आहे. मराठी भागवत-संप्रदायामध्ये हा 'ग्रंथ-गुरुरावो' नित्य वाचन-पठणात असतो. वारकरी संप्रदायामध्ये श्रीज्ञानेश्वर माउली ही पंढरीच्या 'विठो-माउली' इतकी वंद्य-पूज्य मानली जाते. ज्ञानेश्वर-माउलीच्या अमृतवाणीला वेदोपनिषदांइतका मान दिला जातो.

ज्ञानेश्वरीची भाषा यादवकाळातली म्हणजे तेराव्या शतकातील असल्याने आज भाषादृष्ट्या ती कळायला कठीण जाते; त्यामुळे अनेक सांप्रदायिकांनी आणि अभ्यासकांनी आपापल्या पद्धतींनी अर्थ लावून 'सार्थ ज्ञानेश्वरी ग्रंथ' प्रकाशित केले आहेत. काहींनी अशा ग्रंथांना विस्तृत प्रस्तावना लिहिल्या आहेत व तींमध्ये श्रीज्ञानेश्वरांचे चरित्र, त्यांचे तत्त्वज्ञान, त्यांचा कुंडलिनी-योग इत्यादी विषयांचा ऊहापोह केलेला आहे. ज्ञानेश्वरीचे जे अध्याय महाविद्यालयीन व विद्यापीठीय अभ्यासक्रमांत समाविष्ट केले जातात, त्यांच्यावर टीपा - टिप्पणी लिहिल्या जातात. त्यांतून तत्त्वज्ञानापेक्षा शब्दार्थनिर्णय, अलंकार, भाषाशैली, काव्यसौंदर्य इत्यादींचे विवेचन विशेषत्वाने केलेले आढळते.

ज्ञानेश्वरीचा अभ्यास वेगवेगळ्या दृष्टिकोणांतून करण्यात आलेला आहे. ज्ञानेश्वरीतील तत्त्वज्ञान, ज्ञानेश्वरीतील नीतिशास्त्र, ज्ञानेश्वरीचे काव्यसौंदर्य इत्यादी विशद करणारे स्वतंत्र ग्रंथ लिहिले गेले आहेत. ज्ञानेश्वरीच्या वाङ्मयीन रूपासंबंधीही प्रसंगपरत्वे लेखन होत राहिलेले आहे; पण त्यात एकवाक्यता नाही. 'ज्ञानेश्वरी हा एक स्वतंत्र तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ असून, त्याने भारतीय तत्त्वज्ञानात मोलाची भर घातली आहे' - असे एक मत; तर 'ज्ञानेश्वरी लिहिताना ज्ञानेश्वरांची भूमिका प्रतिभाशाली कवीचीच होती; ती तार्किकाची अथवा तत्त्वज्ञानाची नव्हती.' - असे दुसरे मत; 'ज्ञानेश्वरी हे ना तत्त्वज्ञान, ना काव्य.' हे आणखी एक मत. एवंच श्रीज्ञानेश्वर हे केवळ कवी ? केवळ तत्त्वज्ञ ? की तत्त्वज्ञ कवी ?' असे प्रश्न अभ्यासकांपुढे येतात; येत आले आहेत.

श्रीज्ञानेश्वर हे साक्षात्कारी 'संत' होते आणि ते साक्षात्कारी 'संत-कवी' होते. ज्ञानेश्वरी हे त्यांचे श्रीमद्भगवद्गीतेवरील प्रतिपद-भाष्य आहे. हे भाष्य केवळ अर्थविवरण करणारे आणि तत्त्वज्ञान विशद करणारे बौद्धिक स्वरूपाचे भाष्य नाही. श्रीज्ञानेश्वर महाराज आपला भगवद्गीतेचा अनुभव शब्दरूपातून साकार करतात. 'ज्ञानेश्वरी'त भगवान श्रीकृष्ण आहेत आणि भगवान श्रीज्ञानेश्वरही आहेत. भगवान श्रीकृष्णांनी जे गायले ते श्रीज्ञानेश्वरांनी आपले केले आणि गायले. आपला गीतानुभव असा गायला की तो पंचज्ञानेंद्रियांना आस्वाद्य व्हावा, डोळ्यांना दिसावा, कानांना ऐकू यावा, त्वचेला त्याचा स्पर्श जाणवावा, नासिकेला सुगंध यावा, जिव्हेला त्याचे रसमाधुर्य जाणवावे ! गीता-रस चाखण्यासाठी पंचज्ञानेंद्रियांमध्ये चुरस लागावी; त्यांच्यात गोड कलह व्हावा, असे हे रसोत्कट काव्यरूप झालेले भाष्य आहे. ज्ञानेश्वरी हे श्रेष्ठ भाष्यकाव्य आहे; ते एक थोर 'दार्शनिक महाकाव्य' (Spiritual Epic) झालेले आहे ! ज्ञानेश्वरीची प्रतीती 'दार्शनिक महाकाव्य' म्हणूनच येते !

ज्ञानेश्वरी हे चिद्विलासवादाचे केवळ सालंकृत पंडिती मंडन नाही, तर ते इंद्रियांकरवी भोगावे, असे चिद्विलासाचे 'रूपडे' आहे. काव्य हे येथे एक साधन किंवा वाहन म्हणून आलेले नाही. 'समग्र ज्ञानेश्वरी' हा एक एकजिनसी अनुभव देणारा काव्यग्रंथ आहे. त्यातील वरवर अ-काव्यमय वाटणारी स्थळे, या एकजिनसी अनुभवात मिसळून जाताच, आपले गद्य-सदृश रूप गमावून बसतात. ज्ञानेश्वरीतील काव्यमय व अ-काव्यमय स्थळे निवडून वेगळी काढण्यात तथ्य नाही. समग्रतेनेच अशा काव्यग्रंथाचा एकात्मक अनुभव घ्यावा लागतो. तो एक 'गेस्टॉल्ट' असतो. प. पू. बाबा महाराज आर्वीकर यांचा 'दिव्यामृतधारा' हा ग्रंथ श्रीज्ञानेश्वरीची एकसंघता किती सहजतेने व्यक्त करीत आहे, ते पाहाण्यासारखे आहे.

'दिव्यामृतधारा' ही ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायावरील प्रतिपद-टीका आहे. ज्ञानेश्वरी ही श्रीमद्भगवद् गीतेवरील प्रतिपद-टीका; तर 'दिव्यामृतधारा' ही 'ज्ञानेश्वरी-अध्याय बारा' वरील प्रतिपद-टीका होय ! ज्ञानेश्वरीवरील प्रतिपद-टीका अशी ही पहिलीच ! किंबहुना ज्ञानेश्वरीवर प्रतिपद-टीका करावी, अशी टीका करणे आवश्यक आहे, असे या आधी कोणालाही जाणवले नव्हते. नंतरही आजवर अशी दुसरी टीका झालेली नाही. ज्ञानेश्वरीतील प्रत्येक पद हे सार्थ, सहेतुक, स्वतःचे निश्चित प्रयोजन व कार्य घेऊन आलेले आहे आणि ते आपले कार्य ते निश्चितपणे बजावणारे आहे, असे आत्मविश्वासाने कोणी सांगू लागले, तर ते खरे वाटणे, प्रथमदर्शनी तरी, शक्य होत नाही. 'दिव्यामृतधारा' या ग्रंथातील प्रतिपद भाष्य वाचले की, मग मात्र पटते की ज्ञानेश्वरी समजायची असेल, तर तिच्या प्रत्येक पदाचा अर्थ, त्याचे अंतरंग, त्यातील संकेत, त्याचा तत्त्वज्ञानात्मक आशय, भक्तीपर आशय, काव्यमय आशय आपणास सुस्पष्ट झाला पाहिजे. एकदा नव्हे, तर पुनः पुन्हा, दर वाचनाच्या वेळी, चढत्या वाढत्या श्रेणीने तो कळत गेला पाहिजे. ज्ञानेश्वरीतील पदे किती अर्थभरित आहेत, ती समुद्राहून खोल आणि गगनाहून वाड (मोठी) कशी आहेत, हे अनुभवल्याशिवाय व सतत अनुभवत राहिल्याशिवाय 'ज्ञानेश्वरी' ही आपलीशी होणारी काव्यकृती नाही. 'दिव्यामृतधारा'ही टीका आपणास

ज्ञानेश्वरीच्या गाभाऱ्यातच घेऊन जाते व ज्ञानेश्वरीची उराउरी भेट घडविते.

'दिव्यामृतधारा'मधील भाष्यपद्धतीने स्वरूप अगदी वेगळे आहे. ज्ञानेश्वरीतील ओव्यांचा तो आधुनिक मराठीत दिलेला केवळ सरलार्थ नाही की, त्यांतील शब्दार्थांची केवळ व्याकरण-व्युत्पत्तिदृष्ट्या केलेली चिकित्सा नाही. 'दिव्यामृतधारा' हे ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायावरील एक 'प्रगत दर्शन' आहे. बाबा महाराजांना ज्ञानेश्वरी हा काव्यग्रंथ कसा प्रतीत होतो ? ज्ञानेश्वरी हे काव्य विश्व-कारुण्याने ओतप्रोत भरलेले आहे, ते जीवनतत्त्वज्ञानाने फुलारलेले आहे; ते आदर्श अनुभव फळांनी लवलेले आहे व समयोचित इतिहास-भूगोल यांची वास्तवता प्रगट करणारे, असे परिपूर्ण स्थितीचे काव्य आहे, ही बाबा महाराजांची प्रतीती आहे. यामुळे 'भावार्थदीपिका' या ज्ञानेश्वरीच्या पर्यायी नामाभिधानातील सारा आशय आणि सौंदर्य प्रगट करण्याकडे बाबा महाराजांचे सतत लक्ष लागून राहिलेले दिसते. 'ज्ञानेश्वरी' या नावात जरी ज्ञानाचे मोठेपण गौरवलेले असले, तरी 'भावार्थदीपिका' या पर्यायीरूपात ज्ञानेश्वरांचे भावपूर्ण अंतःकरण आणि 'कारुण्य-रूप' अभिव्यक्त झालेले आहे, हे बाबा महाराजांना जाणवते. ज्ञानेश्वरी ही ज्ञानविलासिनी असली, तरी ती भक्तीची अभिमानी आहे, हे अनुभवल्याने बाबा महाराजांच्या या प्रगत-दर्शनामध्ये, ज्ञानेश्वरीतील भक्तिमार्ग, त्यांची विश्व-कारुण्याची वृत्ती आणि अखिल प्राणिमात्रांवरील प्रेम, यांना त्यांचे केन्द्रवर्ती स्थान यथायोग्य लाभले आहे.

'दिव्यामृतधारा' ही प्रतिपद टीका आहे, म्हणजे मूळ ज्ञानेश्वरी-ओवीतील एकेका पदावर (शब्दावर) केलेली ही टीका आहे. ह्या टीकेचे स्वरूप कसे आहे ? बाराव्या अध्यायाच्या पहिल्याच ओवीत, म्हणजे –

***जयजय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।***
***अनवरत आनंदे । वर्षतिये ॥ १२.१***

यामध्ये 'शुद्धे' हे जे पद आहे त्यावरील आपण बाबा महाराजांनी केलेले भाष्यरूप थोडक्यात पाहू. प्रथम ते 'शब्दार्थ' देतात. तो कोशगतच अर्थ असतो; नंतर त्या 'शब्दाचा संकेत' काय आहे ते सांगतात; म्हणजे शुद्ध शब्दाने पावित्र्याची, निर्मळतेची परमोच्च श्रेणी व्यक्त होते. कोणत्याही स्थळी, काळी किंवा कोणत्याही उपाधीत आपल्या स्वरूपाचा बोध स्वाभाविक करून देणारी जी दशा ती शुद्ध दशा, असा शब्दसंकेत येथे स्पष्ट केला जातो; यानंतर 'विवरण' येते. यामध्ये शब्दसंकेताला इतरप्रमाणे व अन्यत्र येणाऱ्या त्या शब्दाच्या समानार्थी उपयोजनांचे आधार दिले जातात. एवढेच नव्हे तर 'शुद्धे' या संबोधनार्थी विशेषणामध्ये सूचित होणाऱ्या अनेकविध अर्थाचेही विवरण केले जाते. उदा. 'शुद्धे' हा शब्द उद्धारकार्यार्थ उपयोजिला आहे. तेव्हा शिव-शक्ति-सामरस्याचा तो वाचक शब्द आहे. 'शुद्ध' म्हणजे 'शिव'; पण तो 'शुद्धा' असा स्त्रीलिंगी वापरून त्यात 'शक्ती'चा समावेश केला आहे. एकटा शिव हा अक्रिय होय. श्रीगुरू हे सक्रिय असतात; तेव्हा श्रीगुरूला 'शुद्धे' असे संबोधिताना शिव-भक्तिसामरस्य दर्शविणारेच विशेषण आवश्यक होते. अशा आशयाचे विवरण बाबा महाराजांनी केलेले आहे. याच्या जोडीला हे विशेषण गुरूला लाविले असल्याने, गुरू म्हणजे काय याचेही व्युत्पत्तिदृष्ट्या आणि शक्तिदृष्ट्या विवेचन—अनेक ग्रंथांधारे केले आहे आणि या आशयाच्या संदर्भात मग पाठचिकित्सा केली गेली आहे. 'सिद्धे' या पाठापेक्षा 'शुद्धे' हाच पाठ कसा योग्य, हे दर्शविले आहे आणि पुन्हा संपूर्ण बाराव्या अध्यायाच्या संदर्भात हा अर्थ निश्चित करून दाखविला आहे. बारावा अध्याय म्हणजे अकराव्या अध्यायातील विराट-पुरुषाची उपासनाच आहे. गुरुदेवांचे प्रतीक घेऊन या उपासना-अध्यायाला प्रारंभ झाला आहे. 'शुद्धे' या साभिप्राय विशेषणाने अव्यक्त व व्यक्त यांचे समावेशन सूचित करून उपास्य व उपासक यांचा संबंध ध्वनित केला आहे. या विवरणानंतर शेवटी 'शब्दछटा' येते. तीत दोन गोष्टी येतात. (१) या पदावरील झालेल्या भाष्याचे साररूप शब्दार्थच्छटांच्याद्वारे व्यक्त करणे, (२) या पदाचा पुढील शब्दाशी येणारा संबंध लावून दाखविणे. उदाहरणार्थ 'शुद्धे' या पदाचे पुढील 'उदारे' या पदाकडे जाण्याच्या दृष्टीने असणारे महत्त्व बाबा महाराजांनी विशद केले आहे.

अशा तऱ्हेने प्रत्येक पदावर शब्दार्थ, शब्दसंकेत, विवरण व शब्दच्छटा देत देत ही टीका सिद्ध होते. कधी कधी 'शब्दार्था'नंतर 'शब्दान्तरंग' ही स्वतंत्रपणे उलगडून दाखविला आहे. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायातील अशा स्वरूपाचे प्रतिपदभाष्य म्हणजे प्रस्तुत 'दिव्यामृतधारा' हा ग्रंथ होय. ह्या 'प्रगत दर्शना'त अर्थनिर्णय, पाठचिकित्सा तर येतेच, पण ती मूळ तत्त्वज्ञानाच्या, संप्रदायाच्या संदर्भात तपासून घेऊनच केलेली असते; म्हणजे 'शब्दसंकेत' अशा तऱ्हेने निश्चित केला जातो. यामुळे ही टीका भक्ति-संप्रदायाला धरून असते, मात्र तिच्या मागे-पुढे आत्मानुभवी आणि चिकित्सक दृष्टी सदैव जागती असते.

बाबा महाराज यांचे भाष्य हे एक 'प्रगतदर्शन' कसे आहे, हे पदोपदी दिसून येते. वानगीदाखल बाराव्या अध्यायातील तिसरी ओवी घेऊ.

***तरी कवणाते तापु पोळी । कैसेनि वा शोकु जाळी ।***
***जरी प्रसाद-रस कल्लोळी । पुरे येसि तू ॥१२-३***

या ओवीतील 'ताप' आणि 'शोक' किंवा 'पोळी' आणि 'जाळी' या पदांतील भेद बाबांनी कसा स्पष्ट केला आहे ते पाहाण्यासारखे आहे. ते म्हणतात, 'पोळी व जाळी या शब्दांतही तापाचे सामर्थ्य व शोकाचे सामर्थ्य वेगळेपणाने प्रगट होते. एखादा पदार्थ जेव्हा जळत असतो, तेव्हा तो पदार्थ जाळणाऱ्याच्या रूपाचा, म्हणजे अग्निरूपच होऊ लागतो आणि शेवटी जाळणारा व जळणारा दोघेही नाश पावतात; पण पोळल्यामुळे आलेली व्याधी निघून जाताच पोळलेला भाग पूर्ववत बरा होतो. देहादी धर्माला ग्रासणारे कर्मफळ देहाला पोळीत असते, तर शोकामुळे प्राणस्फुरणेवर आघात होऊन सर्व इंद्रियांचे सामर्थ्य नष्ट होऊन इंद्रिये गलित होतात, प्राण व्याकुळ होतात व मन किंकर्तव्यमूढ होते. अशा शोकामुळेच माणसाला प्रसंगी वेड लागण्याची पाळी येते. जाळणे ही क्रिया जळणाऱ्याला तद्रूप करणारी असते, तर पोळणे ही क्रिया पोळणाऱ्याला फक्त व्याधिरूप असते; पण पोळल्यानंतर 'पोळणे' थांबविण्याचे नच झाले, तर 'जाळणे' संभवत असते. जसे, एखादी मोठी द्रव्यहानी झाली व ती भरून काढण्याचे त्या व्यक्तीमध्ये जर विवेकसामर्थ्य नसेल तर, त्या द्रव्यलोलुपाला ही हानी म्हणजे अहोरात्र द्रव्य-शोकच होतो... ताप आणि शोक हे सारखे दिसत असले तरी एक 'कर्मदंश' असतो, तर दुसरा 'वृत्तिदंश' असतो. एकाचा परिणाम स्थूल-देह-धर्माशी निगडित असतो तर दुसऱ्याचा कारणदेहापर्यंतच असतो. संतांच्या जीवनातही शोक आहे; पण तो उच्च विरहावस्थेचा निदर्शक असतो. शोकाचे कारण-निमित्त किंवा ज्याच्यासाठी होतो, ते स्थान जर शोक करणाऱ्यापेक्षा दिव्य, पूर्णरूप व आनंदरूप असेल, तर शोकाचे पर्यवसान समाधी सुखात होते. शोकाचे कारण जर शोक करणाऱ्यापेक्षा जड, मूढ व विनाशी असेल तर शोकाचे पर्यवसान जळण्यामुळे दुःखातच होईल. एकनाथांचा जनार्दनस्वामींसाठी व चैतन्यप्रभूंचा गोपाळकृष्णासाठी

शोक, ही सर्व शोकप्रकरणे प्रेमात लयवृत्ती साधून, समाधिसुखात पर्यवसित झाल्याची उदाहरणे होत.

'प्रसाद-रस-कल्लोळ' या पदावरील भाष्य हे ह्या शोकनाशातून व तापनाशातून उद्‌भवणाऱ्या गुरुकृपामृताच्या लीला-प्रसंगातून कसे उद्‌भवते, ते पाहण्यासारखे आहे. प्रस्तुत संदर्भात बाबा महाराजांनी 'रस' म्हणजे काय याचे आधी थोडे विवरण केले आहे आणि 'प्रसाद-रस' म्हणजे काय, ते नंतर विस्ताराने विशद केले आहे. श्रीगुरूंची अवस्था कल्लोळदशेपर्यंत एकपणाने कशी प्रवर्तते ? 'तर गुरुदेव आपल्या गुरुत्वधर्माने प्रथम गतिशील होतात. त्यांच्या ठिकाणी भरून असलेला 'स्वानंद स्वरूपभाव' प्रगट करून ते या जगात विहरतात. परमार्थतः याचा विवेक असा की, ते आत बाहेर आपलीच अवस्था जीवाजीवात जागवीत असतात. आपल्या स्वानंदरसात ते जेव्हा सर्वांना स्फूर्तीने खेळवितात, तेव्हा 'प्रसाद-रस-कल्लोळ' हा परिणाम घडतो. श्रीगुरू जेव्हा आपल्या कृपेने, जीवाजीवांना आपल्या स्वानंदरसात बुडवून ही क्रीडा करतात, तेव्हा स्वगत सच्चिदानंद गुरुदेव प्रत्येकाच्या कृपेचे महापर्वच घडवीत असतात. 'प्रसाद-रस-कल्लोळ' म्हणजे, गुरुशिष्य हा भेद मावळून एकाच अद्वैतानुभूतीच्या दिव्यानंदात रत होण्याचा 'भाव' होय. असे घडताच सद्‌गुरुकृपा पूर्णत्वाला आली, असे जाणावे !

या विचारातून एका अगदी वेगळ्या विचाराकडे हे 'प्रगत-दर्शन' आपणास घेऊन जाते. बाबा महाराजांनी त्याला 'सृष्टियोग' असे म्हटले आहे. रूढ योगशास्त्रातील अपुरेपणा या संदर्भात त्यांनी स्पष्ट केला आहे आणि योगशास्त्रापेक्षा भक्तिशास्त्र कसे परिपूर्ण आहे, हे प्रतीतिपूर्वक विशद केले आहे. हे सर्व विवेचन मननपूर्वक पाहाण्यासारखे आहे. श्रीज्ञानेश्वरांच्या चिद्‌विलासवादाचे रहस्य या विवरणाला आकळू पाहाते आणि या सामरस्य-सिद्धीला गुरुकृपेची आवश्यकता का तेही स्पष्ट होत जाते. पातंजल-योग आणि भक्ति-योग यांचे असे तौलनिक दर्शन अपवादानेच घडविले जाते. मोक्षमार्गातील भक्तिमार्गाचे सर्वश्रेष्ठत्व निःशंकपणे येथे मांडण्यात आले आहे. योगमार्गात पिंडातील अनुभवाबरोबर ब्रह्मांडातील अवस्थांचा बोध समरसतेने होत नाही. याउलट भक्तियोगात पिंडातील शक्तिकेंद्र (चक्रे) जेव्हा उन्मीलित होतात व उच्च आनंदाचा लाभ घडतो, तेव्हा ब्रह्मांडातील शक्तिकेंद्रेही उन्मीलित होऊन विश्वदर्शन बदलत असते. भक्ती ही व्यापकाच्या सन्निध नेणारी प्रेमकला आहे. या प्रेमकलेतच आत्मसाक्षात्कारानंतरही 'उपकारापुरते उरणे' उरत असते, हे आणखी भक्तियोगाचे वैशिष्ट्य-श्रेष्ठपण ! बाबा महाराजांनी हे सारे विवेचन अतिशय तन्मयतेने केलेले आहे. 'कृपापूर्व व कृपेनंतरची जीवदशा' हे यातील भाष्य-प्रकरण अध्यात्मातील गूढ, कूटस्थ अनुभूतीवर स्वच्छ प्रकाश पाडणारे आहे. 'संतांचा सहजयोग', 'चिद्‌विलासदर्शन' आणि 'भक्तीचे ऐश्वर्य' म्हणजे या टीकेतील परमोच्च भाग होत.

ज्ञानेश्वरीच्या अंतरंगातील भक्ति-कलेचे सौंदर्य उकलून दाखवताना बाबा महाराजांच्या कल्पनाशक्तीला अनावर भरते येते आणि उपमा-दृष्टान्तांचा कल्लोळ उठतो. बाबा महाराज भक्ती हा रस मानत नाहीत, भक्ती हे एक रसायन आहे; असे रसायन आहे की त्यात सर्व रसांचे मिश्रण घडून येते, असे ते सांगतात. 'नवरसीं भरवी सागरु' या पदावलीवरील त्यांचे भाष्य फार महत्त्वाचे आहे. नवरस व सागर या जोडीत श्रीज्ञानेश्वरांना नवरसांचा एकता-भाव साधायचा आहे, असे बाबा महाराज म्हणतात. म्हणजे काय ? 'उत्कट भाव-भावनांच्या उंच शिखरांवरून, रसिकांच्या मनःप्रदेशात सुखाचा आस्वाद देत देत, अवखळपणे वाढणाऱ्या नवरसांच्या धारा शेवटी आनंदाच्या सागरात स्थिर व्हाव्यात; त्या सर्वांचे ऐक्य व्हावे; मग सर्व मिळून पुन्हा एकरूप एकघन सागरच घडावा-रहावा; त्याचा रससिंधू व्हावा, तसे हे आहे.' असे बाबा महाराज सांगतात. 'श्रीज्ञानेश्वरांनी शांत रसालाच प्रधानरस मानले आहे. शांतरस आस्वाद्य होणे म्हणजे भक्ती. शांतरसाचा भावनिष्ठ आकार हे भक्तीचे सुंदर रूप होय. भक्ती हा स्वतंत्र रस म्हणून सिद्ध होऊ शकत नाही. साधनकाळी भक्ती हा एक भाव आहे, हे खरे; पण ज्ञानाच्या पुढे ह्या भावाची जी प्रकृती आहे, ती रसरूप नाही, तर आनंदरूप-प्रेमरूप आहे. भक्ती हे ज्ञाननिष्ठ प्रेमाचे लीलामय भान असते.' असे बाबा महाराजांचे आत्मप्रतीतीचे बोल आहेत.

ज्ञानेश्वरीतले भक्तीचे दर्शन असेच आहे. श्रीज्ञानेश्वर भक्तीला भगवंतरूप मानतात. भक्ती ही सर्व रसाने ईश्वराएवढी व्यापक व अद्वयविलासिनी आहे; हे श्रीज्ञानेश्वरांचे भक्ति-दर्शन आहे. 'भक्ती म्हणजे भगवंताची सहजस्थिती' असे श्रीज्ञानेश्वर सांगतात.

*एवं तो बोले ते स्तवन । तो देखे तें दर्शन*
*अद्वया मज गमन । तो चाले तेंचि ॥*
*तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जपु माझा ।*
*तो असे तेचि कपिध्वजा । समाधि माझी ॥*

(ज्ञानेश्वरी १८ : ११८०-८१)

श्रीज्ञानेश्वर म्हणतात, 'द्वैत आणि अद्वैत या दोहोंच्या पलीकडे असणारा एकमेवाद्वितीय आत्मा म्हणजे 'मी'च, असे जाणून, भक्त हा त्या जाणण्याचाही प्रत्यक्ष अनुभव घेतो.' सूर्य प्रगट झाला, म्हणजे तोच प्रगट करणारा होतो आणि प्रगट होणारा व प्रगट करणारा, हे दोन्ही अभिन्न आहेत, हेही तोच प्रगट करतो, असा श्रीज्ञानेश्वरांनी दृष्टान्त दिलेला आहे. श्रीज्ञानेश्वरांची भक्ति-अनुभूती ही द्वैत-अद्वैत-अतीत आहे. बाबा महाराज यांनी या भक्तीला 'द्वैताद्वैतविलक्षण' असेच म्हटले आहे.

बाबा महाराजांच्या प्रगत-दर्शनाचे महत्तम रूप आहे पाहायचे असेल आणि त्यांचा 'भक्ति'विषयक सम्यक् आलोक, बघायचा असेल, तर त्यांचे –

*तरि अस्तुगिरीचां उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठी ।*
*रश्मी जैसे किरीटी । संचरती गा ॥*

या बाराव्या अध्यायातील पस्तिसाव्या ओवीवरील भाष्य पाहावे; पुनःपुन्हा पाहावे आणि पाहूनही पाहाता येते का, ते पाहावे. श्रीज्ञानेश्वर महाराजांचे वैदिक ऋषितुल्य दर्शन येथे बाबा महाराज आपणास घडवतात आणि श्रीज्ञानेश्वर हे वैदिक संदेश देणारे क्रांतदर्शी पथद्रष्टे कसे आहेत, ते पटवून देतात. श्रीज्ञानेश्वर प्रणीत भक्तीचे मूळ हे वैदिक ऋचांत कसे आहे, ही भक्ती वैष्णवी-शांभवी कशी आहे, इत्यादी-इत्यादी शोध घेत घेत बाबा महाराज जेव्हा आद्य आत्मरूपाकडे जातात व तेथे श्रीज्ञानेश्वर अनुभवतात तेव्हा हे दर्शन आकाश ओलांडून महदाकाशात भिडल्याचे प्रत्ययास येते. बाबा महाराज येथे श्रीज्ञानेश्वररूपच झाल्याचा आपणास अनुभव येऊ लागतो आणि 'भक्ति-संप्रदाय' म्हणजे काय, याचा खरा अर्थ कळू लागतो । मुक्तीहून भक्ती श्रेष्ठ, म्हणजे काय, ते जणू डोळ्यांना स्वच्छ दिसू लागते.

खरे तर, हा सारा प्रांत अद्वयानंदवैभवाचा प्रांत आहे. येथे शब्दाला अस्तित्वच नाही. हा मौनाचा, मौनाहून मौनाचा प्रांत आहे; कारण त्या

... आद्य स्वसंवेद्य आहे. येथे जाणण्याचा, बोलण्याचा, सांगण्याचा व्यवहारच नाही. जी वस्तू सर्वांच्या 'आद्य' असते, ती स्वसंवेद्य, म्हणजे एकच, सत्य व सूर्यप्रकाश असते. ती स्वयंप्रकाश नसेल तर तिच्या प्रकाशनाकरता दुसरा एखादा द्रष्टा तेथे असणार व मग द्वैताची सिद्धी होईल आणि 'आद्य' वस्तू दृश्य झाल्यामुळे, ती जड व असत्य ठरेल; शिवाय या द्रष्ट्याचे प्रकाशन करण्यास दुसरा द्रष्टा मानावा लागेल आणि अशा प्रकारे अनवस्था-दोष येईल; म्हणून 'आद्यवस्तू' ही एकच, सत्य व स्वयंप्रकाश असते, असे अनुभूति-प्रमाण ज्ञान साक्षात्कारी पुरुषांना होत असते. हे अद्वयानंदवैभव वैखरीने सांगायचे कसे ? हाच येथे मूलभूत प्रश्न आहे; पण श्रीज्ञानेश्वर महाराज तर प्रतिज्ञेवर सांगतात की, 'मी हे अतीन्द्रिय परब्रह्म इंद्रियांनी भोगता येईल, असे वर्णन करून सांगेन आणि तेही 'बरवे' म्हणजे सुंदरपणे सांगेन.' हे कसे ?

व्याकरण-दर्शनात पश्यन्ती-रूपातले आत्मतत्त्व म्हणजे 'शब्दब्रह्म' असे म्हटले आहे आणि 'श्रीसदाशिव' हा या शब्दब्रह्मद्वारा अध्यासिला जातो, असे मानलेले आहे.

***'शब्दब्रह्ममयं पश्यन्तीरूपं आत्मतत्त्वम् । इति वैयाकरणाः***
***श्रीसदाशिवपदं अध्यासिताः ।' 'प्रत्यभिज्ञाहृदयम्' - (सूत्र ८)***

परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी अशा चार वाणी आहेत. मूलचक्र, नाभी, हृदय व कंठ ही त्यांची स्थाने होत. यांपैकी मूलचक्रातील वाणी, म्हणजे 'परा-वाणी'. ही अत्यंत सूक्ष्म व साक्षात्परब्रह्मरूपच असते, असा वैयाकरणांचा सिद्धान्त आहे. ही नित्यशुद्ध असल्याने हिच्यावर व्याकरणाने संस्कार करण्याची शक्यता नसते. पश्यन्ती, मध्यमा आणि वैखरी ह्या संस्कारक्षम असल्याने, व्याकरणशास्त्राने त्यांच्यावर संस्कार केले आहेत. श्रीज्ञानेश्वर महाराज हे पश्यन्ती-रूपातले आत्मतत्त्व आपणास वैखरीच्या रूपाने देत आहेत. पश्यन्ती-रूपातले अशेष शब्दब्रह्म इंद्रियाकरवी भोगता येईल, अशी शक्तियुक्त वैखरी ते निर्माण करीत आहेत. ही त्यांची प्रतिज्ञा आहे. परेहून परते जे, ते त्यांचे 'अंतिम' 'व्यंग्य' आहे.

श्रीज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या प्रारंभीच श्रीगणेशाचे वाङ्मय-विशेष-रूप आपणापुढे साकार केले आहे. श्रीज्ञानेश्वर महाराज कोणत्याही वैदिक-पौराणिक देवतेचे ग्रंथारंभी स्तवन करताना दिसत नाहीत. त्यांनी 'ॐकारा'ला नमन केले आहे व ॐकार-रूप श्रीगणेशाचे तत्त्वरूप दर्शन प्रगट केले आहे. ॐ ह्या एकाक्षरी ब्रह्माचेच श्रीगणेश हे 'अशेष शब्द-ब्रह्म रूप' आहे. या अशेष शब्दब्रह्मरूपी श्रीगणेशाच्या वर्णनाला 'वर्ण-वपू' पासून प्रारंभ होतो. ॐकारातून प्रगट होणारी ही वर्णवपू विलास पावते आणि शेवटी ॐकारातच विराम पावते. वर्ण, पद, पदपद्धती, नागर पदबंध, अर्थध्वनी इत्यादींनी काव्यशरीर धारण करणारा हा श्रीगणेश, मूलतः आणि अंततः ॐकार-रूपच आहे.

***अ-कार चरणयुगुल । उ-कार उदर विशाल ।***
***म-कार महामंडल । मस्तकाकारें ॥***
***हे तिन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें ।***
***तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥***

(ज्ञानेश्वरी १० : १९-२०)

ज्ञानेश्वरी ही वागीश्वरी आहे. वाणी येथे सर्व सामर्थ्यानिशी आणि सर्व लावण्यानिशी प्रगटली आहे. प्रतिक्षणाला नवता धारण करणारे हे लावण्य आहे. प्रतिक्षणाला नवता धारण करणाऱ्या 'गीतातत्त्वा'प्रमाणे - हे ज्ञानेश्वरी-तत्त्व हा नित्यनूतन, म्हणून लावण्यसुंदर आहे. श्रीज्ञानेश्वरांचा श्रीगणेश अतिसुंदर रूप धारण करून अवतरला आहे. त्याची वर्णवपू निर्दोष आहे. त्याच्या देहावर प्रमेय-रत्न-खचित मणिभूषणे आहेत. त्याची वस्त्रे नागर पदबंधाची, उज्ज्वल तलम पोताची आहेत. ह्या शब्द-ब्रह्माच्या मूर्तीवर अर्थशोभेचे लावण्य प्रकाशत आहे. त्याच्या हातांतील आयुधातून सर्वदर्शने प्रगटली आहेत. हा श्रीगणेश 'सकलमति-प्रकाश' आहे; तो 'उन्मेष-सूक्ष्म-ईक्षणू' आहे. (ज्ञानरूप सूक्ष्म दृष्टी असलेला आहे.) अनादि-अनंत, निर्गुण-निराकार, केवल, अशा आदितत्त्वाला ॐकार-रूपात आणणारे श्रीज्ञानेश्वर, त्या ॐकार-रूपाला पुढे वस्त्रालंकारभूषित श्रीगणेशाकार देतात आणि तेथे अशेष शब्द-ब्रह्माचे अर्थलावण्य अनुभवतात आणि हे अनुभवता अनुभवता पुन्हा मूळ ॐकार-रूपाला ते एकवटून-सामावून टाकतात. अवकाश आणि काळ यांना कवेत घेणारी श्रीज्ञानेश्वरांची प्रज्ञा सौंदर्यलक्ष्मी आणि सौंदर्यदर्शनी आहे.

मौनाच्या प्रांतात हे घडते कसे ? मौनाला वर्णांकुर फुटतात; त्यांवर शब्दकुसुमे फुलतात आणि शब्द-ब्रह्माचे मळेच्या मळे फुली-फळी बहरून येतात, ते कसे ? श्रीगुरूकृपेने हे घडते, असे श्रीज्ञानेश्वर सांगतात.

***म्हणौनि साधकां तूं माऊली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं ।***
***या कारणें मी साउली । न संडीं तुझी ॥***
***अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ।***
***तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥***
***म्हणौनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते ॥***
***आज्ञापीं मातें । ग्रंथ निरूपणीं ॥***

(ज्ञानेश्वरी : १२-८-१०)

बाबा महाराज हे श्रेष्ठ प्रतीचे रसिक आणि उल्लसित वृत्तीचे विवेचक आहेत. साहित्य म्हणजे काय, काव्यसौंदर्य म्हणजे काय, हे ते केवळ जाणतात, असे नाही; ते अनेक ठिकाणी काव्यमय होऊन प्रतिकाव्यनिर्मिती करताना दिसतात. आपण एका काव्यकृतीच्या संबंधात तिच्या अंतरंग-लावण्याच्या संदर्भात - 'प्रगत-भाष्य' करीत आहोत, हे ते कधीही विसरले नाहीत; ह्या जाणिवेचा त्यांना भारही झालेला नाही. बाबा महाराजांच्या ठिकाणी असलेला तत्त्वज्ञ, साक्षात्कारी संत आणि कवी अखंड क्रियाशील राहिल्याचे आपल्या प्रतीतीस येते. 'दिव्यामृतधारा' ही 'ज्ञानेश्वरी' वर एका समानधर्म्याने केलेली तितकीच तत्त्वगंभीर, भक्तिसंपृक्त, काव्यमधुर अशी टीका आहे. संतकाव्याचा जन्म होतो कसा, मौनाला येथे 'वाग्यज्ञा'चे रूपलावण्य लाभते कसे, हे पाहयचे असेल तर बाबा महाराजांनी श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या 'पिके सारस्वत तुझिया पाउली' या चरणावर केलेले भाष्य पाहावे. हे भाष्य म्हणजे एका समानाधिकारी समधर्मीयांच्या भावमग्न अंतःकरण-प्रतीतीचे अतिदुर्मीळ दर्शन होय. एक नवदर्शनच होय !

'म्हणौनि साधका तूं माऊली । पिके सारस्वत तुझिया पाऊली ॥' याचा सरलार्थ 'हे गुरुदेव, तू साधकाची माउली आहेस. तुझ्या चरणप्रसादाने साहित्य निर्माण होते, भरास येते,' असा आहे; तो बरोबर आहे; पण हे शब्दास शब्द ठेवणे झाले. अंतरंग अर्थ काय ? अभिप्रेत काय ? हे बाबा महाराज सांगतात. प्रारंभी हे शब्दार्थ देतात. पिके - पूर्णत्वाला येते; सारस्वत - सरस्वतीचे विद्यारूप; पिके सारस्वत - सरस्वतीचे विद्यारूप परिपूर्ण होते. नंतर या शब्दार्थातील संकेत स्पष्ट करताना ते 'पिकणे' म्हणजे काय ते उलगडून दाखवतात. 'पिकणे' या घटनेला (१) क्रिया, (२) काल आणि

(३) गती यांची गरज असते. शेत पिकवायचे झाले तर बीज पेरण्यापासून ते उगवण्यापर्यंत, उगवून वाढण्यापर्यंत, वाढल्यानंतर फळधारणा होण्यापर्यंत आणि शेवटी फळ पिकेपर्यंत, वेगवेगळ्या रीतीने ते जोपासत आणावे लागते. 'बीज उगवते' येथे 'बीज पिके' ही घटना आहे; (२) उगवलेले धान्य फलभाराला येते, तेथे 'धान्य पिके' ही घटना आहे आणि (३) फळ पूर्ण स्थितीला येते, तेथे 'फळ पिके' ही घटना आहे. या तिन्ही घटनांमध्ये - सर्वत्र - 'पिकणे' हीच एक क्रिया आहे. या सर्व घटना उर्ध्वगती आणि क्रमाक्रमाने होणाऱ्या असल्यामुळे येथे 'पिकणे' हीच क्रिया आपण, कालभेदाने आणि अंशभावाने (म्हणजे उगवणे, वाढणे, फलित होणे, पक्व होणे इत्यादि शब्दांत) समजून घेत असतो; म्हणून 'पिके' याचा अर्थ 'जे पिकते तेच पिकल्यानंतरही असते', असा होतो. येथे बीजाने बीजाकडे जाताना क्रियात्मक वर्तुळाचा एक प्रवास केलेला असतो.

आता 'पिकणे' म्हणजे काय हे समजल्यानंतर बाबा महाराज 'सारस्वत पिके' म्हणजे काय सांगतात ते पाहू. वृक्षावर फळे पूर्णत्वास येतात, पिकतात आणि त्यांतून बिया खाली जमिनीवर पडतात. जमिनीत त्या रुजतात, अंकुरतात, वाढतात, पुन्हा वृक्ष होतात, फळरूप होतात; पूर्ण पिकून पहिल्या फळासारख्या होतात; म्हणजे मूळ पूर्णरूप परिपक्व फळ हे अपूर्ण रूप आणि अपरिपक्व रूप घेऊन अंशाअंशाने आणि कालाकालाने वाढत वाढत पुन्हा पूर्णांशाने व पूर्णपक्वतेने मूळ रूपास येते; तसे पूर्णरूप, परिपक्व अद्वयानंद वैभव हे अपूर्ण रूपाने, अपरिपक्व रूपाने शब्दाशब्दांतून प्रगटत, वाढत, विकसत जाते आणि शेवटी पूर्णांशाने, पूर्ण परिपक्वतेने मूळ अद्वयानंद वैभवरूपाने सिद्ध होते. येथे पिकायला घातले काय ? तर अद्वयानंदवैभव आणि अंती पिकले काय ? तर अद्वयानंदवैभवच ! बाबा महाराज म्हणतात, 'पिकलेली फळे, पुन्हा फलरूप होण्यासाठी आपल्यातील बीजे भूमीवर सांडून वृक्षरूपाला येतात; तसेच प्राप्त झालेली विद्या, आनंद, पूर्ण झाल्यावर अपूर्ण स्वरूपाच्या आपल्या चिद्‌विलासतेला वारंवार येत असते. गुरुदेवांच्या कृपेने 'सारस्वत पिकू लागले' म्हणजे अनुभवाची खूण बोलू लागली, असा अर्थ होतो. गुरूकृपेने प्रथम साधकाला 'पीक येते' ते 'समाधीचे' व समाधीनंतर जे पिकते ते समाधिसुखाला व्यक्त करण्याचे कलासामर्थ्य !' येथे मूळ मौन, ॐकार ध्वनिरूप येते, वाग्विलासातून ते विश्वात्मक होते आणि शेवटी मूळ ॐकार ध्वनिरूपात विलीन होते; पण 'मूळ मौना'ची व्यंजना मात्र देत राहाते. 'मौन'च जणू येथे पिकते आणि 'मौन'च सर्वभर उरून राहाते. शब्दब्रह्म म्हणजे श्रीगणेश पिकतो, त्याचे शारदा-शक्तिरूप विलास पावते व अंती ते ॐकारस्वरूप श्रीगणेशात निमज्जित होते आणि अनादि-अनंत, अज-अव्यय, केवळ-अनाख्येय अशा 'आद्य-आत्मरूपा'च्या ज्ञानमात्र भावरूपात सारे सर्वदूर भरून राहाते !

आपल्या नित्याच्या काव्यशास्त्रात वाङ्मयकलेचे एक महत्त्वाचे लक्षण म्हणून 'क्रीडारूप आत्माविष्कार' हे लक्षण मानले गेले आहे. बाबा महाराज क्रीडारूप आत्माविष्कार हा वाङ्मयाचा पाया म्हणून मान्य करतात; पण ते त्याचे लक्षण आहे, असे मानत नाहीत; कारण क्रीडारूप आत्माविष्कारात कलावंताच्या अहंकाराचा आस्वाद्य प्रदेशच तेवढा क्रीडारूप होणार. वस्तुतः 'क्रीडारूप आत्माविष्कार' यापेक्षा 'आत्मानुभूतीची क्रीडा' या स्वरूपात कलेची किंवा वाङ्मयाची व्याख्या असावी, असे बाबा महाराज प्रतिपादितात. आत्मानुभूतीच्या या क्रीडेचे स्वरूपही त्यांनी दर्शविले आहे. 'जे अनुभविले ते शब्दाद्वारे पुन्हा अनुभववावे' असेच ते असते; कारण 'शब्द' अनुभवाचा पुन्हा देऊ शकतात. 'सारस्वत' हे एका वेळी समाधिसुखाचे फळ दुसऱ्या वेळी समाधिसुखाची आराधना ठरते. 'अपूर्णातून पूर्णत्वात संभव झाल्यानंतर ते सशक्तिक पूर्णत्व अपूर्णात जेव्हा विलसू लागते तेव्हा तिला 'लीला' असे म्हणतात. ही लीला शब्दक्रीडारूपाने 'सारस्वत' बनते. श्रीज्ञानेश्वरांना जणू स्वयंप्रतिमा बघावीशी वाटली असावी आणि त्यांनी आत्मानुभूतीची क्रीडा केली असावी.' असे बाबा महाराज म्हणतात.

क्रीडा ही सहज व मुक्त असते. ही सहजता 'तुझिया पाऊली' या शब्दांनी ध्वनित झाली आहे. 'पाऊल' हा विशेष शब्द योजल्याने विनायासास, 'सह आगमनीय' असा बोध होतो, असे बाबा महाराज स्पष्ट करून सांगतात.

बाबा महाराजांचे ज्ञानेश्वरीचे प्रगत-दर्शन हे असे एकातून एक संकल्पना निघत, त्यांचे स्पष्टीकरण देत, संबंध दर्शवीत चालू राहाते. या प्रगत भाष्यातून साक्षात्कारानुभूतीवर आधारलेल्या वाङ्मयाचे मूळ स्वरूप स्पष्ट होते, त्याची लक्षणे निश्चित करता येतात. त्याच्या आस्वादाची प्रक्रिया ध्यानी येते आणि या वाङ्मयाचे प्रयोजन-परिणाम कोणते ते समजून येताच, त्यांच्या मूल्यमापनाची दिशा कळू लागते. महाराष्ट्रातील साक्षात्कारी संतांच्या साहित्याकडे पाहण्याची आपली आजवरची दृष्टी कशी अपुरी होती, किंबहुना ती खूपशी गैरलागूच कशी होती हे कळून येते. 'सारस्वत' या संज्ञेचा खरा अर्थ मनात भरताच साक्षात्कारी संतांचे साहित्य कोणत्या जातीचे व कोटीचे आहे हे अचूकपणे समजते आणि श्रीज्ञानेश्वरांच्या

***वाचे बरवे कवित्व । कवित्वी रसिकत्व ॥***
***रसिकत्वीं परतत्त्व - । स्पर्शु जैसा ॥***

या 'सारस्वता'च्या आदिलक्षणांचे रहस्य आणि महत्त्व आकळते. संत साहित्य ही आत्मानुभूतीची क्रीडा आहे. पूर्ण सुख प्राप्त झाल्यानंतर संत हे मानुषी अवस्थेत पूर्णत्वाचा सर्व अनुभव आपल्या वाङ्मयातून कसा आविष्कृत करतात, ते जाणणे व आस्वादिणे हे संतवाङ्मयाच्या वाचकाभ्यासकाचे कर्तव्य ठरते. साक्षात्कारवाद आणि भक्तिमाहात्म्य म्हणजे संतसाहित्याचा गाभा. त्याचे सारस्वत-रूप रसिकांनी अनुभवायचे आहे. 'रसना' म्हणजे काय ? बाबा महाराज म्हणतात, 'आत्मानुभूतीची क्रीडा म्हणजे कला. कलेचा आस्वाद हा आत्मानुभूतीचा साक्षात्कार असावा लागतो. कलेतील आस्वाद्य भावना साकार करणे, तिचे संवेदनशीलत्व सारखे स्मृतिस्पंदनाने चघळीत, इंद्रियप्रवृत्ती विलीन करण्याची अनुभूती येणे, म्हणजे 'रसना' होय. बाबा महाराज जणू श्रीज्ञानेश्वरांचे मनोगत ओळखून लिहू लागतात. ज्ञानेश्वरी लिहिताना श्रीज्ञानेश्वरांची कोणती इच्छा असावी ? बाबा महाराज म्हणतात, 'आपल्या काव्याची श्रेणी ही आत्मानंदाचे जीवननिष्ठ दर्शन करविणारी असावी व रसिकांच्या ठायी काव्यास्वाद घेताना, आत्मानुभूतीची सुखद लहर परिचयाला आणणारी, अशी श्रीज्ञानेश्वरांची इच्छा आहे.' 'रसिकत्वीं परतत्त्वस्पर्श घडविते ते सारस्वत होय.' असेच बाबा महाराज श्रीज्ञानेश्वरांच्या या मनोगत-दर्शनातून सुचवितात.

बाबा महाराजांचा 'सारस्वत-विचार' हा स्वतंत्रपणे अभ्यासण्यासारखा विषय आहे. शब्द म्हणजे काय ? साहित्य म्हणजे काय ? 'साहित्य-सोनियाची' खाण म्हणजे काय ? रस म्हणजे काय? भक्तिरस ही रसायन ? शांतरसाची सर्व रसांच्या मूर्ध्नी स्थापना का ? इत्यादी कितीतरी प्रश्नांचा ऊहापोह बाबा महाराजांनी 'दिव्यामृतधारा' मध्ये केला आहे. संतसाहित्याच्या प्राणतत्त्वास धरून हे विवेचन गंभीरपणे अभ्यासिले पाहिजे. 'अनुभवीच खूण जाणतो' तसे साक्षात्कारी बाबा महाराज साक्षात्कारी ज्ञानदेवांच्या

सारस्वताचा खूण जाणतात; रसलीन होऊन रसदर्शन घडवितात. त्या रसावर्णवाचे ते राजहंस आहेत. त्यांच्या दिशेने जाणारे पाखफुटे पाखरू होण्याचे भाग्य आपणास लाभले तरी स्वतःस धन्य-मानावे !!

साक्षात्कारी संत-सत्पुरुष शब्दरूपात ही आत्मानुभूतीची क्रीडा का करतात ? साक्षात्कारानंतरही ते 'उपकारपुरते उरतात' म्हणजे काय ? याचा विचार बाबा महाराजांनी विस्ताराने केला आहे. 'प्रसाद-रसकल्लोळ' या पदावरचे त्यांचे भाष्य अनेकानेक कारणांनी महत्त्वाचे आणि मूलभूत ठरणारे आहे. या पदावरील भाष्यातच ते म्हणतात, 'परमार्थ ही एक जीवन जगण्याची उच्च व उदात्त व्यवस्था आहे.' बाबा महाराजांनी नाथपंथीय भक्तियोगाचे जे स्वरूप नव्याने विशद केले आहे ते पाहिले की संतजीवनाचे व भक्तिसंप्रदायाचे हृद्गत समजते. कुंडलिनीयोग, पातंजलयोग आणि भक्तियोग यांची ही अनुभूतिचित्रे बाबा महाराजांनी काढली आहेत व त्यांतून भक्तियोगाचे माहात्म्य जे गौरविले आहे, ते 'दिव्यामृतधारा' या ग्रंथाचे प्राणतत्त्व होय ! ते म्हणतात, 'नाथांचा योग हा भक्तिप्रधान योग आहे. तो केवळ प्रयोगरूप नाही तर प्रेम, निष्ठा, निर्द्वंद्वज्ञान, धारणा व गुरूकृपा या भक्तिमय व्यवस्थेतून अवस्थारूप आहे. समाधीचा प्रयोग करणे व तिचे विसर्जन करणे, हे या भक्तियोगात नाही. येणाऱ्या अनुभवाचे विसर्जन करायचे नसून, नाथपंथीय भक्तांच्या पंथात ह्या येणाऱ्या अनुभवाचेच जीवन घडावे लागते. सर्वकाळ व सर्व अवस्थांत दिव्यानुभूतीच नांदली पाहिजे, हा त्यांचा दंडक आहे. घेतलेले अनुभव विसरून जीवन जगण्याचा हा धर्म नाही.' यामुळे हे संतश्रेष्ठ साक्षात्कारानंतरही लोककल्याणार्थ जगात राहटत असतात. हे वैकुंठवासी याच कारणासाठी भूलोकी अवतरतात व स्वतः सद्धर्म म्हणजे काय ते आचरून दाखवतात. बाबा महाराज हे 'योगी' आणि 'भक्त' यांतील भेद स्पष्ट करतात. 'योग्यांच्या ठायी जगत्कल्याण हा भाव बहुशः आविर्भूत नसतो; त्यांच्यामध्ये करुणा पूर्णरूपाने असतेच, असे नाही; पण भक्त हा करुणेचा सागर असतो. त्यामुळे शक्तीच्या सुखाचा बाह्य जगात आविष्कार होणे, हे त्यांच्या जीवनात स्वाभाविकच घडून येते. शांतीच्या रसाने, करुणेच्या ओलाव्याने भक्त हा या जगात शब्दांच्या द्वारे विस्तारत असतो. 'अमृतानुभवा'च्या अखेरीस श्रीज्ञानेश्वरांनी आपली ही भावना सुव्यक्त केलीच आहे.

'श्रीज्ञानेश्वरांचा आदेश' जगाला देण्याच्या हेतूने बाबा महाराज यांनी उत्स्फूर्तपणे 'दिव्यामृतधारा' ही टीका लिहायला घेतली. 'संतांचा आदेश' म्हणजे केवळ मंदिरातील व देवघरातील विचारांची पोथी नाही, तर तो एक उदात्त जीवनाचा पथप्रदर्शक आहे, ह्या आत्मानुभूतीतून त्यांना ह्या लेखनाची प्रेरणा झाली. समाजाची समृद्ध अवस्था निर्माण करणारी व त्याचबरोबर समाजाच्या आदर्श, महान जीवनाचे दर्शन करवून देणारी एक जीवनदर्शी निर्मळ विचारप्रणाली म्हणूनही त्यांनी संतांच्या आदेशाचा गौरव केला आहे. ह्या आदेशाचे अंतिमरूप भक्तिमयी प्रकाशज्योतीचे आहे. 'संन्यास ही वृत्ती पवित्र होय; पण त्याचा अर्थ 'सर्वतः दुर्लक्षिणे' आणि 'किंकर्तव्य होणे' असा वेदान्तरीही नाही. 'संन्यास' या पवित्र धर्माचा स्वीकार होताच त्याने सकळ विश्वशांतीसाठी झटावे, दैन्य दूर करण्यासाठी मार्गदर्शन करावे, जीवाजीवाची अध्यात्मसंवेदना जागी करावी व त्रिभुवन आनंदाने भरावे, असा वेदोक्त आदेश आहे', असे बाबा महाराज आवर्जून सांगतात. भागवत-संतांचा विवेकही असाच आहे. 'संतांचा घरचा माणूस, हा विश्व हलवून सोडणारा, परमात्म्याएवढा विशाल हृदयाचा, घनगंभीर वृत्तीचा, उदात्त भावनेचा, स्वानंदी हंसरूप असाच असतो. जग हे प्रभूचेच रूपडे आहे. ते तद्रूपतेने जाणावे व महानत्वाने नटवावे, अशी त्याची धडपड असते. 'अवघाची संसार सुखाचा करीन' ही त्याची प्रतिज्ञा असते. 'विश्व स्वधर्मसूर्ये पाहो' ही विश्वात्मक देवास त्याची प्रार्थना असते. बाबा महाराज असे उचंबळून बोलताना दिसतात. 'संतांच्या भागवत-धर्मात जीवनाला मूल्य आहे; उपासनेला बळ आहे; क्रियेला ज्ञानाचा स्पर्श झाला आहे व विश्वरूप आत्म्याशी तद्रूपत्व आहे. त्यांच्या पारमार्थिक विचारांप्रमाणे अद्वैतसिद्धी हे अंतिम दर्शन आहे व या अंतिमपदाला जाण्यास गुरुभक्ती, प्रेममय भक्तियोग हा मार्ग होय. या मार्गाने जाणारा प्रत्येक जीव कृपांकित होऊनच प्रगतीकडे, दिव्यतेकडे जातो; त्याला उत्तरोत्तर दिव्यानुभूती व सामर्थ्य प्राप्त होते.' हे आत्मप्रत्ययाचे बोल बाबा महाराज अधिकाराने आपणास परमप्रीतीने ऐकवतात.

भागवत-संतांचे जगाशी-जनाशी काय नाते असते, ते बाबा महाराजांच्या 'माचणूरचे हृदय' या पुस्तिकेत संग्रही केलेल्या, त्यांच्या अखेरच्या संदेश-प्रवचनांतून पुन्हा पाहावे. ही पंच-प्रवचने म्हणजे बाबा महाराजांच्या समग्र जीवन हेतूचे आणि कार्याचे एकस्थ साररूप दर्शन होय. या प्रवचनांतून सकळ-संतांच्या विश्वात्मक धर्माचे रहस्य आणि उद्दिष्ट प्रगट झाले आहे. काय केले असता श्रीज्ञानेश्वर महाराजांचे 'पसायदान' सुफलित होईल. याचा येथे अध्यात्माच्या, अधिष्ठानावर, पण वास्तवाच्या संदर्भात विचार करण्यात आला आहे आणि ह्याचा आचार-मार्गही विवरून दाखविला आहे. स्वामी विवेकानंदांच्या धर्मदृष्टीची आणि कार्यसरणीची येथे आठवण होते. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी समाधी घेतली त्यास आता ७०० वर्षे होऊन गेली. 'जागतिक सर्व-धर्म-परिषदेत' स्वामी विवेकानंदांनी धर्मजीवनाच्या विशुद्ध रूपाचा प्रदीप प्रज्वलित केला, त्यास एक शतक पुरे झाले. या जगाला ज्ञानेश्वर, विवेकानंद पुनःपुन्हा हवे असतात. बाबा महाराजांच्या रूपाने ते भेटून गेले आहेत, असेच वाटते. स्वामीजींच्या शिकागो येथील भाषणाबद्दल म्हटले आहे की,

'When he began to speak, it was of 'the religious ideas of the Hindus', but when he ended, Hinduism had been created... It was the religious consciousness of India that spoke through him, the message of his whole people as determined by their whole past.' बाबा महाराजांचे 'माचणूरचे हृद्गत' वाचले की ह्याचाच प्रत्यय येतो.

माचणूरची बैठक संप्रदायनिरपेक्ष अशी आहे. 'घडो एकता संप्रदायी मतांची' ही बाबा महाराजांची आर्त होती. 'भारतीय सृष्टीमध्ये जे धर्मकारण आहे, ते समाजकारण, राजकारण आदी सर्व 'कारणां'ना व्यापून आहे. जीवनाच्या सर्व क्षेत्रांना अधिष्ठानभूत असा भारतीय धर्मविचार आहे.' हे त्यांनी सर्वप्रकारे 'माचणूर'मध्ये विशद केले आहे. ते म्हणतात, 'माचणूर फक्त' 'जीवनवाद' मानते; कारण तो प्रत्यक्ष परिणाम आहे. त्यात जीवनाचा प्रत्यय आहे. जीवनात आपण जे जे अनुभवतो त्यात आपली अभिरुची उत्तरोत्तर दिव्य होत जाणे, दिव्यातिदिव्य होत जाणे हाच तो 'जीवनवाद' होय. आपले अनुभव कणाचे-क्षणाचे असतात; त्या आद्यन्ती भरून-उतरून राहिलेल्या विराटाचे नसतात. आपल्या अनुभवांचे अपूर्णांक जेव्हा त्या पूर्णांकाच्या दर्शनासाठी, प्राप्तीसाठी प्रयत्नशील होतील, तेव्हा आपण खऱ्या अर्थाने धर्मजीवन जगू लागलो, असे होते.' हा धर्म सर्वांचा, सर्वत्र आहे. आदिपुरुषाच्या, विराटाच्या भक्तीनेच हे घडते. त्या विराट पुरुषाची ओळख करून घेणे आवश्यक आहे. 'जीवन' हे याचेच नाव ! 'भक्ती'

हेही याचेच नाव !! 'धर्म' हेही पुन्हा याचेच नाव !!!

'ज्ञानेश्वरी-अध्याय बारा' यावर प्रतिपद-टीका लिहिण्याच्या निमित्ताने बाबा महाराजांनी या धर्माचे, या धर्मजीवनाचे, या अपूर्व भक्तियोगाचे, नवदर्शनच घडविले आहे. आपल्या सर्व श्रीज्ञानेश्वर-दर्शनाचे, द्वैताद्वैतविलक्षण भक्तीचे, सामरस्य-सिद्धान्ताचे रहस्य व श्रेष्ठत्व त्यांनी एका वाक्यात ग्रथित केले आहे. ते म्हणतात, **'श्रीज्ञानेश्वरीचा भक्तिपंथ हा मोक्षाच्या वाटेवरून वैकुंठाच्या पीठास जाणारा नाही; तर मोक्षाचा अधिपती जो भगवंत, त्यासच वैराण वाळवंटी नाचण्यास येण्यासाठी आखलेला तो पंथ आहे.'** ज्ञानेश्वरीतील तत्त्वज्ञान व काव्य, जीवन व साक्षात्कार, अर्थ व संवेदना, दिव्यता व रसोन्मेष यांचे विविध रूपविलास अनुभवत बाबा महाराजांनी, ज्ञानेश्वरी या ग्रंथाची थोरवी व अपूर्वाई तिच्या 'नाथपंथीय भक्तियोगा'त कशी सामावली आहे, हे दाखवून दिले आहे. स्वतः बाबा महाराज हे योगेश्वर आहेत, ज्ञानेश्वर आहेत, श्रेष्ठ भक्तियोगी आणि कर्मयोगी आहेत. या समप्रज्ञ योगी पुरुषाचा साक्षात्कारवादी जीवनधर्म 'दिव्यामृतधारा' या रूपाने प्रगट झाला आहे !

'दिव्यामृतधारा' ही भूतलावर उतरलेली अनंतधारा आकाशगंगा आहे! सद्धर्म-गंगा आहे !! तिच्या पवित्र धारातीर्थात उभे राहून, तिच्याच पावक जलाची ओंजळ, तिला अर्घ्य म्हणून प्रदान करायची आणि कृपाप्रसादासाठी पुन्हा ओंजळ पुढे करायची ! सर्व संकल्पांचा दाता श्रीभगवान ही ओंजळ रिती ठेवणार नाही ! श्रीगुरुदेवेभ्यो नमः ।

ॐ तत्सत् ।

**व. दि. कुलकर्णी**

(सौ. कविता निरगुडकर यांच्या सौजन्याने)

**ध्यान धारणा....**

ध्यान धारणेच्या वेळी....

मनाची एकाग्रता असायला हवी.... ॥ १ ॥

ध्यान धारणेच्या वेळी....

मनाची शुद्धता असायला हवी.... ॥ २ ॥

ध्यान धारणा करताना...

विचारांची योग्य शुद्धता हवी.... ॥ ३ ॥

ध्यान धारणेत असताना....

संसार प्रश्नातून विरक्ति हवी.... ॥ ४ ॥

ध्यान धारणेच्या वेळी....

समोर ईश्वराची मूर्ती असावी.... ॥ ५ ॥

**पंडित हिंगे,**
साहित्यिक / ज्योतिषी / पत्रकार,
अमरबाग, हडपसर, पुणे २८.

# दिव्यामृतधारेतून श्रीज्ञानेश दर्शन


**राजेंद्र दहिभाते**

*बी.कॉम. गेली १५ वर्षे वारकरी सांप्रदायिक कीर्तन-प्रवचन सेवा. वर्तमानपत्रातून धार्मिक विषयांचे स्तंभलेखन. गीताधर्म मंडळातून सलग तीन वर्षे प्रवचन सेवा. पंढरीचा पायी वारकरी.*


महाराष्ट्र ही संतांची भूमी. इथं इतर पिकांपेक्षा संतांचं पीक अमाप पिकले आहे. श्रीज्ञानदेवांनी भक्तिमय भागवत मंदिराचा पाया रचला व कळस झाले जगद्गुरू तुकाराम महाराज. आणि त्याच भागवत परंपरेत पुढे असंख्य पाईक निर्माण झाले. श्रीज्ञानदेवांचे कार्य चालविण्यासाठी 'ज्ञानाचा एका' म्हणून गौरविलेले शांतिब्रह्म श्रीएकनाथ महाराज पंधराव्या शतकात अवतीर्ण झाले.

आधुनिक काळात विसाव्या शतकात प्रति ज्ञानेश्वरच ज्यांना संबोधावे असे प. पू. बाबामहाराज आर्वीकर उर्फ मोरेश्वर हे अवतीर्ण होऊन त्यांनी ज्ञानेश्वरीरूपी पुण्यपावन गंगेची दिव्यामृतधारा बाराव्या भक्तियोग या अध्यायाच्या निमित्ताने प्रकट केली. भाग्यवंताने यावे व तिच्यात अवभृथ स्नान करून कृतार्थ व्हावे.

आपल्या दिव्यामृतधारा या भक्तियोगावरील ग्रंथातून बाबांनी श्रीज्ञानदेवांविषयी जागोजाग सामगान केले आहे. त्यातून वाचकाला श्रीज्ञानेश्वर महाराजांचे भव्य व दिव्योदात्त असे विहंगम दर्शन होते. श्रीज्ञानदेवांविषयी पू. बाबा महाराजांनी जे जे काही हृद्गत व्यक्त केले ते एका लेखाच्या आवाक्यात बसणारे नाही. केवळ त्यावरच एक स्वतंत्र ग्रंथ निर्माण होऊ शकेल. श्रीज्ञानदेवांविषयी बोलणे सुरू झाले की बाबा त्यांना आरंभीच हृदयातील जिव्हाळ्याने ज्ञानाई, ज्ञानराज, ज्ञानेश, ज्ञानदेव, ज्ञानेश्वर, भगवान, ज्ञाननाथ अशा नामांनी पुकारतात.

भक्तियोगावरील भाष्यात बाबा भक्तीविषयी ठाम मत मांडताना म्हणतात की अद्वैत भक्तीचा सोहळा केवळ ज्ञानेश परंपरेतच पहावयास मिळतो. इतरत्र मात्र भक्ती ही द्वैतपूर्ण साधना असे जाणतात. तसेच ज्ञानेश भक्ती ही केवळ मोक्षार्थ साधना नसून ती एक जीवनपद्धती आहे. म्हणून तिचाच सर्वांनी अवलंब करावा असा संकेत बाबा करतात.

'ज्ञानेशो भगवान् विष्णुः' हे सर्वमान्य मत बाबांनाही शिरोधार्य आहे. यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य ह्या षड्गुणांनी संपन्न असतो तो भगवान होय. श्रीज्ञानेश हे साक्षात् भगवान विष्णूच होत हे जगद्गुरू तुकाराम महाराज पुढील त्यांच्याच अभंगातून सिद्ध करतात.

जयाचिये दुवारी सोन्याचा पिंपळ । अंगी ऐसे बळ रेडा बोले ।।
करील ते काय नोहे महाराज । परी पाहे बीज शुद्ध अंगी ।।
जयाने घातली मुक्तिची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ।।

(यश) - (करील ते काय नोहे महाराज), (श्री) = (जयाचिये दुवारी सोन्याचा पिंपळ), (औदार्य) = (जयाने घातली मुक्तीची गवांदी), (ज्ञान) - (अंगी ऐसे बळ रेडा बोले), (वैराग्य) = (परी पाहे बीज शुद्ध अंगी), (ऐश्वर्य) = (मेळविली मांदी वैष्णवांची)

सगुण श्रेष्ठ की निर्गुण श्रेष्ठ ? ह्या वादाचा प्रश्न सहज सोडविणारे व सनातन सगुण हेच अव्यक्त पुरुषोत्तम पद होय. अर्थात् 'सगुण निर्गुण एकु गोविंदु रे' असे सैद्धान्तिक उत्तर देणारे श्रीज्ञानेश्वर महाराज हेच 'ज्ञानेशो भगवान विष्णुः' होत असा प्रस्फुट उद्गार बाबांच्याही मुखातून निघाला आहे.

वेदांच्या सर्व देवतांचा गुणगौरव एकात्मतेने सिद्ध करण्याची किमया श्रीज्ञानेशांनी ज्ञानेश्वरीत केलेली असल्यामुळे ज्ञानेश्वरीची महत्ता व्यक्त करताना 'ज्ञानेश्वरी म्हणजे वेदांची पुनरावृत्ती होय' असे बाबा म्हणतात. यावरून 'एका जनार्दनी संशय सांडोनि । दृढ धरी मनी ज्ञानेश्वरी ।।' असे श्रीएकनाथ महाराज म्हणतात ते का याचा उलगडा होतो. 'श्रीज्ञानेशांनी ज्ञानेश्वरीच्या रूपात भक्तीची महानता ब्रह्मसागरीच्या ज्ञानगंगेद्वारे भूलोकी प्रस्थापित केली' - बाबांच्या या वक्तव्यातून ज्ञानदेव व त्यांची ज्ञानदेवी यांची उत्तुंगता, विशालता दिसून येते.

पू. बाबांनी ज्ञानेश्वरीचा बारावा अध्यायच का निवडला ? तर ब्रह्मज्ञान व समाधिसुख यापेक्षा भगवद्भक्ताला भक्ती सुखद वाटते ही ज्ञानेशांची या अध्यायातील भूमिका बाबांना भावल्यामुळे त्यांनी बारावा अध्याय चिंतनासाठी निवडला. ज्ञानेशांनी दिव्योत्तम पुरुषाचा सोहळा येथे वर्णिला आहे, हेही ह्या निवडीमागचे आणखी एक कारण आहे.

जगत् असत्पासून निर्माण झाले म्हणून ते नाशवंत व दुःखरूप आहे असा निराशाजनक नकारात्मक दृष्टिकोण बाजूस सारून जगत् असत् पासून निर्माण झाले नसून ते परमात्म्यापासून निर्माण झाले आहे. म्हणूनच 'जग असकि वस्तुप्रभा' हा आशावादी, सकारात्मक व सच्चिदानन्दमय श्रेष्ठ दृष्टिकोण श्रीज्ञानेश मांडतात हे बाबांनी आवर्जून उल्लेखिले आहे.

*तरि अस्तुगिरीचिया उपकंठी । रिगलिया रविबिंबापाठी ।*
*रश्मी जैसी किरीटि । संचरती गा ।।*

बाराव्या अध्यायातील या ३५ व्या ओवीवरील रसाळ व विद्वत्तापूर्ण व विस्तारपूर्वक भाष्यात श्रीज्ञानेश प्रज्ञेचा बाबांनी अपूर्व गौरव केला आहे. तो असा, 'ज्ञानेशांचे कविरूप हे साक्षात् ईशरूपच आहे. 'ज्ञानेशप्रज्ञा' ही संवेदनांची अतिविस्तृत व सूक्ष्म स्पंदने जागृत करणारी, दिव्यानुभूती जाणून देणारी दिव्योत्तमा आहे. श्रीज्ञानदेव हे सिद्धहस्त कवी असून त्यांचे कौशल्य व क्रांतदर्शी प्रज्ञा या ग्रंथात साकार झाली आहे. म्हणूनच श्रीज्ञानदेवांच्या प्रसन्न प्रज्ञेतून निर्माण झालेली श्रीज्ञानेश्वरी हे निव्वळ एक वाङ्मय नसून ते ईश्वरीय वेदरूप सत्‌श्वसन आहे.'' तसेच 'वेदांची जाण ज्ञानेशांच्या प्रज्ञाप्रकाशाने पुनश्च उजळली आहे.' असेही बाबा नमूद करतात.

दिव्यामृतधारा प्रथम खंडाच्या अभिदर्शनात श्रीज्ञानेशांविषयी बाबा म्हणतात, 'श्रीभगवान् ज्ञानेश ही धार्मिक विश्वाच्या प्रांगणांतील अतिदिव्य तेजाने मंडित झालेली व उज्ज्वल ज्ञानप्रकाशी विभुती होय.' त्यांच्या ज्ञानप्रकाशाची किरणे अजूनही दशदिशांना प्रकाशीत आहेत.'

'धर्मसंस्थापनार्थाय । संभवामि युगे युगे ।' असा पुकारा करणारे भगवंतच ज्ञानेशांच्या रूपाने अवतरीत झाले. 'लोपले ज्ञान जगी । हित नेणती', अशा बिकट प्रसंगी 'अवतार पांडुरंग'च श्रीज्ञानेशांच्या रूपाने प्रकटले. ज्ञानेश रूपातील ह्या भगवद् अवताराचे प्रयोजन आपल्या अमृतमय बोलांतून वर्णन करताना पू. बाबा म्हणतात - 'एका नव्या युगाची प्रभात घेऊन धार्मिक विश्वाच्या क्षितिजावर ज्ञानेशांची पाऊले पडली. वसुधेच्या माग्यतिलकाचे सौभाग्य झाले व तत्त्वज्ञानाच्या रखरखलेल्या वाळवंटातून भक्तीचा ओलावा जीवाजीवांच्या जिव्हाळ्याने ज्ञानेशांच्या रूपाने प्रवाही झाला. ज्यावेळी भारत वर्ष अवैदिकांच्या निशाणाखाली उभा ठाकू पहात होता, जेव्हा बेबंद कर्मकांड्यांची बेधुंद धार्मिकशाही आपल्या पाशवी व स्वार्थी मुठीत धार्मिक विश्व आवळीत होती, जेव्हा अनाचारी व भ्रष्टाचारी असूर आपल्या भयानक दाढांखाली पवित्र धर्मास रगडू पहात होते, धर्माच्या नावाखाली अनुशासनाने गुलाम झालेली जनमने निराशेने हतवीर्य व गलितगात्र झाली होती, मदांध प्रवृत्तीच्या स्वैरदशेतून भारतीय वीरता व थोरवी आलस्याच्या आणि अकर्मण्यतेच्या काळ्या शिळेवर शतचूर्ण होण्याच्या बेतात होती तेव्हाच मन्महा श्रीज्ञानेश भगवान आपल्या ओजाने धर्मोदयाची ललकार उठवीत भारतीय सीमेवर आरोहण करते झाले.'

श्रीज्ञानेशांचा भक्तिपथ बाबांना अत्यंत हृद्य वाटला. पू. बाबा त्याविषयी चिंता, चिंतन मांडतात. भगवान श्रीज्ञानेश हे ज्ञानाचे ईश्वर व योगीश्वर असूनही त्यांनी भक्तीची गुढी पंढरीला नेली. भक्तीबाबत ज्ञानेशांची झेप अद्वितीय आहे. मुक्तिपेक्षाही भक्ती श्रेष्ठ असून धर्म - अर्थ - काम - मोक्ष या चार पुरुषार्थाहून श्रेष्ठ असा पंचम पुरुषार्थ म्हणजेच भक्ती होय. औपनिषदिक साधनेचा दिव्य ज्योतिष्पथ या भक्तीद्वारे ज्ञानेश सुचवितात. या सनातन जीवास भक्तीचा सोपा मार्ग सांगताना ज्ञानेश म्हणतात, 'मनास आवरू नकोस. इंद्रियांस कोंडू नकोस, तर सुदर्शनधारीलाच आपल्या देहाचे सारथ्य करण्यास हाक दे. हेच प्रेममय अद्वय भजन होय. नित्य, अखंड त्यातच देवाचा होऊन वाग.'

पू. बाबांनी श्रीज्ञानदेव महाराजांचे एक अत्यंत दिव्योत्तम स्वरूप दिव्यामृतधारेत दाखविले आहे की जे सांप्रदायिकांनाही अजून बोध आहे. श्रीज्ञानेशांचा खरा संदेश पू. बाबा स्वानुभविकरीत्या परखडपणे मांडतात. त्यामुळे सांप्रदायिक चौकटीत राहणारे काही लोक बाबांविषयी व दिव्यामृतधारेविषयी गैरसमज करून घेतात. बाबा तर स्पष्टपणे सांगतात की, ज्ञानदेव ही विभूती काही एखाद्या विशिष्ट सांप्रदायाची मक्तेदारी नाही तर ते अखिल विश्वाचे विश्वदेव आहेत. विश्वामाजी विश्व होऊन विचरण करणाऱ्या ज्ञानदेवांनी कोणत्याही पंथाचा वा पथाचा हटवाद सांगितला नाही. बाबा असेही म्हणतात की, काही सांप्रदायिक ज्ञानेशांचे तत्त्वज्ञान नीट ओळखू शकले नाहीत. महाराष्ट्राचा वारकरी विश्वसंजीवन ठरावा अशी ज्ञानेशांची बैठक आहे; पण आज ती अध्यात्माची प्रत्यक्षता राहिली नाही. स्वार्थ, जातीयता याही पंथात नृत्य करून नको त्या वृत्तींचे (सांगणे अवघड आहे) भजनी सूर आळवीत आहेत. ही प्रवृत्ती समाज धर्म यांना घातक आहे. काही सांप्रदायिक लोक अद्याप ज्ञानदेवांना नीट समजून-उमजून घेऊ शकले नाहीत याची खंत बाबांनी व्यक्त केली आहे. उदाहरणार्थ, ज्ञानराज हे भक्तिरहित योगाचा निषेध करतात. पण नेमके हेच न समजून घेतल्याने काही विद्वान सांप्रदायिक ज्ञानेश्वर महाराज योगाचा निषेध करतात, असे चुकीचे प्रतिपादन करून लोकांची दिशाभूल करतात. श्रीज्ञानेशांना सुचवायचे आहे ते हे की, 'भक्तीवाचून जो मार्ग तो कष्टप्रद असतो म्हणूनच ते भक्तिविरहित योगाचा निषेध करतात. तसे नसते तर 'योगा ऐसे सोपे' असे उद्‌गार श्रीज्ञानेशांनी काढलेच नसते पण दुराग्रही खुळ्या सांप्रदायिकांनी ज्ञानेशांचा मानस ओळखला नाही. पू. बाबांच्या मार्मिक निर्देशाकडे दुर्लक्ष करून अद्यापिही सांप्रदायिक विद्वान लोक बाबांच्या दिव्यामृतधारेकडे काना-डोळा करतात. वास्तविक सांप्रदायिकांनी आपल्या दुराग्रही मतांच्या चौकटीतून बाहेर येऊन दिव्यामृतधारेचे भक्तिभावपूर्वक अवगाहन केले तर ज्ञानेशांचे व त्यांच्या दिव्य विचारांचे सत्यदर्शन निश्चितच घडेल. अर्थात् त्यासाठी दिव्यामृतधारा या ग्रंथाचा प्रचार व प्रसार वारकरी सांप्रदायातही होणे आवश्यक आहे. पू. बाबांचा दिव्यामृतधारा ग्रंथ म्हणजे 'समाधिस्थ मूर्ति श्रीज्ञानदेव' यांचे दर्शन करून देणारा गवाक्ष होय. असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही.

दिव्यामृतधारेतून पू. बाबांनी घडवून आणलेले श्रीज्ञानेश दर्शन शब्दबद्ध करता येणे फारच कठीण आहे. ती किमया एक बाबाच जाणोत. आता, ज्ञानेशांनी सांगितलेल्या दिव्यसंकेत वा पथ अणि व्रतपंचक यांचा विचार मांडून या लेखाचा समारोप करू. बाबा सांगतात, 'साधकाने विश्वकल्याणाचा मार्ग धरावा.' हा ज्ञानेशांचा संकेत आहे. पण लोक हाच संकेत विसरले आणि समाज व विश्व यावरील प्रेमाचा झरा व्यक्तिप्रतिष्ठेच्या ओढ्यात रिचवू लागले तसेच 'काहीही करा व कसेही वागा पण नाम घ्या' फक्त स्वउद्धारच करून घ्या. विश्वाची चिंता करू नका.' असा विलक्षण व मूर्ख उपदेश करू लागले.

पण ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, 'सावध हो ! विश्वकल्याणाचा सुपंथ राखणारे जीवन स्वीकारून विश्वात्मक देवावर प्रेम प्रकट कर. तू त्या देवाचा वंशीय आहेस. त्यावरच निष्काम सेवाभावाने अनुरक्त हो व दिव्य समाज निर्माण होईल असा आदर्श घडव. आदर्शाकडे मन वळवीत रहा. पापप्रवृत्तीचा धिक्कार कर. धर्मशील जीवन जगण्यासाठी निःस्वार्थता, पापभीरूता, अहिंसक वृत्ती, दानशीलता व सहृदयता या व्रतपंचकाचा स्वीकार कर. स्वार्थ सोड, दानमय प्रकृती घे. सर्वांशी सहयोगाने वाग आणि निरंतर प्रभुप्रेमाने चिंतनशील हो.'

**श्री. राजेंद्र गणपत दहिभाते**
११५/११६ सुतारवाडी, पो. पाषाण, ता. हवेली,
जि. पुणे ४११०२१.

***धर्म ही कोणत्याही एका समाजाची मिरास नसते. धर्म ही जगाच्या मोकळ्या आवारात, अखिल विश्वाच्या मानवांसाठी दिलेली हाक आहे. व्यक्ती आणि समाज यांच्या विकसनासाठी क्रियाशील होणारी धारणा म्हणजे धर्म, असा हिंदुस्थानातील सर्व शास्त्रांचा मथितार्थ आहे.***



# ॥ दिव्यामृतवाणीचे बाबा महाराज ॥


**ज्योतिर्भास्कर श्री. जयंत साळगांवकर.**

*ज्योतिषालंकार, ज्योतिर्मार्तंड. संकेश्वरचे श्रीशंकराचार्य यांनी परीक्षा घेऊन ज्योतिर्भास्कर ही पदवी दिली. कालनिर्णय सर्वेसर्वा. संत वाङ्मयाचे ज्येष्ठ व्यासंगी. आदित्य प्रतिष्ठानचे अध्यक्ष. महाराष्ट्र गणेशोत्सव महामंडळाचे अध्यक्ष. अनेक संस्थांचे आधारस्तंभ. थोर उद्योजक.*


'प्राण्यांच्या जीवनात कालगतीने जेव्हा आपत्काल वा भयावह परिस्थिती निर्माण होते तेव्हा सुरक्षिततेसाठी व सुखासाठी तो प्राणी आपल्या सामर्थ्यवंत प्रियजनांकडे धाव घेतो. आपत्काली मोठ्या प्रेमाने जो आश्रय देऊ शकेल त्यालाच स्वसंरक्षणार्थ सर्व प्राणी काकुळतीने पाचारितात, हे नैसर्गिकच आहे. ज्याला साहाय्यार्थ हांक घावयाची तो आपल्यापेक्षा समर्थ, आपल्याकरिता सर्वस्व त्यागू शकेल या मनाचा आणि निर्व्याज प्रेमाने आपली भावना ओळखून अभीप्सापूर्ती देणारा, त्याचा व आपला संबंध जगातील सर्व नात्यांमध्ये अति उत्कट जिव्हाळ्याचा असणे इत्यादी धर्मांनी व गुणांनी मंडित असावा लागतो. कित्येक वेळी ज्यांच्या ठायी काही गुण अल्पतः आहेत त्यांनाही संकटकाळी साहाय्यार्थ हाक देतात. पण त्यांचा काय उपयोग होणार ! संकटाचे स्वरूप जर उग्र असेल तर साधारण गुणांच्या पुरुषांकडून कार्य कसे होणार ? बुडणारा जसा काडीचा आधार घेतो त्याप्रमाणे अडचणीत सापडलेला प्राणी मिळेल त्याचा आश्रय घेऊ इच्छितो हे खरे; पण त्यावेळी जर बलवंताचा आश्रय मिळाला तरच तो त्याला उपयोगी पडतो.' श्रीज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायातील नमनाच्या ओव्यांवर निरूपण करीत असताना साहाय्यकारी सक्षम गुरूबद्दलचे हे विचार प्रगट केले आहेत ते महान संतपुरुष प. पू. बाबामहाराज आर्वीकर ह्यांनी !

संसारतापाने तावून निघणाऱ्या लाखो प्रापंचिकांना आपल्या संजीवक अमृतवाणीने दिलासा देणाऱ्या बाबामहाराजांचे संपूर्ण जीवनचरित्र हे इतक्या चमत्कारपूर्ण घटना-प्रसंगांनी समृद्ध आहे की, त्याचा एकसंधपणे नीट विचार केला की, मन अवाक् होते.

बाबांचे वडील प्रभाकरपंत जोशी वर्धा जिल्ह्यातील आर्वी ह्या गावी शिक्षक होते. त्यांच्या घरात दत्तभक्तीची परंपरा होती. ते स्वतः दत्तभक्त म्हणूनच ओळखले जात. नारायणमहाराज हे सिद्धपुरुष प्रभाकरपंतांचे गुरू. त्यांचा आपल्या ह्या शिष्यावर अतिलोभ होता. ऐन तारुण्यात कसल्याशा आजाराचे निमित्त झाले अन् प्रभाकरपंतांची इहलोकीची यात्रा संपली. उभा गाव हळहळला. सर्व तयारी झाली. इतक्यात हे नारायणमहाराज अचानक तिथे आले. प्रभाकरपंतांचा तो निष्प्राण देह पाहून त्यांना भावनावेग आवरला नाही. ते त्यांच्या निःष्प्राण देहावर बसले अन् आपल्या दोन्ही हातांनी प्रभाकरपंतांच्या छातीवर, दोन्ही गालांवर जोरजोरात थापड्या मारू लागले. एकीकडे हातांनी त्यांना मारत असताना दुसरीकडे ते मोठमोठ्याने "अरे प्रभाकरा, मला न सांगता जाण्याचा अधिकार तुला कोणी दिला ? मला न विचारता तू गेलाच कसा ? तू असा जाऊ शकत नाहीतस. हवी तर मी तुला माझ्या आयुष्यातील २५ वर्षे देतो. पण तू आता ऊठ.' असे बोलत होते. काही वेळाने प्रभाकरपंतांनी डोळे उघडले. घरी-दारी जमलेली सर्व मंडळी आनंदली. नारायणमहाराज आले तसे निघून गेले. ह्या घटनेनंतर बऱ्याच वर्षांनी मोरेश्वराचा म्हणजे आपल्या बाबामहाराजांचा जन्म झाला. श्रद्धा-अंधश्रद्धा सारे काही बाजूला ठेवून तटस्थपणे ह्या घटनेकडे बघताना माझ्या मनात विचार आला, बाबांसारखा महान धर्मप्रसारक, अलौकिक सत्पुरुष आपल्या समाजाला, आपल्या महाराष्ट्राला मिळावा, म्हणून तर नियतीने नारायणमहाराजांकरवी प्रभाकरपंतांचे प्राण परत केले नसतील ना ? तसेच असावे. कारण विशेष म्हणजे त्या घटनेनंतर खरोखरच बरोबर पंचवीस वर्षांनी प्रभाकरपंत निवर्तले. तेव्हा बाबा पंधरा वर्षांचे होते.

बाबा साधारण २॥-३ वर्षांचे असताना अचानक आजारी पडले. अगदी तळ्यात-मळ्यात अशी नाजूक अवस्था होती. आई-वडिलांसह साऱ्यांनीच आशा सोडली होती. आईला अश्रू आवरत नव्हते. इतका गोड, गोजिरवाणा मुलगा अंतरण्याचे दुःख माता-पित्यांना होतेच. दोघेही मनाची तयारी करीत होते. इतक्यात पुन्हा हे नारायणमहाराज आले. त्यांनी निर्विकारी मनाने बाबांच्या आईला 'मला खूप भूक लागली आहे. वेळ न दवडता भात कर.' अशी आज्ञा केली. त्या माऊलीनेही नापसंतीचे अवाक्षरही न काढता पतीच्या ह्या गुरूसाठी भात रांधला. पान मांडले. नारायणमहाराज जेवू लागले. दोन-तीन घास खाऊन झाल्यावर त्यांनी मोरेश्वराची चौकशी केली. 'कुठे आहे तो ? जेवायला त्याला इकडे आणा. माझ्याबरोबर तो पण जेवील.' असे सांगताच त्या माऊलीने रडत रडतच मृत्यूशी झुंजणाऱ्या आपल्या लाडक्या लेकराला त्यांच्या मांडीवर ठेवले. नारायण महाराजांनी बळेबळेच त्याला दोन घास भरविले. काही वेळाने बाल मोरेश्वराने डोळे उघडले. एक-दोन दिवसाने तो पूर्वीसारखाच नाचू-बागडू लागला.

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, विदर्भातील अन्य काही संत ह्यांचा सहवास मोरेश्वराला नित्याचाच मिळत होता. त्यांच्या अवती-भोवती, नाचत-बागडत, त्यांच्या सावलीत बाबा वाढत होते. नकळत्या वयात नकळत मनांवर सुसंस्कार होत होते. ईश्वरभक्तीचीही गोडी लागली होतीच. त्यातच शाळेतील शिक्षणाबरोबरच वडील वेगवेगळे आध्यात्मिक ग्रंथ त्यांच्याकडून वाचून घेत होते. पुढे वडील गेल्यावर लगेचच अवघ्या पंधराव्या वर्षी बाबांनी घर सोडले. गावांतील दत्तमंदिरात ते राहू लागले. बाबांचा माधणूरला स्थायिक होईपर्यंतचा पुढचा सारा प्रवास हा कोणत्याही सिद्धसाधकाच्या प्रवासासारखाच होता. अत्यंत खडतर, पावलोपावली परीक्षा घेणारा, सारे गुण, सारी तपश्चर्या कसास लावणारा असा तो प्रवास बाबांनी मोठ्या नेटाने पूर्ण केला. हा प्रवास आता आपल्या साऱ्यांनाच

ठाऊक आहे. एकीकडे असे परीक्षा घेणारे प्रसंग तर दुसरीकडे गाडगेबाबांसह अनेक संत मंडळींचा, सिद्धपुरुषांचा सहवास, अनुग्रह, गुरुदेव रानड्यांची महाराष्ट्रातच राहण्याचा दिलेला मोलाचा सल्ला, अक्कलकोटच्या स्वामीसमर्थांची कृपादृष्टी, दत्तदर्शन, अनेक अलौकिक पारमार्थिक अनुभूतींचे क्षण - सारे कसे सामान्यांच्या आकलनपलीकडचेच नियतीची-दैवाची अतिदुर्लभ अनुकूलताही बाबांना मिळाली. बाबांनी नियतीच्या कृपादृष्टीचे आणि आपल्या गुणांचे परिश्रमपूर्वक सार्थक केले.

व्यवस्थितपणा, नीटनेटकेपणा हा बाबांचा गुण कोणाच्याही सहज लक्षात यावा असा. वेळेबाबतही बाबा अतिदक्ष असत. ठरल्या वेळी ठरलेले काम पूर्ण करण्याकडे त्यांचा भर असे. एकदा प्रवचनाची ठरलेली वेळ टळण्याचा प्रसंग आला. बाबा अस्वस्थ झाले. सभोवताली उपस्थित असलेल्या मंडळींना म्हणाले, 'मी माझ्या प्रवचनाला सुरुवात करणार. श्रोते येवोत वा न येवोत.' अशाच एका निरूपणाच्या वेळी घडलेली घटना. केवळ कपोलकल्पित वाटावी अशी ही घटना बाबांच्या 'साधनसंहिता' ह्या ग्रंथाच्या सांगतेच्या दिवशी घडली. भिंतीवर अक्कलकोटच्या स्वामींचा फोटो होता. त्या फोटोला हार घातलेला होता. त्या फोटोखाली बाबा बसले होते. बाबांनी ग्रंथाची शेवटची ओवी पूर्ण केली आणि चित्रपटातील किंवा नाटकातील 'ट्रीक सीन' वाटावा अशा तऱ्हेने अक्कलकोट स्वामींच्या फोटोला हार घातलेला हार अलगदपणे बाबांच्या गळ्यात येऊन विराजमान झाला. ह्या महाप्रसादाने बाबा सद्‌गदित झाले.

ज्ञानेश्वरीच्या १२ वा अध्याय हा बाबांना अतिप्रिय. ते बाराव्या अध्यायावर निरूपण करताना अगदी भारावून जात. त्यांचा वागीघ अखंड, आवरते वाहू लागे. ती लिहून घेण्याचा अनेकांनी प्रयत्न केला. पण त्यातील काही ओंजळीच भरून घेण्यात मंडळी यशस्वी झाली. प्रचंड लोकाग्रहाला मान देऊन पुढे बाबांनी ह्या बाराव्या अध्यायाच्या नमनाच्या गुरुस्तवनाच्या १९ ओव्यांतील प्रत्येक शब्दावर केलेले ५२५ पृष्ठाचे निरूपण हाही एक वाङ्मयीन चमत्कारच आहे. त्या ग्रंथाचे 'दिव्यामृतधारा' हे नाव यथार्थ आहे. हे तो ग्रंथ वाचला, अभ्यासला की पटते.

बरोबर ३३ वर्षांपूर्वी दत्तभक्त घराण्यात जन्मलेल्या बाबांनी मार्गशीर्ष पौर्णिमेला म्हणजे दत्तजयंतीला दि. २ डिसेंबर १९७१ रोजी लौकिकार्थाने आपला देह ठेवला. मात्र त्यांच्या दिव्यामृतधारेच्या रूपाने बाबा अमर झाले आहेत, अक्षर झाले आहेत ह्यात शंका नाही. बाबांच्या पवित्र स्मृतींना विनम्र अभिवादन !


**ज्योतिर्भास्कर श्री. जयंत साळगावकर**

१७२, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय बिल्डींग, तळमजला,

दादर, मुंबई ४०००१४


***देवभक्तीचे कमळ जीवनाच्या कर्मपंकात तेव्हाच उगवते की जेव्हा चित्त व मन निर्मळ, निष्कपट आणि प्रामाणिक असते. निर्मळतेचे झुळझुळणारे पवित्र विचारजळ ज्याच्या अंतकरणात स्थिरतेने सतत वाहाते, त्याच्या जीवन पथावर प्रभूचा कृपामय प्रकाशझोत केव्हाना केव्हा प्रकटल्याशिवाय राहात नाही.***



# दिव्यामृत धारा म्हणजे अमृताच्या धारा


**श्री. वा. ना. उत्पात**

*श्रीज्ञानेश्वरी लेखक. श्रीसच्चिदानंद बाबा यांचे १६ वे वंशज. ५० वर्षे ज्ञानेश्वरी व इतर ग्रंथांवर प्रवचन व कीर्तन सेवा. सहकार खात्यात ३३ वर्षे नोकरी नंतर निवृत्त. सोलापूर येथे श्रीज्ञानेश्वर-तुकाराम मंदिर प्रकल्प सुरू. श्रीसंतसाहित्य सेवा संघ सोलापूर संस्थेद्वारा ८-१० ग्रंथांच्या प्रकाशन कार्यात मोलाचा सहभाग.*


पू. वै. बाबामहाराज आर्वीकर हे एक महान योगी, तपस्वी, ज्ञानी, कर्मयोगी होतेच होते. पण त्याहीपेक्षा अधिक म्हणजे ते परमात्म्याचे परमभक्त होते. भक्त ज्ञानी, योगी, तपस्वी असू शकतो. पण ज्ञानी, योगी, तपस्वी भक्त असेलच असे नाही. पण वारकरी संप्रदायातील संत हे ज्ञानी होते, योगी होते. तपस्वी होते तसेच परम भक्त होते.

ज्ञानेश्वरी हे भक्तिशास्त्रच आहे. भक्तीविषयी माऊलींची जी भूमिका आहे तीच आर्वीकर महाराजांनी 'दिव्यामृतधारा' या ग्रंथात विशद केली आहे. माऊली म्हणतात, 'जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत । हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥' सर्व भूतांच्या ठायी भगवंताला पाहणे हीच भक्ती आहे. ही भक्तीची उच्चतम कल्पना ज्ञानेश्वरीत आहे.

संत एकनाथ महाराज म्हणतात, 'निःशेष मावळल्या अहंकृती । भूते निजात्मरूपे दिसती ।' माझ्या स्वरूपाची सहज स्थिती । ते माझी मुख्य भक्ति उद्धवा ॥' (ए.भा.) अहंकार संपूर्ण गेल्यावर सर्व भूतमात्र आत्मरूपाने दिसतात. ती ईश्वराच्या स्वरूपाची सहज स्थिती आहे. उद्धवा, ती माझी मुख्य भक्ती आहे. ज्ञानेश्वर महाराज सुद्धा भक्तीला 'ईश्वराची सहजस्थिती' म्हणतात. 'पै माझिये सहजस्थिती । भक्ति नांव ॥'' (ज्ञा. १८.११९३)

तुकाराम महाराजसुद्धा म्हणतात, 'विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म' वैष्णवांचा धर्म कोणता ? सर्व जग विष्णूने भरले आहे, असे पाहणे. त्यालाच भक्ती म्हणतात.

ज्ञानेश्वरीचे अभ्यासक कै. वि. स. पागे यांना कोणी विचारले, 'ज्ञानेश्वरीचे सार एका वाक्यात सांगा.' त्यावर पागे यांनी सांगितले, 'किंबहुना नारायणे विश्व कोंदले' हे सारे विश्व ईश्वराने ठासून भरले आहे. हे ज्ञानेश्वरीचे सार आहे. त्याची अनुभूती येणे म्हणजे भक्ती होय.

तुकाराम महाराज हेच सांगतात :

*विश्वी विश्वंभर । बोले वेदांतीचे सार ॥*
*जगीं जगदीश । शास्त्रे वदती सावकाश ॥*
*व्यापिले हे नारायणे । ऐसी गर्जती पुराणे ॥*
*जनीं जनार्दन । संत बोलती वचन ।*
*सूर्याचिया परी । तुका लोकी क्रीडा करी ॥*

संपूर्ण विश्वात एक विश्वंभर ओतप्रोत भरला आहे असे उपनिषदे सांगतात. जगात जगदीश भरला आहे असे शास्त्रे सावकाश सांगतात. हे जग नारायणाने व्यापले आहे, असे पुराणे गर्जतात. जनात जनार्दन आहे, असे संत बोलतात. सूर्यनारायणाप्रमाणे परमात्मा विश्वात भरून उरला आहे. याची अनुभूती येणे म्हणजे भक्ती होय.

'दिव्यामृत धारा' या ग्रंथात हीच उच्चतम भक्ती आर्वीकर महाराजांनी प्रतिपादिली आहे. ते म्हणतात, 'जग जगदीश्वर एकच आहेत', असे अनुभवणे म्हणजे समप्रज्ञा आहे. सकल विश्वाचा शिवरूपाने अनुभव घेणे म्हणजे साक्षात्कार होय. हा साक्षात्कार होण्यास गुरुकृपा म्हणजेच ईश्वरकृपा लागते.'

एक साधू होता. सर्वत्र ईश्वर भरून राहिला आहे. 'हरि दिसे जनी वनी आत्मतली' हे ज्ञान त्याला झाल्याने त्याला भक्ती प्राप्त झाली होती. त्याला रस्त्याने जाताना एका दुष्ट दुर्जनाने खूप बडविले. तो खाली रस्त्यावर कोसळला व वेदनेने तडफडू लागला. एक सहृदय माणूस शेजारून चालला होता. त्याला दया आली. त्याने साधूला पाणी पाजले. मलमपट्टी केली. त्याला विचारले, 'तुला कोणी मारले ?' तो म्हणाला, 'ज्याने मारले, तोच आता मलमपट्टी करीत आहे.' त्याला मारणारा व मलमपट्टी करणारा दोघेही ईश्वरच दिसत होते. ही समबुद्धी म्हणजे भक्ती होय.

बाबा महाराज आर्वीकर म्हणतात, 'पिंड व ब्रह्मांडाच्या ऐक्याचा अनुभव भक्तीने येतो. भक्तियोगाने पिंडातील शक्तिकेंद्रे उमलित होतात. उच्च आनंद प्राप्त होतो. त्याच वेळी विश्वाचे जड रूप दूर होऊन त्याचे सत्स्वरूप प्रगट होते. भक्तीने विश्वाचे जड स्वरूप दूर होते, म्हणजे मायेचा पडदा दूर सारला जातो व चैतन्य प्रगट होते. जे योगाने साध्य होते तेच भक्तीनेही प्राप्त होते.' भक्तीचे योगनिष्ठ स्वरूप प्रगट करून बाबांनी अध्यात्मशास्त्रात फार मोठे योगदान दिले आहे. आर्वीकरांनी 'दिव्यामृतधारा' या ग्रंथात भक्तीचे दिव्यरूप वर्णन केले आहे. ते म्हणतात,

'भक्ती ही जीवन जगण्याची एक साम्यवादी व प्रेममय वाट आहे. ही सकल सृष्टीच्या अभ्युदयाची आणि जीवांना निःश्रेयसाकडे नेणारी श्रांतपथक्रमिका आहे. भक्तियोग हा गीतेचा प्रतिवाद्य विषय आहे. भक्ती शिवाय इतर मते म्हणजे कोरडी गंगाच आहे. भक्तिशास्त्र म्हणजे जीवननिष्ठ दर्शन आहे.'

भक्ती ही जीवन जगण्याची साम्यवादी वाट आहे, हे त्यांचे मत. कार्ल मार्क्सचे साम्यवादी मत नाही. मार्क्सचा साम्यवाद मजूर व मालक, आहे रे व नाही रे यांच्यात विषमता करणारा आहे. संघर्ष पेटवणारा विषमवाद आहे. भक्तीचा साम्यवाद सर्व भूतमात्रांत ईश्वर पाहणारा आहे. ती प्रेममय वाट आहे. मार्क्सची वाट द्वेषमय आहे. भक्तीने इहलौकिक कल्याण-अभ्युदय व पारलौकिक कल्याण - निःश्रेयस प्राप्त होते. आचार्य विनोबा भावे सुद्धा म्हणतात, 'गीतेचे सार म्हणजे साम्ययोग आहे.'

पू. बाबांनी भक्तीचे उत्तम दर्शन घडविले आहे. ते म्हणतात, 'जीवनमुक्त करणे हे भक्तीचे साध्य आहे. जीवनमुक्ती म्हणजे भक्तिमय प्रगत दशा होय. भक्ती हे मोक्षाचे साधन नव्हे. भक्तीच्या वाटेवर मोक्ष

मिळलही. पण भक्ती तेथे थांबत नाही. जीवनमुक्त होऊन् सगुण प्रमान नांदणे हा भक्तीचा लाभ आहे.'

जीवनमुक्ती मरणानंतर प्राप्त होते असे नाही तर जिवंतपणी जीवनमुक्त होता येते. जीवनमुक्ती ही भक्तीची प्रगत दशा आहे हे बाबांचे मत यथार्थ आहे. कारण सर्व संत हे जीवनमुक्त होते व भक्तीत रममाण झाले होते. भक्ती मोक्षप्राप्तीसाठी नाही तर जीवनमुक्त होण्यासाठी आहे. हा बाबांचा विचार संतांच्या विचाराशी सुसंगत आहे. तुकाराम महाराजांनी, 'नलगे मुक्ति धन संपदा' म्हणून मुक्ती नको म्हणून सांगितले. भक्तीच्या वाटेवर मोक्ष मिळतो खरा पण संत तेथे थांबत नाहीत. त्यांना मोक्षापेक्षा भक्ती आवडते. म्हणून जीवनमुक्त झाले तरी त्यांची सगुण भक्ती चालूच राहते. शंकराचार्य हे जीवनमुक्त होते तरी जेथे जेथे ते गेले, तेथे तेथे त्यांनी त्या त्या देवतांची स्तोत्रे केली व सगुणात रमले. शुकाचार्य हे जीवनमुक्त होते तरी भागवताच्या सगुण वर्णनात रममाण झाले. म्हणून बाबा म्हणतात, त्याप्रमाणे जीवनमुक्त होऊनसुद्धा सगुण प्रेमाने नांदणे, हा भक्तीचा लाभ आहे. हा विचार संत विचारासी पूर्ण सुसंगत आहे.

बाबा पुढे म्हणतात, 'भक्तिरूप होणे हे भक्तियोगाचे फळ आहे. मोक्ष व ईश्वर त्यात आहे. भक्तिमार्गावर ईश्वरप्राप्तीसुद्धा गौण मानली आहे. इथे साध्यही भक्तीच आहे व साधनही भक्तीच आहे. भक्तिरूप होणे हे भक्तीचे फळ आहे. हे बाबांचे मतही शास्त्रसंमत व संत विचाराशी सुसंगत आहे. श्रीमद् भागवताने भक्ती साधन मानली व साध्यही मानली आहे.'

बाबा म्हणतात, 'भक्ती सर्व साधनांची व महत्तेची जननी आहे. मोक्ष व ईश्वर त्यात आहे.' केवढा दिव्य व उदात्त विचार आहे ! सर्व साधने भक्तीतून निर्माण होतात. ज्ञान, कर्म, तप, यज्ञ, दान जेवढी म्हणून साधने आहेत ती सर्व भक्तीतून उद्‌भवतात. सर्व साधनांना भक्तीची गरज आहे. पण भक्तीला कशाची गरज नाही. कर्म भक्तियुक्त नसेल तर व्यर्थ आहे. भक्त हा एकाच वेळी योगी, ज्ञानी, उत्तम कर्मवादी, वैराग्यशील व तपस्वी असू शकतो. पण योगी ज्ञानी आदि भक्त असतीलच असे नाही. चांगदेव योगी होते. भक्त नव्हते. दुर्वास ज्ञानी, तपस्वी होते, भक्त नव्हते. पण आमचे सर्व संत भक्त होते. म्हणून योगी, ज्ञानी, कर्मयोगी वगैरे सर्व काही ते होते. ऋषी, मुनी, योगी, भ्रष्ट झाल्याची उदाहरणे सापडतात. पण आमचे कोणतेही संत कधी भ्रष्ट झाल्याचे उदाहरण सापडत नाही.

भक्ती निर्गुण आहे; तशी सगुणही आहे. ती सगुण आहे कारण संतांनी तिचा अनुभव घेतला आहे. त्याच्या रूपाचे वर्णन केले आहे.

भक्तीचा अधिकार सर्वांना आहे. वेद जरी आपल्या ठायी संपन्न आहे तरी स्त्रीशूद्रांना ज्ञान देण्यात तो कृपण झाला. भक्ती मात्र सर्वांना अधिकार देते. भक्ती दुराचारी माणसांनाही शुद्ध करते. भक्ती करणारा पशू जरी असला तरी तो मुक्त होतो. ओहोळ गंगेला मिळाला की गंगा होते. तसे पापी भक्त झाला की तो पावन होतो. सारा समाज उद्धरावा, समाजात दिव्यता निर्माण व्हावी म्हणून भक्ती निर्माण झाली.

'भक्तीमध्ये सुलभता, सर्वकषता, व्यापकता, विशालता, उदारता सर्व काही आहे.'

दिव्यामृत धारेने भक्तीमार्गाच्या आचरणात नामसाधनेला अपार महत्त्व दिले. बाबा म्हणतात, 'नाम नुसत्या व्यक्तीच्या उद्धारासाठी नाही तर सर्व जग शुद्ध करण्यासाठी आहे. नाम चित्त शुद्ध करते व विश्वशुद्धीही करते...सारे जग सुखरूप करण्याची इच्छा असेल, तर प्रत्येकाने आपल्या प्रत्येक निःश्वासात आपले संकल्प शुद्ध ठेवावेत. नामस्मरणाने त्यांचे श्वास त्या देवतांकडे जातात व त्याचे दिव्यत्व नामस्मरण करणाराला प्राप्त होते. त्याच्या बाह्य शरीरात, वृत्तीत बदल घडतो... वेदमंत्र पठणाने जसे विश्वकल्याण होते, तसे नामस्मरणाने विश्वकल्याणाचे वारे वाहू लागतात. नाम हे परमार्थ साधन आहे. ते विश्वशांतीसाठी व विश्वाच्या कल्याणासाठी उपयुक्त आहे.'

पू. बाबांनी नामस्मरणाचे वर्णन केलेले हे माहात्म्य परमोच्च आहे. नामस्मरणाचे हे वैश्विक महत्त्व इतक्या उच्च स्थानावरून कोणी क्वचितच विशद केले. ज्ञानेश्वर महाराज हरिपाठात म्हणतात,

'नामे तिन्ही लोक उद्धरती' बाबा महाराज म्हणतात, नामाने विश्वाचे कल्याण होते. विचार तोच आहे. नाम विशाल आहे. ब्रह्मांडाला व्यापून उरणारे आहे.

***ज्ञानदेव पुसे निवृत्तीची चाड । गगनाहुनी वाड नाम आहे ॥***

ज्ञानदेवांनी नामाचे महत्त्व निवृत्तिनाथांना विचारले, तेव्हा ते म्हणाले, 'नाम गगनापेक्षा मोठे आहे.' नामदेव महाराज म्हणतात.

***नांदतसे नाम आकाश पाताळी । सर्व भूमंडळी घनदाट ।***
***पाताळ फोडोनि किती आहे पुढ । नाही अंत वाउन भवरी ॥***
***अनंत ब्रह्मांडे व्यापक ते नाम । अनादि निष्काम विश्वंभर ।***

बाबा महाराजांनी भक्तियोगाचे विवेचन करताना नामाचे महत्त्व वर्णन केले आहे.

'दिव्यामृतधारा' हे नावच मुळी नामाचे आहे. या विश्वावर वर्षणारी दिव्य अमृताची धारा म्हणजे नामच आहे.

बाबा महाराजांचा भक्तियोग सारांश रूपाने सांगायचा झाल्यास, त्याचे स्वरूप असे सांगितले आहे.

'संतांच्या भागवतधर्मात जीवनाला मूल्य आहे. उपासनेला बळ आहे. क्रियेला ज्ञानाचा स्पर्श आहे. विश्वरूप आत्म्याशी तद्‌रूपत्व आहे. त्यांच्या पारमार्थिक विचाराप्रमाणे अद्वैतसिद्धी हे अंतिम दर्शन आहे. अंतिमपदाला जाण्यासाठी गुरुभक्ती, प्रेममय भक्तियोग हा मार्ग आहे.'

पूजनीय बाबांच्या मते जीव ब्रह्माचे अभेदत्व हे अंतिमपद आहे. तेथे जाण्यासाठी भक्ती हेच साधन आहे.

'दिव्यामृतधारा' हा ग्रंथ म्हणजे बाराव्या अध्यायातील भक्तिदर्शनच आहे. योगी अरविंदांच्या इंग्रजी भाषेप्रमाणे बाबांची मराठी भाषा उच्च दर्जाची आहे. अमृताचे भोजन देण्यासाठी ताटही सोन्याचे लागते. पत्रावळीवर ते देता येत नाही. तसे ज्ञानेश्वरीचे दिव्यामृत बाबांनी रत्नाच्या वाटीत दिले आहे. दिव्यज्ञान भिकार व रूक्ष भाषेत मांडणे म्हणजे कमळदलाच्या ताटात वाळूचे खडे खाण्यासारखे आहे. बाबांच्या 'दिव्यामृतधारा' ग्रंथातून भक्तीचे अमृत दिव्य व साक्षात्कारी भाषेत दिले आहे.

**श्री. बा. ना. उत्पात**
२९३०, 'राधा नारायण' पश्चिम द्वार, पंढरपूर,
जि. सोलापूर, ४१३३०४.





# 'येथ चैतन्य बहरले । तेचि साकार झाले ।'


**प्रा. म. अ. कुलकर्णी तथा स्वामी प्रज्ञानंद**

एम.ए. शिवाजी विद्यापीठात मराठीत सर्वप्रथम. निवृत्त मराठी विभाग प्रमुख. श्री.आर.के. कॉलेज ऑफ कॉमर्स कोल्हापूर. कथा, कविता, स्फुट लेखन. निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रकाशित. सहा पुस्तके प्रकाशित. महाराष्ट्र महाराष्ट्राबाहेर व्याख्याने. 'श्रीक्षेत्र पावस' षण्मासिकाचे संपादक.


३ ऑगस्ट १९२५ हा श्री बाबांचा जन्मदिवस. वर्धेच्या परिसरातील बाबांच्या आर्वी या विदर्भातील पुण्यग्रामी त्यांचा जन्म झाला. प्रभाकरपंत हे त्यांचे वडील, अन्नपूर्णाबाई या मातोश्री, जोशी हे आडनाव. समग्र घराणे साधुसंतांच्या आशीर्वादाने कृतार्थ झालेले. या घराण्याचे मूळ पुरुष वामननाथ महाराज हे नाथपंथी मीननाथ महाराज यांचे शिष्य होते. म्हणजे नाथपंथाचा वारसा त्यांना पूर्वपुण्याईने लाभलेलाच होता. पुण्यश्लोक संत मायबाई, सिद्धपुरुष नारायणमहाराज माळी या वैदर्भीय संतांची या घराण्यावर पूर्ण कृपा होती. घरचे समग्र वातावरण अध्यात्म विषयाला प्रेरक व पोषक असेच होते. संत तुकडोजी महाराज, शेख फकीरबाबा, काशिनाथ बाबा या अलीकडील महात्म्यांची ये-जा या जोशी कुटुंबात आत्मीयतेने होत असे.

वयाच्या अवघ्या दहाव्या वर्षी बाबांनी रामायण, महाभारत, गीता, भागवत, रामचरितमानस या ग्रंथांचे वाचन पूर्ण केलेले होते. त्यातील अलौकिक तेजस्वी विचारांचा प्रभाव बाबांच्या मनावर झाला आणि या मानवी जीवनात जे गूढ आहे त्याचा रहस्यभेद करण्यासाठी ते उत्सुक होत राहिले. संत साहित्यातील या श्रेष्ठ अनुभवाचा आपल्यालाही प्रत्यय यावा, संतकृपेचा प्रसाद प्राप्त व्हावा, त्या अतिसूक्ष्म तसेच अतिविराट अनुभवाची प्राप्ती व्हावी, ही ओढ त्यांना वाटू लागली. मॅट्रिकपर्यंतचे लौकिक शिक्षण पूर्ण होताच त्यांनी या पोटभरी विद्येचा हव्यास सोडला व परमार्थाचे, संतविचारांचे चिंतन, मनन करण्यात ते रमू लागले. त्याबरोबरच महात्मा गांधी, रवींद्रनाथ टागोर, स्वामी रामतीर्थ, मानवेंद्रनाथ रॉय यांसारख्या परमार्थप्रवण विचारवंतांचा व समाज क्रांतिकारकांचा, त्यांच्या ग्रंथाचा ते स्वतंत्रपणे अभ्यास करू लागले. वरवरच्या अभ्यासामुळे त्यांचे समाधान होईना. आत्यंतिक एकाकी आणि विमनस्क अवस्थेत ते तपश्चर्येसाठी निघून गेले.

नर्मदातीरी घोर तपश्चर्या केली. उत्तरेत भ्रमण केले. गोकुळ वृंदावनात वास्तव्य केले. चारीधाम यात्रा केल्या. संतमहंतांचा सहवास साधला. जपतपादी साधने पूर्ण केली. ध्यानधारणा तर नित्याची होतीच. या सगळ्या पुण्यसंग्रहामुळे यती महेश्वरानंद, मंत्रशास्त्रनिपुण तपेबाबा, बंगाली परमहंस शुकाचार्य, अवलीया उडीयाबाबा, श्रेष्ठ शास्त्री पंडित राघवाचार्य अशा अधिकारसंपन्न संतमहंतांच्या कृपाप्रसादाचा लाभ या काळात त्यांना झाला. या संतकृपेमुळे त्यांच्या अंतर्यामी असलेल्या दिव्य शक्तीचा आश्चर्यकारक विकास होत गेला. ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः । अशा परमपदाची प्राप्ती करून घेऊन ते ऋतंभरी प्रज्ञा प्राप्त महापुरुष होऊन गेले ! अंतरीच्या प्रगाढ ओढीने ते पुन्हा महाराष्ट्रात परत आले. काही काळ अक्कलकोट व मढी येथे त्यांचे वास्तव्य होते.

या समग्र साधना व सिद्ध काळात त्यांनी भारतीय समाजाची दुरवस्था पाहिली. कधी राजवैभव भोगले तर कधी पोटासाठी उपहारगृहात कपबशा विसळल्या. स्टेशनवर हमाली केली. तशीच नेपाळसारख्या ठिकाणी त्यांची सिद्ध पुरुष म्हणून हत्तीवरून मिरवणूकही काढली गेली. रेशमी गाद्यागिरद्यांवरून मठातून लोळण्याचे भाग्य अनुभवले तर कधी रखरखीत वाळवंटे तुडवून पायाची चाळण करून घेतली. रानेवने, जंगले तुडविली, नदीकाठ, मंदिरे, मशिदी येथे वास्तव्य केले. साधुसंतांच्या भेटीगाठी घेतल्या. बैरागी, महंतांच्या मेळ्यांतून भटकंती केली. भव्य मठ, आश्रम पाहिले. अगदी बिहार, बंगाल, हरिद्वार, द्वारका, वृंदावन, जगन्नाथपुरी येथील मठमंदिरांना भेटी दिल्या... हे सर्व करताना जीवनात आणि अध्यात्मात स्वीकृत काय आणि अस्वीकृत काय ? सार काय आणि असार काय ? शाश्वत कोणते आणि अशाश्वत कोणते ? याचे स्वतंत्रपणे विचारमंथन चाललेलेच होते. विवेक जागा होताच. महत्पुण्याईने प्राप्त झालेल्या मानवी जीवनाचे खरे सार्थक कशाने होईल याचा शोध चालला होता. समग्र विश्वात चाललेली भगवंताची लीला पाहात व स्वतःच भगवंताच्या चैतन्यदायी प्रकाशाचे प्रकटीकरण होऊन कसे राहावे याचेही चिंतन-मनन चालले होतेच. परमेश्वराच्या आदेशाप्रमाणे कार्य करीत राहण्याचा निश्चय करून ते आज्ञेसाठी अक्कलकोट येथे स्वामी समर्थांच्या सेवेत येऊन राहिले. केवळ मोक्षप्राप्तीची चिंता करीत ध्यान पूजा-अर्चा करीत न राहता राष्ट्रोद्धाराच्या व समाजोद्धाराच्या जाणिवेने त्यांना सुचणारे नवे विचार ते आपल्या कीर्तन प्रवचनातून समाजासमोर मांडू लागले. त्यांचे व्यक्तिमत्त्व तेजस्वी होते. वक्तृत्व प्रभावी होते. असीम करुणेने भरलेला अमृतमेघ बनून ते समाजकल्याणार्थ बरसत राहिले. त्यांच्या शब्दाशब्दांना भक्तिप्रेमाची मुद्रा लाभलेली होती. संतांच्या शिकवणुकीतील तत्त्वांची शाश्वतता त्यांना आकळता आलेली होती. त्यांचे स्वतःचे अनुभव क्षितीज मोठे व्यापक झालेले होते. यापुढे संतधर्म आणि संतसंस्कृती यांच्या संस्थापनेचीच गरज आहे हे ओळखून त्यांनी आपल्या कार्याची मुहूर्तमेढ माचणूर येथे रोवली.

विसाव्या शतकातील मानवाचे धार्मिक, नैतिक अधःपतन पाहून ज्यांच्या अंतःकरणात वेदनेचा तीव्र कोलाहल निर्माण झाला होता, संतधर्माची शाश्वत तत्त्वे ज्यांनी पूर्णपणे जाणली होती, म्हणून ज्यांच्या अंतरी जगदोद्धाराच्या दिव्यभावाचे तुफान उठलेले होते. भक्ती, ज्ञान, योग यांचा सुंदर समन्वय साधनेद्वारा साधून जे सिद्धयोगीच बनलेले होते, कुशाग्र बुद्धीचा मेधावी महापुरुष म्हणून ज्यांच्या लेखणीवाणीबद्दल सतत आदर वाटावा असे प्रज्ञावंत पुरुष म्हणजे बाबा महाराज आर्वीकर होत. परमार्थातील

*आम्ही वैकुंठवासी आलो याचि कारणासी ।*

*बोलिले जे ऋषी साच भावे वर्तावया ॥*

या तुकाराम महाराजांच्या उत्स्फूर्त उद्‌गारात जी संतांची अस्मिता प्रकटलेली आहे तीच त्यांच्याही जीवनात प्रकटलेली होती. मानवी जीवन दिव्य व आदर्श कसे होईल. मानवाचे अंगभूत सामर्थ्य त्याला पुन्हा कसे प्राप्त करून देता येईल... याची चिंता त्यांना सदैव अस्वस्थ करीत होती.

*ही घोर धर्मदैना । बघवे कशी वदा ना ।*

*तिळ प्रेम ना मनी कां ! । धर्मास चेतवा ना ॥धृ.॥*

*ते शौर्य काय झाले । काळास दंडण्याचें ।*

*मगनात लोटण्याचे । गतवीर आठवा ना ॥*

*ती सत्त्व प्राणज्योति । बहु क्षीण जाहली ना*

*उजळेल कोण सांगा । कशि शांति पूर्वजांना ॥२॥*

*तो दिव्य ज्ञानभानू । अस्तावरी निघाला ।*

*अज्ञान तिमिर झाला । आता तरी उठा ना ॥३॥*

*गिरी कंदरीं ऋषींनी । अति कष्ट साधना ती ।*

*साधोनि दिव्य केलें । उपकार ते स्मराना ॥४॥*

*या सान थोर सारे । राखूं स्वधर्म ज्योति ॥*

*जी पूर्वकाल महति । इतिहास तो पुराणा ॥५॥*

जगत्कल्याणाकरिता पुन्हा एकदा धर्म भावना दिव्यत्वाने प्रकट झाली पाहिजे तरच नव्या पिढ्यांचे जीवन उज्ज्वल होईल हे त्यांना मिळालेले उत्तर होते. धर्मभावना जी ऋषिमुनींनी पुनीत केली आहे, संतांनी अनुभवलेली आहे, जी विवेकावर उभी आहे, जिच्या अंगीकाराने जीवनातील हीनदीनता कायमची नष्ट होऊन जाते, - ती दिव्य धर्मभावना पुन्हा एकवार उजळून टाकली पाहिजे हा त्यांना ध्यास लागला होता.

बाबा महाराजांनी धर्मसंदर्भात मूलभूत कल्पना, तत्त्वद्रष्ट्या, ऋषींच्या विमल प्रज्ञेने, कधी सूत्ररूपाने, तर कधी विस्ताराने मांडलेली आहे. ते सांगतात, धर्म म्हणजे शुचिता. अखिल मानवजातीला शुद्धतम भूमिकेवर कसे आणता येईल या जाणिवेने याचा विचार करावयास हवा. सत्याभिमुख व्यवस्था म्हणजे धर्म होय. संत धर्मावर तळपणारा उज्ज्वल प्रकाश शुचिता - भानूचा आहे. या शुचिता धर्मानेच आपण सारे आदर्श होऊ शकू... संतधर्म रचनेचा प्रथम शब्द आहे शुचिता. त्याचा अर्थ आहे निर्मळता, मंगलता. साधनेसाठी शुचितेसाठी अतीव आवश्यकता आहे. मन - वचन - कर्म यांत एकसूत्रता आणण्यासाठी शुचिताच असली पाहिजे. व्यक्ती व समाज जीवनात ती सर्वत्र प्रकटली पाहिजे. संतांचे जीवन तसेच असते म्हणून बाबा महाराज त्यामागे 'संत' हा शब्द आग्रहाने लावतात. कबीर, लतीफ, महंमद, ज्ञानेश, तुलसीदास, तुकाराम, येशू, एकनाथ आदी जगातील यच्चयावत संतांचा एक धर्म आहे. तोच 'संतधर्म' होय. बाबा महाराजांचे मते ख्रिश्चन, हिंदू, पारशी हे समाज आहेत. पण त्या त्या समाजाच्या वेटोळ्यात न बसता आपण सर्वत्र 'संतधर्म' जागवला पाहिजे !... स्वधर्म - आत्मधर्म - संतधर्म एकच ! ... समस्त विश्वाची जीवन व्यवस्था सुखकर व परिणामी महान करण्याची ती दिव्य कला व व्यवस्था आहे - असे ते सांगतात.

संतधर्माचा परिचय परमेश्वर निसर्गाच्या माध्यमातून आपल्याला करून देत असतो हा बाबांचा आवडता सिद्धांत आहे. पंच महाभूते त्या ईश्वराचे

सतत चालू असतो. वारा अपरिवर्तनशील भावनेने सर्वत्र नांदतो. त्याची वाहण्याची क्रिया सुगंध-दुर्गंध आदी कोणत्याही भावनेने बद्ध नाही. प्रवाही असणे हा आप तत्त्वाचा धर्म. पृथ्वी तितिक्षा धर्म जागवते. सूर्य उगवतो व प्रकाशाचे मंथन सर्वत्र सहज घडते !... संतप्रणीत धर्म असा स्वाभाविक, सहज, शाश्वत आहे. मानवही असाच स्वधर्म ओळखून जीवन जगेल तरच तो महामानव होईल. हा सिद्धांत ते प्रतिपादन करू लागले. ज्यात पावित्र्य व विशालता नाही तो धर्मच नव्हे असा आग्रह ते धरू लागले. धर्माचरणाने हीनदीनता संपली पाहिजे व दिव्यता प्रकट झाली पाहिजे. असा अनुभव ते जनमानसाला पटवून देऊ लागले. आपल्या समग्र विचारांना तात्त्विक सिद्धांताची बैठक देऊन 'संतधर्म प्रचारक मंडळाची' त्यांनी स्थापना केली. मंगळवेढ्यानजीकच्या माचणूर येथील आपल्या आश्रमात येणाऱ्या साधकांस ते उत्साहाने मार्गदर्शन करू लागले.

धर्मसंदर्भात 'धर्माचा सजीव भाव आपण स्वीकारीत नाही असे ते सांगतात. जोपर्यंत धर्माचा केवळ आपण भावात्मकतेने विचार करतो, तोपर्यंत तो केवळ मृतधर्म आहे. मी धार्मिक आहे, मी धर्म सांगतो हे म्हणणे व्यर्थ आहे. केवळ पूजाअर्चा, जपजाप्य, मठमंदिरे हे सारे धर्माचे बाह्यांग आहे. त्यांना महत्त्व मर्यादित आहे. विश्वासकट मानवाची धारणा करण्याची पद्धती म्हणजे धर्म होय. जी शाश्वत, चिरंतन आहे तोच खरा धर्म. ईशधर्म, आत्मधर्म, संतधर्म या नावांनी बाबा महाराज त्या धर्माचा गौरव करतात. परिचय करून देतात. 'उजळाया आलो वाटा । खरा खोटा निवाडा । आम्हा ते कौतुक । जगा द्यावी नीत । करावे फजित । चुकती ते ॥' या तुकाराम महाराजांच्या वाण्याने बाबा महाराजांनी खऱ्या-खोट्याचा न्यायनिवाडा केलेला आहे.

धर्मात किंवा परमार्थात पौरुषशून्य जीवनास स्थान नसते... हा बाबांचा आणखी एक आवडता सिद्धांत. जो समाजजीवन निर्बल, वंचनाखोर, कर्तव्यशून्य बनवतो तो धर्मच नव्हे. हे परखडपणे सांगण्याचे काम केवळ बाबा महाराजच करू शकले. उदारता, सामरस्यबोध, व्यापकता व सहजता यामुळे ज्ञानेशभक्ती सिद्धांत आपल्या आगळ्या वैशिष्ट्यांनी भारतात नांदत आहे, असे बाबा महाराज सांगतात. साधक, साधना आणि धर्म या संदर्भातील बाबा महाराजांचे विचार हे सर्वार्थाने त्या त्या क्षेत्रातील सोंगढोंग मोडून काढणारे आहेत. बाबांचे मते साधक ही एक पवित्र जीवननिष्ठा आहे. साधक जीवनाचे रहस्य प्रकट करताना बाबांनी साधकाची स्वतंत्र व्याख्या केली आहे. 'महद्‌ब्रह्म कैवल्य आनंद तो मी' हा भाव ज्याच्या चित्तात सदैव जागा असतो तो साधक. साधक मन, बुद्धीने दुर्बळ नसावा. तो सुदृढ, निकोप, सतेज, कार्यप्रवण असावा. सहजानंदी जीवच खरा साधक होतो. एखादा देवभक्त म्हणजे केवळ ऐतखाऊ, कर्महीन ही भूमिका बाबांना तिटकारा आणते. जो पोटापाण्याची चिंता करतो, ज्याला आधीव्याधींचा ताप सतत ग्रासतो, जो भयग्रस्त असतो तो साधक होऊच शकत नाही. तर जो आपल्या शरीराची प्रयोगशाळा करून स्वतःच संशोधक बनतो, मन, बुद्धी या साधनांनी सतत ईशचिंतन करीत, ईशप्रेमात राहतो, तो साधक असे ते सांगतात. साधकाचं मन निवांत होत जाणं, बुद्धी प्रसन्न होत जाणं ही खरी साधना व हे होणं म्हणजे खरी ईशकृपा. अशा बाबांच्या व्याख्या आहेत. तमोगुण टाकणे, रजोगुण जिंकणं आणि सत्त्वगुणावरही विजय मिळवणं या कृतीचा ते साधना म्हणून उल्लेख

करतात. साधना करून साधकाला संजीवन प्राप्त झालं पाहिजे. तो बलवान, तेजस्वी झाला पाहिजे. धीरता, विराग आणि सेवा या गुणांनी मंडित होणं म्हणजे साधक होणं. साधक दिव्यतेकडं जातो, दिव्यतेसाठी जगतो, दिव्य होऊनच जगतो. जे सेव्य, त्याच्या चरणी पूर्ण समर्पित होतो. त्याच्याशी तन्मय होतो तो साधक. हे न होता साधना करणं म्हणजे पतीवाचून पतिव्रता म्हणून मिरवणं, द्रव्यावाचून खजिना असणं किंवा पाण्यावाचून जलाशय असणं असाच प्रकार ठरतो. बाबांचे हे सगळे सांगणे परखडपणाचे आहे. साधकाने सर्वव्यापक अशा ईश्वराला, सर्व अवस्थांत, सर्व भावाने ओळखावयाचे असते. तसे त्याला जाणता, ओळखता आले तरच तो शुद्ध भावाचा शुद्ध परमार्थी बनतो. अन्यथा धन, मान, पद याकरता चाललेले परमार्थ हेही एक नाटकच ठरते ! बाबा आदेश देतात - 'साधक म्हणून जगण्याचा निश्चय करा. साधना आपोआपच मागे येते.'

मनोबोध या उपदेशपर / मार्गदर्शनपर काव्यात बाबा महाराजांनी जे मनोगत व्यक्त केले आहे ते फार मोलाचे आहे. ते म्हणतात, प्रभूप्राप्तीचे अनेक उपाय आहेत. पण सकल उपायांचे अधिष्ठान मनाचे निकोपपण व सबलपणच असते. ते त्या प्रमाणात ज्याला साध्य झाले त्या प्रमाणात त्याने आपले ध्येयशिखर सन्निध आले म्हणून समजावे. मन निर्मल भावांचा प्रवाह बनवले पाहिजे. हे मन जिथपर्यंत स्वभावरूप निर्मळ होत नाही तिथपर्यंत उपासना साधना तर राहोच पण जगणेही सुस्वादीय करता येणार नाही ! आपल्या मनात दिव्य धर्माचा उदय होतो. त्यासाठी (साधकाचे) मन निकोप, निर्मळ असले पाहिजे. साधकाने मन ही ज्याची प्रकट अवस्था आहे त्या आत्मरूपाला आपल्या आत्मभावनेत प्रकट होऊ देण्याचे केले पाहिजे. आपल्या शुद्ध भावाने स्फुरण होऊ देणे श्रेयाचे ठरते... परमार्थविचार व साधना देव मिळावा यापेक्षा देव व्हावयासाठी आहे हे लक्षात घ्यावे. देव मिळवावयाचा नसतो तर देवच व्हावयाचे असते. देवत्त्व अंगी यावे, जीवन दिव्य व्हावे यासाठी साधकाने परमार्थातील व धर्मातील भ्रांत विचार त्याज्य मानावेत. ते टाकून द्यावेत. अध्यात्ममार्ग ही एक जीवन जगण्याची दिव्य व उदात्त वाट आहे हे ते समजावून देतात. कोणाही संप्रदायाच्या साधकाला दीपस्तंभासारखा मार्गदर्शन करणारा हा ग्रंथ आहे.

बाबा महाराजांना अपेक्षित साधक कोणाची कशी उपासना करतो ? याचे उत्तर 'माचणूरचे हृद्‌गत' या पुस्तकातील प्रवचनांमधून उपलब्ध होते. साधनेद्वारा साधकाने परमेश्वर प्राप्त करून घ्यावा. आत्मपुरुष प्राप्त करून घ्यावा. ब्रह्मप्राप्ती करून घ्यावी इ. म्हटले जाते. बाबा महाराज म्हणतात, त्या परम पुरुषाला 'गुरुदेव' या संज्ञेने मी जाणतो. हा पुराणपुरुष आहे. सगुण निर्गुण या सर्वांचा व्यापक, विश्वाच्या सर्व अवस्थांमध्ये शाश्वत मूल्यांनी असलेले एकमेव दर्शन आहे. साधना करून भू म्हणजे आम्ही - या भूतलावर त्या परमसत्तेचे - गुरुदेवाचे अवतरण करण्याची क्रिया म्हणजे साधना - आपली अस्मिता म्हणजेच भूमी. या भूमीवर - अवतरण त्या पुराण पुरुषाचे व्हावे. ते घडले की आपण ज्ञाते होतो. द्रष्टे होतो. सिद्ध होतो. हाच विचार सूत्ररूपाने बाबा महाराज सांगतात - 'जो जीवन जगतच जीवन सुंदर करतो, सार्थ करतो तो साधक किंवा भक्त होय !'

'दिव्यामृतधारा' हा बाबा महाराजांच्या अध्यात्मक्षेत्रातील अधिकार सांगणारा उत्तम ग्रंथ आहे. सर्वज्ञता प्राप्त अशा या महापुरुषाने कुशाग्र बुद्धीने ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायावर केलेले प्रतिपद भाष्य आहे. अध्यात्म ग्रंथाचे चिंतन हे शुद्ध आत्म्याच्या प्रकाशात घडत असते. संतांच्या शब्दाला परतत्त्व स्पर्श झालेला असतो. तो सर्वांगाने जाणणं हा संतसाहित्याचा खरा अभ्यास होय. दिव्यामृतधारा हा ग्रंथ म्हणजे गुरुकृपा प्राप्त शांभवीविद्येचा दिव्यप्रकाशच आहे. बाबा महाराजांनी ज्ञानदेवांच्या ओवीमधील शब्दाशब्दांमधून प्रकट केलेला आशय आश्चर्यकारक आहे. जे खऱ्या धर्मलाभासाठी सुपात्र ठरलेले आहेत. ज्यांनी गुरुपरंपरा-प्राप्त साधना उपासना केलेली आहे आणि जे एका विशेष अधिकाराच्या सीमेवर उभे आहेत, त्यांना मार्गदर्शन करण्यासाठी हा असाधारण ग्रंथ तयार झाला आहे. परमार्थ मार्गावर जे बरीच वाटचाल करून पुढे आलेले आहेत त्यांना तत्त्वज्ञानाची उंच उंच शिखरे दाखविण्याचा हा समर्थ प्रयत्न आहे. श्रीकृष्णार्जुनाच्या संवाद माध्यमातून श्रीज्ञानदेवांचे हृद्‌गत प्रकट झालेले आहे ते आपल्या भावसमृद्ध बाबा महाराजांनी साठविले आहे. त्यांना स्वतःला प्राप्त झालेल्या भगवतकृपेच्या, दिव्यप्रतिभेच्या प्रकाशात त्यांनी त्या अक्षर ओव्या वाचल्या आहेत. स्वतः श्रीकृष्ण, अर्जुन, ज्ञानदेव होऊनच तो अद्वैतसुखसोहळा त्यांनी स्वतः भोगला आहे. दैवी कृपाप्रसादाचा परतत्त्वस्पर्श घेऊनच त्यांनी बाराव्या अध्यायावरील हे भाष्य लेखन केलेले आहे. अशी गंभीर, प्रशांत, दिव्य आकलनाची पातळी साऱ्यांनाच साध्य होते असे नाही. दिव्यामृतधारा हा अवघड ग्रंथ नाही. बऱ्याच जणांची आकलनशक्ती फार तोकडी, तुटपुंजी असते म्हणून त्यांना तशी टीका करावीशी वाटते. हे वास्तव ध्यानात घ्यावयास हवे.

बाबा महाराज परम व्याकूळ होऊन त्या गुरुदेवांना आवाहन करतात -

*आता शुद्ध स्वरूपावगामी । चित्कळे मत् स्वामी ।*
*गुरुदेवा शुद्धासनी । यावे हो ॥१॥*
*विराजावे कैवल्यदाता । शोभवी स्वाधिष्ठान सत्ता*
*जेणे सकळांचे सहिता । लाभ होई ॥२॥*
*प्रेमचंद्रा प्रकाशावे । नील किरणी बोधावे ।*
*स्वयंज्योतीस पाजळावे । जीवदशेच्या ॥३॥*
*चित्ताकाशा स्वरदेवते । आत्मरवीचे नादशक्ते ।*
*गुरुस्वामिने ओंकारमूर्ते । अवधारावे जी ॥४॥*
*बिंबा उणेचि प्रतिबिंब । घटाठायीचा अवलंब ।*
*प्रकटोनी भरा प्रबोध कुंभ । सकळांतरी ॥५॥*
*शुद्धांतराचिये गगनी । गुरुदेवा उदयाचेनी ।*
*प्रार्थनारंभी आवाहनी । हाक घेई ॥६॥*
*नील ज्योति रश्मी सरे । कृपाकणी प्रक्षिप्य विखरे ।*
*जेणे स्वानंद पहाट पसरे । समुदायी हो ॥७॥*
*कोमलांगी पदकमळे । ठेवी आसनी लडिवाळे ।*
*येई हृदयवासी कृपाळे । भावुकासी ॥८॥*
*सावधान निजलक्षणी । गुरुदेव ये आवाहनी ।*
*हृदय कपाटा उघडोनी । राहावे आता ॥९॥*

त्या सद्‌गुरूच्या कृपाप्रसादाने बाबा महाराजांचे अंतर्यामी धर्मतत्त्वाचा अखंड प्रकाश नित्य प्रकाशमान झाला होता. ते ईश्वरी तत्त्व शिष्यभूमीवर करुणेसह उदारतेने अवतरले होते. इहपर कल्याण करणारे दिव्य शक्तीसामर्थ्य बाबा महाराजांना भरभरून प्राप्त झाले होते... लोककल्याणार्थ मग 'दिव्यामृतधारा' अवतरली. 'गीतादर्शन' अतिमधुर, सुखसंवाद करीत

प्रकट झाले. 'साधना - संहिता' - मांडली गेली.

बाबा महाराज हा भक्ती, ज्ञान, योग यांचा उत्फुल्ल होऊन फुललेला कल्पवृक्ष होते. हरिभक्तीच्या प्रेमात विरघळून गेलेला महासागर होते. परमार्थाच्या चिदाकाशात ज्ञान व भक्ती पंख पसरून यथेच्छ विहार करणारे पक्षीराज होते. गुरुपरंपरा प्राप्त ज्ञानाची महासिद्धी त्यांच्या पायी लोळत होती. आनंदाच्या प्रगाढ अवस्थेत ऐक्याच्या आस्वादात रममाण झालेला तो महायोगी होता. दिव्य देवकार्याची धुरा घेऊन आलेला तो महामानव होता.

येथ चैतन्य बहरले । तेचि साकार झाले ॥ अशीच किमया बाबा महाराजांच्या समग्र चिंतन, मनन, लेखनात झालेली आहे. थोर तत्त्वज्ञ, दिव्यातिदिव्य अनुभव घेणारा कवी आणि ज्ञानदेव तुकारामादी संतमांदियाळीत शोभणारा संत या त्रयीतून बाबा महाराजांचे दर्शन घेतल्यास त्यांचे आगळेपण आपल्याला कळू शकेल.

**प्रा. म. अ. कुलकर्णी तथा स्वामी प्रज्ञानंद**
२६३ ई, ताराबाई पार्क,
९ चैतन्य अपार्टमेंट,
आळवेकर प्लॉट, कोल्हापूर.

***श्रीकृष्ण जीवन हाच सर्व शास्त्रांचा व वेदांचा संपूर्ण साकार विहार आहे. कृष्णजीवन जर अनुभवले, तर सारी शास्त्रे तुमचे दास्यत्व करतील. त्यातला संवेद्य कृष्ण जर तुम्हाला स्पर्श करेल, तर वेदांतील सर्व ज्ञानाला तुम्ही पाहू शकाल !!***

# श्रीसंत बाबामहाराजांच्या जीवनात फुललेला पत्र-पारिजात

पत्रप्रेमी

महापुरुषांचं-सत्पुरुषांचं जीवन आपल्या असंख्य प्रतिभालहरींनी, स्पर्श केलेली वस्तू न् वस्तू सुंदर, पवित्र नि मनोहारी करून टाकीत असतं. अथांग आत्मीयतेने भरलेली त्यांची विशाल जीवनदृष्टी परम सुंदर तत्त्वाचा वेध घेत, अवघ्या वस्तुजातावर आल्हादाचा फुलोरा फुलवीत 'सत्यं शिवं सुंदरम्' ची वाटुली रेखांकित करीत लहरत असते. जीवन हा घटक ज्या ज्या सृजनातून बागडत असेल, ते ते प्रत्येक निर्माण सुंदर, निर्मळ व प्रगतिकारक करण्याकडेच अशा थोरांची बुद्धी झेपावत असते. त्यामुळे स्वाभाविकच अशा साधु-संतांच्या सहवासाने अवतीभवतीची स्थिरचर सृष्टी उत्क्रांत होत असते.

श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर हे अशाच एका महन्मंगल जीवनाचं नाव ! त्यांच्या सहवासात आलेल्या प्रत्येक जीवाला त्याला प्रेमाच्या सलगीने जागवलं नि जोजवलंही ! श्रीबाबांनी पत्ररूपांतून अशी प्रेमाची सलगी करून साधकांना उद्धाराची वाट सुस्पष्ट करून दिली. त्यांनी लिहिलेल्या असंख्य पत्रांचा मागोवा घेणं असंच आनंदाचं नि बोधाचं आहे !

एका साधकाने माचणूरच्या कार्यासंबंधी अनेक प्रश्न विचारणारे एक पत्र श्रीबाबांना पाठविले होते व त्याचे उत्तरही मागविले होते. त्याला उत्तरादाखल श्रीबाबांनी जे पत्र लिहिलं होतं, त्यात 'पत्र' ह्या साधनाचंच कसं सुंदर वर्णन केलं आहे पहा. ते लिहितात, 'प्रिया, पत्राचे उत्तर देणं हा भागच नसतो. पत्र हे मी समजतो त्या प्रमाणे हृद्‌गताचा व्यवहार अबोल बोलीने करण्याचे एक उदात्त साधन आहे. त्याचे उत्तर संभवत नाही. पत्र ही काही नोटीस किंवा वॉरंट नव्हे ! पत्र हे दोन मनांच्या कल्पनांना जवळ आणणारे व एकमेकांत मिसळून एकजीव करणारे असे निसर्गरम्य साधन आहे. पत्रास निसर्गरम्य साधन म्हटल्यामुळे तुला आश्चर्य वाटेल व तू कौतुकाने हसशीलही ! असे वाटण्याचे कारण तुला जे कळलं नाही असं माझं मत नाही. उलट माझं बोलणं-वागणं, तुमच्यात मिसळणं या सर्व दृश्यांवर तुझं नितांत प्रेम आहे हे मला समजतं ! या प्रेमापोटीच माझा प्रत्येक व्यवहार म्हणजे आश्चर्य व कौतुकाचं हसणं होतं ! पण पत्राला निसर्गरम्य साधन म्हणणं हा माझा निसर्गच आहे. पत्र म्हणजे धडधडीत मानवी कल्पना व कृती पण मला तो निसर्ग वाटतो. जगात होणारे, घडणारे सारे केवळ निसर्ग होय. त्यात काही रम्य तर काही अरम्य ! काही विपरीत तर काही सुरचित ! पण असतो सारा निसर्गच ! मानवाच्या मनातून, बुद्धीतून हा निसर्गच क्रीडत असतो... पण जेवढे मानवाने आपले म्हटले ते मानवकृत ठरले व जे त्याने जाणले नाही ते निसर्गाचे ठरले. हा निसर्ग मानवरूपाने आपल्याच रूपात संघर्ष व संयोगही निर्माण करतो. निसर्ग म्हणण्याचे कारण असे की मानवाच्या कृतिनिष्ठेवर कालाचे आवरण आहे. अवकाश व काल ह्याशिवाय काही होणे नाही. म्हणूनच पूर्ततेसाठी मानव कालाची अपेक्षा करतो. भविष्यात होईल व भूतकाळात झाले यांना सांधणारा वर्तमान म्हणजे मानवी कृती पूर्ततेचा काल प्रतिक्षत रहाणे ही अवस्था होय. पण वर्तमानात जे नाही ते भविष्यात घडेल असे जरी मानव म्हणत असला तरी त्याचा अर्थ एवढाच असतो की काय घडावे हा निसर्ग आहे. मानवास त्याचे ज्ञान नाही. अज्ञात घटनांचा निसर्ग हे भविष्य कालाचे रूप व ज्ञात घटकांचा निसर्ग हे भूतकाळाचं रूप. व द्वयांगी हक्क व आशा हे वर्तमानाचे रूप. अर्थात सर्वत्र खरे पहाता निसर्गच आहे. त्याला चालविणारा शक्तिमान देव आहे. कारण निसर्ग जड आहे, मृत आहे. देवाने त्याला स्पर्श केला व तो सचेत झाला. जेथे जेथे चेतन नाही, कल्पना व भावनाच आहेत तो निसर्ग अजीव, जड झाला. अर्थात् जेथील चेतना जाणिवेच्या अतीत ते जड व जाणिवेत ते चेतन ! दगडाची चेतना कळत नाही म्हणून तो जड व झाडाची चेतना कळते म्हणून ते सजीव. पण खरं म्हणजे हा जाणीव-दोष आहे. तो चेतनतेचा दोष नाही. कारण निसर्गाच्या सर्व अवस्थांत चेतन भरून आहे... हा आमचा हा तुमचा ही मानवाची भाषा जेव्हा खऱ्या धर्मालाही झाकू लागली तेव्हा मानवाचे हे अघोरी तंत्र मोडावे यासाठी देवाने 'पत्र' नावाचा दूत माणसाकडे पाठविला व त्यावर त्याने लिहिले, 'हे पत्र मानवास आहे. त्याने ठरविलेल्या गोष्टींचे उत्तर नव्हे. माणसाने मानलेल्या निरनिराळ्या खुराड्यांतील कल्पनांचे चांगले-वाईट असे काही नाही. तुम्ही सारे माझे आहात, माझ्याकडे या - माझ्यात या ! निसर्गरूप व्हा ! म्हणजे तुम्ही महान व्हाल, प्रगती पावाल !'' वास्तविक पत्र हा प्रेषित आहे. त्याचे उत्तर संभवत नाही. कारण ते आदेशाने, सत्य ज्ञानाने, सत्य प्रेमाने, एकात्मतेने घडलेले आहे. देव म्हणतो की तुम्ही जेवढे आहात ते मुळाशी एक आहात. जगताना यामुळेच तुम्ही एकसारखे आहात. सर्वांना मुळातून सांगा ! मग या संदेशाचे कार्य घडले. तरू, लता, नद्या, सागर पसरले ! झाडांची पाने हा अनुभव गाऊ लागली ! माणसासाठी अखंड संदेश या पत्रांच्या आकाराने निनादू लागला... उत्तराने पत्राची रम्यता जाते. म्हणून हृदयाचे जे मीलन तेच याही पत्री मी तुझ्यासाठी लिहीत आहे. तुझ्यावरील प्रेमाचे व माझ्यावरील तुझ्या लोभाचे हे एक प्रगटन आहे. झाडांच्या पानांप्रमाणे ! नदीच्या वहाण्याप्रमाणे, पाण्याच्या रुचीप्रमाणे, पृथ्वीच्या गंधाप्रमाणे व शेवटी हृदयाच्या गतीप्रमाणे.' 'पत्र' संकल्पनेची उदात्त व मधुर महती गाणारी ही श्रीबाबांची शब्दवेली अशी सुंदर व सुखद आहे. जीवनाला एक विशाल आयाम देणारी आहे !

एक साधकाला अतीव गोड शब्दांत श्रीबाबांनी सांगितलेली ही चेतना पहा, 'वृंदावनाला जाऊन आलास ना ? आधीच तू गोड. आता तर तुझी

गोडी अधिक वाढली ! कारण तूं त्याच्याशी नाते जोडून आलास की ज्याच्यामुळे जग गोड होते. देवाच्या, संतांच्या कामाने ती गोडी प्रकट होईल. देवाचे काम हे देवावरील प्रेमाचे आभरण होय. देवाचे काम म्हणजेच शामसंग होय. कामाद्वारे तो फक्त जाहीर होतो व मग तो सावळा वेगळा रहात नाही. त्याचे काम नाही तोपर्यंत आपला संग त्याला आवडला तरी प्रकटविण्यास तो लाजतो. आपली लाज आडवी येते. तो प्रत्यक्षच लाजतो ! पण कामरूपाने आपण प्रकट झालो की तो निःसंग संग साधून प्रकटतो. मी त्याचे काम करतो. मला बरे वाटते. तो माझे काम करतोच करतोस हे मला पटलेच आहे. तूही ये ना माझ्या सोबत ! हो माझ्यासारखाच !! नकली बुरखा दे टाकून एकदाचा. जनाबाईप्रमाणे वेसवा म्हणून वागणे चांगले. कबीरप्रमाणे म्हण एकदा, 'नही कोई रोखनहार । मन अब शामसगाई ॥' लवकर लवकर ये माझ्या सोबत देवाचं काम करायला. सुहृदांनो, पाहिलीत का ही श्रीबाबांनी पत्रांतून चेतना देण्याची ही अनोखी पद्धती ! पत्रातून लाभलेला त्यांचा तो शब्दसंग म्हणजे त्या सावळ्या श्रीहरीचा प्रत्यक्ष स्पर्शच होता.

संतधर्माचे तत्त्वज्ञानही श्रीबाबा आपल्या कार्यकर्त्यांना लिहीत असत. त्यांनी अशा एका पत्रात लिहिले होते, 'आपल्या मंडळाला सामरस्यानुभव प्राप्तीसाठी द्वैत वा अद्वैत मान्य नाही, तर मंडळ द्वैताद्वैत विलक्षण असाच परमात्मा मानते. तो परमात्मा एकाच वेळी व्यक्त व अव्यक्त असतो हाच सिद्ध अनुभव होय. संतांचा हाच परमबोध होय...'

संतांबद्दल आणि संतप्रणीत धर्मविचारांबद्दल श्रीबाबांना अतीव प्रेम व पूज्यभाव होता. ते स्वतःला संतांचा सेवक म्हणविण्यात धन्यता मानीत. संतधर्म प्रसारक मंडळाच्या एका कार्यकर्त्याला पत्र लिहिताना श्रीबाबा म्हणतात, 'संतांच्या पायाच्या धुळीचीही किंमत जर मला खरेपणाने येईल, तर मी कृतकृत्य झालो असे समजेन. मी आपला त्यांचे लेकरू होऊन त्यांच्या मागे मागे उड्या मारतो. अर्थात् ते मला आवडतात पण मी त्यांना आवडतो की नाही हे अजून तरी मला कळलेले नाही. मी त्यांना आवडतो असे जेव्हा मला कळेल, तो दिवस मी परमभाग्याचा मानीन. जेथे तुकोबांसारखे संत म्हणतात की, 'मज पामरासी काय थोरपण । पायीची वहाण पायी बरी ॥' मग माझ्यासारख्याचा काय पाड !!'

संतांच्या धर्मप्रसारकार्यासाठी त्यांना आवाहन करताना एका पत्रात म्हटले आहे, 'रूढ असलेल्या भ्रामक परमार्थाला कौशल्याने कलाटणी देऊन, परमार्थाचा इहपर सुखकर मार्ग यथार्थतेने समजावून देण्याचे प्रायोगीकरण करताना मला तुम्हा सर्वांची गरज आहे. पण तुम्हीच जर क्रियाशून्य झालात तर देवाचा संदेश पोहोचविण्याचे महत् भाग्य न लाभल्याचे घडेल ना ! भगवंताचे जुळेल तेवढे सचोटीने करा. खडबडून उठण्यात चेतना पसरेल व तुमचे जीवन उजळून इतरांचेही डोळे उघडतील. विश्वास दृढ करा व नेटाने माचणूरहून दिलेले आदेश समाजासमोर मांडा.'

सुहृदांनो, श्रीबाबामहाराजांचे पत्ररूप वाङ्मय विपुल व विविधांगी आहे. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या पत्रवाङ्मयाचे वर्णन करताना डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी म्हटल्याप्रमाणे, पूज्य बाबा महाराजांचे पत्र वाङ्मयही एक 'पत्रोत्सव'च आहे. त्या असंख्य पत्रांचे एकत्रीकरण करून प्रकाशन करण्याचे महत्तम कार्य आपल्यापुढे आहे. हा छोटासा लेख म्हणजे त्याची फक्त नांदी आहे !

पत्रप्रेमी



# श्रीसंत बाबा महाराज आर्वीकर यांच्या आरत्या

**श्री. वि. श्री. फणसळकर**

*एम.ए. (मराठी), सुपरवायझर म्हणून आयकर खात्यातून निवृत्त. पुस्तके - १) पु. बाबामहाराज आर्वीकर यांचे दिव्य जीवन दर्शन, २) श्री. रा. ग. बर्वे यांजबरोबर विलेपार्ले अमृत स्मृति ग्रंथ खंड १.*

'मराठी भाषेतील आरत्या हे भक्तिरसप्रधान काव्य मंदिरातील एक स्वतंत्र असे देवघर आहे. या देवघरात परमेश्वराचे सगुण, सुरम्य स्वरूप आणि भक्त याशिवाय काही दिसावयाचे नाही. देव आणि भक्त यांच्यामधील पूज्य-पूजक संबंधाचे साक्षात् दर्शन घडवणारे असते म्हणजेच आरत्या होत.' – **ल. रा. पांगारकर**

### आरतीचे आगळेपण

माणूस धार्मिक असो वा नसो, त्याने स्वतः आरती उजळून देवाला आळविलेले असो वा नसो, आरती ही त्याला माहीत असणारच. इतका महाराष्ट्रीय जीवनाचा नव्हे, भारतीय जीवनाचा व आरतीचा संबंध आहे.

आरती एकट्याने नव्हे तर सर्वांनी म्हणावयाची आणि हलके पुटपुटत नव्हे तर मोठ्याने म्हणावयाची. ती म्हणताना कापूर अथवा निरांजन पेटवून देवाला ओवाळावयाचे. पूजेच्या अखेरीस ज्यावेळी संकल्प आवाहनापासून पुष्पनैवेद्यादि समर्पण पर्यंतचा उपचार पूर्ण झालेला असतो. प्रसन्न आणि पवित्र वातावरणात दैवताची मूर्ती दीप ओवाळून त्या प्रकाशात पाहताना आणि त्याचवेळी आरतीचे चरण तोंडाने म्हणताना टाळ्या वाजवीत ताल धरताना तादात्म्य साधता येते. देव-भक्त अशा भूमिकेतून होणारी ही आरती पूजेच्या वेळी म्हणत असता भक्ताला एकाग्रता साधता येते.

### एक आठवण

आरतीच्या वेळी टाळ्या वाजवीत आपण ताल धरतो या संबंधात श्रीबाबा महाराज आर्वीकर यांची एक आठवण हृद्य आहे. 'सोलापुरात जुन्या विठ्ठल मंदिरात श्री बाबा महाराजांचे प्रवचन होते. श्रीबाबा येण्याआधीच सभामंडप व आजूबाजूच्या ओवऱ्या गच्च भरल्या होत्या. मंदिराच्या प्रवेशद्वारातून श्रीबाबांना येताना पाहून श्रोत्यांनी स्वागतपर टाळ्या वाजविण्यास प्रारंभ केला. ते व्यासपीठावर येऊन उभे राहिल्यावरच टाळ्या थांबल्या. श्रीबाबांनी विठ्ठल मूर्तीला हात जोडून वंदन केले आणि 'प्रेमळ भावंडांनो' ही त्यांची नेहमीची हाक दिली. सांगितले की, टाळी हे नादयुक्त वंदन आहे. त्यांत उल्हासाबरोबर शरणभाव आहे. परमेश्वराच्या स्मरणाचा तो निदर्शक आहे. म्हणून टाळी ही केवळ श्रीहरिनामाच्या उच्चाराबरोबर जोडलेली असू द्या ! मर्त्य मानवासाठी नुसता 'राम राम', नुसता 'नमस्कार' पुरे आहे.'

### आरतीच्या रचना

महाराष्ट्रात श्रीज्ञानेश्वर महाराजांवर केवळ हाताच्या बोटावर मोजण्याइतक्याच आरत्या प्रचलित आहेत. ज्ञानेश्वरांवर एकोणिसाव्या शतकापर्यंत भीमराज, मुक्तेश्वर, रामदास, रामाजनार्दन, निळोबाराय, स्वामी निरंजन रघुनाथ एवढ्याच आरत्या प्रचलित आहेत. विसाव्या शतकातील एकमेव आरतीकर्ते श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर हेच होत. यापैकी महाराष्ट्रात रामाजनार्दन यांची 'आरती ज्ञानराजा, महाकैवल्य तेजा' ही आरती विशेष प्रकारे लोकप्रिय झालेली आहे. इतर आरत्या फारशा म्हटल्या जात नाहीत.

### श्रीबाबामहाराज आर्वीकर

श्रीबाबामहाराज आर्वीकर हे आधुनिक कालखंडातील साक्षात्कारी पुरुष होते. ज्ञानेश्वरांचा आदेश जगाला कळावा म्हणून उत्स्फूर्तपणे त्यांनी 'दिव्यामृतधारा' हा अजोड ग्रंथ लिहिला. या ग्रंथामुळेच ते संतधर्मीयांच्या जगतात अलौकिकत्वाने ओळखले जात होते.

'दिव्यामृतधारा' हा ज्ञानेश्वरीतील प्रतिपदभाष्य टीका करणारा गद्य ग्रंथ आहे. तो श्रीमद् भगवत्गीतेच्या बाराव्या अध्यायावरील भाष्य ग्रंथ आहे. श्रीज्ञानेश्वरांच्या गुरुस्तवनाच्या एकोणीस ओव्यांवर 'वर्षा-उदगीय' या नावाने ज्ञानेश्वरीतील बाराव्या अध्यायावरील प्रगत दर्शन घडविणारा प्रथम खंड (पृष्ठे ५००) आहे. दुसऱ्या खंडामध्ये उरलेल्या ओव्यांवर अमृत लहरी व धारामृततीर्थ या नावाने भाष्य टीका आहे. (पृष्ठे ७००) असे हे बाराशे पृष्ठांचे गद्य भाष्य आहे.

### ब्रह्मानंदलहरी (भजनांजली)

श्रीबाबामहाराजांच्या तेहेतिसाव्या पुण्यतिथीनिमित्त या वर्षी ब्रह्मानंदलहरी (भजनांजली) हा नवा पद्यमय ग्रंथ प्रकाशित झाला आहे. ईशचिंतनासाठी ऐन तारुण्यात गृहत्याग करून स्वेच्छाविहार होता व एकान्त भ्रमण होते. हरिभजनही होते. त्या कालात त्यांना जी गीते-भजने स्फुरली त्या गीतभजनांच्या एकत्रित संग्रह ब्रह्मानंदलहरी (भजनांतली) या नावाने निर्माण झाला आहे.

या भजनांजली ग्रंथातील गीते व भजने यांची अपूर्वाई काय सांगावी ? ती सारी भक्तिरसाने ओथंबलेली, विविधतेने नटली आहेत. श्रीबाबामहाराजांच्या चित्तांत उद्भवलेल्या भक्तिलहरी लाटांचा हा कल्लोळ आहे. या लाटांचे लौकिक वर्गीकरण संपादकांनी पंचवीस विभागांत केले आहे. रसिक वाचकांची ही मोठीच सोय झालेली आहे. या विभागांतील तेविसाव्या विभागात श्रीबाबांनी केलेल्या आरत्या एकत्रित केल्या आहेत.

### श्रीबाबामहाराजांचे कार्य

१९५४ सालच्या सप्टेंबरपर्यंत श्रीबाबा कुणालाच माहीत वा परिचित

नव्हते. आरत्या विजनवासांत श्रीहरिचिंतनाच्या मस्तीत भटकत भटकत अचानकपणे ते अक्कलकोट निवासी श्रीस्वामी समर्थांच्या समाधी दर्शनार्थ अक्कलकोटला आले. तेथे अक्कलकोटच्या वडाच्या मंदिर परिसरात श्रीबाबांचे पहिले-वहिले प्रवचन या चातुर्मासात झाले आणि त्यांची महती अक्कलकोटवासीयांना पटली. तत्पूर्वी श्रीस्वामीसमर्थांच्या समाधीवर अनन्यभावे नतमस्तक झाले असता श्रीबाबांची भावसमाधी लागली. त्यावेळी 'तू माचणूरला जा' असा आदेश श्रीस्वामीसमर्थांकडून मिळाला. श्रीबाबांना माचणूर अज्ञातच होते. परंतु तपस्येच्या निमित्ताने त्यांची भटकंती चालूच होती. तिला विराम मात्र श्रीस्वामीसमर्थांच्या समाधीतून मिळाला आणि श्रीबाबा माचणूरला आले. माचणूरच्या सिद्धेश्वर मंदिराच्या बाहेर श्रीकाशीनाथ महाराजांची समाधी आहे. तेथील ओवरीत श्रीबाबा राहात होते. श्रीबाबांच्या वास्तव्याची सोलापूरकरांना - अक्कलकोटकरांना वार्ता समजली. त्यावेळी श्रीबाबांच्या जिव्हाळ्याची मंडळी माचणूरला आली. गावकऱ्यांनी श्रीबाबांची जुनाट ओवरी नीट केली आणि त्यांची गैरसोय होऊ नये म्हणून डोळ्यांत तेल घालून सर्वतोपरी साहाय्य सुरू झाले. १९५५ सालच्या चातुर्मासाच्या सुरुवातीस श्रीबाबा सोलापुराहून बेगमपूर मार्गे चंद्रभागेच्या तीरावरील श्रीक्षेत्र माचणूरच्या सिद्धेश्वर मंदिरात आले.

माचणुरात काही काळ वास्तव्य करून श्रीबाबा चातुर्मासासाठी श्रीक्षेत्र आळंदीला आले. १९५६ चा हा काळ होता. आळंदीच्या वास्तव्यात एक विशेष घटना घडली ती म्हणजे 'साधना संहिता' हा ओवीबद्ध ग्रंथ म्हणजे श्रीकृष्णाच्या तसबिरीवर घातलेला हार 'साधनासंहिते'वर अचानकपणे पडला. हा केवळ ज्ञानेश्वरांचा वा भगवान् श्रीकृष्णाचा साक्षात् कृपाप्रसादच होता. यासंबंधीचा उल्लेख श्रीबाबांनी 'साधना-संहितेच्या' समारोपात केला आहे. ते म्हणतात –

*जन्माष्टमी श्रावण । अतुरसर्वनी क्रमण ।*
*पूर्णत्व पावला शब्दगुण । ग्रंथाठायीचा ॥११५७॥*
*श्रीकृष्ण अवतारदिनी । अवतरे हा ग्रंथमणी ।*
*परिपूर्ण साधनांगांनी । अर्पावया ॥११५८॥*
*तै ज्ञानेश्वर जयंती । भगवान् जन्मतिथी ।*
*धांबे ग्रंथवाणी गती । तेचि दिवशी ॥११५९॥*
*मज हा चमत्कार वाटे । हर्ष उफाळे कंठ दाटे ।*
*ज्ञानाईचे रत्न गोमटे । झाले ऐसे ॥११६०॥*

## श्रीबाबा महाराजांचे आरती वाङ्मय

आळंदीच्या चार-पाच महिन्यांच्या वास्तव्यातच श्रीबाबामहाराज ज्ञानेश्वरमयच झाले होते. आरती या ब्रह्मानंदलहरी तेविसाव्या भागात 'स्वामी समर्थांची आरती, ज्ञानेश्वर महाराजांच्या दोन आरत्या, 'अवतार भूलोकी' ज्ञानेश्वरांवरील लहानशी आरती व 'ओवाळू आरती भावे गुरूराया' ही गुरूबद्दलची आरती एवढेच आहे. परंतु वाचताना जाणवते काकडारती विभागातील 'तत्त्वमसि वाक्याचा हा भावार्थ उघडा ।' व 'निरंजनी काकडा ज्योती उजाळल्या वेळी ।' या दोन आरत्यांचा समावेश करणे इष्ट ठरेल. याशिवाय साधकाला उद्देशून केलेली

*'ऊठ ऊठ साधका प्रेमळा निजमनीच्या शुभवेळी ।*
*साधन मानसी कष्मल सावी ब्राह्ममुहूर्तकाळी ॥'*

ही आरती ही महत्त्वाचीच आहे.

मातेच्या प्रेमाने साधकावर कृपादृष्टी असतानाच त्याला त्याच्या कर्तव्याची जाण देण्याचे कार्यही श्रीबाबांनी या भूपाळीत केले आहे.

'जय जय जय गुरूदेव' ही स्वामी समर्थांची आरती आणि भगवान ज्ञानेश्वर महाराजांची आरती - 'आरती ज्ञानेश्वर प्रभूची' या दोन्ही आरत्यांची बैठक सारखीच आहे. तेराव्या शतकावलीत श्रीज्ञानेश्वर महाराज आणि दोन शतकांपूर्वी होऊन गेलेले श्रीस्वामी समर्थ या दोन विभूती प्रति परमेश्वरच आहेत. या भूतलावरील हे श्रीबाबांनी वर्णिले आहे. ही उभयता मानवधारी असली तरी देवलोकीचे पृथ्वीवरील मानवाचे अवतारच होत.

ज्ञानदेव आपल्या 'ज्ञानेश्वरी'ने प्रत्येकाच्या मनात कायमचे ठसले आहेत. श्रीस्वामी समर्थ अलीकडच्या दोन शतकांतील असले तरी ज्यांनी आपल्या लीला-लाघवाती हजारो भक्तांच्या मनात स्थान मिळविले आहे. केवळ स्वामींचे स्मरण घडले तरी दुरिते दूर जातात. सुभाषितकाराने म्हटले आहे –

*'यस्य स्मरण मात्रेण जन्मसंसार बंधनात् ।*
*विमुच्यते नमस्तस्यै नमस्तस्यै नमोनमः ॥'*

अनंत कोटी ब्रह्माण्डनायक श्रीस्वामी समर्थांचा जयजयकार हा सर्वार्थाने केला जातो.

या दोन्ही आरत्यांची बैठक समान असली तरी श्रीबाबांनी ज्ञानेशांच्या महत्तेचे आणि दैवी संपत्तीचे वर्णन समर्थपणे केले आहे. ज्ञानेश्वर हे देवलोकातून (स्वर्गातून) आलेली मानवीविभूती होय. तसेच असामान्य बुद्धीचे महात्मे व अवतारी पुरुष आहेत ही दृढ श्रद्धा बाबांची आहे. तसेच ज्ञानेश्वर म्हणजे सांबसदाशिवाचा अवतार आणि सांबसदाशिव म्हणजे विश्वाची देवता. त्यांच्या दरबाराचे वर्णन करताना 'विराजित सहस्रदळकमळी मंडित रत्नासम झळकी । धारित दिव्यांकर पिवळी, कंठि त्या रत्नमाळ खेळी ।' इ. ओळींतून शिवशंकराचे अलौकिकत्व प्रगट झाले आहे. 'दिव्यांबर पिवळी' हा चरण म्हणताना पृथ्वीचा शांत धर्म पीतांबरातून प्रकट होतो - तेजाचा आविष्कार करणारे पीत रेशमी वस्त्र त्या परब्रह्म शिवाने धारण केले आहे. गळ्यांत रूंडमाळांऐवजी रत्नहार झळकतो आहे - शिवाचे हे सगुण रूप आहे. आजूबाजूला होत असलेला वेदघोषाच्या नौबती वाजताहेत. षट्शास्त्रांचे नगारे वाजत आहेत. शिवनामाच्या घोषाचा वीणाझंकार होतो, मानवाच्या कर्म-अकर्माचा शंखनाद होतो आहे. त्याबरोबरच कानी येणारा घंटानाद हा साधासुधा घंटानाद नसून प्रणवाचा ओंकारध्वनी आहे. शिवमंदिरात शिवस्मरणाचा महिमा अशा प्रकारे गायिला जात आहे.

या आरतीसोबत 'जय जय गुरुदेव' ही श्रीस्वामी समर्थांची आरती म्हणत असता श्रीबाबा महाराजांनी श्रीस्वामी समर्थांचे शांत, कृपाळू, जडजीवांना आधार देणारे स्वरूप वर्णिले आहे. श्रीस्वामी समर्थ हे संतांचे मुकुटमणी असल्यामुळे साहाजिकपणेच राजाधिराज हे सार्थ बिरुद त्यांना लाभले आहे. श्रीस्वामी समर्थांचे मंगल दर्शन त्यांच्या सर्वांगातून घडत आहे. त्यांच्या मुखावर चंद्राची शीतलता, त्रिभुवनावर कृपाकटाक्ष टाकणारे त्यांचे नेत्र, आशीर्वाद आणि अभय देणारी त्यांची दोन्ही करकमले - श्रीस्वामी निःशब्द बसले असले तरी भक्ताच्या कानी पडणारा अनहत वीणेचा झंकारनाद मानवाच्या वृत्ती झंकारीत आहे. मनी उमटणारे भाव मृदंगाच्या नादाप्रमाणे सुखवीत आहे. कानी पडणाऱ्या वेणूनादामध्ये सप्तस्वरांची गोडी एकवटली आहे. ढोल, नौबतींचा आवाज कानी येताना

तुताऱ्याही वाजत आहेत. श्रीस्वामी समर्थांच्या या दरबारांत रिद्धि-सिद्धींच्या बरोबरच सुरेल आवाजाचा नारीगण आरतीसाठी दारी येऊन ठेपला आहे. सारे भक्त व त्यांचे सगेसोयरे गुरुदेव श्रीस्वामी समर्थांचा जयजयकार करीत आहेत.

श्रीज्ञानेश्वरांच्या आरतीतील दुसरे कवन 'निरंजन अंजन ज्ञानाचे, अभयांकित वरदानाचे' या कवनात ज्ञानेश्वर हे अभय देणारे - संसार सागरात बुडून देणारे भक्ताची नाव सुरक्षितपणे परतीराला नेणारे आहेत. पतितांच्या उद्धारासाठीच त्यांनी अवतार घेतला आहे. पतितांना ज्ञानदान करणे हे केवळ निमित्त आहे. या आश्रयस्थानाचा कर्ता-निर्माता कोण आहे ? ज्याला नाव देता येत नाही असा तो अनामी असला तरी तो सर्वांमध्ये सर्वकाळ नांदतो. तो श्यामसुंदर ज्योतीच्या रूपाने सर्वत्र नांदतो आहे. त्याला नाव देता येत नाही म्हणून तो अनामी - कदाचित ज्ञानेशांच्या रूपाने निमित्त म्हणून सर्वांना दर्शन देऊन पावन करत आहे. तो कसा आहे ? तो शब्दाविना संवाद साधतो (शब्देविण संवादिते) पंचेंद्रियांना कळण्यापूर्वीच तिचा अनुभव घेतो (इंद्रिया नेणता भोगिजे) मुखातून शब्द उमटण्यापूर्वीच तो प्रमेयाला जाऊन भिडतो (बोलाआधी झोंबिते प्रमेयासी) असा अनामी तो आहे.

सुकुमार ज्ञानेश्वराच्या मनीचा कळवळा म्हणते, सुंदर उमललेल्या कमळातून सुगंध स्रवत जावा किंवा प्रफुल्ल कमळातून मध गळत असावा त्या योगाने हाच तो रसपेला आहे असेच वाटते. या ठिकाणी भक्ती ही जिव्हाळ्यातून उत्पन्न होते तोच हा भक्तीचा प्रेमळ जिव्हाळा होय. स्वानंदात रमलेला भोळा शंकर त्याचेच हे प्रेमळ रूप वाटते.

शिव स्वानंदात मग्न आहे, आत्मानंदात आहे. त्याचे भक्तगण आनंदाने, प्रेमाने, प्रसन्नतेने नाचत-क्रीडत आहेत. या शिवशंकराच्या दरबारात चारही मुक्ती त्याच्या आज्ञेची वाट पाहात सामोऱ्या आल्या आहेत. या निमित्ताने त्या भक्तवत्सल सुखाचा नि सौख्याचा केवळ खजिनाच असलेल्या सांब सदाशिवाची सेवा करण्याचे पुण्यच मिळवीत आहेत असे वाटते.

शिवशंकराच्या या भव्य दरबाराचे, त्याच्या गणांचे वर्णन केल्यानंतर अखेरीस प्रसाद मिळणे - लाभणे अपरिहार्यच आहे.

परंतु या दैवताकडून मिळणारा प्रसाद तसाच अलौकिकच असणार. हा प्रसाद म्हणजे जिव्हाळ्यातून उत्पन्न झालेले उत्कट प्रेम. ते या ज्ञानेश्वर माऊलीच्या चरणी अर्पण केले. या प्रसादासाठी ताट आणले ते अद्वैत-निर्द्वद्वाचे. त्या ताटात प्रसाद (उत्कट प्रेम) साठवला / एकत्रित केला त्याची रुची काय सांगावी ? त्या रूचीत (लौकिक दृष्टीने द्वैत भावनेचा) - कडू, गोड, आंबट, तुरट असा भेद नव्हताच. त्याबरोबरच प्रसाद अर्पण करताना चित्तांत कुठलेही किल्मिष नव्हते वा भेद नव्हता. अहो ! रुचीतील भेदच नाहीसा झाल्यावर सारेच मंगल ! अमंगलाला वावच नाही. त्यामुळे भक्ताची नाव विश्वैक्याशी जोडली गेली. स्वर्गाचे दारच खुले झाले. यच्चयावत प्राणिमात्रावर कृपाकटाक्ष टाकणारी गुरुमाऊली (मोठ्या आनंदाने) स्वर्गातील आदिपीठावर जाऊन बसली. त्या गुरुमाऊलीला अनन्य भावे शरण जाऊन तिच्या पदकमलावर मी माझे प्राणसर्वस्व अर्पण केले. अशा या ज्ञानेशाचा थोर महिमा आहे. त्याचा जयजयकार असो ! ज्ञानेश्वराचे अलौकिक स्वरूप, अति थोड्या शब्दांत पण आशयघन असलेले या आरतीत कळून येते.

पांडेचरीच्या अरविंदाश्रमात असलेले थोर साधक कै. गजाननराव गोखले यांच्या कानी आरती पडली, तेव्हा ते म्हणाले, 'साक्षात् ज्ञानेश्वराचे दर्शन घडवणारी ही प्रभावी आरती आहे.'

चित्रमय बोलकी भाषा, उपास्य दैवताची करुणा भाकणारा, मनी उमटणारा भाव व परमेश्वराच्या चैतन्य रूपाशी सलगी करणारी वृत्ती आपल्यामध्ये आपोआप निर्माण होते.

'अवतार भूलोकी नांदे ज्ञानेश्वरा' ही लहानशी आरती ज्ञानेश्वरांची वैशिष्ट्ये प्रकट करणारी आहे तरीही,

*'मार्तंडाचा योग झांकोनि ज्याते ।*
*नाही ते बोधी सुगम शब्दाते ।*
*कैवल्य निधान ब्रह्मचि साकारा ॥*
*ओवाळू आरती श्री सर्वेश्वरा'*

या ओळी लक्षात राहतात.

'श्री साधना - संहितेची मंगलारती' ही आरती श्रीबाबांनी साधना-संहिता हा ओवीबद्ध-साधनेचे अंग प्रकट करणारा साक्षात अनुभवाचा ग्रंथ पूर्ण झाल्यावर रचिली आहे. आध्यात्मिक क्षेत्रांतील योगी व अनुभवसिद्ध पुरुषालाच केवळ या आरतीतील संज्ञांचा उलगडा होऊ शकेल. येरागबाळ्याला ते समजणे शक्य नाही.

'ओवाळू आरती भावें गुरुराया' ही आरती गुरुपदी शरणागत झालेल्या साधकाची आहे. ही शब्दरचना सोपी दिसत असली तरी यांतील संज्ञा गुरु-शिष्यांची जवळीक असलेल्यांनाच कळू शकेल. सामान्य माणसाने ते समजून घ्यावयाचे व अभ्यासावे असे ठरविले तरी योग्य गुरू लाभणे ही दुर्लभ गोष्ट आहे. नुसत्या शब्दार्थांनी काहीच बोध होणे शक्य नाही. अभ्यासच हवा !

## काकड आरती (विभाग ४)

*'तत्त्वमसि वाक्याचा हा भावार्थ उघडा ।*
*करुणावंत संतबोध 'मीपणा' झाडा ॥*
*संत कारुण्याचा बोध 'देवा जा शरण' ।*
*तेणे लाभे भाव, देवा सर्वांतरी जाण ॥१॥*

या आरतीत सहजसोप्या भाषेत श्रीबाबा महाराजांनी भक्तीचा शरणभाव दिग्दर्शित केला आहे. प्रभातीची काकडारतीची वेळ ही कोणाही साधकाला चैतन्यमयीच वाटत असते. सर्वसाधारण माणूस हा भावुक असतो. कमीतकमी श्रमात अधिकाधिक पुण्य कसे गोळा करता येईल अशी त्याची दृष्टी असते. यामुळे शब्दशः अर्थ त्याला नको असतो. तरीही ओढ हरीच्या पायाशी असते. अशांसाठी साधना शिबिरे, सत्संग यांची आवश्यकता असते. त्यातूनच त्याची जी प्रगती होते तोच खरा भक्तिमार्ग असतो. तो सुलभही असतो आणि सन्मार्गगामी असतो. यासाठी अशा आरत्या त्याच्या कानांवर पडतील तर तो लाभच होय.

निरंजनी काकडा ज्योति उजाळल्या वेळी ।
ज्योती ज्योत प्रकाशे प्रगटे तै सावळी ॥

अगदी सोप्या भाषेत साधकाला केलेले हे मार्गदर्शन आहे. विद्यमान काळात अनेक परंपरांचा लोप झाला त्यामुळे आपोआप कानी पडणारा सत्संग, पहाटेच्या उठण्यामुळे आरोग्याचे जतन, मनाला लाभणारा उत्साह सामुदायिकपणे घडत असलेल्या उपासनेने चित्तही परस्पर प्रेमभाव निर्माण होतो. त्यातूनच ही भक्तीची सुलभ वाट साधकाला सापडते.

आपले धार्मिक उपासनेचे अनेक उपक्रम न कळत समाजाचे उत्थान

घडवून आणतात - गरजू माणसे एकत्र येऊन काही कार्य करू शकतात ही ताकद अशा कार्यक्रमांतून साधकाला मार्गदर्शक ठरते यासाठी असे उपक्रम राबविले गेले आहेत.

श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर यांच्या तपस्येचा बराच काळ उत्तर हिंदुस्थानात हरिद्वार, हृषिकेश, गंगोत्री, जम्नोत्री, नेपाळ आदि भागांत गेल्या कारणाने त्यांच्या समोर असलेले धार्मिक जगताचे दर्शन हे महाराष्ट्रातील वातावरणापेक्षा वेगळे होते. उत्तर भारतातील भव्य मंदिरे, मोठमोठ्या मूर्ति त्यांची पूजाअर्चा होत असताना तेथे व्यक्तिगत बाबीला वाव नव्हता. तेथे होणाऱ्या आरत्या समुदायाकडून मोठ्याचे म्हटल्या जात, मंदिरांची आवारेही मोठीच होती. देवांचे भोग हे संस्थानिक व जमीनदार अशा श्रीमंत श्रद्धाळू माणसांकडून विशेषत्वाने होत. आरत्यांचे वेळी ढोल, पडघम, नगारे व तुताऱ्या, झांजा यांचा उपयोग केला जातो. यामुळे सकाळची वा सायंकाळची आरती हे जनतेच्या दृष्टीने वेगळेच जागरण असे. मूर्तीचा अभिषेक सोहळा नदीवरून घागरी भरून साजरा होई. पंचामृताचा अभिषेक हे देवदुर्लभ दर्शन होते. त्या त्या वेळेस दूध, दही, मध, साखर, तूप असे पदार्थ मूर्तीला अर्पण करून त्यांचे स्नान घातले जाई. अशा वेळी श्रीकृष्णाची, शिवशंकराची, श्रीकृष्ण-रुक्मिणी यांच्या मूर्ती आणि कालिया मर्दन करणारा बाळकृष्ण, सांब सदाशिवाच्या पिंडी, शाळुंका यांचे दर्शन अभिषेकाचे मनोज्ञ व अभिनव दृष्टीस पडते. मंत्रोच्चार करणारे विद्वान ब्राह्मण आपल्या श्रीमंतीचा उपयोग सत्कार्यासाठी मनापासून करीत असला तर त्याच्या मुखावरील आनंद अवर्णनीय असतो. विशेषतः हे अभिषेक उत्सव प्रसंगी पाहावेत - स्नानानंतर गंधलेप, पुष्पसेवा, प्रसाद व आरतीसाठी मोठमोठ्या समया या दैवताचे रूप पालटून टाकताना भक्ताच्या मनात भक्तिभाव उत्पन्न होतो.

बाबांच्या आरतीच्या चाली उत्तर भारतीय धर्तीवरील आहेत. त्यांतील कल्पनांची उत्तुंगता चटकन ध्यानी येत नाही पण आरती म्हणताना चित्तात जोश निर्माण होतो.

उत्तर भारतात देवाला ओवाळणे हे पाहण्यासारखे दृश्य असते. मोठमोठ्या समयांतून वाती घातलेल्या असतात. त्यावर तूप घातलेले त्या एका वेळी पेटवतात सामुदायिकपणे. एका देवळातून दुसऱ्या देवळात जातात. उपास्य देवतेचे समयांच्या प्रकाशात घडणारे दर्शन परिणामकारक असते. पंचामृताच्या अभिषेकात ज्याप्रमाणे मूर्तिदेवतेचे आगळे दर्शन घडते तसेच समया ओवाळताना वातींच्या प्रकाशात मूर्तीच्या साऱ्या अवयवांचे व मुखमंडल हे भक्ताच्या मनात असलेल्या जिव्हाळ्याला प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ मिळत असतो. आरती करीत असता भक्ताला अवर्णनीय आनंद होतोच पण जन्माचे सार्थक झाल्याची धन्यताही लाभते.


**श्री. वि. श्री. फणसळकर**
फाटकवाडी, राममंदिर रस्ता,
विलेपार्ले (पूर्व) मुंबई - ४०००५७


***प्रतिष्ठा व्हावी म्हणून कर्म करू नका. तसे अप्रतिष्ठेचेही कर्म करू नका. सत्यसन्मुख व्हा व सत्कर्म आचरा की ज्याचा परिणाम प्रतिष्ठा व अप्रतिष्ठा यांच्या संबंधात नाही.***

# वक्तृत्वा गोडपणे –
# श्रीबाबा महाराज आर्वीकरांची वाणी


**श्री. दा. कां. थावरे गुरुजी**

*श्रीज्ञानेश्वरी लेखक. श्रीसच्चिदानंद बाबा यांचे १६ वे वंशज. ५० वर्षे ज्ञानेश्वरी व इतर ग्रंथांवर प्रवचन व कीर्तन सेवा. सहकार खात्यात ३३ वर्षे नोकरी नंतर निवृत्त. सोलापूर येथे श्रीज्ञानेश्वर-तुकाराम मंदिर प्रकल्प सुरू. श्रीसंतसाहित्य [illegible] संघ सोलापूर [illegible] ८-१० ग्रंथांच्या प्रकाशन कार्यात [illegible]*


***वक्तृत्व गोडपणे । अमृताचे पारू म्हणे ।***
***रस होती ओळगणे । अक्षरांसी ॥***

अशी ज्यांची वाणी लेखणी, अमोघ, अपूर्व, असामान्य व परतत्त्वाला स्पर्श करणारी अलौकिक होती असे ब्रह्मस्वरूप असलेले ब्रह्मलीन श्री मोरेश्वर प्रभाकर जोशी तथा श्रीमंत संत बाबामहाराज आर्वीकर (सन १९२४ ते १९७१) यांचे जनजागरणार्थ जे कार्य घडले ते शब्दांत मावणारे नाही. अवघे ४७ वर्षांचे जीवन पण त्याची उत्तुंगता जोखता यावयाची नाही. त्यांची वाणी ओघवती, पवित्र, पावन, गंगा सलीलसम प्रवाही, सरल, रसाळ, मर्मज्ञ आणि ज्या वाणीने 'उरोधु वादुबलु । प्राणुपाप ढालु। उपहासु चालु । वर्मस्पर्शु ।। आटु वेगु विंदाणु । आशा शंका प्रतारणु । हे संन्यसिले अवगुणु । जिया वाचा ।।' असे सारे अवगुण ज्यांच्या वाणी लेखणीने सन्यासिले होते असे बाबा महाराज प्रभु साक्षात्कारी सत्पुरुष होते. साक्षात भगवान गोपाळ कृष्णाचा अनुग्रह त्यांना लाभला होता. आपल्या साधनासंहिता त्या योगमार्गाच्या खाणाखुणा सांगणाऱ्या ग्रंथात त्यांनी हे नमूद केले आहे:

***'तोचि सद्गुरु प्राणेश्वर ।***
***श्रीकृष्णनामे सुंदर ।***
***गोपाळांचा जो आधार ।***
***भक्तवत्सल ॥'***

भगवंताच्या कृपेचाच वारसा बाबांना लाभला होता. ते जगी अवतरले यासाठी की,

***'आम्हा हे उचित जगा द्यावी नीत ।***
***करावे फजित चुकती ते ॥'***

त्यांना हा मार्ग भगवंतांनीच हाताला धरून दाखवला. ती त्यांची साक्षात आणि प्रत्यक्ष अनुभूती आहे.

***'तो श्रीकृष्ण योगनाथ ।***
***भक्ति सागर ज्ञानवंत ।***
***माझिया प्रेमाचा मनोरथ ।***
***पुरविला जेणे ॥'***

बाबा ! योगी होते. भक्त होते. तो – श्रीकृष्णनाथ वृंदावनीच्या परिसरी त्यांना भेटला होता. आळंदीच्या परिसरी त्यांना ज्ञानोबांचे दर्शन झाले. तो प्रसंग त्यांनी लिहून ठेवला आहे –

असा तो प्रेमळ परिसर. त्यातून एकादशीचा मंगल दिवस. खळखळणाऱ्या इंद्रायणीचे मायामय स्वरूप पाहात बसलो होतो. सायंकाळची पांचची वेळ असेल ती ! निवांत, निर्मम प्रतिभा प्रकाशांत वृत्तीचा विहार सुरू होता. देहमान बाजूला सारून लांब कोठेतरी बुद्धीचे प्रशांत स्थिर होते.

घंटा झाली. हो अगदी तशीच ! तोच नाद, तोच जिव्हाळा. कानाचे आत तीच अनुकंपा. साऱ्या स्मृती टवकारल्या. कान अनुसंधान आले. मान वाकली. हृदयाचे कंप कंपित स्फुरणांनी रोमांच उठवू लागले. नादाचे मार्गानी - धुंद दिशेच्या वाटेवर धुंदरलेल्या मनोवृत्तीत चालू लागलो. देवळात आलो. अनुभूतीचे स्मृत्य गायन गायले गेले. सारा तोच प्रकार. पण...

देवळात - देवाचे साकारपण विहरत होते. तो कोठेही व कशातही येऊ लागला. देवळाचे कणाकणात ज्ञानदेवांचा स्वरूपसोहळा होता. कोठे दर्शन करू ? कसे करू ? काही सुचेना ! गंगेतील तीर्थ कोठले घेऊ ? सूर्याचा प्रकाश कोणता पाहू ? अशासारखे झाले. ही जादुगिरी कळेना. मात्र हर्षाचे हिरवे रान उगवले. दुर्वांकुरांचा पवित्र सडा पसरला. अमृततत्त्वाची ती आनंदी सरिता बाळ धावणे धावू लागली. 'ज्ञानोबा ! असा उद्‌गार फक्त उमटला ! आटोपले !

अशा बाबांची वाणी प्रथम प्रवचनाच्या रूपात अवतरली – ती अक्कलकोटला, स्वामी मंदिरात. बाबांचे पहिले प्रवचन झाले. तो काळ १९५३-५४ चा होता. वाणीचा वेग एवढा वेगवान होता की, कानाला फक्त शब्दांचा स्पर्श होई. काही कळायचे नाही. त्या वेळी वाटे हे प्रवचन स्वात्म-सुखासाठी आहे. अन्यांच्यासाठी नाही.' शब्दांना एवढे सौंदर्य, सखोलता, आकाशाहून मोठी असलेली विशालता काही कळायची नाही. १९५४-५५ नंतर मावणूरला प्रतिवर्षी मार्गशीर्ष मासात दत्तजयंतीची पर्वणी साधून साधना सप्ताह महोत्सव होत असे. त्यावेळी सकाळी गीतेवर, दुपारी तुळशी रामायणावर तर रात्री ज्ञानेश्वरीवर प्रवचने होत. एकेका ओवीवर बाबा सात दिवस भाष्य करीत. शब्दांच्या कळा, शब्दांचा अर्थ, शब्दांचे वर्म आणि ज्ञानदेवांचा वेध बाबा कापूस पिंजावा तसा पिंजून काढीत, 'बिंब तरी बचकेचि एवढे । परी प्रकाशासी त्रैलोक्य थोकडे । शब्दाची व्याप्ति तेणे पाहे । अनुभवावी ।।' हे ज्ञानदेवांनी आपल्या शब्दाबद्दल जेवढे आत्मविश्वासाने लिहिले तोच, आत्मविश्वास बाबांच्या गाठी होता. त्यामुळे शब्दांचे व्यापकपण त्याची विशालता आणि विराटता बाबा जेव्हा सांगत तेव्हा जाणता श्रोता थक्क होऊन जाई. 'जे अहंकार वाहत आंगी । आम्ही हरिचे भूषावयालागी । जे लौभिये एकचि जगी । माझेनि लोभे ।।' या ओवीवर बाबांनी एकदा सात दिवस प्रवचन केले होते. पण अर्धी ओवीही संपली नाही. 'समुद्राहून सखोल । अर्थभारित ।।' अशी ज्ञानदेवांची वाणी बाबांनी विस्तारून विस्तारून सांगितली.

एकदा सोलापूरला बाबांचे सात दिवस ज्ञानदेवांच्या हरिपाठावर प्रवचन झाले. 'देवाचिये द्वारी उभा क्षणभरी ।' या ज्ञानदेवांच्या हरिपाठातील

पाहल्या अभंगातील पाहल्या चरणावर बाबा बोलले – प्रवचनाची सांगता होताना मी बाबांना म्हणालो, 'बाबा ! देवाचिये द्वारी' या दोनच शब्दांवर तुम्ही सात दिवस, सात तास बोललात पण देवाचे द्वार सोडले नाही. ज्ञानदेवांच्या विचारांचा उत्तुंग हिमालय आपण उभा केलात' तेव्हा बाबा एकाच शब्दात म्हणाले, 'जीवाने देवाचे द्वार सोडायचे नसते. त्यातच सार्थकता आहे.' एकाच वाक्यात सारा परमार्थ आला. सारे अध्यात्म आले. सारा वेदांत आला. अशी बाबांची वाणी परतत्त्वात स्पर्श करून परहितासाठी मुखातून स्रवत असे. परावाणीतून जे येते त्यालाच प्रवचन म्हणतात. बाबांच्या सारखा एखादाच वक्ता असा परेहून पलीकडे असलेले बोलतो. त्यांचे जीवनच परेच्या पंखाखाली वृद्धिंगत झाले होते. प्रवचन म्हणजे परार्थाचे वचन आणि परार्थ म्हणजे जीवाचे परम हित. बाबांनी आपल्या वाणीने आणि लेखणीने अपरंपार जनजागरण केले. त्यांची वाणी, त्यांचा शब्द इंद्रियांत –

*ऐका रसाळपणाचिया लोका । की श्रवणींचि होती जिभा ।*
*बोले इंद्रिया लागे कळंभा । एकमेका ॥*
*सहजे शब्द तरी विषो श्रवणाचा । परिरसना म्हणे हा रसु आमुचा ।*
*घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि होईल ॥*
*नवल बोलतिये रेखेची वाहणी । देखता डोळ्याही पुरो लागे धणी ।*
*ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥*
*जेथं संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धावे बाहिरे ।*
*बोलु भुजाही आविष्करे । आलिंगावया ॥*
*ऐसी इंद्रिये आपुलालिया भावी । झोंबती परि तो सरिसेपणेचि बुझावी ।*
*जैसा एकला जग चेववी । सहस्र करु ॥*
*तैसे शब्दाचे व्यापकपण । देखिजे असाधारण ।*
*पाहतया भावज्ञा फावती गुण । चिंतामणीचे ॥*

यासम कळंभा (भांडण) लावणारी होती. जाणता श्रोता गदगदून जाई.

बाबांचे एक अंतरंगी शिष्य बाबांच्या रंगात रंगलेले आणि त्यांच्या वाणीत डुंबून गेलेले ज्येष्ठ गुरूबंधु ब्रह्मलीन श्रीवासुदेवराव वैशंपायन म्हणत की, प्रवचनाच्या समयी बाबांची चैतन्य चक्रवर्तीची शोभा असलेली कुंडलिनी जगदंबा साक्षात त्यांच्या अंगी नाचत असे. स्वसाधना, अभ्यासाचे सातत्य, ईश्वराचा ध्यास, संतांचे मनोगत उकलून दाखविण्याची अपूर्व ताकद बाबांच्या अंगी वसत होती.

माचणूरच्या साधना सप्ताहातील एक प्रसंग आहे. दुपारी 'रामचरित मानसा'वर बाबांचे रसरशीत भक्तिभावाने ओथंबलेले प्रेम रसाने ओलेचिंब झालेले, श्रोत्यांच्या कळवळ्याने कारुण्यरूप धारण केलेले बाबांचे रामचरित मानसावरील प्रवचन म्हणजे एक दर्शन असे. एके दिवशी असे घडले. बाबांच्या आसनाच्या डाव्या बाजूला मारुतीरायांचे आसन घातले जात असे. त्यावर मोठा हार असे. भावना अशी असे की, कोठेही रामकथा चालू असो तेथे मारुतीराय उपस्थित असतात. मारुतीराय हे प्रभु रामचंद्रांचे बहिश्चर प्राण आहेत. 'तुम्हरे भजन राम को पावै ।' असे मारुतीराय प्रभु रामचंद्रांनाही प्रिय आहेत. रामायण कथेसाठी बाबा आसनस्थ होत. त्यानंतर गुरुस्तवन होऊन ते डावीकडे हनुमंतांच्या आसनाकडे बघत. क्षणभर स्मित करून त्यांचे मुख श्रोत्यांकडे होई आणि रामकथेला सानंद सहर्ष प्रारंभ होई. एके दिवशी बाबांनी गुरुस्तवन म्हटले. डावीकडे नजर टाकली. दोन-चार-आठ मिनिट झाली. बाबा श्रोत्यांकडे मुख करीनात. श्रोत्यात चुळबूळ सुरू झाली. बाबा असे स्तब्ध का ? डावीकडची नजर श्रोतृसन्मुख का होईना ? कोणाला काही कळेना बाबांची ही अस्वस्थता आहे का ? श्रोतेच अस्वस्थ झाले. एवढ्यात बाबांच्या मुखकमलावर स्मित झळकले. त्यांनी श्रोत्यांकडे मुख करून रामकथेस प्रारंभ केला. तुलसीदासांची नव्हे तुलसीरामांची वाणी बाबा भरभरून श्रोतृवृंदांच्या कर्णरंध्रांत रिचवू लागले. प्रसन्न प्रवचन झाले. रामचंद्रांच्या गजरात श्रोतृवृंद प्रवचन मंडपातून परतू लागले. तदनंतर मी बाबांच्या कुटीकडे गेलो. त्यांना साष्टांग प्रणिपात केला. माझे अंतःकरण भरून आले. मर्यादा सांभाळून नम्रतेने मी त्यांना विचारले, 'बाबा ! प्रवचनाच्या प्रारंभी काही अस्वस्थता आली होती का ?' तेव्हा बाबा माझ्या पाठीवर थाप मारीत म्हणाले, 'मालक आले नव्हते. हनुमानजी आल्याशिवाय रामकथा सुरू करता येत नाही.' केवढा मोठा बाबांचा अधिकार. त्यांच्या रामायण प्रवचनात साक्षात महारूद्र हनुमान उपस्थित असे. मी बाबांकडे पाहिले. तेव्हा त्यांची प्रसन्न मुद्रा जी तेजोवलयांकित होती, ती मुखमुद्रा आजही माझ्यासमोर तरळते आहे. मी बाहेर आलो. समोरच वासुदेवराव वैशंपायन आले. ते म्हणाले, 'तू कशासाठी बाबांकडे गेलास हे मला कळले. मारुतराय प्रवचन मंडपात आसनस्थ झाले नाहीत तोपर्यंत बाबांनी प्रवचन सुरू केले नव्हते, असेच ऐकले ना !' वासुदेवराय असे विलक्षण बुद्धीचे भावादृश्य श्रोते होते.

विचक्षण बुद्धिमत्ता, विलक्षण स्मृती, विवेकाचे भांडार, अभ्यासाचे बळ, परिपुष्ठ साधनांग, आसेतु हिमाचल, देवशोधासाठी परिक्रमा, शुचिता, विद्वत्ता, आंतरबाह्य चोखटेपण, प्रपंचापासून विलग असे साधुत्व बाबांच्या अंगी दाटून आले होते. जनजागरणाला दीड तपाएवढाच अत्यल्प काळ लाभला. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायावर बाबांचे बाराशे पानांचे भाष्य आहे. भारतीय भक्तिशास्त्राचा तो एक अपूर्व कोषच आहे. ज्ञानदेवांचे विशाल हृदय बाबांनी उकलून दाखविले. आजवर गेल्या सातशे वर्षात भक्तिशास्त्रावर एवढा मोठा ग्रंथ झालाच नाही. हे कार्य ज्ञानेशांनीच बाबांच्या लेखणीसाठी राखून ठेवले असावे. बाबांनी बरेच ग्रंथ लिहिले. पण त्यांच्या वाणीची अपूर्वता उत्कट, उदात्त, उदार, नवोन्मेषशालिनी अशी अनेक अंगांनी समृद्ध होती. त्यांच्या एकेका शब्दात महासिद्धांताचा आवाका असे. एका बाराव्या अध्यायाच्या निमित्ताने बाबांनी ज्ञानेश्वरांच्या वाणीचा मोड उकलून दाखवला. त्यांच्या वाणीलेखणीचा मोडच स्वतंत्र होता. तेज, ओज, दिव्यता, भव्यता, धीरोदात्तता आणि उदात्तता यांनी तुडुंब भरलेला असे. त्यांच्या सहज बोलण्यातही उपदेशाच्या कोटी असत. हलुवार आणि मवाळ वाणी त्यांच्या मुखातून स्रवत असे. एवढे महत्तपण लाभूनही बाबा म्हणाले होते –

*'आम्ही काय केलें व्हावयाचे ते झाले ।*
*हरिने ठेविले तैसे वागू ॥'*

बाबांच्या वाणीचे दर्शन म्हणजे आम्हाला साक्षात्कारच वाटे. 'गुण गाईन आवडी ।' एवढेच त्यांच्या चरणी विनम्रभावे म्हणून लेखणीला विराम देतो.

**श्री. दा. का. थावरे गुरुजी**
'सांगाती' स्टेट बँक कॉलनी, नं. १,
दयानंद महाविद्यालयासमोर,
सोलापूर ४१३ ००२.

# ‘ब्रह्मानंदलहरी प्रकट केली’

श्री. नरसिंह केशव दिवेकर

बी. कॉम. एलएल. बी. लघुउद्योजक, चित्रकार, मोक्षधाम प्रकाशन मंडळाचे अध्यक्ष.

भारतात युगानुयुगें अखंडपणे विशिष्ट कार्यासाठी ईश्वरी शक्तीच्या संकेतानुसार अवतारी, साक्षात्कारी, संत सत्पुरुषांचं अवतरण होत आलेलं आहे.

पारलौकीक प्रज्ञेचे वरदान त्यांना जन्मतःच लाभलेलं असतं. श्रीसंत बाबा महाराज आर्वीकर हे आधुनिक काळातील या परंपरेतले सिद्ध प्रज्ञावंत सत्पुरुष होत.

बालपणीच सर्वज्ञता । वरी तयाते ॥ असं संत ज्ञानेश्वरांनी म्हटल्याप्रमाणे त्यांचे अलौकिक वेगळेपण त्यांच्या दत्तभक्त वडिलांच्या आणि आर्वी येथील अन्य ईश्वरभक्तांच्या लक्षात आलेलं होतं. त्यांच्या वयाच्या अवघ्या दहाव्या वर्षीच राष्ट्रसंत तुकडोजीमहाराज यांच्याही ते एका प्रसंगातून ध्यानी आलं होतं. बालवयातच अक्कलकोटचे स्वामी समर्थ यांचं दर्शन त्यांना झालं व त्यांना प्रत्यक्ष भेटण्याची ओढ निर्माण झालेली होती.

वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी एका मध्यरात्री दत्तमंदिरातून श्रीदत्तात्रयांचा मंगल आशीर्वाद घेऊन ‘सोळा वरुषांचा निघालो आडरानी, पंढरी वाटेनी म्हणता विठ्ठल’ असा मनाचा, निश्चयाचा निर्धार करून ‘मोरेश्वर’ नावाचा युवक ईश्वराचा शोध घेण्यासाठी आर्वीतून बाहेर पडला.

बारा वर्षे पायी प्रवास करत हिमालयापर्यंत जाऊन तेथे वास्तव्य करून वृंदावनांत त्यांना भगवान श्रीकृष्णाचा आत्मसाक्षात्कार झाला. साधनाकाळात त्यांचा स्वेच्छाविहार होता. एकांत भ्रमण होतं आणि अखंड हरिचिंतन होतं.

स्वामी रामतीर्थांनी प्रभु रामचंद्राला गुरुस्वरूपात पाहिलं. तसंच बाबामहाराजांनी भगवान श्रीकृष्णालाच सद्गुरू स्वरूपात पाहिलं. वृंदावनात श्रीहरिमय झालेल्या त्यांना अद्वैतभक्तीचा प्रत्यक्षानुभव आला. ब्रह्मानंदाची अनुभूती आली आणि शब्दांच्या माध्यमांतून ब्रह्मवाणी प्रकट होऊ लागली.

ब्रह्मानंद लहरी प्रकट होत असतात. संत नामदेवांनी म्हटलेले आहे,

*‘गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी ।*
*ब्रह्मानंद लहरी प्रकट केली ॥*

आत्मचैतन्य आतून-बाहेरून उफाळून येतं आणि परावाणी, ब्रह्मवाणी पाझरू लागते.

साधनाकाळात व त्यानंतर अभंग गीतांच्या माध्यमांतूनही त्याची प्रचिती येऊ लागली. आपल्या प्राणप्रिय श्रीहरीला वंदन करताना ते म्हणतात –

*ॐ नमो ब्रह्मरूप वासुदेव सद्गुरो ।*
*शरण्यं गुरुपदारविंदं त्राहि जगद्गुरो ॥ धृ. ॥*

अखंड हरिचिंतनात असलेल्या पूज्य बाबांना श्रीकृष्णदर्शनाची अनुभूती येत होती. ती व्यक्त करताना

*‘गुरुदेव जीवा आवडला । जीव प्राण तयासी दिधला ॥’*

या गीतांत ते वर्णन करतात. ‘मम ध्यानी हरि तो हसला ।’ आणि पुढील एका ओळीत सांगतात ‘मन्मनीं अनुभव हा केला ।’

‘ब्रह्मानंदलहरी’ या अभंगगीत संग्रहातून आत्मानंद स्थितीतला ‘चिंतनप्रवाह’ अखंड वाहतो आहे. पवित्र गंगेच्या प्रवाहाप्रमाणे या प्रवाहाचं विशाल स्वरूप प्रत्ययाला येत. त्याची गंगोत्री साधनाकाळातील एकांतवासात केलेल्या चिंतनात आहे.

*गंगे तुझ्या तीराला वसतात साधुसंत ।*
*करतात साधना ती पावावया अनंत ।*
*ध्यानी जपी किती ते मुनी योगी दीर्घ काळ ।*
*ऋषि राहतात तेथे । व्हायास गोड अंत ॥*

हे स्वानुभूतीचं वर्णन करताना बाबामहाराज आपल्याला हिमालयातील गंगाप्रवाहाच्या तीरावर घेऊन जातात. या ओळी वाचत असताना ऋषीरूप बाबामहाराजांचं दर्शन घडतं. केवळ या अभंगगीतांतूनच नव्हे तर बाबांच्या संपूर्ण वाङ्मयात हाच अनुभव येतो. ब्रह्मवाणीचा तो अखंडपणे वाहणारा अत्यंत गतिमान प्रवाह आहे.

अध्यात्मासारख्या विषयावर प्रवचन करत असताना त्यांच्या वाणीचा प्रवाह एवढा गतिमान असे की पांच-सहा ओळींची वाक्ये असलेल्या त्या प्रवाहातून शब्दांचा अर्थ समजून घेणं सर्वसामान्य श्रोत्यांना कठीण जात असे. तरीही नादब्रह्माच्या श्रवणामुळे ते मंत्रमुग्ध होऊन जात. त्यांचं देहभान हरपून जात असे.

सुप्रसिद्ध साहित्य समीक्षक प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख आपला अनुभव व्यक्त करताना लिहितात, ‘बाबा स्वतः गुरुप्रार्थना प्रथम म्हणत. त्यांचा गंभीर आवाज सर्व प्रार्थनाभर कंपित झालेला असे. त्याची स्पंदने ऐकणाऱ्याला हेलावून सोडत. बाबांची प्रवचने हा एक स्वतंत्र अनुभव आहे. नामवंतांची भरपूर भाषणे ऐकलेला मी बाबांच्या वाणीचे सामर्थ्य आणि ताजेपण कशांत आहे, ते शोधताना पार गोंधळून गेलो. अनुभवसंपन्न भाष्य ऐकवावे, ही त्यांची धारणा असे.’

‘ब्रह्मानंदलहरी’ या ग्रंथात एका गीतांत त्यांनी आपल्या अवतारकार्याचं स्वरूप निर्देशित केलेलं आहे. त्यांतून त्यांच्या परावाणीचं रहस्यही ध्यानी येतं –

*गुरुदेवांचा नंदादीप मी असा सतत जळणार ।*
*तत्त्वप्रकाशें भूवरचा मी उधळिन अंधःकार ॥धृ.॥*
*क्षितिजावरचा दीप्त भानू मी । उदयास्ताविण नाम अनामी ।*
*दिव्य स्रोत परी अखंडतेने फेकिन वारंवार ॥१॥*
*अवघे हारीन पापताप मी मत्स्पर्शाने पुनीत करुनी ।*
*गंगोदक जै प्रवाह तैसा अविरत मी असणार ॥२॥*
*आकृतिचे विण दृश्य भासणे स्वभावशील परिकर्म सांडणे ।*
*ज्ञानकिरण परि प्रकाश माझा विश्वसीमा भरणार ॥३॥*

या शब्दांत आपल्या विहित कार्याचं वर्णन आत्मविश्वासपूर्वक, प्रतिज्ञापूर्वक केलेलं आहे.

संत ज्ञानेश्वरांनीही अशा तऱ्हेने 'अरूपाचे रूप दावीन' अतींद्रिय ते इंद्रियांकरवी भोगवीन, हे ज्ञानेश्वरीत ते उद्‌गार काढले त्यांचं स्मरण होतं.

बाबांचं सर्व वाङ्मय अनुभूतिप्रधान आहे. 'अनुभवाचे पाय पुढे चालती' आणि शब्द मागून येतात त्याचप्रमाणे 'भाव' आधी निर्माण होतो आणि तो शब्दरूप होतो.

भक्तिशास्त्रांत 'विरह' या शब्दाचा अर्थ रूढार्थापेक्षा वेगळा आहे. 'विरह' ही भक्तिप्रेमाची सर्वोच्च अवस्था आहे. बहुतेक सर्व संतांच्या अभंगवाणीत 'विरहिणींना' महत्त्वाचे स्थान आहे. बाबामहाराजांनी 'विरह' या शब्दावर 'दिव्यामृतधारा' या ग्रंथात प्रदीर्घ भाष्य केलेलं आहे. विरहाग्नीच्या प्रेमभावाचा प्रत्यक्षानुभव सांगताना एका गीतात ते म्हणतात –

*'विरहानल मम शमवा । कुणी श्याम सुलोचना दावा ॥धृ.॥'*
*स्वर्गवासिनी देव देवता । भूलोकीच्या अनंत संता ॥*
*भूतकालीच्या आणि महंता । आंस मनीची पुरवा ॥*
*जलस्थलवासी सांगा कुणीतरी । कुठें राहतो श्याम मुरारी ॥*
*नेत्र बावरे बघण्या तो हरि । मम जीवाचा ठेवा ॥*

विरही भक्तीचे वर्णन करताना बाबा म्हणतात -

"त्यांना देव जवळच आहे हे कळत असूनही त्याच्यासाठी त्यांचा विरह असतो.'

'भक्तिप्रेमाच्या खोल तळाशी बसून अश्रू ढाळीत बसलेल्या मीराबाईस या जगाचे सज्जन जेव्हा प्रेमसागराच्या तटावर अलीकडेच उभे राहून समजावू लागले तेव्हा त्यांना काय कल्पना की प्रेमसागरात बुडालेल्या या कृष्णवेड्या मीरेच्या हृदयांत कोणती संवेदना होती ती.'

तुकोबांच्या समर्पणाचा धावाही असाच -

*'भेटी लागी जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिवस वाट तुझी ॥'*

वाट पाहण्याची परिसीमा झाली.

'हरीप्रेमात वेडे झालेले ज्ञानराजही आपल्या प्रेमानुभूतीचा उच्चांक प्रकट करतात. विरहाचा कळसच तो. जगांतील सगळी सुखे श्रीहरीवाचून त्यांना शून्यवत् वाटतात.' आपल्या प्रिय प्रभूसाठी तळमळणारे हे जीवन ईश्वराशिवाय कोण शांत करणार ? हरिप्रेमाच्या सरोवरीची क्रीडाच त्यांना सुखवील. भक्तांच्या विरहाचे गोडवे विरहवेदनाच गाऊ शकेल."

बाबामहाराज म्हणतात, शब्दाला ध्वनी असतो तसा अर्थाला ध्वनी असतो आणि भावालाही ध्वनी असतो. तो अर्थाचा आणि भावाचा ध्वनी अंतःकरणाला जाऊन भिडतो. संतांच्या सर्व अभंगांतून ही प्रचिती येते.

ते स्वयंभू झरे असतात. आत्मानुभवाचे सहजस्फूर्त सहजोद्‌गार असतात. भावोत्कट संगीतरचना त्यामुळे सहज येते.

'दिव्यामृतधारा' हा पूज्य बाबांचा महत्त्वपूर्ण ग्रंथ. ज्ञानेश्वरांची 'ज्ञानेश्वरी' तसा बाबांचा 'दिव्यामृतधारा'. ज्ञानेश्वरांच्या प्रत्येक शब्दावर भाष्य करताना त्यांनी जे विवेचन केलेलं आहे, त्यांत निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव, मुक्ताबाई, नामदेव, गोराकुंभार, चोखामेळा, जनाबाई, तुकाराम, रामदास इत्यादी मराठी संत व कबीर, मीराबाई, रामतीर्थ, तुलसीदास, सुफी संत इत्यादी सर्व संतांच्या ओळींचा उल्लेख वारंवार, औचित्यपूर्ण व विषयाला अनुसरून केलेला आहे. आपली अनुभूती सांगताना इतर संतांच्या आत्मानुभवाचे संदर्भ ठिकठिकाणी दिलेले आहेत. संतवाङ्‌मयात बाबामहाराजांचं हे महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य मानावं लागेल. सर्व संतांच्या विषयीचा आत्यंतिक आदर, प्रेम, जिव्हाळा यांनी एका गीतांत अतिशय नम्रतेने विनयशीलतेने केला आहे.

*तुक्या जैसा आम्हा येई ना अभंग ।*
*परि प्रेमरंग सांभाळितो ॥१॥*
*तुक्याचा अभंग, अभंग सर्वदा ।*
*आम्हा मतिमंदा नाकळतें ॥२॥*
*ज्ञानेदवांचे ज्ञान जैसे शुद्धपण ।*
*आम्ही हो अज्ञान केवीं बोलो ॥३॥*
*एकनाथापारी शुद्ध भाव पोटीं ।*
*आम्ही काय दिवटी राखो शकू ॥४॥*
*नाम्याचा जिव्हाळा आम्हा कोणे काळी ।*
*कृपा वनमाळी करील तरी ॥५॥*
*जैसा तैसा भाव पायांशी विदित ।*
*समर्थ कृपावंत सांगो काय ॥६॥*
*विनवणी अवघ्या संता कृपा करा हो महंता ।*
*सांभाळोनी न्यावें ज्ञातां मोरयाचा बोल ॥७॥*

संत मोरेश्वरांनी भक्तिभावांनी सकळ संतजनांना दंडवत घातलेलं आहे. बाबांनी म्हटलेलं आहे 'विनयाच्या पर्वतावरील लीनता हे शिखर आहे' विनय आणि लीनता या आकाशाएवढ्या विशाल अंतःकरणातील अवस्था केवळ संतपदी पोचल्यावरच प्राप्त होऊ शकतात. व्यवहारी लौकिक जीवनात ही भावना अपवादात्मक व सत्यस्वरूपात सर्वसाधारणपणे केवळ औपचारिक व दांभिक स्वरूपाची असते. विनय व लीनता या भावनांचा पूज्य बाबांचा हा महत्त्वपूर्ण विचार आहे. स्वतः विराट ज्ञानी, महान योगी व श्रेष्ठ भक्त असूनही त्यांनी हा विचार प्रत्यक्षात आणलेला आहे याचं अतिदुर्मिळ दर्शन या अभंगात होतं ही या गीताची महनीयता आहे.

ज्ञानेश्वरांपासून सर्व संतांचं पंढरीचा विठ्ठल हे आराध्य दैवत. सर्व संतांनी प्रत्यक्ष परब्रह्माच्या स्वरूपाचा आत्मानुभव विठ्ठलाच्या रूपातून घेतला आणि अभंगवाणीतून प्रकट केला. तसाच बाबांनीही विविध गीतांतून केलेला आहे.

*'सामर्थ्याची दिव्य शोभा । पहा पंढरीसी उभा ॥'*
*'समाधि समाधि । भक्त भावनेची ।*
*मूर्ति विठ्ठलाची । आकारिली ॥'*
*'स्वानंदाचा गाभा । पहा हो पंढरीसी उभा ।*
*मोक्षाचे माहेर । पंढरीचे दैवत सुंदर ॥'*

पंढरीच्या विठ्ठलाच्या चरणी अभंगगीतांची जी भावपुष्पं बाबांनी वाहिली त्यांत वेगळाच सुगंध असलेलं एक फूल आहे.

*आळंदीचे देव आले चंद्रभागा तीरीं ।*
*भावभक्ति पाहोनियां वेडावले हरि ॥धृ.॥*
*वीणा मृदुंगाचा ध्वनि निरहंकारपणीं ।*
*म्हणे धन्य धन्य अवघें आकाश अवनी ॥१॥*
*आनंदाचा हेलावला भक्तांचा सागर ।*
*कटीं हात ठेवितसे रुक्मिणीचा वर ॥२॥*
*वाजविती टाळी टाळ छंदपणे धुंद ।*
*उभा कान्हु सन्मुख झाला गोपाळ गोविंद ॥३॥*
*कीर्तनासी भरला रंग अभंगाचा सार ।*
*ज्ञानदेव हांसे नाचे विठाई सुंदर ॥४॥*

संत ज्ञानेश्वर म्हणजे बाबांचा प्राणविसावा. आळंदीच्या वास्तव्यात बाबामहाराज बेभान, निर्भान अवस्थेत असत. जळीस्थळी, काष्ठी, पाषाणी त्यांना ज्ञानोबांचं दर्शन घडे. अंधाऱ्या रात्री भावावस्थेत इंद्रायणीत प्रवेश करताना साधक भक्तांना त्यांना आवरावे लागत असे. त्या अवस्थेत त्यांनी अभंगरचना केलेली आहे.

*'अद्वैताचा ठेवा । ठेवुनी निमाला ।*
*ब्रह्मरूप झाला ज्ञानदेव ॥'*
*'सुखाचा सागर । उफाळला अनिवार ।*
*झाला एकाकार । ज्ञानेश्वरीं ॥*
*विश्वाचे जे धन । एक जागीं आलें ।*
*डोळ्यांनी देखिलें । आळंदीसी ॥'*
*'आळंदीच्या वाटेवरती कुणा कोमलाचे ।*
*उमटले जिवंत ग ठसे पावलांचे ॥'*

असे ज्ञानाईच्या प्रेमांत ओथंबून गायलेले अनेक अभंग आहेत.

'द्वैताद्वैतविलक्षण' भक्तीचा पूर्णानुभव घेतल्यानंतर जो आत्मानंद बाबांना झाला त्याचं वर्णन करताना बाबा म्हणतात -

*'हे कोण भाग्य माझे । मज सर्व प्राप्त झाले ।*
*विश्वांत सौख्य जें जें । ते अवघें मिळालें ॥*
*नच सौख्य वेगळेचि । सुखरूप मीच झालो ।*
*सदानंद स्वामी बनलो । मज विश्वगूढ कळले ॥'*

सुखदुःखाच्या द्वंद्वांत सांपडून होरपळून निघालेल्या जडजीवांना 'नच सौख्य वेगळेचि सुखरूप मीच झालो' या एकाच ओळीत स्वानंदाचा ठेवा ते प्राप्त करून देत आहेत.

आपल्या प्रेमळ भक्तांना उद्देशून वात्सल्याने, प्रेमाने, तळमळीने काढलेले, त्यांना आधारशक्ती देणारे आश्वासक उद्‍गार बाबांच्या एका गीतांत भक्तांच्या विषयींची आत्यंतिक आत्मीयता दर्शवितात : ते सांगतात -

*'बांधून ठेविला मी अति दिव्य तो महाल ।'*

संपूर्ण विश्वव्यापी असं भक्तीचं मंदिर बाबामहाराजांनी उभारलेलं आहे. 'मोक्षधाम' आश्रम माचणूर हा या मंदिराचा गाभा आहे. त्या मंदिराला सीमा नाहीत. विशाल आकाशांत गगनभरारी घेण्यासाठी 'प्रेम आणि निष्ठा' हे शक्तीशाली पंख बाबांनी सद्‍भक्तांना दिलेले आहेत. ईश्वरचरणी सद्‍गुरुचरणी शरणागत समर्पित झालेल्या चैतन्यमय जीवांसाठी 'भक्तीमहाल' उभा केलेला आहे. तो तेजोमय दिव्यप्रासाद आहे. चैतन्यस्वरूप बाबामहाराजांचं साक्षीरूप वास्तव्य त्याठिकाणी आहे.

पूज्य बाबांच्या कृपेचा लाभ झालेल्या भक्तांना 'कृष्णदर्शन' घडविण्यासाठी ते प्रेमळ आवाहन करीत आहेत. बाबा म्हणतात -

*'वृत्तिगोपिकांनो या या कृष्ण पाहुंया ।'*

श्रीकृष्णस्वरूपाशी एकरूप झालेल्या 'गोपगोपिका' ही भक्तीपथावरील भक्तांनी कोणत्याही काळातली सर्वोच्च अवस्था समजली जाते. भक्तांच्या हृदयाचा ठाव घेणं कठीण आहे. भक्तहृदयीचा सकळ सत्प्रवृत्तींना उद्देशून 'वृत्तिगोपिका' हा शब्द बाबांना अभिप्रेत असावा. सकल सत्प्रवृत्ती एकाग्र झाल्या, सर्वेंद्रियांचं संवेदन एकरूपाला आलं तर शुद्ध भाव निर्माण होतात व 'कृष्णदर्शन' होऊ शकतं.

कृष्णदर्शनाचा प्रत्यक्षानुभव असल्यामुळे 'पाहुंया कृष्ण भेटतो का ?' असा संदेहपूर्ण भाव त्यांत नाही. तर पूर्ण आत्मविश्वासांनी ते भक्तीसंपन्न भक्त गोपगोपिकांना कृष्णदर्शनासाठी अतीव प्रेमानी आवाहन करीत आहेत.

बाबामहाराजांचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन संपूर्ण सकारात्मक होता. चेतना जागृत करणारा, विधायक कार्यासाठी प्रवृत्त करणारा, कल्याणकारी होता. 'नैराश्य' हा शब्द त्यांच्या शब्दकोशांतच नाही.

त्यांचे विचार पुरुषार्थी आहेत. 'निसर्गाची पुरुषार्थाला हांक आहे.' हा महत्त्वपूर्ण विचार त्यांनी मांडलेला आहे. प्रत्येक क्षणाचं मोल त्यांना आहे. त्यांनी म्हटलेलं आहे. 'येणारा प्रत्येक क्षण आनंदाची अंजली घेऊन उभा आहे. त्याचं स्वागत कसं करायचं हे प्रत्येकाच्या हाती आहे.'

समाजातील दैन्यावस्था पाहून ते व्याकुळ होतात व म्हणतात –

*ही घोर दैना बघवे कशी क्वाना ।*
*तिळ प्रेम ना मनीं कां ! धर्मास चेतवा ना ॥*
*ते शौर्य काय झालें, काळास दंडण्याचे ।*
*गगनास लोटण्याचें गतवीर आठवा ना ॥*

मृतप्राय जडजीवांना जागृत करण्यासाठी ते स्वधर्मचेतना जागृत करतात –

*उठा रे उठा काळ संत्रिध आला ।*
*करा सत्करा आपुले सार्थकाला ।*
*स्मरा ईश्वरां त्यागुनी या विकारां ।*
*धरा आसरा सद्‍गुरू दीनधारा ॥*

'ब्रह्मानंदलहरी' या अभंगगीतांच्या संग्रहाचं वर्णन बाबामहाराजांच्याच एका गीतांतील शब्दांनी करावं लागेल –

*'झाली पौर्णिमा पौर्णिमा ।*
*अवघा चांदण्यांचा प्रेमा ॥'*

**नरसिंह केशव विवेकर**
१०१, धैर्य अपार्टमेंट, मधु पार्कजवळ, ११ वा रस्ता,
खार (पश्चिम) मुंबई - ४०००५२
दूरध्वनी - २६४९६२२९

***वैराग्याने मन आवरावे. विवेकाने बुद्धी शुद्ध करावी. ज्ञानाने अहंकार जाळावा व प्रेमाने हृदय व्यापक करावे. वैराग्याने मनाला बुद्धीत स्थिर करावे. विवेकाने बुद्धीला सत्यसन्मुख करावे व ज्ञानाने तिला भरावे. ज्ञानाने अहंकार निरहंकार करावा व निरहंकाराने हृदयाचे व्यापकत्व आत्मवत् अवस्थेने दृढ करावे.***



# प. पू. श्रीबाबा महाराज आर्वीकरांचे समाज प्रबोधन


## सौ. विजया प्रभुणे

*द्विपदवीधर, बी.ए.,बी.एड्. दैनिक प्रभात - १९८९ ते २००१ पर्यंत अनेक संतांवर लेखमाला (लेखसंख्या) सुमारे ७८०. अनेक कौटुंबिक मासिकांतून लेखन. अनेक बक्षिसपात्र कथाही प्रसिद्ध ! ओंकार ट्रस्टच्या कल्याणी मासिकात सात वर्षे सातत्याने लेखन. अहमदनगरच्या 'दिनांक कॅलेंडर'मध्ये ७ वर्षे लेख प्रसिद्ध. अनेक निबंध वैचारिक लेख प्रसिद्ध. अनेक ठिकाणी प्रवचने. दैनिक समाचार पत्र (चिंचवड) संत विशेषांकातून लेखन. श्रीॐ ब्रह्मांडनायक स्वामी समर्थ (त्रैमासिक) उस्मानाबाद - अनेक संत विशेषांकासाठी लेखन.*


चांदण्यांची स्निग्ध शीतल प्रभा जेव्हा चराचर सृष्टीला आपल्या वर्षावाने सौंदर्य प्रदान करीत सौंदर्याचे वरदान देते तेव्हा बारीक बारीक झाडेझुडपे आणि इवलीशी तृणपातीही सौंदर्याचा साज लेवून आल्हादक रूपाने नटतात. तसेच या महापुरुषांचे जीवन आपल्या असंख्य प्रतिभा लहरींनी स्पर्श करून वस्तू आणि वास्तु पवित्र आणि मनोहारी करून टाकण्यासाठी होते. या भूतलावर त्यासाठीच या महान् संतांचा अवतार होता. श्री. मनोहर भगत यांनी व्यक्त केलेले विचार आपले मन नक्कीच प्रभावीत करतात.

*बोल बोलूनी मुनी गेले आता काय बोलू ?*
*पूर्ण सेजेवरी आम्ही रंगरंगूनी डोलू ।*
*राममय वृत्ति झाली आता काय उणे ?*

जगन्नियंत्या परमेश्वराशी पूर्णाद्वैत असणारे नित्यानंदात डोलणारे, आत्मानंदात रमणारे ते होतेच होते परंतु आधुनिक युगात संघर्षमय जीवन जगणारा, जगण्यासाठी जीवघेण्या स्पर्धेत धावणारा, अर्थार्जनासाठी धडपडणारा, आकुल, व्याकुळ जीव जणूं त्यांच्या समाधिसुखाचा भंग करीत होता. त्यांना त्रिविध पीडेने दुःखाने आर्त होवून साद घालीत होता आणि म्हणूनच भगवन्ताशी तदाकार झालेला हा विदेही भक्त देहभानावर आला. करुणायन असलेले हे सद्गुरु आपल्या कृपामृताच्या वर्षावासाठी आपले दोन हात उभारून हाकारू लागले -

'अरे पीडित संसारी जीवा, भिऊ नकोस मी तुझ्या पाठीशी आहे-' अणु अणुतून राहिला भरून सकल संपूर्ण वासुदेव, हे त्रिवार सत्य आहे. परंतु बाबा म्हणत आणखी एक त्रिकालाबाधित सत्य सांगतो -

*सदाचारेण सर्वेषाम् शुद्धं भवति मानसम् ।*
*निर्मलं च विशुद्धं च मानसं देवमंदीरम् ।*

सत्कर्मकुसुमांनी समाजरूपी देवाची पूजा बांधायची आहे.

संतश्रेष्ठ तुकडोजी महाराजांचे सद्गुरू अडकोजी महाराज हे प. पू. बाबांचे सद्गुरू होते. त्यांच्यापासूनच प्रेरणा घेवून समाज कल्याणासाठी हा महापुरुष कटीबद्ध झाला. व्यष्टीतून समष्टीकडे वळला.

समाजात दिसणारी विषमता दोन प्रकारची असते. एक निसर्गनिर्मित तसेच दुसरी मानवनिर्मित. आपण कोणाच्या पोटी कुठे जन्म घेणार ? आपली प्राप्त परिस्थिति कशी असणार ? हे आपल्या हातात कोठे असते ? ही ईशनिर्मित स्वाभाविक विषमता असली तरी त्यात न्याय, दया, प्रत्येकाचे स्वास्थ्य, प्रगतीची व्यवस्था ही सहजसिद्ध, स्वतःसिद्ध असते.

चातुर्वर्ण्यम् मया सृष्ट गुणकर्मविभागशाः । असे भगवान् श्रीकृष्ण गीतेत म्हणतात.

*यत्न करवून करीन मी*
*यश दे रामा न दे तुझी सत्ता*

अशी रामरायाची सत्ता मानून सामान्यांचा असामान्य नरका नारायण बनता है - या तत्त्वानुसार, शेतकरी कुटुंबात अशिक्षित परिवारात जन्म घेतलेले जन्मांध गुलाबराव महाराज भगवंताच्याच प्रेरणेने जणू आपल्या बहुस्पर्शी, प्रतिभारूपी परीस स्पर्शाने अनेक विषयांवर ज्ञानपूर्ण ग्रंथ लिहू शकले.

दैवायत्तं कुलेजन्म मदायत्तं तु पौरुषम् – हे जणुं त्यांनी सिद्ध केले.

शिंपी कुळात जन्मलेले नामदेव विठ्ठलमय होऊन चराचरातील भगवंताचा वास ओळखणारे कुत्र्याचे पोट दुखेल म्हणून रोटी घेवून धावणाऱ्या कुत्र्याच्या मागे तुपाचे भांडे घेवून धावत सुटले. वाण्याचा धंदा करणारे सांसारिक आघातांनी विरक्ति आणि ईश्वरभक्तीकडे वळलेले तुकोबाराय कालौघात अभंग ठरलेले अभंगगाथा जगाला देवू शकले. या सर्व ईश्वरप्रेषित श्रेष्ठ संतांनी नैसर्गिक सहजसिद्ध व्यवस्थेनुसार कर्माचरणाचा आदर्श घालून दिला.

*दैव सदा आहे सांगाती जीवाच्या ।*
*धर्मशांची वाचा हेचि केले ।*

संत एकनाथ तर गाढवाच्या मुखात गंगा ओतणारे, अंत्यजाच्या मुलाला कडेवर घेऊन स्वच्छ करणारे कृतीशील संत होते.

*सामर्थ्य आहे चळवळीचे जो जे करील तयाचे ।*
*परंतु तेथे भगवन्ताचे अधिष्ठान पाहिजे ।*

ईश्वरनिर्मित सामाजिक सुव्यवस्थेचा भागच बाबामहाराज अगदी सुलभपणे समजावून सांगतात. ते म्हणतात, 'लोक हो, आकाशातील देवाला हाक मारण्यापेक्षा किंवा अज्ञात पोकळीतून उठणाऱ्या प्रतिसाद लहरींची प्रतिक्षा करण्यापेक्षा ज्या भूमीवर त्या देवाने मानवाचा जीवनरथ हाकणे चालू ठेवले आहे त्या मानवाच्या जीवनातून हृदयातून आपल्या हाकेस मातृत्वाने ओ मिळावी यासाठी आपण धडपडू हे खरोखरीच अमोलिक विचार आहेत. हेच दुसऱ्या शब्दात सांगू काय ?'

*जे का रंजले गांजले । त्यासी म्हणे जो आपुले ।*
*साधु तोची ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ।*

बाबा महाराज म्हणतात - देव आकाराने नांदतो यावर आपण श्रद्धा ठेवू या. आपली भावरूपी दीपज्योत विश्वात्मक देवासमोर सातत्याने तेवत ठेवू या. देवत्वाने आकार घडावा हा आपण हट्ट धरू या.

*अंजलि स्थानी पुष्पाणिवासयान्ति करद्वयम् ।*

अहो सुमनसाम् प्रीतिः वामदक्षिणयोः समा - अंधारात प्रज्वलित

केलेला दिवा शत्रु मित्र भेद न करता प्रकाश देतो. खळखळ वाहणारी नदी गायीला पिण्यासाठी पाणी देते आणि वाघाला नाकारते असे घडते काय ? बाबा म्हणतात -

***सर्वात्मका सर्वेश्वरा ।***
***गंगाधरा शिवशंकरा ।***
***जे जे जगीं जगते तया ।***
***माझे म्हणा करुणा करा ॥***

ते सर्वांना पटवून देतात - अरे मानवा, तुझ्या अंगच्या सत्कर्मरूपी सुगंधाने माझा देव मोहित झाला आहे. मानवा, माझा देव तुझ्या सोबत आहे रे ! मानवा तुझे आहे तुजपाशी परि तू जागा चुकलासी । आपण भगवन्ताला साद घालू या -

***देहाची तिजोरी । भक्तिचाच ठेवा***
***उघड दार देवा आता । उघड दार देवा ।***

आणि मग बघ सर्व सृष्टीमध्ये तुला आनंदी आनंद दिसेल. आणि अशा आनंदमय सन्मार्गावर साधकाने निश्चितपणे वाटचाल करावी. यासाठी माचणूर या गावी मोक्षधाम आश्रमाची स्थापना केली. तेथे येणाऱ्या साधकांसाठी ठराविक उपासनेचा दिनक्रम ठरवून दिला. ज्या आश्रमात फक्त शांति, सुख समाधानच आहे असा अनुभव साधकाला येवू लागला. माचणूरला केलेली ५ प्रवचने संतांचे भक्तीतत्त्व व आध्यात्मसाधनेचे स्वरूप विशद करतात.

त्या नियमबद्ध आचरणाने नित्यनियमित केलेल्या उपासनेने माणसाचे मन वैषयिक सुख आणि दुःख दोन्ही अवस्थांचा त्याग करून पलिकडे जाते आणि उपाधिरहित सहजानंदात मग्न होते. या आनंदाचा अधिकारी सामान्य प्रापंचिकालाही बनविण्यासाठी आश्रम स्थापण्याचा त्यांचा निश्चय म्हणजेच समाज प्रबोधनरूपी कार्यातील दीपस्तंभच आहे असे म्हणता येईल. याचे कारण काय ? सांगू का ?

मन प्रसन्न नसेल, चित्त प्रसन्न नसेल, चित्तामध्ये प्रसाद उदित झाला नसेल तर मग सामान्य लौकिक विषय सुखापासून वेगळे होवूच शकत नाही. पंचज्ञानेंद्रिये व पंचकर्मेन्द्रिये या पासून मिळणारे सुख हे क्षणिक क्षणभंगूर आहे. सुख आणि शाश्वत समाधान यात फरक आहे. मन जर प्रसन्न नसेल तर बुद्धि कोठल्याही प्रकारे स्थिर होऊच शकत नाही. भगवान् श्रीकृष्ण भगवत् गीतेत म्हणतात —

***प्रसादे सर्व दुःखानां हानिरस्योपजायते***
***प्रसन्न चेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ।***

आणि हा शाश्वत परमानन्द मिळविण्यासाठी माचणूर येथील श्रीबाबांच्या आश्रमामध्ये लोकांचा महासागर उसळू लागला.

गुणाः कुर्वन्ति दूतत्वं दूरेऽपि वसताम् सनाम् । केतकी गंधं आघ्रातुं स्वयम् आयान्ति षट्पदाः । या न्यायाने परमपूज्य बाबांच्या सत्कर्मरूपी सुगंधाने प्रापंचिक मोहीत झाले. त्यांचे भक्त बनले आणि त्यांना प्रत्यक्ष परमेश्वरच मानू लागले. समाजाबद्दल त्यांना अपरंपार जिव्हाळा होता.

श्री. बाबा महाराज साधकांना सांगू लागले - लोक हो - माणसाच्या मनातला देव जागवा. संघटनेच्या मागे लागू नका. विघटनेची जी कारणे आहेत ती दूर करा. व्यक्ति, समाज आणि विश्व यामध्ये जो दुवा आहे तो समजून घ्या. तो दुवा म्हणजे या चराचरात भरून उरलेले परम मंगल चैतन्य होय. श्रद्धावान जीव जागे करा. विश्वाचे सर्वच घटक हे एकाच परमात्म्याचे अभिन्न अंश आहेत. त्यांच्याकडे भोगाने वा स्वार्थाने बघू नका कारण लोभ हा पापाचा बाप आहे.

भगवान् श्रीकृष्णाने गुणकर्म विभागशः केलेली विभागणी विसरून मानवाने– स्वनिर्मित कृत्रिम विभागणी - पक्की अशी तटबंदी उभारून जातिभेद, पंथभेद, धर्मभेद, उच्चवर्णीय, नीचवर्णीय असे तुकडे समाजाचे पाडले आणि स्वतः सिद्ध परमेश्वराचे अंश असलेले जीव हे विविध प्रकारच्या अभिमानाने दुःखीच होवू लागले.

'अभिमान शत्रु मोठा सर्वांना जाचतो सुखाशेने' - सामान्य प्रापंचिक काम, क्रोध, लोभ, मोह, मत्सर आदि षड्विकारांच्या विळख्यातून सुटेचना. आणि करुण असे आक्रंदन करू लागला – अरे या मानवी आयुष्यात सुख आहे कोठे ? समाधान मी कोठे शोधू ? शांति मला कोठे मिळेल ?

***षड्रिपु मजला गांजिती भारी ।***
***तुजवीण सखया मज कोण तारी***

मज कोण तारी ? म्हणून श्रीबाबांना हाकारू लागला. श्रीबाबा महाराज स्वच्छ, निर्मळ, स्पष्ट शब्दांत उत्तर देतात. त्यात त्यांच्या समाज प्रबोधनाची तळमळ, कळकळ दिसून येते.

ते म्हणतात - खचून जाऊ नकोस. निराश होवू नकोस. मी सांगतो ते ऐक - त्याग व सेवा हे प्रभुमय जीवनाचे विशुद्ध स्वरूप आहे. लोकहो तुम्ही जागे व्हा. अभ्यासू लोकांना निरपेक्ष विचार करता आला पाहिजे. आपली निष्ठा दुसऱ्याच्या दोषांमुळे खंडित होता कामा नये. जीवांचा आणि ईश्वराचा परस्पर नैसर्गिक संबंध काय आहे हे समजावून सांगत. तसेच सांस्कृतिक संबंधही सांगत. ते टिकवावे कसे हेही समजावून देत. ते म्हणत - स्वधर्मे निधनं श्रेयः । परधर्मो भयावहः । 'धारणाद्धर्ममित्याहुः । श्री बाबांचे धर्मविषयक विचार व्यापक, विशाल अन् उदात्त होते. कविवर्य केशवसुत म्हणतात, हिंदु नाही, ब्राह्मणही नाही न मी एक पंथाचा । तेच पतित की जे आखडती प्रदेश साकल्याचा । सर्वच भारतीय संतांनी स्वधर्माचा स्वाभिमान राखत परधर्मसहिष्णुताच दाखवली, सांगितली आणि आचरूनही दाखवली. परमपूज्य बाबा महाराज व्यापक अशा मानवतावादाचे प्रवर्तक होते.

श्री बाबा महाराज आर्वीकर सामान्य प्रापंचिक वाटसरूंचे वाटाड्या होते. शाश्वताचे सांगाती, दीनांची माऊली अन् अनाथांची साऊली होते. ती साऊली आज कोठेतरी भीमातीरी कायमची हरवली असली तरी त्यांनी सत्कर्मरूपी दिवलीत सद्विचाररूपी स्नेह (तेल) घालून जी दीपज्योत आमच्या मनात प्रज्वलीत केली आहे ती त्यांच्याच कृपामय आशिर्वादाने, सातत्याने तेवत राहील. त्यांच्या प्रत्यक्ष कृतीशील जीवनातून आपण एकच शिकणार आहोत.

***जीवाला पिंजोनी निबरला स्वार्थ ।***
***वळल्या यथार्थ फुलवाती ।***
***अहंकारचित्ती कर्तृत्व नाही जे ।***
***झाडली पाहिजे काजळी ती ।***
***कर्तव्यनिष्ठेचा उज्ज्वल प्रकाश ।***
***ध्येयमार्ग खास उजळीत ।***

संतश्रेष्ठ तुकडोजी महाराज आपल्या एका पद्यात म्हणतात -

***दगडाचा देव त्याला पाथरवटाचे भय ।***
***लाकडाचा देव त्याला अग्नीचे भय ।***

*सोन्याचा देव त्याला चोराचे भय ।*
*मातीचा देव त्याला पाण्याचे भय ।*

म्हणून प्रत्येक जीवात वास असणाऱ्या विश्वेश्वराला ओळखायला शिका.

*येन केन प्रकारेण यस्य कस्यापि देहिनः ।*
*संतोषं जनेत् प्राज्ञः तदेवेश्वरपूजनम् ।*

श्री बाबांना संतश्रेष्ठ तुकडोजींविषयी परम आदर होता. त्यांच्या एक-दोन भेटींचा आणि सहजसंवादाचा आनंदही त्यांनी लुटला होता. आपले समाज प्रबोधनाचे विचार सांगताना म्हणतात, भारतीय समाजाच्या अंकावरील अर्भकांनो तुमच्या या कार्यातून या देवाच्या देशात गजर उठवा. सारा भारतीय समाज त्या पवित्र देवाची मृदु शय्या कधी होईल या चिंतेत मी आहे. संतांच्या आदेशाने सिद्ध झालेला जीवनधर्म स्थापन करा. संकुचित मर्यादा, भ्रामक अशा समजुतींचे बांध फोडून टाकू. जे जे उत्तम, उदात्त, महन्मधुर ते ते लोकमंगल करण्यासाठी धडपडणारा हा एक महामानव होता. त्यांची मनीषा एकच होती.

*सर्वेऽत्र सुखिनः सन्तु । सर्वे सन्तु निरामयाः ।*
*सर्वे भद्राणि पश्यन्तु । मा कश्चित् दुःखम् आप्नुयात् ।*

श्रीबाबा महाराजांनी समाजाचे प्रबोधन पत्ररूपाने, साधकांना मार्गदर्शन, वाणी-लेखणीने सतत केले. समाजाचे प्रबोधन करताना श्रीबाबा महाराज म्हणतात, 'जगात दोन प्रकारचे लोक असतात, एक जीवनाचा उपभोग घेणारे व दुसरे जीवनाचा उपयोग करणारे. जीवन एक साधन आहे. हे ओळखून प्राप्त वेळेचा सदुपयोग करणे हे सुविद्य लक्षण होय. आणि जीवन हे क्षणिक आहे असे जाणून ते क्षणीक व काल्पनिक उपभोगासाठी वापरणे किंवा जीवनाचा सतत उपभोग घेणे हे अविद्या लक्षण होय. जीवनाचा उपयोग करणे हा धर्म व उपभोग घेणे हा अधर्म !'

वैकुंठवासी श्रीगुळवणी महाराज, श्रीबाबा महाराजांचे वर्णन करताना चंद्रमे जे अलांछन, मार्तंड जे तापहीन या शब्दात करतात. बाबांचे जीवन हे असे होते -

*करी कर्म सारोनी कर्माभिमान ।*
*मुरारी पदी अर्पियले कर्मदान ।*
*परी अर्पणी भाव सांडोनी ठेला ।*
*जगी जन्मूनी जीव तो मुक्त झाला ।*

**सौ. विजया प्रल्हाद प्रभुणे**
श्रीमान सोसायटी, १/१९ ब, कर्वेनगर,
पुणे ४११०५२. फोन : २५४५७४६४

# धर्मधुरंधर नवे महर्षी...

संतधर्मध्वज मंगल होता अपुल्या खांद्यावर ।
उपनिषदातील अमृत होते नाचत ओठावर ।
जनसेवेचे हाती अपुल्या कंकण जीवनभर ।
अनासक्तियोगात नाहले ओसंडुन अंतर ॥१॥

शिवयोगातून नवनाथांची जागविली शक्ती ।
भागवताची हृदयी भरली आर्त भावभक्ती ।
पार्थाचा तुम्हि अंतरी जपला सार्थ ज्ञानयोग ।
कृष्णापरि योगेश्वर बनला मुक्त सर्वसंग ॥२॥

रहस्य उकले सहजपणाने चिरंजीवनाचे ।
मर्म दाटले हृदयी अपुल्या लोकधारणेचे ।
लपली होती परंपरातळी ज्ञानाची गंगा ।
धर्मक्षेत्रातून फिरविली मुक्त लोकसंगा ॥३॥

अक्कलकोटी समर्थ केले तुम्हा समर्थांनी ।
हृदय परांचे उजळायाला दिली दिव्य वाणी ।
सिद्धशक्तीच्या अवधूतांनी दिला अग्रहार ।
धर्मस्थाच्या सारथ्याचा सोपविला भार ॥४॥

भागवताची प्रेमवाहिनी प्रीत चंद्रभागा ।
माचणुरी जी आली होती सिद्धेश्वरसंगा ।
तिथे रोविला धर्मध्वज तुम्ही इंद्रायणी निकटी ।
नवधर्माचे पान उघडिले भीमेच्या काठी ॥५॥

ज्ञानेशाची ओवी आली गुंजत धारेत ।
ज्ञानभक्तीचा ओघ झुळझुळे पात्रापात्रांत ।
तुकयाचे वर अभंग आले रसातळी बुडले ।
उपनिषदाचे कूजन फिरूनी वनोवनी घुमले ॥६॥

ज्ञानेशांनी पुन्हा गायिला नवीन 'हरिपाठ' ।
दासांनीही नवा मांडला बोध धीट पाठ ।
साधकप्रीती बनुनी आली नवी योग 'संहिता' ।
'दिव्यामृतधारे' त नाहला भक्तीचा माथा ॥७॥

पहाट झाली सुरू आपुल्या नव्या प्रार्थनेची ।
प्रयोगभूमी सिद्ध जाहली नव्या धारणेची ।
तोच अचानक विपरीत झाले पडला अंधार ।
माध्यान्ही मालवला दिनकर, तुटला आधार ॥८॥

नवधर्माची जो न विराली गगनी ललकारी ।
निःश्वसितांची सुरू जाहली दारुण ललकारी ।
गुरुगायेचा लिहिला आपण काळावर लेख ।
उजळित राहिल विश्व, होऊनी दीपक नवलाख ॥९॥

धर्मधुरंधर नवे महर्षी, मुनी, मंत्रद्रष्टे ।
नवधर्माचे पाईक आपण नवयुग निर्माते ।
तेजोमय नभप्रांगण होईल भारतवर्षाचे ।
पथिक आम्ही अपुल्या मंगल अमृतपदवीचे ॥१०॥

**चकोर आजगांवकर**



# ॥ दिव्यामृतवाणीचे बाबा महाराज ॥


**श्री. शां. गो. पोतदार**

*बी.एस्सी. (ऑनर्स) प. पू. श्रीनानामहाराज तराणेकर अनुग्रहित. नागपूरच्या शांती पुरुष व हरिद्वारच्या समन्वय साधना व इतर मासिकांतून लिखाण*


सामान्य जनतेला आपले जीवन नीरस व फार कंटाळवाणे वाटते. कारण भूतकाळाचे नको इतके चिंतन व भविष्यकाळाची चिंता ह्या चिं चिं मुळे मानवी जीवन पोखरलेले आहे. ही सामान्यांची व्यथा पाहून जीवनात शाश्वत सुख व समाधान लाभावे यासाठी अनादी कालापासून संतांनी नाममहिम्याचा पुरस्कार केलेला आहे. या नामजपामुळे काम, क्रोध व लोभ हे विकार हळूहळू कमी होतात व शेवटी संपुष्टात येतात. म्हणजेच प्रपंच सुखाचा होण्यासाठी नामजपासारखे सोपे व हमखास दुसरे कोणतेही साधन नाही. हे ओळखून श्रीज्ञानेश्वर माऊलींना ही हलाखी पाहवेना. या भूमिकेवरून चांगदेव पासष्टीतील उपदेश, ज्ञानेश्वरीतील ज्ञान व अमृतानुभवातील अमृत एकत्रित करून सुरेख छोटासा हरिपाठ हा सूत्रमय ग्रंथ सामान्यांसाठी लिहिला. हरिपाठात एकूण २७ अभंग आहेत. जणू ती २७ नक्षत्रेच आहेत. या हरिपाठातील पहिला अभंग आहे -

*देवाचिये द्वारी उभा क्षणभरी ।*
*तेणे मुक्ति चारी साधियेल्या ॥*

म्हणजे हरिपाठासाठी कसा, कोठे व किती यावर माऊलींनी संपूर्ण मार्गदर्शन करून अशा हरिपाठाची फलश्रुती काय हे अभंगाच्या उत्तरार्धात सांगितलेले आहे. संपूर्ण हरिपाठाचे तात्पर्य माऊलींनी पहिल्याच अभंगात चर्चिलेले आहे. ईश्वरभक्तीचे, नामसाधनेचे हे महत्त्व पटवून देण्यासाठीच पूज्य श्रीबाबामहाराज आर्वीकर यांचा अवतार झाला होता. ते आधुनिक काळातील थोर तत्त्वचिंतक संत व जनजागरणाचे महान प्रवर्तक होते. लहानपणापासूनच चिंतनशील स्वभावामुळे सद्‌ग्रंथांचे वाचन व मनन यामुळे आत्मसाक्षात्काराची कल्पना त्यांनी स्वतःच्या जीवनकार्यातून प्रतीत केली. श्रीज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायावरील त्यांचा 'दिव्यामृतधारा' हा चौदाशे पृष्ठांचा संत वाङ्‌मयातील एक अग्रगण्य सर्वमान्य ग्रंथ आहे. यातील प्रत्येक शब्द ईश्वरवाणीचा प्रत्यय देतो.

हरिपाठ या शब्दाबद्दल विवरण करताना त्यांनी असे म्हटले आहे की, हरिपाठ या शब्दात ह + रि + प + आठ अशी अक्षरे आहेत. वस्तुतः शब्द म्हणजे शारीरिक शक्ती विचारांच्या माध्यमातून ध्वनिरूप करणे हे होय. वास्तविक हरि म्हणजे निर्गुण परमात्मा सगुण रूपाने होतो तो हरि होय. म्हणजेच हरि या शब्दात सगुण व निर्गुण या परमेश्वराच्या रूपाचे ऐक्य प्रकट केले आहे. प म्हणजे पालन करणे व नंतर येणारा आठ हा शब्द अष्टप्रकृतीसाठी योजिलेला आहे. थोडक्यात हरिपाठ म्हणजे सकल विश्वाचा पालनकर्ता तो सगुण-निर्गुण रूपाचा पुतळा जो हरी त्याचे रूप या अभंगाद्वारे करणे हा होय. तसेच हरी हा शब्दसुद्धा फार महत्त्वाचा आहे. कारण त्यामध्ये शिव-शक्तीचे सामरस्य हरी या शब्दाने लाभते. इतःपर संपूर्ण हरिपाठाऐवजी पहिला चरण विचारात घेऊ.

संत बाबामहाराजांनी देवाचिये द्वारी या उभय शब्दांचा एकत्र विचार मांडला आहे. त्यांच्या मते देवाचिये द्वारी म्हणजे परमेश्वराचे द्वारी होय. त्यांच्या मते द्वार ही एक विभागणारी कल्पना आहे. कारण द्वार झाल्यापासूनच आत-बाहेर हा भेद झाला आहे. याचाच जास्त विचार द्वाराला चार भिंती आल्या की आत व बाहेर ही कल्पना जास्त स्पष्ट होते. म्हणजेच देव द्वाराचे आत व जग द्वाराचे बाहेर हे ठरले. आता द्वाराचा मालक त्याचे ते द्वार किंवा द्वाराचा मार्ग जाणणारा त्याचे हे द्वार म्हणजेच देव द्वाराचा मालक वा मार्ग जाणकार असा त्यांचा अभिप्राय आहे. म्हणजेच हे द्वार देवाला ज्ञात असून देवाच्याच अधिकारात व उपयोगी आहे. देव बाहेर येतो म्हणजे तो आपले निर्गुण, निराकार रूप सोडून साकार होऊन बाहेर येतो व आत जातो म्हणजे आपल्या मूळ रूपात परततो. या द्वारमार्गे तो सगुण व निर्गुण ही रूपे धारण करतो. म्हणून ते जगाला मार्गदर्शन करतात की तुम्ही द्वाराचे आतही जाऊ नका व बाहेरही राहू नका. तर फक्त द्वारातच राहा म्हणजे पूर्णांशाने त्या परमात्म्याचे रूप समजेल व तुम्ही ज्ञानी व मुक्त व्हाल. म्हणजेच देव जेथे सगुण व निर्गुण एकाच वेळी असतो तेच त्याचे द्वार होय. श्रीज्ञानेश्वर माऊली कदाचित याच द्वारात उभे राहून हा अभंग म्हणत असावेत.

या अभंगातील तिसरा शब्द आहे, 'उभा' या ऐवजी बैस क्षणभरही असेही म्हणता आले असते. पण कोणापुढेही उभे रहाणे ही आदराने केलेली मानाची कृती आहे. वडीलधाऱ्यांसमोर तसेच ज्येष्ठ व श्रेष्ठ व्यक्तींसमोर आपण वयाने वडील असलो तरी उभेच राहतो व योग्य तो मान देतो. ह्या व्यवहाराला धरूनच उभा या शब्दाची योजना आहे. दुसरा अर्थ असावा की उभे राहिले म्हणजे मन एकाग्र व निश्चल होत असते. कारण ज्या कार्यासाठी आपण उभे आहोत त्याबाबतचेच विचार मनात येत राहतात. जर आपण खाली बसलो तर आपली एकाग्रता राहातेच असे नाही. म्हणूनच आपण आरती उभ्याने करतो. संपूर्ण लक्ष आरतीच्या शब्दाकडे असते. अशा अर्थानेही उभा शब्द वापरलेला आहे.

अभंगातील नंतरचा शब्द आहे 'क्षणभरी'. हा धीरगंभीर शब्द फारच गूढार्थाने वापरलेला आहे. याबाबत श्रीबाबामहाराज म्हणतात - नाममंत्राचे अगाध सामर्थ्य आहे. तुम्ही चंचल मनाचे निश्चल व्हाल आणि मग याच मार्गाने संत भेट घडून ज्ञान प्राप्ती होईल. अशी अवस्था प्राप्त झाली की तुम्ही थोडा क्षण जरी थांबलात तरी तुम्ही मुक्त व्हाल. कारण --

*काहीच न करोनी प्राणी । रामनाम वदे वाणी ।*
*तेणे तुष्टे चक्रपाणी । भक्तालागी सांभाळी ॥*

असे आश्वासन संत श्री रामदास स्वामींनी दिलेलेच आहे. जीवनात

जेवढे क्षण तेवढे जर भगवंतांचे नाम आले तर आपण नाममय होऊ व आपणांस जिकडे तिकडे भगवंतच दिसू लागेल. म्हणजे -

***जे जे भेटे भूत । ते ते जाणिजे भगवंत***

अशी आपली वृत्ती होईल. हा केवढा फायदा !

थोडक्यात म्हणजे अखंड नामस्मरणाचे फळ म्हणजे 'तेणे चारी मुक्ती साधियेल्या' याची प्राप्ती होय. या चारी मुक्ती म्हणजे सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता होय. या चारी मुक्ती नामधारकाला त्याच्या जिवंतपणीच मिळत असतात. कारण मृत्यूनंतर जीवाची काय गत होते यापेक्षा जिवंतपणी काय व्हावे हा विचारच प्रामुख्याने महत्त्वाचा होय. माऊलींनी असा स्पष्ट उल्लेख केला आहे की,

***मुक्ती नाम हाती मोल । ऐसी बहुतांची ताल ।***

नामधारकाच्या अखंड नामभक्तीची भगवंताला फार आवड आहे व ज्या स्थळी प्रेमाने अपेक्षेरहित नामस्मरण, कीर्तन, भजन वा प्रवचन चालू असते, त्या ठिकाणी भगवंत असतोच असतो. कारण मदभक्ता यत्र गायन्ति । तत्र तिष्ठामि नारद ।। असा निर्वाळा भगवंताने नारदांना दिलेलाच आहे व जेथे भगवंत तिष्ठत उभा राहतो ती जागा पवित्रोत्तम होणारच !

***परिस लागता लोहासी । सुवर्ण होतसे खासी ।***

अशा स्थळी नामस्मरण सेवा केली तर सलोकता मुक्ती निश्चित प्राप्त होते व जेथे जेथे नामधारक जातो तेथे तेथे भगवंत धावत असतो. अशा रीतीने नामधारकाला सलोकता या मुक्ती समवेत भगवंताच्या समीपता या मुक्तीचाही लाभ होत जातो. या अविस्मरणीय मुक्तीच्या प्राप्तीमुळे तो स्व ला विसरून भगवंताशी एकरूप होऊन जातो व त्याला देहबुद्धीचे भान उरतच नाही व मग -

***ब्रह्मानंदी लागली टाळी । कोण देहाते सांभाळी ।***

***अशी अवस्था आली की सायुज्यता मुक्ती प्राप्त होते.***

म्हणजेच 'देवाचिये द्वारी उभा क्षणभरी' याची ही फलश्रुती आहे. भगवंताचे नामस्मरण (अखंड) हे भगवंताशी एकरूप करणारे सुलभ शास्त्र आहे व त्यामुळे नामधारकाला चारी मुक्ती प्राप्त होऊ शकतात.

थोडक्यात श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर सांगतात

१) हरिपाठ म्हणजे हरीला पाठ करा व त्याला अंतरी साठवा.

२) भगवंताचे सातत्याने स्मरण करा.

३) विश्वाचा पालन कर्ता तो सगुण-निर्गुण श्रीहरी त्याचे यथार्थ वर्णन या अभंगात आहे.

४) संतसंग वा सत्संग म्हणजेच देवाचे द्वार होय.

हरिपाठातील शब्दाचा - गूढार्थाचा गूढार्थ श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर अशा शब्दात सांगतात, ते म्हणतात – 'जन्मोजन्मीच्या महापुण्याईने वैष्णवांचा समन्वय असणारा 'रामकृष्णहरी' या नामजपावर मन अनुरक्त होते. इतःपर त्या नामाची गोडी निर्माण होणे कठीणच आहे. म्हणून आवडीने तुम्ही हरी नाम घ्या. पुण्य पदरी साठवा व त्या नामाच्या ठायी मन लागेल असे करा. भावाशिवाय त्याचे भजन घडणार नाही. भाव हा बुद्धीच्या निश्चयाशिवाय होत नाही व सत्वाशिवाय निश्चय होत नाही. म्हणून सत्वशुद्ध भाव मनी प्रथम धारण करा. कारण सत्वाचाही प्रारंभ या हरी नामानेच होईल. म्हणून हरी हेच सर्व निधान होय !

**श्री. शां. गो. पोतदार**

१५८८, सदाशिव पेठ, गोपाळ गायन समाज रस्ता, पुणे ४११०३०.

दूरध्वनी : २४३३७५६२

## श्री भगवान् ज्ञानेश्वरांची आरती ।

आरती ज्ञानेश्वर प्रभूची । करुणासागर सद्गुरूंची
ब्रह्मासिन अवताराची । जयजय महायोगियाची ।। धृ. ।।

चिद्‌घन देहकांति झळके । प्रकाशे विमल तेज फांके ।
प्रगट महिमान, जयाचे ज्ञान, दिव्य सुरयान
कृपाळू माऊली भक्तांची, सुस्वर वंद्य जगद्गुरूंची ।। १ ।।

निरंजन अंजन ज्ञानाचे, अभयांकित वरदानाचे ।
तारु अक्षय भवोदधीचे केवळ ब्रह्म अनादीचे ।
पतिता तारण कारण हे । धरणी देह धारण हें ।
निखळ सत्‌धाम, ज्योतिरूप शाम अनामिनाम ।
पावन तनु सुकुमाराची, निरंजन निगम प्रतितेची ।। २ ।।

कोमलांगीचा कळवळा, प्रेमकमळीचा रसमेळा ।
भक्तिचा प्रेमळ जिव्हाळा, स्वानंद स्वरूपी शिवभोळा ।
भक्तगण नाचती आनंदे । होउनि हर्षित स्वच्छंदे ।
जयाचे द्वारी, मुक्ति त्या चारीं, उभ्या सामोरी ।
सेवा साधिति सांबाची सुखागर भक्तवत्सलाची ।। ३ ।।

विराजित सहस्त्रदळ कमळीं, मंडित रत्नासम झळकी ।
धारीत दिव्यांबर पिवळी, कंठिं त्या रत्नमाळ खेळी
गर्जति नौबत वेदांचें । नगारे झडति शास्त्राचे ।
वीणा नामाचा, शंख कर्माचा, नाद घंटेचा ।
गर्जना अनहत प्रणवाची । राऊळीं शंकर महिमेची ।। ४ ।।

भक्तिचा प्रसाद अर्पियला, अद्वयताटीं सांठवीला ।
अभेदरुचिनें सेवियला, विश्वैक्यासी तो फळला ।।
फळतां उघड झाली कोठी । कृपांकित चढले आदिपीठीं ।
तयाला शरण, वाहिलें प्राण, केलि उतरण ।
पदासी माझे जीविताची, महिमा थोर ज्ञानेशाची ।। ५ ।।

**श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर**

प्रेमाने जग भारावे, ज्ञानाने सावरावे व अहंतेच्या व्याप्तीने वर उचलावे. नेत्र स्थिर होतील तर अंतःकरण निवृत्तीचे दर्शन घेईल. वाणी प्रेमळ व सत्य होईल तर आंत बाहेर समता येईल. गंध बद्ध होईल तर दुर्गंधीची वार्ता मिटेल; कान अधीर होतील तर पावित्रतेचे संगीत ऐकावयास येईल; स्वादिनी निर्मोह होईल तर चित्ताचा चकोर आत्मभावाने चंद्रप्रकाशांत, अज्ञानाची रात्र, रात्रीचे पुढे प्रकाशाला यावी तद्वत् अधोदृष्टीचा बहरलेला कल्पवृक्ष ध्येय स्मरणाच्या वर्षावाने उर्ध्वगतिक होऊन दृष्टिभेद करतो. जगण्याचे व मरण्याचे - दोन टोके मूळचा आश्रय घेऊन असतात. पण मुळाची माया हरिची झाली म्हणजे मूळ जन्म-मरणच अवताराचा न्याय ठरतो. मूळ म्हणजे मन... !

**श्रीबाबा**



# श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर यांची नवविधा भक्ती

डॉ. सौ. सुमती देशपांडे

एम.ए.मराठी, एम.एड., पीएच.डी. मराठी-हिंदी भारुड काव्य - एक अभ्यास. ३० वर्षे नोकरी - कर्मवीर भाऊराव पाटील, हिरे हायस्कूल, उपमुख्याध्यापिका म्हणून निवृत्त. ३ वर्षे संत नामदेव अध्यासनात संशोधन सहाय्यक. संत साहित्यावर निरनिराळ्या मासिकांतून लेख.

**प्रास्ताविक**

***'श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।***
***अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥'***

(श्रीमद्‌भागवत ७.५.२३)

श्रीमद्‌भागवताने प्राचीन काळीच नवविधा भक्तीचे मंगल गीत गायले आहे. नारद भक्तिसूत्रात भक्तिचे वर्णन करताना 'सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा ।' असे म्हटले आहे. ही भक्ती ज्यांना लाभते, त्यांना 'यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति । अमृतो भवति । तृप्तो भवति ।' याची प्रचिती येते.

परंतु भक्ती म्हणजे काय ? भक्ती या शब्दाच्या अनेक व्याख्या केल्या गेल्या आहेत. पण भक्ती म्हणजे भक्ताचा ईश्वराच्या ठिकाणी असलेला शुद्ध भाव होय. ही सुटसुटीत व्याख्या सर्वसामान्य माणसांना पटते. परमेश्वरावाचून दुसरी कोणतीही इच्छा नसते; कारण सर्व इच्छा, अभिलाषा, कामना यांच्यापासून सुटका झाल्यावरच अनन्य भावाने आणि मनापासून तो परमेश्वरप्राप्तीचे ध्येय उरी बाळगतो. भगवद् कृपेच्या आनंदाबरोबरच मोक्षाचाही लाभ या भक्तीमध्ये अपेक्षित आहे. भक्तीचे सर्वश्रेष्ठ आचार्य महर्षी नारद होत. त्यांनी दुसऱ्या कोणत्याही मार्गापेक्षा सर्वसामान्य माणसांना 'भक्ती' हाच परमेश्वराजवळ जाण्याचा सर्वात सुलभ मार्ग आहे, असे म्हटलेले आहे. 'भक्ती' या शब्दात 'भज्' या धातूला 'क्तिन्' हा प्रत्यय लागून 'भक्ती' हा शब्द तयार झाला असून त्याचा अर्थ प्रेममय सेवा असा होतो. (भज = सेवा क्तिन् = प्रेम) हा अर्थ भक्तिकोशाच्या द्वितीय खंडात डॉ. शंकर अभ्यंकर यांनी दिलेला आहे.

भक्तीचे नाते भावनेशी, हृदयाशी आहे. बुद्धीचा मार्ग अवघड असतो; पण भावनेचा मार्ग हा सुगम व सर्वगम्य असतो. श्रद्धायुक्त प्रेमभावनेने आपल्या इष्ट देवतेला भजणे म्हणजे भक्ती होय ! नारदभक्तिसूत्रातील (ना. भ. सू. २) 'सात्वस्मिन् परमप्रेमरूपा' म्हणजे ईश्वराच्या ठायी परमप्रेम असणे म्हणजे भक्ती असा अर्थ केलेला आहे. ज्ञानोत्तर भक्ती आचरलेल्या अनेक महात्म्यांनी भक्तीच्या बोधप्रद व्याख्या केलेल्या आहेत; पण आपल्याला 'भक्तिः भज्यते, सेव्यते इति भक्तिः' । ही सिद्धान्त कौमुदीतत्त्वबोधिनीतील व्याख्या जास्त पटणारी, सहज समजणारी आहे. भक्तीच्या व्याख्यानाप्रमाणे भक्तीचे प्रकारही पुष्कळ आहेत. भागवत पुराणाच्या सातव्या स्कन्धात 'नवविधा भक्ती' आलेली आहे. त्यामध्ये भगवान विष्णूच्या भक्तीचे नऊ प्रकार वर्णन केलेले आहेत. श्रवण, कीर्तन, स्मरण या भक्तीमुळे ईश्वराच्या ठायी दृढ श्रद्धा निर्माण होते. हे प्रकार लोकांना आनंद मिळवून देतात. पादसेवा, पूजास्मरण, वन्दन या एकांतात किंवा एकट्याने करावयाच्या आहेत. दास्य-सख्य आत्मनिवेदन ही अंतरंग साधना आहे. परमेश्वर हा विश्वात्मक असून नवविधा भक्ती आचरताना भक्तीनेही विश्वात्मक होणे आवश्यक आहे.

चैतन्य महाप्रभूंनी भक्तीचे शांत, दास्य, सख्य, वात्सल्य, माधुर्य असे पाच प्रकार सांगितलेले आहेत. श्रीमद् शंकराचार्यांनी स्थूलभक्ती आणि सूक्ष्मभक्ती असे दोन प्रकार मानले आहेत. संत तुलसीदासांनी श्रीरामचरितमानसात भक्तीची अनंत रूपे दाखविली आहेत. उदा. अविरल भक्ती, अनूपाभक्ती, परमभक्ती, निर्भराभक्ती इत्यादी. पण शबरीला उपदेश करताना श्रीरामाच्या मुखातून संत तुलसीदासांनी नवविधा भक्तीच सांगितलेली आहे. सगुण निर्गुण असेही भक्तीचे दोन प्रकार आहेत. संत तुलसीदास, संत सूरदास, संत नामदेव, संत तुकाराम यांनी सगुण भक्ती तर संत कबीर, संत दादू दयाल यांनी निर्गुण भक्ती वर्णन केलेली आहे. संत ज्ञानेश्वर म्हणतात,

***'ज्ञानी इयेतें स्वसंविती ।***
***शैव म्हणती शक्ती । आम्ही परमभक्ती ।***
***आपुली म्हणो ॥'***

(ज्ञानेश्वरी अ. १८, ओ. ११३३)

ज्ञानी लोक चौथ्या भक्तीला स्वसंविती म्हणतात; तर शैव तिला 'शक्ती' म्हणतात. आम्ही तिला श्रेष्ठ भक्ती म्हणतो. 'जो भक्त नाशवंत अशा सर्व चराचर भूतांच्या ठायी अविनाशी परमेश्वराला समभावाने, स्थित असलेला पाहतो तोच खऱ्या अर्थाने पाहतो' अशी पुष्टी भगवान श्रीकृष्णांनी गीतेत जोडलेली आहे.

थोडक्यात पुराणांच्या कालखंडापासून भक्तिमार्ग प्रवाहित आणि विस्तारित झालेला आहे. या भक्तिमार्गाचा अवलंब करण्याचा अधिकार सर्वांना आहे. सहज, सोप्या वाटणाऱ्या या भक्तीचे आचरण करणे वाटते तितके सोपे नाही असे संत एकनाथ महाराज म्हणतात,

***मज पाहता निजात्म पुष्टी । सर्वभूतीं भगवद् दृष्टी ।***
***हेचि भक्ति माझी गोमटी । ब्रह्मांड कोटी तारक ॥***

(ए. भा. २९.३६९)

अशी भक्ती दुर्लभ आणि निगूढ आहे. संत तुकाराम महाराज म्हणतात,

***'भक्ती तो कठीण शुळावरील पोळी ।***
***निवडे तो बळी विरळा शूर ॥'***

(श्री तु.गा. १५४१)

संत जनाबाईनी 'भक्ती ते इंगळाची खाई' असे म्हटले आहे. भक्तिमार्ग सोपा आहे पण तो शेवटपर्यंत अनुसरला गेला पाहिजे. आरंभ सुलभ वाटला, तरी वाटचाल, सिद्धी अवघडच आहे. तरीसुद्धा भक्तीने सर्व

दुःखाचा नाश होतो. मानवाचे कल्याण होते. मोक्षसुखाची प्राप्तीही होते. भक्ताने कोणत्याही मार्गाने केलेल्या भक्तीतून जो आनंद मिळतो. तो एवढा सात्त्विक व श्रेष्ठ असतो की त्यात ईश्वर दर्शनाची, आत्मसाक्षात्काराची तृप्ती होते. एकूणच या भक्तिमार्गाची साध्यसाधन सरूपता, कर्तव्यकर्माची कठोरता, बाह्य उपाधींची बाधा नसणे, निर्गुण ब्रह्माबद्दलची कल्पना न करणे, सर्वसामान्यातला सामान्य माणूस सुद्धा भक्ती करू शकतो, मुक्तीहून श्रेष्ठ असा आनंद प्राप्त होऊ शकतो, ही वैशिष्ट्ये सांगता येतील.

## प. पू. बाबामहाराजांच्या दृष्टिकोणातून नवविधा भक्तीचे थोडक्यात स्वरूप

नवविधा भक्तिचे वर्णन करताना बाबामहाराज म्हणतात,

*'नवविधा भक्ति मधुर । वर्णिता असता गुरुवर ।*
*आनंदाचा का नये पूर । कथेलागी ॥'*

प. पू. बाबामहाराजांनीही परमप्रेमरूपिणी भक्तीचे नवविध अवस्थांतून होणारे परिपूर्ण स्वरूप स्वानुभवाने सांगितलेले आहे. संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम यांच्या संत परंपरेचा श्रेष्ठ वारसा महाराजांना लाभल्यामुळे त्यांनी केलेले 'नवविधा भक्तीचे विवेचन हे भक्तिशास्त्राचे पथप्रदर्शन करणारे उच्च कोटीचे 'संत-सारस्वतच' आहे' असे माधवस्वामी-श्रीक्षेत्र हनुमान, टाकळी यांनी 'नवविधा भक्तियोग' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे.

### १) श्रवण भक्ती

श्रवणभक्ती मध्ये 'श्रवण' या शब्दाची व्याप्ती अतिशय व्यापक व सूक्ष्म आहे. कानांनी ऐकणे म्हणजे ऐकून टाकून देणे नव्हे, तर ऐकलेल्या शब्दाचा यथार्थ बोध करून घेणे होय ! शब्दाचा यथार्थ बोध होणे म्हणजे शब्दाने ध्वनित होणारा क्रियाशील भाव लक्षात घेणे होय ! परमेश्वराने मानवांना भावस्वरूप शब्द समजण्याची शक्ती दिलेली आहे. 'शब्द' हा प्रत्येक विषयाच्या आरंभी व नंतर असलेल्या ज्ञानाची बाजू व्यापतो. शब्द उच्चारल्यानंतर त्याचा ध्वनी निर्माण होतो. त्यामुळे त्याचा भाव प्रस्थापित होतो; म्हणून ज्ञानाच्या कक्षेत शब्दाला अधिकार आहे. तो शब्द ऐकणे किंवा बोलणे जितके शुद्ध तितके ज्ञान शुद्ध, जितके जीवन निष्ठ, तितके व्यापक व शक्तिशाली असते. भक्तीच्या मंदिरात शिरण्यासाठी 'श्रवणाच्या' पहिल्या महाद्वारातून जावे लागते.

*भक्तीचा प्रसाद बहुसुंदर । श्रवणाचे जे महाद्वार ।*
*शुभेच्छा राखी ते द्वार । प्रेमभावे ॥५४॥*

(नवविधा भक्तियोग प. पू. बाबामहाराज आर्वीकर)

श्रवणामध्ये भावाचे अधिष्ठान महत्त्वाचे असते. स्वराचे पावित्र्य, गांभीर्य जसे असेल; तसे भाव निर्माण होतात. शृंगाररसाचे भावगीत ऐकताना कामोद्दीपन होईल, तर वैभव, पराक्रम, नीती यांचे आदर्श ऐकताना वीररस निर्माण होईल. म्हणून कथा, शास्त्र, पुराण ऐकल्याने देवाविषयी प्रेम निर्माण होऊन परमोच्च कल्याणाचा मार्ग सापडतो. आपण जे जे ऐकतो, ते ते शुद्ध स्वरूपाचे असावे. कारण तसा भाव अंतःकरणात निर्माण होतो. प. पू. बाबामहाराज श्रवणाची व्याख्या अशी करतात -

*'वाचणे, ऐकणे, देखणे । श्रवणामाजी त्याहाकणे ।*
*चिंतनीं एकान्त सेवणें । या नामश्रवण ॥'*

जे जे आपल्या कानावर येईल, त्याचे चिंतनमनन करावे. संतांचे बोल, सद्ग्रंथांचे वाचन, परमेश्वरासंबंधीचे गुणगान ऐकावे. अशा प्रकारचे श्रवण न [illegible]

*ऐसे न होता श्रवण । उगीच तो श्रवणशील ।*
*अभिमान वाढे निष्कारण । बहु ऐकोनि ॥*

असा परिणाम होईल. म्हणून आपले मन, बुद्धी, चित्त हे अशुद्ध श्रवणापासून, विपरित शब्दापासून दूर ठेवावेत. शुद्ध सात्त्विकाचे श्रवण हे मोक्षदायी होते.

### २) कीर्तन भक्ती

देवाला आपल्या मनातील भाव सांगण्याचे, आपला भाव व्यक्त करण्याचे साधन म्हणजे कीर्तन ! श्रद्धापूर्वक परमेश्वराचे यशगान केले, तर वृत्ती शुद्ध होतात. त्यागमय संकल्प करतात. परमेश्वराच्या ज्या अंगाचे कीर्तन करावे, ते अंग आपलेच आहे असा आत्मीयतेचा भाव निर्माण होतो. चित्त शुद्ध होते. श्रवणामध्ये ज्याची कीर्ती ऐकतो, तिच्यावर भावसंस्करण होऊन ती कीर्तनरूपाने प्रकट होते. प्रत्यक्ष भगवंताने नारदांना सांगितले होते.

*'नाहं वसामि वैकुंठे, योगिनां हृदयेऽपि वा ।*
*मद्भक्ता यत्र गायन्ति, तत्र तिष्ठामि नारद ॥'*

(श्रीमद् भागवत)

परमेश्वर आपल्या भक्तासाठी, त्याच्या भावाप्रमाणे नटतो. भक्ताचे चित्त शांत करतो, मन पवित्र करतो, बुद्धी प्रकाशित करतो. अहंकार नष्ट करतो. परमेश्वराचे सान्निध्य कीर्तन भक्तीत सहज प्रकटते.

*'कीर्तनी रूप नि शक्ती । नामयोगें ये अनुरक्ती ।*
*अश्रूंचिया सवें । पावतें तै ॥'*

कीर्तनामध्ये कशी स्थिती होते हे सांगताना प. पू. बाबामहाराज म्हणतात, शरीराला कंप सुटतो, डोळ्यांतून अश्रुधारा वाहतात, मनाच्या सर्व अवस्था नाहीशा होऊन एकच आनंदाची भावना उरते आणि मग तो 'स्वच्छंदे नाचे मयूर ।' तसा हर्षाने नाचू लागतो. कीर्तन करताना तो दमत नाही, थकत नाही, इतका एकरूप होतो की,

*जैसी की गंगेची आंघोळ । करी नित्य गंगाजळ ।*
*गंगाचि होय घंघाळ । आपणासाठी ।*
*तैसाचि भक्त कीर्तनी । कीर्तना रंगवी कीर्तनीं ।*
*स्वहृदयाचे अंगणीं । नाचो लागे ॥*

### ३) स्मरण भक्ती

स्मरण भगवंताचे किंवा त्याच्या अवतारांचे करणे याला स्मरण भक्ती म्हणतात. स्मरणाचे मुख्य साधन त्याचे नाम हे आहे. ईश्वर आणि भक्त यांचा संबंध नामामुळे येतो. म्हणून नित्य नेमाने सकाळी, दुपारी, सायंकाळी जेव्हा वेळ मिळेल तेव्हा, नव्हे; सतत सुखदुःखमय असो, आनंदाचा काळ असो, अथवा कठीण संकटांचा काळ असो नामस्मरण करावे. श्रीसमर्थ रामदास म्हणतात,

*'नामें संकटें नासती । नामें विघ्नें निवारती ।*
*नामस्मरणे पाविजेती । उत्तम पदें ॥'*

परमेश्वराचे कोणतेही नाम घ्या. त्यामुळे देह पुण्यमय होतो. पापे नष्ट होतात. भगवंताचे अनुसंधान टिकते. प. पू. बाबामहाराज म्हणतात, 'परमेश्वराच्या सगुण स्वरूपाची गोडी त्याच्या नित्य सान्निध्यामुळे प्राप्त होते. हे नित्य सान्निध्य सतत होणाऱ्या नामस्मरणाने घडते. विवेकयुक्त

मन बाह्येंद्रिय प्रवृत्तीने जगत नसून ते विशेष आंतरेन्द्रिय शक्ती सामर्थ्याकडे झुकलेले असते. कीर्तन भक्तीमुळे बाह्येन्द्रीय अंतर्मुख होतात आणि मन विवेकी बनते. अशा मनाचा परिणाम संकल्प शक्तीवर होऊन त्या शुद्ध होतात. अशा शुद्ध झालेल्या शक्तीवर, परमेश्वराच्या निर्मळ ओजावर आसक्त झालेले मन अमंगल वस्तूंचा त्याग करून देवाच्या नामस्मरणाशी एकरूप होते. देव आणि भक्त एकमेकांच्या सोबत राहू लागला. याचाच अर्थ स्मरण भक्ती होय ! स्मरण ही क्रिया अंतर आकाशातील विकारी ढगांचा नाश करून चित्ताकाशात निर्मलता आणते. त्यावेळी देवाचे गोड स्वरूप स्वप्रकाशाने प्रकाशू लागते. भक्ताच्या आत-बाहेर एकाच देवाचे आकर्षण निर्माण होऊन मायेचे भ्रामक व काल्पनिक स्वरूप नष्ट होते आणि परमात्म्याच्या दिव्य तेजाने अंतःकरण प्रकाशित होते. तो अखंड भगवंताच्या नामस्मरणात राहतो.

## ४) पादसेवन भक्ती

श्रीसमर्थ रामदासांनी दासबोधात सद्‌गतीसाठी काया, वाचा, मनाने आणि आपलेपणाने सद्‌गुरुचरण सेवा करणे याला 'पादसेवन भक्ती' म्हटलेले आहे. जन्ममरणाची यातायात कायमची सुटावी म्हणून सद्‌गुरू चरणी अनन्य होणे, याला पादसेवन भक्ती म्हटलेले आहे. सद्‌गुरुकृपा म्हणजे ईश्वरकृपा होय ! सद्‌गुरूची कृपा झाली की अनाकलनीय गोष्टी कळू लागतात. ब्रह्माचा अनुभव आपण घेत आहोत अशी भक्ताची अवस्था होते. पारमार्थिक अनुभव हे शब्दातीत असतात. पण सद्‌गुरुचरण सेवेने ते आपोआप कळून येऊ लागतात.

***'ही भक्ती पावन करितसे त्रिजगती ।***
***ये करितां सायोज्यमुक्ती । साधकास होये ॥***

(दासबोध)

प. पू. बाबामहाराजांच्या मते पादसेवन भक्ती म्हणजे 'मयि सर्वमिदं प्रोक्तं सूत्रे मणिगणाइव' या तत्त्वाचा बोध करून घेणे होय. देवाचे सर्वत्र दर्शन होत राहणे, ही अवस्था प्राप्त झाली की 'तुका आकाशाएवढा' किंवा 'कांदा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी' असा सावता माळींना आलेला अनुभव येऊ लागतो.

***'म्हणोनि पादसेवा आरंभी । ना तो करावया आरंभी ।***
***वाजवी इंद्रियें दुंदुभी । गीरवाने ॥'***

सद्‌गुरु चरण सेवेने आरंभ केल्यास

***'आनंदें कोंदा टले भुवन । आतबाहेर सर्व सूण ।***
***उतरले ऐकावया गोपगण । प्रेमानेगा ॥'***

अशी अवस्था लवकरच प्राप्त होते.

***सेवन म्हणजे ग्रहण । पादसेवेने विकार जाळण ।***
***पेट घेऊन मुरे गुणें । इंद्रियांचे ॥***

पादसेवन करणाऱ्यांच्या अवस्थेचे वर्णन प. पू. बाबामहाराजांनी खालील ओव्यांत केलेले आहे.

***करावयासी पादसेवन । सुसज्जले आता मन ।***
***विखुरले भावसुमन । मार्गावरी ॥७९॥***
***प्रेमें आकळिला देव । वर्तती इंद्रिये अभिनव ।***
***डोळे देखती माधव । आनंदघन ॥८०॥***
***दृष्टी खिळें चरणकमळीं । भृंग जै फिरे राऊळीं ।***
***धाव ना कधी मावळी । सेवकाची ॥८१॥***
***दोन्हीं धरोनि चरण । ओवाळी वरोनि प्राण ।***
***हेचि सावधपण । योगियांचे ॥८२॥***

(नवविधा भक्तियोग पृ. क्र. ५९)

पादसेवा कशी करावी हे प. पू. बाबामहाराजांच्या शब्दांत -

***'पाद सेवा कैसी करो । सुभक्तिभावाधरो ।***
***अपुलिया भगवंतावरो । मन हे की ॥ ॥***

(नवविधा भक्ती योग पृ. ६३)

अशी वर्णन केलेली आहे. शेवटी सांगतात,

***'म्हणोनि सेवावा सत्संग । हीचि पादसेवा अभंग ।***
***सेवावे संत निःसंग । प्रभूसाठी ॥१७०॥***

(नवविधा भक्ती योग पृ. ६७)

प. पू. बाबामहाराजांनी पादसेवन भक्तीनंतर 'पूजन भक्ती' हे स्वतंत्र नाव देऊन त्याचे सुंदर व सखोल विवेचन केले आहे. नवविधाभक्तीतील 'वंदन भक्ती' ही पूजन व अर्चन या दोन्ही भक्तींत अंतर्भुत आहे. म्हणून 'वंदन भक्ती' स्वतंत्र न करता 'पूजन भक्ती' असे तिला नाव दिले आहे.

## ५) पूजन भक्ती

पादसेवन भक्तीत आत्मभावाचा अभ्यास केल्यामुळे साधकाला सामर्थ्य लाभते. हाच 'आत्मभाव' पूजनभक्तीमध्ये त्याला तारुण्य प्राप्त करतो. म्हणजेच भक्ताच्या हृदयाचा विस्तार होऊन बाह्याकाश आणि चिदाकाश यांचा भेद नाहीसा होतो. आत-बाहेर समदृष्टीचा व्यापार सुरू होतो. प. पू. बाबामहाराज पूजन भक्तीचे स्पष्टीकरण करताना म्हणतात, 'आपल्या सर्व चित्तवृत्ती केंद्रित होऊन बाहेरच्या विश्वात आपली चित्तावस्था अनुभवू लागतो; तेव्हाच खरी पूजन भक्ती होते. निद्रा, आहार, विलास हे सारे काही 'तुझीच ते सेवा' म्हणून हरीशी एकरूप होऊन करतात, तीच 'पूजन भक्ती' होय. यामुळे भक्ताला सर्वत्र देवाचीच मूर्ती अनुभवता येते. भक्त 'देवं सर्वेषु भूतेषु भूतात्मानं स्थितं सदा' असा दृढ भाव धरून परमेश्वराचे अंतर्बाह्य पूजन करतो. पण ही अवस्था फार काळ टिकत नाही. मधून मधून अहंकारामुळे जागृतीचे भान येते. पण खरा साधक प्रभु-दर्शनात रंगण्याचा अभ्यास करीत असतो. शेवटी,

***'अपुलेते चि स्वरूप । मानी साधक तद्रूप ।***
***शुद्धत्वें लोकीं आत्मरूप । साधु ठायीं ॥'***

अशा स्थितीला भक्त येऊन पोहोचतो.

## ६) अर्चन भक्ती

श्रीसमर्थ रामदासांनी आपल्या उपास्य देवतेची पूजा करणे याला 'अर्चन' म्हटले आहे. देवाच्या मूर्तीचे - मग ती कोणत्याही धातूची असो, दगडाची असो किंवा मातीची असो - तिचे ध्यान करून, आसन, पूजेची भांडी, वस्त्रे, अलंकार ही सर्व पूजा मनाने करावी. गंध, फुले, सुगंधी द्रव्ये, धूप, दीप, निरांजने वापरून आरत्या म्हणाव्यात. अनेक खाद्यांचे नैवेद्य, फळे, तांबूल देऊन पूजा करावी. उत्सव करावेत. काया, वाचा, मन, चित्त, वित्त, जीव, प्राण देऊन म्हणजेच भगवंताला अर्पण करून मनापासून पूजा करावी. हीच 'अर्चन भक्ती' होय ! बाह्योपचार करता आले नाहीत तर मनाने पूजा करावी. बाहेरील उपचार कल्पनेने निर्माण करून आतल्या आत भगवंताला अर्पण करतो, याला मानसपूजा म्हणतात. ही अर्चन भक्तीच आहे. प. पू. बाबामहाराजांच्या मते कारणदेहामध्ये शिष्यांवर सद्‌गुरूंची कृपा होऊन ते

त्याला महाकारणामध्ये स्थिर करतात. म्हणजेच तो भक्त आपल्याच आत्मरूप परमात्म्याचे नित्यदर्शन घेत असतो. त्याच्या स्वानंदाला सीमा रहात नाही. तरीपण तो सद्गुरूची सेवा अनन्ये भावे करतो.

*'अर्चनी गुंतवी भाव । अनुसंधानीं ठेवीं जीव ।*
*नित्यराही चित्त साव । भक्ताचे या ॥'*

अशी स्थिती साधकाची होते. अर्चन भक्तीचे फलित म्हणजे

*'अर्चनी ओळखी झाली । विश्वाकार दृष्टी झाली ।*
*विश्व मीचि अनुभूती आली । भक्तराया ॥'*

श्रीसमर्थ रामदासांनी 'वंदनभक्ती' मानली असून देव, साधू, संत, सज्जन यांना नमस्कार करावा असे म्हटले आहे. नमस्काराने अंगी लीनता येते. विकल्प जातात, सख्य जडते, अवगुण कमी होतात, प्रेम पूर्ववत् होते. ज्याला नमस्कार करतो ती व्यक्ती प्रसन्न होते, वैरभाव नष्ट होतो. नमस्काराला साधनसामग्री लागत नाही, कोणत्याही प्रकारचा खर्च येत नाही. तो मनापासून अनन्यभावाने केल्यास 'या कारणे नमस्कारापरतें । आणिक नाही अनुसरते' ह्याची अनुभूती येते.

## ७) दास्य भक्ती

देवाचे दास्य करणे म्हणजे देवाची सेवा करणे. देवाचे वैभव, ऐश्वर्य यांचे रक्षण करणे म्हणजे दास्य करणे असे स्पष्टीकरण श्री समर्थ रामदास करतात. 'मी देवाचा आहे' ही भावना ठेवून त्याच्या मंदिराचे वैभव वाढवावे. त्याच्याकडे येणाऱ्याबद्दल आदर ठेवावा. त्यांची सेवा करण्यात तत्पर असावे. प्रसंग पडेल तेथे, पडेल ती सेवा अगदी आवडीने करावी. प. पू. बाबामहाराजांच्या मते दास आपल्या स्वामी सेवेसाठी प्राणाची बाजी लावून अर्थात अहंकार स्वामींपायी नत करून स्वामींच्या व्यापक स्वरूपाची सेवा करतो. अर्थात समष्टीची सेवा करतो, ही दास्यभक्तीच होय ! समाजातील जीवांची सेवा करणे म्हणजे जीवोद्धार करणे, त्या वेळी ते सद्गुरूचे स्वरूप आहे असा त्याच्या मनाचा निश्चय असतो.

*'फुटो हे मस्तक । तुटो हे शरीर । दासाचा निर्धार । स्वामीपायीं ॥'*

असा निर्धार करून भक्त सेवेमध्ये रत होतो. दास हा विश्वव्यापी स्वामीरूपावर लुब्ध होऊन सेवाकार्य करतो. यालाच निष्काम कर्मयोग किंवा निष्काम सेवाभाव म्हणतात. हे देवावरील प्रेमाचे मोठे लक्षण आहे. दास्यभक्तीत भावाविष्कार होतात. ते सर्व सेवामय असल्यामुळे दास्य भक्ती अभंगपणे चालू असते. दासाची स्थिती

*'दासदारुपणे पाही । स्वामी स्वभावे हे नाही ।*
*आत्मसती दास राही । सेवा कार्यी ॥'*

अशी असते.

दास्य भक्तीत अत्यंत श्रेष्ठ असा वात्सल्यभाव असतो. या भावातून दास जेव्हा सेवा करतो तेव्हा प्रेम व निर्वैर वृत्ती भक्तामध्ये येते. दास्यभक्तीचे फळ एकरूपतेतच आहे.

*'प्रकृति पुरुष संयोग । हा तो दास्याचा प्रयोग ।*
*सद्गुरु दैवतिला भोग । मज माझा ॥'*

अशा प्रकारे दास्य भक्तीचे विवेचन पुष्कळ दृष्टान्त, दाखले देऊन केलेले आहे.

## ८) सख्य भक्ती

दास्यभक्तीत आपले सर्वस्व भगवंताला देतो. सेवा केल्याशिवाय त्याला काही सुचत नाही. त्याचे चित्त व्याकू[illegible] तर सख्यभक्तीत देवाशी मैत्री, सख्य जुळवावयाचे असते. त्याला प्रे[illegible], आपलेपणाने बांधून ठेवायचे असते. त्यासाठी देवाला जे जे आवडेल [illegible] करायचे असते.

*'देवाच्या सख्यत्वासाठी । पडा[illegible] [illegible]वलगांच्या तुटी ।*
*सर्व अर्पावे सेवटी । प्राण [illegible]री वेचावा ॥'*

असे श्रीसमर्थ रामदासस्वामी दासबोधात म्हणतात. देवाला आपला जीव की प्राण समजणे, त्याच्यावर मनापासून प्रेम करणे, तो जे करील ते योग्यच समजणे, त्याच्याजवळ जीवाभावाच्या गोष्टी सांगणे म्हणजे सख्यभक्ती होय. सख्यभक्तीत भगवंत आईच्या कृपेपेक्षा जास्त कृपा करतो. भक्ताचा कैवारी होतो. अनाथांचा नाथ होतो. त्याला भक्ताचा विसर पडत नाही. प. पू. बाबा महाराजांच्या मते, अर्चन भक्तीपर्यंत अहंकार शुद्ध करीत करीत तो आत्मतत्त्वाचा व्यापक अहंकारी होतो. याच अहंकाराला ब्रह्मांडी ते पिंडी या न्यायाने सद्गुरूंच्या ठिकाणी प्रचीती येते. त्याला सर्वत्र स्वामीच दिसू लागतात. तो दास्य करीत करीत स्वामींवर स्वामित्व गाजवू लागतो. ही सख्यभक्ती ! एकाच वेळी तो दासही असतो आणि स्वामीही असतो. सख्यभक्तीत परमेश्वर आणि भक्त इतके एकरूप होतात, की कुणालाही धरले तरी दोघेही सापडतात. सख्यभक्ती सिद्ध करताना परमेश्वरच भक्ताच्या स्वाधीन होतो. म्हणजे देहाचा अहंकार जाऊन शुद्ध, आनंदरूपी परमेश्वरातच तो विलीन होतो. त्यालाच 'विदेही' पुरुष असे म्हटले आहे. सख्यभक्तीच्या शेवटी पूर्ण प्रेमाचा स्वीकार झाल्याची, पूर्ण रूप सर्वात्मकता झाल्याची प्रचिती येते.

*तैसी सख्य सखाभाव । सख्येय होणे स्वभाव ।*
*सख्यभावे एकी अभाव । भासतसे ॥*

अशी स्थिती होते. सख्यभक्तीमध्ये परमेश्वर भक्तासाठी कष्ट करतो.

*भक्ताचे हृदयी दाटला । भक्तचि स्वयें झाला ।*
*अहोरात कष्टू लागला । निजभक्तासाठी ॥*

सख्य भक्तीत भावावेशात भ्रातृभावाचा प्रथम समावेश होतो. नंतर परमेश्वर सान्निध्य भक्ताला प्राप्त होताच, भक्त हा प्रभूचा सोहळा, कौतुक, विचारविनिमय व भगवंताशी अंगसंगाने एकत्व साधतो. सख्यभक्तीतून प्रकट होणारे 'सखीभाव' आणि 'गोपभाव' ही विस्ताराने सांगितलेले आहेत.

## ९) आत्मनिवेदन भक्ती

ही भक्तिची पराकाष्ठा आहे. यामध्ये भक्त देवात पूर्णपणे विलीन होऊन जातो. तो वेगळा राहतच नाही. 'निविद्' या शब्दाचे निवेदन असे रूप आहे. नैवेद्य असा त्याचा पर्याय आहे. देवाला जे अर्पण करावयाचे त्याला 'नैवेद्य' म्हणतात. आत्मनिवेदन म्हणजे स्वतःचे समर्पण करणे, देवमय होऊन जाणे. भगवंताहून जो वेगळा उरत नाही तो भक्त असे श्रीसमर्थ रामदास म्हणतात.

*'भक्त म्हणजे विभक्त नव्हे । आणि विभक्त म्हणजे भक्त नव्हे ॥'*

'मी' नाहीसा होणे हेच आत्मनिवेदन होय ! आपला संपूर्ण मीपणा भक्त भगवंताला अर्पण करतो. भगवंताशी पूर्ण एकरूप होतो. ही भक्ती जर साधली तर भक्ताचे जन्ममरण चुकते. असे श्रीसमर्थ रामदास ठामपणे सांगतात.

नवविधा भक्तीतील प्रत्येक भक्तितून उत्तरोत्तर प्रगती करीत सख्यभक्तीपर्यंत भक्त पूर्ण रूपाला येतो. त्याचा अनुभव घेण्याची अंतिम स्थिती ही आत्मनिवेदन भक्ती होय ! भक्ताचे पूर्ण ज्ञानमय व प्रेममय

भगवंत होतो. 'चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम्' अशी वृत्ती ... बुद्धी, चित्त, अहंकार अंतःकरणाच्या निर्मळ अवस्थेत समरस ... भक्तीतही भावावेश आहे, राधाभाव आहे. आत्मरूपी विलीन झालेला भक्त आत्मनिवेदनाने आत्मस्थित होतो.

*'आत्मनिवेदनाचे अंग । आत्मप्रीतिप्रमुख संग ।*
*अनात्मतेचा त्याग निःसंग । पाहिजे तेथे ॥*

नवविधा भक्तियोगात प. पू. बाबामहाराजांनी आत्मनिवेदन भक्तीचे भरपूर दाखले दिलेले आहेत. भक्त आणि परमेश्वर एकरूप झाल्यानंतरची स्थिती वर्णन केली आहे.

*जीवाजीवा भेटवी शिव । आत्मैक्य स्थापोनि दाव ।*
*तव कृपे परमानंद संभव । सहजचि गा ॥*

प. पू. बाबामहाराज नवविधा भक्तियोगाची सांगता करताना म्हणतात,

*'नवविधा भक्ति निरूपण । अंतिम ते आत्मनिवेदन ।*
*मधुरांती मधुरपूर्ण । विवेचक हो ॥'*

## समारोप

प्रत्येक संतांचे ध्येय हे विश्वात्मक देवाची भक्ती हे होते. 'मना सज्जना भक्तिपंथेचि जावें । तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें' असे श्रीसमर्थ सांगतात. ही भक्ती वेदसंहितेच्या काळात सुखभोग प्राप्तिसाठी केली जात असे. तर ब्राह्मणकाळात यज्ञयागांच्या रूपाने करण्यात येत असे. नंतरच्या उपनिषदांच्या काळात ऐहिक व पारलौकिक सुखांसाठी करण्यात येत असे. कोणत्याही प्रकारे केलेली भक्ती, कोणत्याही उद्देशाने केलेली भक्ती ही अखेर, 'तेणें सार्थक पावलो' येथेच समाप्त होते.

**डॉ. सौ. सुमती देशपांडे**
३६/४, एरंडवणा, पांडुरंग कॉलनी,
'संकल्प' बंगला, पुणे - ४११ ०३८. दूरभाष : २५४३०५७६

## ध्यान सुकुमार...

ध्यान सुकुमार । लाजिरे लावण्य ।
महापीठ धन्य । आळंदीचे ॥१॥

जयाच्या सौंदर्या । सौंदर्य भाळले ।
नभ वितळले । अलंकापुरी ॥२॥

ज्ञानाचे माहेर । सुखाचे आगर ।
ज्ञानराज सार । ध्यानी ध्यान ॥३॥

दिशा धुंदावल्या । पाहता जयासी ।
अलंकाधीशाशी । विसावती ॥४॥

साजिऱ्या सुखाचे । सोहाळे साकार ।
ज्ञानेश अंकुर । तयामाजी ॥५॥

वेडावले मन । म्हणे मोरेश्वर ।
ध्यानी महेश्वर । पाहोनिया ॥६॥

**— श्रीसंत बाबामहाराज**





# ।। श्रीबाबामहाराज आर्वीकर यांचे संतधर्म : जीवनदर्शन ।।

डॉ. सौ. सुनीता सांबे

एम.ए.एम.फिल, पीएच.डी. – श्री एकनाथ महाराज पंचक - एक विवेचक अभ्यास. २५-३० लेख व लघुकथा प्रकाशित. काही कथा बक्षीसपात्र.

### ।। आरंभिक ।।

माचणूरचे (जि. सोलापूर) ब्रह्मीभूत प. पू. श्रीबाबामहाराज आर्वीकर हे आत्मानुभवी, थोर संतसत्पुरुष होते. वेदोपनिषदे तसेच संतवाङ्मयाचा त्यांनी सखोल अभ्यास केलेला होता. नव्हे, ते त्यांचे प्रतीतीचे विषय होते. आत्मप्रत्ययाचा विलक्षण अनुभव त्यांनी त्याद्वारे प्रकटविला आहे. 'दिव्यामृतधारा' व 'साधना संहिता' या दोन ग्रंथांतून त्यांनी ज्ञानभक्ति-कुंडलिनी योगाचे नवदर्शन घडवून अध्यात्म क्षेत्रात आपले असे एक आगळे स्थान निर्माण केले. या आपल्या योगानुभवांचे आचार धर्मात प्रकटीकरण होण्यास्तव काय करायला हवे हे त्यांनी सलगतेने कुठे लिहून ठेविले नसले तरी, श्री. शरद भगत यांच्या 'माचणूरचे हृद्गत', 'साधक विहारसूत्रे', 'देवाचिये द्वारी' आणि 'संतधर्म-जीवन दर्शन' इत्यादी पुस्तिकांच्या संपादन-प्रकाशनाने ते आज समाजासमोर आलेले आहेत. त्यातीलच काही विचार येथे सारांशाने प्रस्तुत आहेत.

### ।। आधारभूत तत्त्वज्ञान - दर्शने ।।

भारतीय परंपरेत तत्त्वज्ञानास 'दर्शन' असा शब्दही रूढ आहे. तत्त्वज्ञान याचा अर्थ संपूर्ण जीवनाचे वा अनुभवाचे दर्शन ! जीवनाकडे पाहण्याचा सम्यक् दृष्टिकोण ! 'दृश्यते ज्ञायते अनुभूयते अनेनेति द्रर्शनम !' जीव-जगत-जगदीश्वर यांच्या परस्पर संबंधाविषयी अनुभवपर्यवसायी अशी जी ख्याती, तिच्या संदर्भात असणारा विशिष्ट दृष्टिकोण ! न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा, उत्तर मीमांसा ही वेदप्रामाण्यवादी षड्दर्शने होत. भारतीय तत्त्वचिंतन प्रत्यक्ष जीवनात वापरले जाण्याची अपेक्षा असल्याने या जीवन-आचारासच 'धर्म' म्हटले गेले. तत्त्वज्ञानाची धर्माशी याप्रमाणे सांगड घातली जाणे हे भारतीय तत्त्वज्ञानाचे प्रमुख वैशिष्ट्य पाहिले जाते. 'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति', अर्थात 'सत्य' एकच असले तरी त्याची दर्शने विविध असल्याचे म्हटले गेले आहे. अनेकांतून एकत्वाकडे पाहण्याचा भारतीयांच्या सनातन वृत्तीचा उगम हा असा वेदांच्या तत्त्वज्ञानात आहे.

### ।। द्रष्ट्या महापुरुषांची विज्ञाननिष्ठ धर्मकल्पना ।।

'धारणात् धर्म इत्याहुः धर्मोः धारयते प्रजाः' असे महाभारतात म्हटले आहे. ज्यामुळे सर्व प्रजा व सृष्टीची धारणा होते त्या व्यवस्थेस 'धर्म' म्हणतात. ही नैसर्गिक व्यवस्था आहे. मात्र भारतातील द्रष्ट्या महापुरुषांनी शास्त्रशुद्ध प्रज्ञा व वैज्ञानिक दृष्टी राखीत धर्मविचारांची मांडणी केलेली आहे. हा धर्म चार स्तरांवरील आहे. विश्वातील ग्रहगोल, नक्षत्रे, सूर्यमाला व ब्रह्मांड यांची कॉस्मिक ऑर्डर ! ग्रह गोल व पृथ्वीवरील मानव समाज व मनुष्येतर सृष्टी, वनस्पती, पशुपक्षी यांची धारणा ती इकॉलॉजिकल ऑर्डर ! माणसा-माणसांतील सामाजिक संबंधाची धारणा ती सोशल ऑर्डर आणि माणसाच्या अंतर्विश्वाची - भावविश्वाची धारणा ती मेंटल ऑर्डर ! कॉस्मिक व इकॉलॉजिकल ऑर्डर यांचे नियम अती काटेकोर नियतीचे, तिथे चुकीला क्षमा नसते. त्यांना भारतीय परंपरेत 'ऋत' म्हटले आहे. सृष्टीतील विविध घटनांमागील नियामक तत्त्व म्हणजे 'ऋत' होय. देवही ऋताचे उल्लंघन करू शकत नसत. सोशल ऑर्डर व मेंटल ऑर्डर यांचे नियम मात्र दयार्द्र स्वातंत्र्याचे व चूक क्षम्य असणारे ! त्यांना भारतीय परंपरेत 'सत्य' म्हटले आहे. 'सत्य' याचा अर्थ ऋताचे मानवी व्यवहारात पडलेले प्रतिबिंब ! 'ऋत' व 'सत्य' मिळवून विश्वधारणा करणारा धर्म असा आपल्या विज्ञाननिष्ठ धर्माचा व्यापक अर्थ आहे. भारताबाहेर असा सर्वकष विचार आजवर झालेला आढळत नाही. भारताचे धर्मशास्त्र हे ज्ञान-विज्ञानसहित असल्याने या धर्मप्रवण भारतात विज्ञानानेही खूप प्रगती साधली. 'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च !' सूर्य हा आपल्या ग्रहमालेचा व चराचर सृष्टीचा जीवन-ऊर्जास्रोत आहे, हे तत्त्व श्रुतीत सांगितले गेले आहे. पृथ्वी सूर्याभोवती फिरते हे, कोपर्निकस याच्या पूर्वीच वराहमिहिरादी हिंदू ज्योतिर्विदांना ज्ञान होते. दिक् आणि काल म्हणजेच 'टाईम ॲण्ड स्पेस' या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. हा अत्याधुनिक विज्ञानाचा सिद्धान्त प्राचीन ऋषींना ज्ञात होता. यावरून लक्षात येते की, विज्ञानाची उपासना प्राचीन भारतानेही केलेली होती. त्यांनी विज्ञान दुर्लक्षिलेले नव्हते. उपनिषदातील तत्त्वज्ञानही याची साक्ष देते. संत बाबामहाराज या विषयी म्हणतात, 'उपनिषदातील आचार-विचारांच्या चाकोरीस 'विज्ञानपथ' असेच म्हणावे लागते. ज्ञाननिष्ठ विज्ञानाचा उद्भव करणारी आदर्शशास्त्रे असेच उपनिषदांचे स्वरूप आहे. ईशावास्योपनिषदावर भाष्य करताना भारतीयांच्या या जीवनदृष्टीचे जे मार्मिक व सारगर्भ विवेचन त्यांनी केलेले आहे; ते महत्त्वाचे ठरावे. वेदातील तत्त्वविचारांचे तात्पर्य म्हणून आपल्याला एवढेच म्हणता येईल की, अनेकांतून एकत्वाकडे पाहण्याचा भारतीयांच्या सनातन वृत्तीचा उगम वेदांच्या तत्त्वज्ञानात आहे.

संत श्रीबाबामहाराजांनी वेदांचा धर्मदिशही सांगून ठेविला आहे. 'मानवी जीवन सुखी आणि महान होण्याची दिव्य व्यवस्था व कला म्हणजे धर्म होय.' याच धर्माला 'संतधर्म' संबोधून त्यांनी त्याचे विविध प्रकारे चिंतन केलेले आहे. ते म्हणतात, 'धर्म ही भावना वा कल्पना नव्हे. ती सृष्टीची धारणा, जीवनाची व्यवस्था व कर्माची गती होय. सृष्टी, जीवन व कर्मही चिरंतन आहे. धारणा, व्यवस्था व गती मात्र बदलणारी आहे.

ही त्रयी जेव्हा असद्‌धर्मी होईल तेव्हा सृष्टिजीवन व मानवीजीवन ही अधर्मी बनेल. जेव्हा धारणा, व्यवस्था व नीती ही त्रयी सद्‌गामी होईल, तेव्हा सृष्टीतील दैवी व मानवी जीवनही आध्यात्मिक होईल. सृष्टीचे दैवी जीवन व मानवी जीवनाचे आध्यात्मिकीकरण तुम्ही निश्चयाने - प्रयत्नपूर्वक करा. प्रयत्नपूर्वक घडवा हाच वेदांचा धर्मादेश होय.'

## ॥ नव्या संतधर्माचे प्रयोजन ॥

धर्मालाच 'संत' असा विशेश शब्दप्रयोग जोडून संत बाबामहाराजांनी 'संतधर्म' असा स्वतःचा नवीन शब्द आपल्या साहित्य व प्रवचनातून उपयोगात आणलेला आहे. त्याचे प्रयोजनही ते सांगतात, 'धर्म' व 'संस्कृती' हे शब्द आजचे आधुनिक जग फार विपरीत अर्थाने जाणते. सत्ताधारी व सामाजिक संघटनांनी या दोन शब्दांना खंडशः केलेले असल्याने त्यातील पावित्र्य व विशालता नष्ट झालेली आहे. पण त्यासारखे दुसरे पवित्र पर्यायी शब्दच नाहीत. म्हणून सध्याच्या विपरीत जाणिवेस केवळ दूर सारण्यासाठीच मी 'धर्म' व 'संकृती' या शब्दांमागे 'संत' शब्द लावतो. 'धर्म' हा शब्द स्थिर चराच्या परस्पर संबंधातून वागणे, राहाणे व असणे याची व्यवस्था करणारा असल्यानेच मी 'मानवधर्म' न म्हणता 'संतधर्म' म्हणतो. या धर्मात मानव-धर्म व मानवेतर जीवन रचना करणारी विशाल वृत्तीची विचारधारा आहे. संत जीवनही विशाल असते. संत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, कबीर, येशू, तुलसीदास, महंमद आदी, जगतातील यच्चयावत् संतांचा एकच धर्म आहे तो म्हणजे 'संतधर्म' ! विश्वात्मक देवाची प्रार्थना करणारे ज्ञानेश्वरही म्हणतात, 'विश्व स्वधर्म सूर्ये पाहो ।' स्वधर्म आत्मधर्म हाच संतधर्म ! सर्व संत एकाच आत्मबोधाची ग्वाही देतात. 'आत्मज्ञाने चोखडी । संत ही माझीच रूपडी ।' तुलसीदासही संतांना चालते-बोलते म्हणजे जंगमी तीर्थक्षेत्र म्हणतात. 'मुद मंगलमय संत समाजू । जो जंग जंगम तीरथराजू ।' संत ही जागतिक स्वरूपाची मंगल संस्कृतीच असल्याने 'संतधर्म' हा ईशधर्म-आत्मधर्म-मूळ सनातन धर्म असल्याचे सांगून धर्माच्या या मूळ परिशुद्ध स्वरूपाविषयी ते सांगतात 'मूळ धर्म हा पाण्यासारखा असून एकाच पाण्याच्या प्रवाहाने सृष्टीत फुलवणारी-फळणारी झाडे, लता-पल्लवे अभिव्यक्त होतात. एकाच पाण्याच्या आश्रयात निसर्गाची अनेकविधता आपण पाहतो. कडू रसापासून ते मधुर रसापर्यंत, रानवट फुलापासून ते कमळापर्यंत एकाच पाण्याचे पोषण असते, हे न ओळखताच निसर्ग उल्हसत असतो. परस्पर विरोधी रुचीची कडुलिंब व आंबा ही झाडे भिन्न भिन्न असली तरी, त्या दोन्ही वैभवात त्याची अभिव्यक्ती पूर्ण झाली की, त्यांचा धर्म स्थिर झाला. बरेचदा धर्मकार्यासाठी काही विशेष गुण असावा असा भ्रम मानवी बुद्धीत होतो. पण धर्मकार्यार्थ त्याची गरज नाही. तुमच्या अंगी ईश्वराने दिलेल्या कोणत्याही गुणाद्वारे धर्म स्वीकारताच धर्मकार्य सुरू होणार आहे. धर्म तुमच्या आंत प्रवेशताच तुमच्यातील उत्तम गुण उपकारकच ठरतील. तुम्ही दुर्बल वा सबल, दुष्ट वा सुष्ट कसेही असा, फक्त तुम्ही धर्म स्वीकारताच धर्मकार्य सुरू होणार आहे. त्याच गुणांचा धर्ममय आविष्कार विश्वाचे पूजन ठरणार आहे... समतेच्या धर्माला अंतःकरणात वाव द्या. म्हणजे तुमच्यात आहे त्या गुणानेच धर्मसेवा सुरू होईल. याच युक्तीने गोकुळातील वेडीवाकडी माणसे, अज्ञ परिजनही भारतीय सृष्टीत वंदनीय ठरले. वानरेही महान ठरली. हा इतिहास डोळ्यांसमोर ठेवा. परमेश्वरावर श्रद्धा ठेवणे व त्याला जीवनात मिसळून जगणं म्हणजच समतला वाव देऊन जगणं होय. तुम्ही खटाटोप आरंभू नका. उठाठेव करू नका. फक्त तुमच्या भावनामय मुळ्या धर्मरूप-जलरूप प्रवाहाशी युक्त ठेवा. धर्मरचनेची व देवाची व्यवस्था अशीच असते.' (पृ. १४) श्री बाबामहाराजांचे धर्मचिंतन सर्वांनाच उपयुक्त ठरणारे आहे. त्यांच्या मते 'पदार्थ मात्र ही धर्म सोडून व्यक्त होणे असंभव असते. पदार्थाचा स्वभाव ज्या विशेष गुणाने प्रकट होतो, तो गुणच त्याचा धर्म होय. या गुणाच्या कमी-अधिकतेने त्या पदार्थाचा ऱ्हास वा विकास संभवतो. धर्म हा मानवाच्या उच्चतम अभिरूचीचा व उन्नत जीवनस्तराचा दर्शक व प्रेरक आहे. शांत, रागद्वेषरहित व विशाल भाव यांच्या चित्तात अनुभव करविणारा धर्म हा 'प्रकाश' आहे. अध्यात्मवादी संवेदना आहे. जीवनरचना आहे. भारताने अखिल विश्वाला कल्याणकारी, साधनामय जीवनाचा धर्ममार्ग दिला. हा धर्म जीवांना पतनातून उद्धाराकडे, असत्यातून सत्याकडे, सीमिततेकडून असीमितीततेकडे, मृत्यूतून अमृततत्त्वाकडे, जडातून चेतनाकडे नेणारी दिव्यशक्ती आहे.' (पृ. १७)

भारतातील मूळ धर्मरक्षणासाठीच श्रीबाबामहाराज सांगतात, 'विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म !' व्याप्नोति इति विष्णुः म्हणजे जो सर्वत्रांस व्यापून आहे तो विष्णू'. म्हणून सर्व जगताशी मैत्र भावाने वागणारा तो वैष्णव ! हा कोणा एका संप्रदायाचा नसून तो जगन्मित्र आहे. म्हणून 'तुका आकाशाएवढा आहे'. ज्ञानदेवही म्हणतात 'आतां विश्वात्मके देवे !' संतांच्या या सर्वव्यापक मंगल जीवनदृष्टीच्या आधुनिक विचारप्रणालीचा प्रतिभासंपन्न आविष्कार श्रीबाबामहाराज आर्वीकर यांच्या 'संतधर्म जीवनात' झालेला आढळतो. त्यांनी आपला नवविचार 'संतधर्म : जीवन दर्शना'द्वारे आजच्या आधुनिक विचारसरणी बाळगणाऱ्या नवयुवकांसमोर मोठ्या विश्वासाने-ठामपणे-प्रेमाने-कळकळीने ठेविला आहे. संपूर्ण विश्वालाच ते या नवधर्माद्वारे कवेत घेऊ इच्छितात. ज्ञानदेवांनंतरचे एक आगळे-वेगळे, नवा शोध-बोध देणारे, क्रान्तिकारी स्वरूपाचे हे नवदर्शन त्यांच्या प्रगल्भ व्यक्तिमत्त्वाचाच आविष्कार दर्शविते. विज्ञानयुगातील धर्मविचाराला ते गतिमानता देणारे, विविधतेतील एकतेचे नेमकेपणी दर्शन घडविणारे, मानवीजीवनासच केवळ नव्हे तर, सर्व प्राणिमात्रांच्या जीवनासही पायाभूत असणारा जो मूलग्राही 'सत्यधर्म विचार' त्याचे सम्यक् प्रबोधन करणारे हे, श्रीबाबामहाराजांचे नवदर्शन थोडक्यात, त्यांच्याच शब्दातून लक्षात घेऊ. संतधर्म जीवन-दर्शनाचे मूलभूत तत्त्वज्ञान विशद करताना श्रीबाबामहाराज सांगतात, 'प्रभूने निर्मिलेले विश्व अभावरूप नसून भावरूप आहे. सारे सृजन भावात्मक आहे. हा मूळ सिद्धान्त लक्षात घेऊन 'भावनिक विश्वनिर्मिती करणे' हाच संतधर्म होय. द्वंद्व पूर्ण भासणाऱ्या विश्वातला एकतेचा धागा संतांनी दर्शविला व ही एकताच अनेक रूपांनी कशी सूत्रमय आहे, हे सिद्ध करण्याकरिता आपले स्वतंत्र तत्त्वज्ञान (जे वैदिक आहे) निर्माण केले. ते तत्त्वज्ञान अनुभवाने सिद्ध करण्याकरिता उपासना मार्ग उघड केला. संतांचा धर्म हा जीवननिष्ठ तत्त्वज्ञानाच्या पायावर 'स्वधर्मक्रतू' ने आध्यात्मिक ममत्त्वाचे प्रवाहीपण घेऊन अपूर्णातून पूर्णत्वाकडे, अल्पत्वातून सर्वस्वाकडे त्यागमय व्यथेने सारे विश्व उजळून सुखरूप करणारे एक दिव्य दर्शन आहे.' या दिव्य दर्शनाचा प्रकाश त्यांना ज्ञानदेव, एकनाथ व तुकाराम या संतत्रयींनी उद्‌घोषिलेल्या 'ज्ञानयुक्त भक्तियोग' यात साकारलेला दिसला. वैदिक ऋषींचे जीवन-दर्शन व कार्य, मुळात एकच असल्याचे त्यांना आढळले. श्रीक्षेत्र माचणूर (जि. सोलापूर)

येथून प्रवर्तित केलेल्या आपल्या कार्यात, श्रीबाबा महाराजांनी याच जीवन दर्शनाचा पुरस्कार केला. 'दुरितांचे तिमिर' जाऊन 'विश्व स्वधर्म सूर्ये पाहो' अशी तळमळ बाळगून 'जीवनवाद' हा एक नवसिद्धान्त त्यांनी महाराष्ट्रास दिला आहे. या जीवनवादाच्या सिद्धान्ताची मोठी गंभीर तात्त्विक मांडणी त्यांनी केली आहे. ती त्यांच्यात शब्दातून पाहू.

**॥ जीवनवाद ॥**

'परमात्म्याच्या सहाय्याने 'प्राण' नावाचे त्याचे शक्तिरूप सर्व जगत् निर्माण करते. यजुर्वेदात प्राण हेच या सृष्टीचे आदिकारण मानले आहे. पण प्राणापूर्वीही हा आत्मपुरुष सर्वत्र असतो. म्हणून 'प्राण' ह्या जगाला सुघटित व्यवस्थेने निर्माण करू शकतो. प्राण हे आदितत्त्व होय. या प्राणात चेतना नावाचा भाव आहे. या प्राणालाच वेदांमध्ये 'जीवनशक्ती' असे म्हटले आहे. म्हणजे जीव सर्वत्र आहे व प्राणाचा त्याला स्पर्श होताच, त्याला जीवनशक्तीचे रूप येऊन 'जीवन' नावाने तो जागा होतो. म्हणूनच संतधर्म या जगात 'जीवन' हेच मूल्य मानतो. जीवन हे ज्ञान व कर्म यांना जोडणारे क्रियाशील ज्ञानरूप होय. जीवनातच ज्ञान व कर्म यांचा संगम होतो. जीवन नसेल तर ज्ञान व कर्म दोन्हीही नसते. आणि या दोनपैकी एकाच अवस्थेने 'जीवन' कधीही नसते. म्हणून 'प्रकृती' न मानता, 'जीवनद्रव्य' नावाचा प्राणरूप घटकच संतधर्मने मानला आहे. येथे माया, प्रकृती आदी काही नाही तर केवळ जीवन द्रव्याचा विहार व विलास आहे; असेच संतानुभवी मत आहे. या मताची ग्वाही उपनिषदेही देत आहेत. काही ब्रह्मवादी लोक जगदुत्पत्तीची कारणे सांगताना काल, स्वभाव, नियती (प्रकृती) यदृच्छा, भूते व पुरुष आदींची नामावली घेतात. पण या सर्वांचा सुघटित व्यवस्थाभाव आत्म्याच्या आधीनच असल्याने, ह्या सर्वांना जगदुत्पत्तीचे कारण म्हणता येणार नाही. यः कारणानि निखिलानि तानि । कालात्मयुक्तान्यधितिष्ठत्येकः ॥ (श्वेताश्वेतर उपनिषद्) या प्रमाणाने वरील विधानच सिद्ध होते. या विश्वात प्रथम ब्रह्मपुरुषापासून प्राण (जीवन) निर्माण झाले व पुढे त्या जीवनानेच परम पुरुषाच्या आश्रयाने सारे जग निर्माण केले. 'आत्मनः एष प्राणो जायते' व नंतर, 'यदिदं किंच जगतः सर्व प्राण एजति निःसृतम् ।' (कठोपनिषद्) म्हणूनच हे सर्व जग प्राणाने प्रभुरूपात निर्मिले. त्यायोगे सर्व जे काही आहे ते प्रत्यक्ष ब्रह्मच आहे. यात दुसरा पदार्थ नाही. याच कारणाने आम्ही हे जग मिथ्या समजत नाही. जग हे प्रभूचेच अपूर्ण ज्ञानरूप होय, असे आम्ही म्हणतो. अर्थात अपूर्ण जाणिवेमुळेच जग ब्रह्मरूप दिसत नाही. यासाठी जाणीवच (संवित्) पूर्ण करा, असा संतधर्माचा आदेश आहे. संवित् पूर्ण करणे म्हणजेच उपासना करणे होय. जगरूप परमात्मा व आत्मरूपी जग कसे याविषयीचा उपनिषदातील पुरावा पहा. 'यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति । यत् प्रत्यभिसंविशन्ति तद् विजिज्ञासस्व । तद् ब्रह्मेति ॥' यावरून हे लक्षात येते की प्राणाने या ब्रह्म पुरुषाच्या आश्रयानेच जग निर्माण केले. म्हणूनच संतांनी या जगास 'भावसृष्टी' किंवा 'भावात्मक रूप' म्हटले आहे.' (पृ. २३-२४) जीवनवादाचे हे तात्त्विक स्वरूप विशद करून 'जय जीवन' असा जीवनाचा जयजयकार करीत, संत बाबामहाराजांनी 'जीवन' या घटकाची शास्त्रशुद्ध व्याख्याही केली आहे. ते म्हणतात, 'अपूर्ण जाणिवेचा पूर्णत्वाकडे होणाऱ्या प्रवासी कालखंडातील अनुभूतियुक्त अस्तित्वास 'जीवन' हे नाव आहे. या व्याख्येतील दोन भाग म्हणजे १) अपूर्णता, २) पूर्णता. या दोघांत नांदणारी जी अस्मिता, अर्थात अस्तित्वसूचक जाण, तिलाच 'जीवन' म्हणतात. म्हणजे अपूर्णाचा पूर्णत्वाकडे होणाऱ्या प्रवासातील जे अस्मिता दर्शन, ते 'जीवन' या संज्ञेस पात्र ठरते.'' (पृ. २४)

संतधर्माचे विविधांगी दर्शन बाबामहाराजांनी ठायी ठायी घडविले आहे. संतधर्मानेच सामूहिक उत्थान शक्य असल्याचे सांगून व्यक्तिगत उद्धार व जगदुद्धार या क्रिया एकाच वेळी घडल्या पाहिजेत असे सांगतात. भारतीय धर्माने अंतःकरण शुचितेला दिलेले महत्त्व, शुचितेचा सर्वकष पाठ, त्रिपाद शुचिता, समभावनेची उपासना इत्यादींविषयीही श्रीबाबामहाराजांनी सविस्तर विवेचन केलेले आहे. तसेच मानवाने आपल्या विशालतेसाठी 'समर्पणाचा कर्मयोग' साधला पाहिजे. कारण मानव हा विश्व कल्याणाचे पवित्र द्वार ठरावा हीच आध्यात्मिक जीवन रचनेत - यज्ञमय जाणिवेत मूळ कल्पना असल्याचेही ते सांगतात. संतधर्म दर्शनाचे स्वरूप प्रकट करताना त्यांनी म्हटले आहे की, 'धर्म हा मानवाचा उच्चतम अभिरुचीचा व उन्नत जीवनस्तराचा दर्शक व प्रेरक आहे. शांत, रागद्वेषरहित व विशाल भाव यांचा चित्तात अनुभव करविणारा धर्म हा प्रकाश आहे. संतांच्या भागवत धर्मात जीवनाला मूल्य आहे. क्रियेला ज्ञानाचा स्पर्श झाला आहे व विश्वरूप आत्म्याशी तद्रूपत्व आहे. त्यांच्या पारमार्थिक विचाराप्रमाणे अद्वैतसिद्धी हे अंतिम दर्शन आहे व या अंतिम पदाला जाण्यासाठी गुरुभक्ती, प्रेममय भक्तियोग हा मार्ग होय.' (पृ. ३१)

**॥ भक्तियोग ॥**

श्रीबाबामहाराजांनी प्रेममय भक्तियोग साधण्यास्तव संतांनी उद्घाटीत केलेल्या 'उपासना-मार्गाचे' आपल्या 'दिव्यामृतधारा' ग्रंथातील तीनही खंडांत स्वरूप वर्णन केलेले आहे. (ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायावरील हे प्रगत भाष्य होय.) त्यांच्या मते 'भक्ती हाच एकमेव साधनापथ होय. ज्ञान हे विराट सृष्टिच्या ललाटावरील एकपणाचे भाकित सांगेल व सर्वात्मकतेचे दर्शन घडवील; पण भक्ती हा सृष्टीच्या ललाटावरील सौभाग्य तिलक होय. भक्तजीवन प्रेम, उदारता, व्यापकता व समर्पण या धीरोदात्त धर्मांनी स्निग्ध असते. स्मरण, सेवा व समर्पण ही भक्तीची त्रिपदी आहे. 'जे जे भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत । हा भक्तियोग, निश्चित । जाण माझा ॥' (ज्ञा. १०.११८) असेच या भक्तियोगाचे स्वरूप आहे. म्हणून हा विश्वोपासनेचा मूलमंत्रच होय.' 'भगवद्भाव सर्वाभूती । तेचि माझी परमभक्ती ॥' अशा विश्वरूपिणी भगवद्जननीचेच भजन संतसमाजात विशाल भावाने रूढ आहे. परोपकार व उदारता या दोन हृदयधर्मातच भक्तीची धारणा आहे. भक्तीचे आसन ते हेच होय. धर्ममय भावना जीवन-व्यवहारात राखावी तरच खरेखुरे हरिप्रेम-भक्तिमार्ग लाभतो. भक्तिपथाच्या प्रभूचे रूपही धर्ममयच आहे.'

**॥ नामस्मरणः संतप्रणीत नामोपासना ॥**

भक्तिमार्गात संतांनी सांगितलेले उत्कृष्ट साधन म्हणजे नामस्मरण वा नामोपासना ! श्रीबाबामहाराज म्हणतात, 'नामस्मरणाच्या सुलभ साधनात जीवन व्यतीत होऊ लागताच प्रत्येक श्वास हा, ज्या पुरुषाचे नामस्मरण असेल त्या पुरुषाकडे त्या नामाच्या प्रीतीने फेकला जातो. ज्या प्रमाणात नामीवरील प्रीतीच्या आवेगाने नाम घेणे घडेल, त्या प्रमाणात नामीचे दिव्यत्व, शक्तित्व व महानत्व हे नामस्मरण करणाऱ्या जीवाला न कळत लाभू शकते. हे दिव्यत्व जसजसे वाढीला लागेल, तसतसा हा नामसंकल्प

प्रियशक्तीच्या प्राणद्रव्याचा आकार घेतो व हा प्रकार जसजसा बदल तसतसे जीवाच्या शरीरात फेरबदल घडू लागतात. येथे प्राणद्रव्य, नामीची प्रेमशक्ती व जीवाचे नामीवरील प्रेम हे सर्व 'तो जीव' एकरूपाने जेव्हा अनुभवतो, तेव्हा तो जीव नामीची संवेदना, नामीचे प्राणाचे सामर्थ्य व नामीचाच आकार होऊन क्रीडतो. 'राम राम म्हणता रामचि होसी' अशी संतांची वचने या सिद्धान्ताला धरूनच आहेत. मानसशास्त्राच्या तत्त्वाप्रमाणे मनाने जर एखादा पदार्थ सतत चिंतीला तर त्या पदार्थाचे गुणधर्म हे मनाचे स्वरूप होते असे सिद्धच आहे. मनाचा हा स्वाभाविक धर्म लक्षात घेऊनच, 'मय्यावेश्य मनो ये मां नित्य युक्ता उपासते । श्रद्धया परयोपतास्ते मे युक्ततमा मताः ॥' (गीता १२.२) ही उपासना भगवंतांनी सांगितली आहे.

भक्तियोगातील 'नामस्मरण उपासना' ही कशी एक वैशिष्ट्यपूर्ण श्रेष्ठ धारा आहे याचेही सविस्तर विवेचन श्रीबाबामहाराजांनी केलेले असून 'भक्तियोगात नाम हेच सार असते कारण ते नाम नामीचे नसून वा देवाचे नसून केवळ प्रेमाचे अंतःस्थ स्पंदन असते. यद्यपि 'हरि हरि' हा ध्वनी नामाक्षरी असला, तरी 'हरि' नावाचा देव तेथे अभिप्रेत नसतो. येथे हरीवरील जे प्रेम, तेच नाम असते. म्हणून भक्तीच्या स्वतंत्र मार्गात हरिप्राप्ती हे साध्य नसून, नाम व प्रेम हेच साध्य व साधन असते... ज्ञानयोगाचे नाम नामीशी संयुक्त असते, तर भक्तियोगाचे नाम स्वतंत्र प्रेममय असे आहे. नामीचे नाम होणे हा ज्ञानयोगाचा परिणाम, तर प्रेमाचे साम्राज्य पसरणे हा भक्तीच्या नामाचा परिणाम ! ज्ञानयोगियांचे नाम अक्षरब्रह्म प्राप्तिदायक तर भक्तियोगाचे नाम पुरुषोत्तमपद प्राप्तिकारक ! असा बराच मोठा भेद आहे. तरी नामोपासकांनी नामीच्या मागे न लागता, नामाच्याच ध्यानी असावे. नामातच प्रेम उगवते. प्रेमच भक्तीचे सुख बनते... असे पवित्र नाम सतत घ्या नि व्यक्तिगत जीवन व सारे विश्व शुद्ध व सामर्थ्यशाली करा असा संतांचा आदेश आहे. (दिव्यामृतधारा २.२२५) सामरस्य अनुभवप्राप्तीसाठी द्वैत वा अद्वैत संतांना मान्य नाही. तर द्वैताद्वैत विलक्षण असाच परमात्मा ते मानतात. तो एकाच वेळी व्यक्त व अव्यक्त असतो. हाच सिद्ध अनुभव ! परमबोध ! 'अवघे विश्वचि माझे घर' असे ज्ञानदेवांनी याचसाठी सांगितले. 'भक्ती' हा जीवन जगण्याचा एक सर्वांग परिपूर्ण विचार असून भक्तीची निष्ठा ही सर्व स्तरांवर ईश्वराचे अवतरण घडविणारी निष्ठा असल्याचे सांगत, हृदयाच्या विशालतेत स्व-पर कल्याणाचे भक्ती हेच महान जागतिक तत्त्व आहे, असे श्रीबाबामहाराजांनी म्हटले आहे. त्याचप्रमाणे भारतीय ज्ञानाचा उद्घोष चैतन्याच्याच स्वभावोत्क्रान्तीचा असल्याचे त्यांनी आपल्या सविस्तर विवेचनातून स्पष्ट केले आहे. यज्ञ, यज्ञसंस्था, भारतीय समाज, कुटुंब व्यवस्था, राष्ट्र व विश्वरचना, व्यष्टी-समष्टी, भारतातील निरनिराळ्या द्रष्ट्या पुरुषांची विविध सिद्धान्त मते 'सत्यं अनन्तं ब्रह्म' कल्पना, पुरुषार्थ कल्पना, बहुदेववाद, सृष्टिसूक्त इत्यादी अनेक विषयांवरील श्रीबाबामहाराजांची सुस्पष्ट नवी विचारसरणी लक्षणीय आहे. त्यांच्या मते मूळ वर्णव्यवस्थेत विषमता व भेद यांना बिल्कूल स्थान नाही. ईश्वरनिर्मित व मानवनिर्मित अशी दोन प्रकारची विषमता असून त्यातील ईश्वरनिर्मित विषमता नैसर्गिक आहे व मानवनिर्मित विषमता ही कृत्रिम, संघर्ष वाढविणारी व समाजास दानवी बनविणारी आहे. ईशनिर्मित विषमतेत न्याय व दया असते व तेथे प्रत्येक घटकाचे स्वास्थ्य व प्रगतीची व्यवस्था सहजसिद्ध असते. ही व्यवस्था गुण व कर्म यावर उभी असून प्रत्येक क्षण प्रत्येकास स्वविकासाचे - पूर्ण प्रगतीचे आवाहन करीत असते. यातून दैवी जगाची जडण-घडण होते. प्रत्येकाला सत्याकडे नेण्यास ईश्वराचा समान सहयोग असतो. परस्पर सहयोग व प्रगतीचा समान अधिकार देवदत्तच असतो. यासच निसर्गरूप अनुशासन-धर्ममय अनुशासन म्हणतात.' (पृ. ४५)

## ॥ कार्यप्रणाली ॥

श्रीबाबामहाराजांनी आपल्या संतधर्म जीवनदर्शनाची कार्यप्रणालीही स्पष्ट केली आहे. त्यासाठी समाजस्तरावर काही योजना कार्यक्रमांच्या तपशिलासह सर्वासमोर ठेविल्या आहेत. 'मानव म्हणजे मन-बुद्धी-चित्त-अहंकार या चार शक्तिघटकांत प्रतिक्षण परस्पर होणाऱ्या व्यापारांचे प्रतिक्षणीच भान मात्र आहे. त्या भानास त्यापेक्षा दिव्यतर भानावर जर नेता आले तर त्याच्या व्यापारात सुख, शांती, उल्हास, प्रसन्नवादी भावांचे जीवन तो अनुभवू शकेल. यासाठी मन, बुद्धी, चित्त, अहंकार या मानवांतर्गत मूलभूत शक्तिघटकांचा अवस्था भाव शुद्ध करणे आवश्यक आहे. या चार घटकांना भारतीय द्रष्ट्यांनी 'चित्तचतुष्टय' अशी संज्ञा दिलेली आहे. यालाच संतधर्म जीवनात 'चतुर्विधा क्षेत्र' म्हणतात. याची परिशुद्ध व्यवस्था राखणाऱ्या जीवनतंत्रास 'रचनात्मक जीवनपद्धती' वा 'जीवनसंस्कृती' म्हणतात. मन हे भावनाक्षेत्र, बुद्धी ही विद्याक्षेत्र, चित्त हे विहारक्षेत्र आणि अहंकार हे कर्तृत्वक्षेत्र ! ही क्षेत्र मानवांतर्गत ईश्वरदत्त शक्तिकेंद्रे आहेत. अखिल ब्रह्मांडात होणारी उलाढाल याच शक्तिघटकांच्या अंतर्बाह्य क्षेत्रात घडत असते. जीवन प्रगत व्हावयास या चतुर्विध क्षेत्रांचीच परिशुद्ध व्यवस्था राखणारे जीवनतंत्र स्वीकारायला हवे' असे श्रीबाबामहाराज म्हणतात. त्याचप्रमाणे या दृश्यमान अवस्थांना जीवनात अधिक स्थूलपणे पहावयास गेल्यास असे आढळून येते की, 'भावना हेच तीर्थक्षेत्र', 'विद्या हेच शिक्षण क्षेत्र', 'विहार हे 'कुटुंब क्षेत्र' व 'कर्म' हे 'ग्रामक्षेत्र' होय. 'तीर्थक्षेत्र' भावना पवित्र व दिव्य करणारे स्थान, 'शिक्षण क्षेत्र' विद्या पवित्र करणारे सूक्ष्म प्रज्ञा देणारे स्थान, 'कुटुंब' हे विहार त्यागमय व पवित्र करणारे स्थान तर 'ग्राम' हे कर्म परिशुद्ध व सहयोगी करणारे स्थान होय. अशा प्रकारे तीर्थक्षेत्र-विद्यापीठ-कुटुंब व ग्राम या चार क्षेत्रांच्या शुद्धीलाच श्रीबाबामहाराज 'चतुर्विधा क्षेत्रशुद्धी' म्हणतात. त्यांच्या शुद्धिकरणाचे कार्य 'संतधर्म दर्शना'त अपेक्षित आहे. शुद्धिकरणाची ही जीवनव्यापी मोहीम सर्वत्र क्रियाशील व्हावी याचे तंत्रही त्यांनी दिग्दर्शित केले आहे. तसेच या तंत्राचा पायाभूत विचारही सुस्पष्ट केलेला आहे. आपली ही कार्यप्रणाली प्रत्यक्षात उतरविण्यासाठी समाजातील सर्व धर्मबांधवांना त्यांनी हाक दिलेली आहे. ते म्हणतात, 'संतधर्म जागरणाचे हे कार्य सांप्रदायिक स्वरूपाचे नाही. त्यात कोणताही पांथिक अभिनिवेश नाही. ते सामाजिक संघटनेच्याही चेहऱ्या-मोहऱ्याचे नाही तर ऊर्जस्वल धर्मप्रबोधनाचे, देवाधर्माचे, सांस्कृतिक पुनरुत्थानाचे, निर्मल साधुत्वाचे, संतांच्या सर्व कल्याणकारी जीवनबोधाने राष्ट्र व विश्वजीवन उजळून टाकण्याचे हे महत्तम कार्य आहे.' (पृ. ७८) या कार्यासाठी 'संतधर्म प्रसारक मंडळ' अशी एक कार्यरचना त्यांनी सूत्रबद्धतेने महाराष्ट्रातील काही विचारवंतांसमोर मांडली. त्या मंडळाच्या कार्याची ठेवण कशी आहे ? कशी असायला हवी ? हे कार्यकर्त्यांना उद्देशून विविध प्रकारे सांगितले आहे. त्यांनी म्हटले आहे, 'प्रचार हा करायचा नाही. तो आपल्या आचाराने-बोलण्याने सहजच व्हायला हवा. प्रचार ही कीर्तनभक्ती आहे. धर्माचे,

देवाचे बोलावे व करावे. समाजसेवा नव्हे. पण समाजातील देवत्व चेतविताना ईशसेवा घडते हा पारमार्थिक न्याय ध्यानात ठेवा.' 'आपल्या मनाजोगे व्हावे असे प्रत्येकालाच वाटत असते. पण आपल्या जोगे मनास तयार करणे यांतच जीवनाचे खरे रहस्य व मांगल्य आहे.' (पृ. ७९) आज सत्ताधाऱ्यांना समाजप्रतिष्ठा लाभते. त्या जागी 'ज्ञान' निष्ठा स्थापित करणे, धनवानास समाज मान्यता देतो. त्या जागी 'दैवी गुणसंपदा' असलेल्यांस आदराचे स्थान प्राप्त होणे, 'संघटना' पाठीशी असलेल्या व्यक्तीला समाज 'प्रतिष्ठित' समजतो त्या जागी 'संकृती' निष्ठ सांस्कृतिक मूल्ये जोपासणाऱ्या व्यक्तीस 'वंदनीय' ठरविले जावे अणि या प्रकारे ज्ञान, दैवी गुणसंपन्नता आणि संस्कृती या तीन भारतीय निष्ठांच्या प्रस्थापनेतून ईशसत्तावाद अवतरेल व धर्म हाच मानवाचा शास्ता होईल. अशी ही चतुर्विधा क्षेत्रशुद्धीची सांस्कृतिक स्वरूपाची कार्यप्रणाली 'संतधर्म जीवन दर्शनाने' स्वीकारली आहे. त्यासाठी बाबामहाजांनी निषेधात्मक आणि रचनात्मक अशा दोन स्वरूपाच्या कार्यक्रमांचेही दिग्दर्शन केले आहे. ही कार्यप्रणाली सांस्कृतिक स्वरूपाची आहे. श्रीबाबामहाराजांच्या मते 'आपल्या कार्याचे स्वरूप शुद्ध ठेवण्यासाठी कार्यकर्ता सोज्ज्वळ व विचारी हवा. सात्विक कार्यकर्ता म्हणजे भक्तच ! कार्य निकोप व शुद्ध होण्यासाठी कार्यकर्ता शुद्ध, कार्याशी आत्मीयतेने वागणारा व कार्याच्या स्वरूपाचा विचार जसाच्या तसा घेणारा हवा. दुसऱ्या प्रकारातील कार्यकर्ता गंभीर, सखोल, मुत्सद्दी, सावधान व कार्याचे तत्त्वतः, कर्मतः अनुसंधान बाळगणारा असावा. कार्याबाबतचे विचार आत्मविश्वासपूर्वक, स्पष्टपणे, निर्भीडतेने मांडणारा असावा. कार्याचे यथार्थ प्रतिपादन करणारा असावा.' (पृ. ८३) संतधर्म मंडळाच्या नियुक्त पदाधिकाऱ्यांना उद्देशून लिहिले. पत्ररूप मार्गदर्शन हे श्रीबाबामहाराजांच्या संपूर्ण जीवनदर्शनाचे, कार्यप्रणालीचे, कार्यकर्त्यांविषयी असलेल्या मातृहृदयी भावनेचे आणि सर्वच संतांविषयीच्या उदात्त प्रेमाचे प्रतीकरूप असलेल्या, संत नामदेवांच्याच शब्दांत त्यांनी सांगून ठेवले आहे. 'कल्पनेची बाधा न हो कोणे काळी । ही संतमंडळी सुखी असो ।। अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझिया विष्णुदासा भाविकासी ।। नामा म्हणे तयां असावे कल्याण । जया मुखी निधान पांडुरंग ।।'

## संदर्भ ग्रंथ


संतधर्म जीवन दर्शन, दार्शनिक श्रीसंत बाबामहाराज आर्वीकर, संपादक : शरद भगत (श्रीक्षेत्र माचणूर)



**डॉ. सौ. सुनीता सदानंद तांबे**

२, आसावरी, गणेश खिंड रोड, औंध गाव, पुणे ४११००७.




## गुरुराया...

जीवनात तुझा । झालासे उदय ।
होत निरामय । मन बुद्धी ।।१।।

मन बुद्धी चित्त । पूर्णरूपी रत ।
निवांत निश्चिंत । सर्वस्वाने ।।२।।

सर्वस्व मी नेणे । तुजवीण काही ।
जनी मनी पाही । प्रेम तुझे ।।३।।

तुझ्या प्रेमे झाले । जग हे माहेर ।
त्यात निरंतर । खेळ तुझा ।।४।।

तुझ्या खेळी कैसे । खेळू मी दयाळा ।
शिकवी कृपाळा । वात्सल्याने ।।५।।

वत्सलता तुझी । सर्वांगे सांभाळी ।
राही खेळी मेळी । अंगसंगे ।।६।।

अंगसंगी एक । तुझे प्रेम देवा ।
वाही जीव भावा । पायावरी ।।७।।


**– इंदुमती कवठेकर,**
**बडोदा**



# प्रार्थना


**श्री. उल्हास सोळस्कर**

*कॅम्लीन लिमिटेड कंपनीतून सुपरवायझर म्हणून निवृत्त. मोक्षधाम प्रकाशन मंडळाचे कार्यवाह.*


'संत' हे परमेश्वराचे सगुण रूप. विश्वातील ईशशक्तीच संतांच्या रूपाने अखिल विश्वांतील जीवाचे कल्याणास्तव भूतलावर अवतीर्ण झाली. जसे 'माऊली' आपल्या मुलाचे कल्याणासाठी जगते, तद्वतच 'माऊली'रूप संत, जीव, शिवस्वरूप ऐक्य घडवून विश्वांत आनंद निर्मितीसाठी अवतरीत असतात. असेच संत श्रीबाबामहाराज आर्वीकर यांनी 'विश्वशांती' व 'स्वानंद प्राप्तीस्तव' प्रार्थनेद्वारे एक क्रांतीकारी प्रयोग मांडला. पू. बाबा म्हणतात, 'प्रार्थना शब्दाची व्युत्पत्ती संस्कृतात आहे. वैदिक प्रार्थना वेगवेगळ्या यज्ञयादिकादी कर्मात आहे. प्रत्येक धार्मिकाला साधना करताना अंतःकरणाची शुचिर्भुतता राखणारा उपचार अत्यावश्यक आहे. ईश्वराचे स्मरण हा प्रार्थनेतला एक भाग आहे. पण त्याहीपेक्षा, त्याच्या स्मरणामुळे एका विशेष नात्याचे निर्माण करणे अत्यंत आवश्यक आहे. प्रार्थनेत वैशिष्ट्याने विश्वात्मक असा श्रीगुरुशक्तीशी आपले नाते जोडणारा असा एक अत्यंत मोठा आर्तभाव प्रार्थनेत गुंफलेला आहे. भारतातील सर्व धर्मपीठांच्या प्रार्थना मी अवलोकील्या व त्यांत थोडी त्रुटी जाणविली. त्या सर्व प्रार्थनेत 'मला मोठे व्हायचे सामर्थ्य हवे आहे.' अशी कल्पना मानवांत सुस्थिर झाली व त्या दूर सारल्याशिवाय आपले ईश्वराशी काही नाते आहे हा विवेक जागृत होणे कठीण. त्यासाठीच प्रार्थनेत विशेष आविर्भाव व आविष्काराचे प्रयोजन केले. जीव आणि परब्रह्म किंवा आत्मतत्त्व यांच्या संयोगामुळे एक अतीव जिव्हाळा व ऐक्य या प्रार्थनाद्वारे आपल्या अंतःकरणात प्रतितीला येईल.'

बर कां मित्रांनो ! त्याची अनुभूती या प्रार्थनेतून आपणास येते हा माझा अनुभव. त्याशिवाय पू. बाबांनी ही प्रार्थना का रचली त्याबाबत माझे मनोगत असे.

ऋषिप्रणित वेदकालीन सामूहिक प्रार्थनेचा कालनुगतीने मानवांस विसर पडला. ख्रिश्चन, मुसलमान वगैरे संप्रदाय धर्म निर्माणद्वारे त्याच्या प्रार्थना प्रचलीत झाल्या व त्या माध्यमातून त्यांची संघ, संप्रदाय शक्ती प्रकट झाली. हिंदू धर्मात मानव उद्धाराकरिता ईशशक्तीनी कालानुरूप वेगवेगळे अवतार घेतले. रूप धारण केले. त्यामुळे हिंदू वेगवेगळ्या उपास्य दैवताची स्वकल्याणासाठी प्रार्थना करू लागला. हिंदूची सामुहिकता लोप पावली व त्यांना एकत्र आणण्यासाठी या प्रार्थनेचा उदय झाला. प्रत्येकांचे उपास्य दैवत वेगळे असले तरी ते ॐ रूप आहे ही त्यांची श्रद्धा आहे व म्हणूनच प्रार्थनेत ॐ मांडला व उपास्य देवताला 'श्रीगुरुदेव' हे संबोधीत करून हा प्रयोग मांडला. कोणत्याही देवदेवतांची पूजा, उपासना करताना आपण आवाहन, आरती, करुणा, स्तुती, ध्यान, जयजयकार, पसायदान व उध्यात अशा उपक्रमाने कर्म करतो तद्वतच आपण प्रार्थनेत प्रथम आवाहन मंत्र - आवाहन करुण व मार्दव स्वरात म्हणणार नंतर नमन करून ज्ञानीभक्त दर्शन - भावपूर्ण आरती - करुणाष्टके - विनम्र भावांत नमस्कार. गुरुस्तवन - श्रीगुरुदेवतेचे मंगल ध्यान - पसायदान - नामगीत - श्रीगुरूंना नमस्कार व उध्यात दिल्यावर स्वस्थानी परतल्यावर १० मिनिटे स्वस्थ मनाने प्रार्थनेतील आनंद अनुभवणे असा मानस आहे.

पू. बाबांची पावन वाणी प्रार्थनेतून सांगते, 'धर्म कळावा, देव आकळावा व देश प्रगत व्हावा हेच कार्य प्रार्थनेची ही ज्ञान ज्योत करील व या प्रार्थनेतून शांतीची वाट जीवांना सहज लाभावी व ज्ञानपूर्ण ज्योतीर्मय स्वानंदाची पहाट उगवावी असा मानस व संकल्प प्रार्थनाठायी आहे.'

पू. बाबा लिहितात, 'प्रार्थना करताना मला जो आनंद होतो व जे अनुभव मी करतो, तेच या प्रार्थनेद्वारे सर्वांना येतील, असा श्रीगुरुदेवांचा माझेकडे आशीर्वाद आहे. म्हणून मी विश्वासाने आश्वासन देतो की ह्या प्रार्थनेद्वारे प्रत्येक पारमार्थिक जीव, उच्चतम आनंदाचा स्वगत अनुभव श्रीगुरुप्रसादे मिळवू शकतो. अर्थात श्रीगुरू ही देवता, सकळांचे प्राकट्य गुरुत्वाने योग्य वेळी स्वीकारेल. म्हणून ही प्रार्थना सर्व मंगलकारक आहे.'

भावंडांनो, गुरुदेवाच्या कृपेने लिहिले, गंगेच्या पाण्यानी गंगेलाच अर्घ्य दिले. बालकाचे बोल मातेच्या अंतःकरणाने गोड मानून घ्या. नित्य प्रार्थनेमुळे सकल जीवांचे कल्याण होवो हीच श्रीगुरुदेववाणी प्रार्थना.


**श्री. उल्हास सोळस्कर**

७, भिकोबा निवास, गोखले रोड (नॉर्थ), दादर, मुंबई, ४०००२८.


## मधुर मधुर हरिनाम...

जन हो ! मधुर मधुर हरिनाम ॥ धृ. ॥

अखिल रसांचा ऐक्यभाव हा ।<br>
अमृत-ताटी भावपूर्ण हा ।<br>
जीविताचा निष्काम ॥१॥

गाता प्रेमे चवी उगवते ।<br>
विश्वरसाची गोडी चुकते ।<br>
निरालंब रसधाम ॥२॥<br>
हरिसम त्याचे नाम कृपाघन ।<br>
स्मरता तुटते हे भवबंधन ।<br>
सहज मिळे सुखधाम ॥३॥

— श्रीसंत बाबामहाराज



# ॥ श्रीबाबामहाराज आर्वीकर यांच्या आठवणी ॥

श्री सद्‌गुरू, योगिराज गुळवणी महाराजांचे सत्‌शिष्य श्री. अच्युत सिद्धनाथ पोटभरे यांनी महाराजांच्या जीवन चरित्रावर 'चार कलश' लिहिलेल्या, 'जीवनगंगा' या पुस्तकावरून साभार –

## भेटी लागी जीवा लागलीसे आस !

प. पू. योगिराज गुळवणी महाराज आणि श्रीबाबा महाराज आर्वीकर यांची भेट - **दि. २६-१०-१९७१** रोजी श्रीगुरुदेवांनी नेहमीप्रमाणे आन्हिक आटोपले. जेवण झाले की वाडीहून निघून मिरजेला डॉ. अरविंदराव प्राणी यांच्याकडे प्रतिवर्षीप्रमाणे मुक्कामाला जावयाचे ठरले होते. कोणताही कार्यक्रम बाकी राहिला नव्हता. आदल्या दिवशीच मातुश्री उमाबाईचे श्राद्ध आटोपले होते. वाडीच्या मुक्कामातील हा शेवटचा कार्यक्रम. त्या दिवशी माधुकरीही वाढली जाते.

श्रीगुरुमहाराज जेवण्यास निघणार इतक्यात श्रीबाबामहाराज आर्वीकर यांच्याकडून आलेले दोन शिष्य दत्त म्हणून पुढे उभे राहिले. 'बाबा आजारी आहेत. आपले दर्शन मृत्यूपूर्वी व्हावे अशी त्यांची तीव्र इच्छा आहे. आपण नाही म्हणू नये. कसेही करून यावे. नेण्या-आणण्याची सोय उत्तम करतो.' अशी दोघांनी परोपरीने विनवणी केली. श्रीगुरुमहाराज म्हणाले, 'माझी प्रकृती इतका दूरचा प्रवास करण्याइतकी उत्तम नाही. मला ते सोसणार नाही. आता यावेळी नको. पुढे पाहू !' परंतु त्यांचा आग्रह चालूच होता. श्रीगुरुदेवांना घेऊन जावयाचेच अशा कृतनिश्चयाने ते आले होते. ते म्हणाले, 'महाराज, आपण काही झाले तरी यावेळी नाही म्हणू नये.' बाबांना कॅन्सर झाल्याने ते फारच अत्यवस्थ आहेत. त्यांनी आम्हाला पाटीवर लिहून दाखवले की, श्री. गुळवणी महाराजांचे दर्शन स्वप्नात एक-दोन वेळा झाले आहे. प्रत्यक्ष दर्शनाची तीव्र इच्छा आहे. माझा निरोप सांगून त्यांना घेऊन यावे.

श्रीगुरुमहाराज एक क्षणभर स्वस्थ उभे राहिले आणि म्हणाले, 'येतो. जरूर येतो. संध्याकाळीच निघू.' तुम्ही मिरजेला डॉ. प्राणी यांच्याकडे गाडी घेऊन या म्हणजे रात्रीच निघू. श्री. अलाटकर व श्री. दळवी या दोघांना ही योजना पसंत पडली. ते मोटार आणण्यासाठी निघून गेले. श्रीगुरुदेव संध्या करून देवाचे दर्शन घेऊन मिरजेला जाण्यास निघाले.

श्रीगुरुमहाराज मिरजेस सायंकाळी सहा वाजता आले. कोल्हापूरहून रात्री अकरा वाजता श्री. दळवी गाडी घेऊन आले. दुसऱ्या दिवशी सकाळी निघावयाचे ठरले.

पहाटे ५ वाजता श्रीगुरुमहाराजांनी सोलापुरी प्रयाण केले. गाडीत श्री. दळवी, श्री. अलाटकर व श्री. केशवराव होते. सकाळी १०॥ वाजता श्रीगुरुमहाराज सोलापुरी पोहोचले.

गाडी प्रथम श्रीबाबामहाराज यांच्या घरी घेण्यात आली. त्यावेळी त्यांचा मुक्काम सिद्धेश्वर पेठेत एका घरात माडीवर होता. श्रीगुरुमहाराज येणार अशा तयारीत सर्वजण वाट पाहात होते. श्रीगुरुमहाराजांनी श्रीबाबांच्या खोलीत प्रवेश केल्यावर तेथील लोकांनी बसण्याकरिता खुर्ची पुढे केली. परंतु खुर्चीवर न बसता श्रीगुरुमहाराज एकदम श्रीबाबांच्या पलंगावर जाऊन बसले. श्रीबाबांचा हात हातात घेत श्रीमहाराज म्हणाले, 'आपण निरोप दिल्याप्रमाणे मुद्दाम भेटीस आलो.' या एका वाक्याने श्रीबाबांना खूप समाधान वाटले. कॅन्सरची जखम मूलतः तोंडात झालेली असली तरी तिने दोन्ही दाढा भेदून बाहेर प्रवेश केल्यामुळे सर्व मुखमंडल कापडाने वेष्टून टाकले होते. श्रीबाबांचा भव्य देह अगदी अस्थिपंजर झाला होता. पण जखमेच्या वेदना त्यांनी गिळून टाकल्या होत्या. बाबा शांत होते. त्यांना श्रीगुरुमहाराजांशी बोलता येणे शक्य नसल्याने काही लिहून दाखवावयाचे असेल अशा कल्पनेने त्यांच्या शिष्यांनी पाटीपेन्सिल पुढे धरली. परंतु बाबांनी काही लिहावयाचे नाही अशी मानेनेच खूण केली. दर्शनानेच सर्व काम झाले होते.

## एका तपस्वीची तळमळ भेदून शांत केली.

आपली इच्छा पूर्ण झाल्याने भेटीचे एक अपूर्व समाधान त्यांना वाटले. दुपारी चार वाजता परत येतो असे सांगून श्रीगुरुमहाराज व श्री. केशवराव, श्री. बापूसाहेब कुबडे यांच्याकडे गेले. तेथे आन्हिक, जेवण करून विश्रांती घेऊन श्रीगुरुमहाराजांनी दुपारी अर्धा तास पुन्हा श्रीबाबांची भेट घेतली. सर्व विचारपूस केली. श्रीबाबांना अशा स्थितीत माचणूरला हलविणे चांगले असा प्रेमळ सल्लाही दिला. तेथील मंडळींनी पुढे त्यांना माचणूरला हलविले. तेथेच त्यांचे देहावसान दत्तजयंतीस झाले.

---

## स्मृतिपुष्पे

**शरद भगत**

१९५७ सालचा तो पुण्यपावन जीवनकाळ ! तारुण्याच्या नव्हाळीनं जीवन फुलत होतं ! अंतरंगात काहीतरी अबोध, अस्फुट उमलत होतं ! दिव्यतेची स्वप्निल पाखरं विशाल निळ्या आकाशात उंच उंच भरारी मारीत होती ! मधुर स्वरांचा गुंजारव एक अनोखं संगीत, अंतःकरणाच्या मृदुल पटलावर ताल धरीत साकारत होतं ! ध्येयवेडं मन काहीतरी दिव्य-भव्य, उदात्त-मंगल शोधीत हुरहुरत होतं ! जीवनातली ती दिव्यता कवेत

घेता येईल का, ते महत्तम स्वरूप स्पर्शिता येईल का असा साशंकतेचा विचार, नव्हे कल्पनाही मनाला शिवत नव्हती ! 'अशक्य' 'असंभव' या शब्दांचं सावटही पडलं नव्हतं, जीवनातल्या त्या 'मंतरलेल्या दिवसांवर' ! देव भेटावा, देव डोळे भरून पाहावा-अंतःकरणात साठवावा, त्या अथांग प्रेमसागरात आपलं जीवन मिसळून जावं, त्या ईश्वराच्या सेवाकार्यात आपण चंदनासारखं झिजत राहावं अशा उर्मींनी क्षण नू क्षण व्यापून राहायचा असा तो आयुष्यातला काळ !!

आणि मग अशा अवस्थेत नांदत असतानाच जन्मदाते माता-पिता नि प्रेमळ आप्तजन यांची माया दूर सारून डोंबिवली सोडली ! उदात्त जीवन जगायला आव्हान देणारं, राष्ट्रसेवेतून ईशसेवेची वाट दाखवणारं संघप्रचारकाचं ध्येयनिष्ठ जीवन पुरस्सर व्हायला पुकारत होतं ! घेतली उडी ! मायेचे पाश ढिले पडले आपोआप ! संघाच्या योजनेप्रमाणे सोलापूर जिल्ह्यातील बार्शीत येऊन दाखल झालो ! ही भगवंताची बार्शी शिवशंकराच्या बारा ज्योतिर्लिंगांनी मंडित झालेली आहे !

माझ्या आवडत्या शिवभक्तीचं महिम्नस्तोत्र, बार्शीच्या गलीगलीतून गुंजारव करीत असल्याचा भास व्हायचा ! एकीकडे संघाच्या कामासाठी निष्ठावंत भावाने धडपड करायची नि उरलेल्या वेळात बार्शीच्या भोगेश्वर, उत्तरेश्वर, मल्लिकार्जुन मंदिरांत जाऊन, गहिवरलेल्या नेत्रांनी शिवसांबाची पूजा बांधीत बसायचं; असा जीवनयोग बार्शीत सुरू झाला ! कोणीतरी मार्गदर्शक सद्गुरू भेटावा, हाताला धरून चालविणारा संत-सांगाती भेटावा, म्हणून मन सारखं तडफडत राहायचं ! दिवसानुदिवस सद्गुरु-भेटीची ही आतुरता वाढतच होती ! पण असा गुरुदेव शोधावा कुठं, कुठं नि केव्हा भेटेल तो, अशा भावोर्मी अंतःकरणात उचंबळत राहायच्या पण काही कळत नव्हतं ! मन विषण्ण होई, बुद्धी कुंठित होई ! अश्रूंच्या पायघड्यांवरून चालत असे किती दिवस गेले कुणास ठाऊक !!

होता होता १९६० साल उजाडले ! आणि मग एके दिवशी कुर्डुवाडीची शाखा करून, तेथे राम मंदिरात गणेशोत्सव सुरू आहे व कोणी साधुमहाराज तेथे प्रवचनासाठी येणार आहेत असे कळल्याने, रात्री मी व श्री. मुकुंद दीक्षित राममंदिरात गेलो ! खूप लोक जमले होते ! वातावरण प्रसन्न होते. आणि प्रवचनाची वेळ होताच व्यासपीठावर एक तरुण, तेजस्वी साधू येऊन बसलेले आम्ही पाहिले ! भरदार शरीरयष्टी, शुभ्र लुंगी व गुलाबी झब्बा घालून महाराज येऊन बसताच आदरयुक्त भावनेचे साम्राज्य श्रोतृवर्गात पसरले ! 'दर्शनि प्रशस्ती पुण्यपुरुष...' हाच भाव नांदत होता तेथे ! काळा-सावळा वर्ण, काळेभोर केस व दाढी, धीरगंभीर पण मोहक मुखमंडल, अतीताचा शोध घेणारे उत्फुल्ल नेत्र ! अगदी शुचिर्भूत व्यक्तिमत्त्व ! नेत्रपाती खिळून बसली तिथे ! मग प्रवचनाची अमोघ, ओजस्वी वाणी आवेशपूर्णतेने धबधब्यासारखी सांडू लागली ! वृत्ती तटस्थ झाली ! काया रोमांचित झाली ! शब्दांचा वेध घ्यायला बुद्धी तयार नव्हती ! अंतर्यामात मात्र आनंदाच्या लहरी उचंबळत होत्या ! सुमारे १-१॥ तास प्रवचन झाले ! शेवटी राजा राम राम... चा गजर सुरू झाला व मी भानावर आलो ! शेजारी बसलेल्या मुकुंदाकडे प्रश्नार्थक नजरेने पाहिले ! एरवी साधुलोकांची टिंगल करणारा मुकुंदा उद्गारला, 'प्रवचन इतके अवघड होते की काहीच कळले नाही, पण विलक्षण आनंदाने मन मात्र बेभान झाले होते !' अशा संत बाबामहाराजांचे मला झालेले हे पहिले-वहिले दर्शन ! जीव अगदी भारावून गेला होता !

प्रवचन संपल्यावर शेजारच्या खोलीत जेव्हा श्रीबाबा जाऊन बसले, तेव्हा सर्वांच्या समवेत मीही जाऊन बसलो तिथे ! महाराजांची ओळख व्हावी म्हणून जीव आसुसला होता, पण त्यांनी तर आपल्याकडे नुसते पाहिलेसुद्धा नाही म्हणून संकोचाची गाठ सुटत नव्हती ! रात्रीच्या पॅसेंजरने महाराज पुण्याला जाणार होते म्हणून सर्वजण स्टेशनच्या दिशेने चालत जात आहेत हे पाहून आम्हीही अभावितपणे त्यात सामील झालो. गाडी यायला अर्धा तास उशीर असल्याने सर्वजण प्रतीक्षागृहात बसले ! महाराज सर्वांशी अगदी खेळीमेळीने व सलगीने बोलत होते. मी दुरूनच त्यांना न्याहाळत होतो ! ओळख झाल्याशिवाय बोलावे कसे व ते तर आपल्याकडे पाहातही नाहीत अशा विचाराने मी दूरच होतो ! पॅसेंजर स्टेशनात शिरत असताना देवाने पंढरपूरचे संघचालक श्री. बाबूराव अत्रे यांना सद्बुद्धी दिली आणि त्यांनी माझी ओळख श्रीबाबांशी करून दिली ! आणि लगेच प्रेमाने भिजलेली श्रीबाबांची नजर माझ्याकडे वळली ! प्रसन्न नि निरागस हास्य त्यांच्या मुखावर खळाळले ! गाडी येऊन थांबली व ते आत चढून खिडकीजवळ येऊन बसले तरी त्यांची नजर माझ्यावर खिळलेलीच होती ! दरवाज्यातून मी घाईने आत गेलो व चरणस्पर्श करून श्रीबाबांना पहिला नमस्कार केला. 'आमच्या माचणूरला या बरं का एकदा !' असे ते म्हणाले नि मग गाडी सुटली ! खाली उतरून मी फलाटावर उभा राहिलो तरी श्रीबाबा माझ्याकडेच पाहात होते ! प्रेमाचे अमृतघट घेऊन माझ्यावर खिळलेले श्रीबाबांचे नेत्रद्वय गाडी दूर होईपर्यंत तसेच होते ! ती नजर आणि ते हास्यवदन न्याहाळीत मी स्वतःला हरवून उभा होतो ! एक रमणीय व कमनीय स्वप्न कुर्डुवाडीच्या रेल्वे स्थानकावर जणू आकाशातून उतरून तरंगत होते ! गाडी दिसेनाशी झाली नि मग काडादी चाळीतील संघाच्या कार्यालयाकडे जाण्यासाठी आम्ही चालू लागलो ! 'सद्गुरू आपण शोधायचा नसतो, तो आपणहून आपल्याकडे चालत येतो' असे काहीसे ऐकलेले मनात तरळत होते ! 'आपैसा भेटणारे' सद्गुरू म्हणजे श्रीबाबामहाराजच असतील का असे शब्द आत उमटत होते ! आनंदाच्या हिंदोळ्यावर बसूनच कार्यालयात जाऊन पोहोचलो. बाबांची ती प्रेमार्द्र दृष्टी व निरागस हास्यवदन पाहातच झोपी गेलो !

पूजनीय बाबामहाराज असे अगदी अकल्पितपणे माझ्या जीवनात आले आणि पहिल्याच भेटीने त्यांचा विलक्षण 'वेधू' लागला. तसे त्यांना मी माझे काहीच मनोगत सांगितले नव्हते आणि त्यांनीही विशेष काही चौकशीही केली नव्हती. म्हणतात की, 'गुरोऽस्तु मौनं व्याख्यानम्...' असेलही ! कासवी आपल्या दृष्टीतून पिलांचं पोषण करते असंही ऐकायला मिळतं ! पण एखाद्या माणसाच्या डोळ्यांतून विशुद्ध प्रेमाची सरिता खळखळून वाहाते आणि समोरील जीवाला मातेच्या ममतेने, सन्मित्राच्या स्नेहपूर्णतेने नि उत्कट जीवाभावाने अंतर्बाह्य न्हाऊ-माखू घालते, हे दृश्यच अलौकिक नव्हे काय ? ते दृश्य मनाच्या गुंफेत खोलवर अजिंठ्याच्या कोरीव लेण्यासारखं नकळतच सुरेखित नि सुरंगित केलं गेलं ! जगावेगळ्या अनोख्या रंगांनी रंगविलेलं ते दृश्य आजही कसं ताजंतवानं नि प्रफुल्लित आहे. 'गुरुमाऊली' म्हणून जीवाने प्रेमभराने, निराधारपणे हाक मारावी नि त्या माऊलीने धावत येऊन प्रेमाचा पान्हा पाजावा अशा भावाचं ते दृश्य ! आकाशाच्या पोटीची ममता पिऊनच 'माऊली' शब्द जन्मला ! या जगातलं प्रेमाचं सर्वश्रेष्ठ नातं सांगणारी ही शब्दाची कुळकथा प्राचीन काळापासून विद्यमान आहे ! म्हणून शंकराचार्यांनीही या मातृस्वरूपाचा

गौरव करीत असताना म्हटलं की, 'कुपुत्रो जायेत् क्वचिदपि कुमाता न भवति ।' म्हणून सद्गुरूंच्या अत्युत्तम पदाला 'माऊली' शब्दाची जोड देऊन गुरूंची प्रेमलता, वत्सलता प्रगट झाली ! जीवाचं आत्यंतिक सर्वांगीण कल्याण करणारी ही 'गुरुमाऊली' पाहून परमेश्वरही तिच्यापुढं लहान झाला ! संत बाबामहाराजांच्या दर्शनात ह्या साऱ्या भावोर्मी जणू एकवटल्याची जाणीव माझ्या मनाला होत होती ! म्हणूनच माझी भावना व्यक्त करणारं एक पत्र मी बार्शीहून त्यांना लिहिलं ! बरेच दिवस प्रतीक्षा केल्यानंतर एक दिवस श्रीबाबांचं भलं मोठं पत्र वृंदावनाहून आलं नि माझ्या आनंदाला पारावार राहिला नाही ! त्या पत्राची मी कितीतरी पारायणं केली. पत्रातली भाषा थोडी अवघड वाटली खरी, पण तिचा रसाळपणा नि पदलालित्य पाहून मन अगदी मोहून गेलं ! पहिल्या भेटीत त्यांनी कुर्डुवाडीला माझं जे काही निरीक्षण केलं होतं, ते सारं इतक्या काही गोड शब्दांत त्यांनी लिहिलं होतं की मन अगदी हरखून गेलं ! एक मोठा वत्सल व विश्वासाचा आधार आपल्याला लाभत आहे अशा भावकल्लोळात जीव ओलाचिंब झाला ! त्यांच्या भेटीची आतुरता गात्रागात्रांतून दाटून आली ! दुसरं काही सुचेना नि रुचेना ! पत्रात त्यांनी लिहिलं होतं, 'सद्गुरुपद फार मोठं आहे रे ! ते तुला पुढे लाभेलच ! मला तू आपला मित्र समज ! मला जेथपर्यंत चालविता येईल, तिथपर्यंत तुला अवश्य चालवीन !' ज्यांच्या तपःपूत, उदात्त-मंगल जीवनावरून जीव ओवाळून टाकावा, असा बाबांसारखा 'मित्र' आपल्याला लाभतो आहे यासारखी देवाची कोणती वेगळी कृपा असणार ?

आकाश जसं सर्वत्र व्याप्त आहे पण लिप्त कुठेच नाही, तसे असतात संत ! त्यांचं पत्र आल्यानंतर काही दिवसांनी ते माचणूरला आलेले आहेत असे कळल्याने, मी रस्ता शोधीतच मंगळवेढ्याहून माचणूरला त्यांच्या भेटीसाठी गेलो ! मला आलेला पाहताच अगदी अलिप्ततेने ते म्हणाले, 'आपली भेट कुर्डुवाडीला झाली होती का ?' शुभ्रधवल लुंगी, झब्बा परिधान केलेले व डोक्याला पांढरा कपडा बांधलेले बाबामहाराज मला त्या दिवशी अगदी येशूख्रिस्तासारखेच वाटले ! प्रेमळ पण विरक्त ! स्वागतोत्सुक पण अनासक्त ! त्या दिवशीही ते पुण्यास जायलाच निघाले होते म्हणून गाडी येईपर्यंत थोडाच वेळ आमची भेट झाली ! मला त्यांनी दोन दिवस राहायला सांगितले व आश्रमातील दोन सेवकांची (अनंता-माधव) ओळख करून दिली. मी प्रथमच दोन दिवस माचणूरला राहिलो. अनंता-माधवनी मला श्रीबाबांची व माचणूरच्या कार्याची खूप माहिती दिली. त्यांच्या त्या सहवासात एक वेगळाच सात्त्विक आनंद वाटला व त्यांच्याविषयी सहजच बंधुत्वाची भावना निर्माण झाली ! माचणूर क्षेत्राचा निर्मळ-पावन एकांत नि परिसराची भव्यता मनावर ठसून गेली ! पंढरपूर-मंगळवेढ्याजवळची ही शिवभक्तीची पावनपेठ, तिथं बाबांसारख्या संतांचं वास्तव्य, साधुसंतांची लाडकी पुण्यसलिला चंद्रभागा, धर्म-भक्तीच्या आवडीची तिथं येणारी भाविक माणसं, संतधर्मकार्याची पूज्य बाबांची अनंत-माधवकडून ऐकलेली योजना हे सारं पाहून पहिल्या भेटीतच खूप समाधान वाटलं ! एक मोठा भरभक्कम आधार जीवनाला लाभत असल्याची जाणीव झाली ! जीवनगाथेतला 'माचणूर अध्याय' सुरू झाला !

जीवनातला 'माचणूर-अध्याय' सुरू झाला नि मग पूज्य बाबांचं चिंतन प्रतिदिन असायचंच ! त्यांना पाहावं, त्यांचं बोलणं ऐकावं, त्यांची सेवा करावी, त्यांच्याशी खूप सलगी करावी अशा भावोर्मी मनात नेहमी उसळत ! त्यांच्या गूढगंभीर जीवनात काय काय दडलेलं असेल, ते सारं समजावं-उमजावं, तत्त्वज्ञानातील सखोल रहस्ये त्यांनी आपल्याला समजावून द्यावीत नि जिज्ञासेने आपण ती ग्रहण करीत जीवनाचं सत्य स्वरूप आपल्याला आकळावं असे तरंग मनात सारखे उठत राहायचे ! असा मनबुद्धीला बाबांनी वेधुच लावून ठेवला. मनातील रंगतरंग कधी कधी शब्दांना वाट पुसत अंतरंगातील ओढीने पत्ररूप धारण करीत. त्यांची भेट कुठे नि केव्हा येईल यासाठी मन सारखं शोध घ्यायचं ! त्यांचा सत्संग लाभावा म्हणून जीव नेहमी आसुसलेला असे ! नारदभक्तिसूत्र ह्या सत्संगाचं स्वरूप व माहात्म्य सांगताना म्हणतं -

*'महत्संगस्तु दुर्लभः अगम्यः अमोघश्च ।'*

खरंच आहे. बाबांसारख्या शुचिर्भूत महात्म्याचा सत्संग सहजासहजी थोडाच लाभणारा होता ! संत तुलसीदास म्हणतात,

*'बिनु हरि कृपा मिलहिं नहीं संता ।'*

आणि

*बिनु सत संग बिबेक न होई ।*
*रामकृपा बिनु सुलभ न सोई ॥*

प्रभुकृपेने, पूर्वपुण्याईने संतसंग लाभला तरी तो अगम्य नि अमोघ असल्याने त्याचं मर्म नाही लवकर लक्षात येत ! त्यासाठीही संतकृपेचीच आवश्यकता आहे. अंतरंगातील ही सारी आंदोलनं बाबा निश्चितच जाणत होते. त्यांच्या गोड पत्राने याचा कधी कधी सुखद अनुभव यायचा ! संघकार्यातील निष्ठावंत मने पाहून त्यांना फार आनंद होई. एकदा असाच मी त्यांना भेटायला गेलो असताना ते म्हणाले, कार रे शरद, सध्या संघात कोणतं समूहगीत सुरू आहे ? मी म्हटले, बाबा सध्या आम्ही म्हणतो आहोत -

*अब तक सुमनों पर चलते थे ।*
*अब काटों पर चलना सिखो ।*

माझ्याकडून हे संपूर्ण गीत त्यांनी म्हणून घेतलं ! मी तन्मयतेनं म्हणत होतो नि बाबा जणू भावसमाधीत प्रविष्ट होत आहेत असं त्यांचं ते गोड दर्शन हृत्पटलावर कोरलेलं आहे अजून !! नि मग थोड्या वेळानं ते म्हणाले, 'अरे शरद, अशा सुंदर, भावपूर्ण गीतांनीच संघाने ध्येयनिष्ठ मने घडविली आहेत, नाही का ?' मी आपलं साधं म्हटलं गीत, पण त्यातील सखोल अर्थ-गंभीरतेने बाबांची हृदयवीणा अगदी सहजतेने छेडली होती ! पुढे माझ्या गीत म्हणण्याचा त्यांनी पत्रातून पाठपुरावा केला नि मग लिहिलं, 'तुझं ते त्या दिवशीचं गीत कसं वाटलं सांगू मला ? उंच निळ्या आकाशात मधुर गुंजारव करीत स्वच्छंद झेप घेणारा एखादा पक्षी असावा; निःस्तब्ध नीरवतेचा छेद देणाऱ्या त्याच्या त्या मंजुळ आवाजाने, धनगंभीर शांतीची जाणीव आणखीनच तीव्रतेने व्हावी... तसं वाटलं तुझं गाणं !' माझ्या साध्यासुध्या बाळबोध स्वरांना, बाबांनी दिलेलं ते महत्तम रूप, त्यांच्या अभिजात मोठेपणाचीच साक्ष देत नाही का ? मोठ्यांचं सारंच मोठं !' 'मधुराधितेः अखिलं मधुरं ।' शरदाच्या शुभ्रधवल चांदण्यात, काटेरी झुडुपही सुंदर नाही का दिसत ? पार्थिवाला अपार्थिवाचा साज चढविणारी बाबांची ती प्रसन्न प्रतिमा पाहून, भक्तिभावानं जीव ओलाचिंब झाला !

मित्रांनो ! सख्यांनो ! श्रीबाबामहाराजांची सुगंधित स्मृतिपुष्पे तुम्ही-आम्ही साऱ्यांनीच अंतःकरणाच्या पेटीत अगदी जपून-सांभाळून ठेवली आहेत ! ती स्मृतिपुष्पे अजूनही ताजीतवानी नि टवटवीत आहे. त्या

पुष्पांचा गंध सर्वत्र दरवळत राहिला आहे नि त्या पावन गंधलहरींवर तरंगत तरंगत आपल्या आयुष्यातला काळ पुढे सरकत आहे, नाही का ? आपण सारेच त्या स्मृतिपुष्पांच्या सुंदर माळा करून जनताजनार्दनाच्या चरणी वाहूया ! मी अशी एक माळ गुंफत आहे ! आज केवळ थोडीशी पुष्पेच आणली आहेत पुजेला ! एकरूप होऊ सगळे ! देवरूप होऊ सगळे !!

**शरद भगत**
श्रीक्षेत्र माचणूर

## माचणूरच्या भूमीतील जादूगार !
### श्री. द. शं. मोहोळकर

सोलापूर-मंगळवेढे रस्त्यावर भीमेच्या काठावर वसलेल्या माचणूर गावाचे मला नेहमीच आकर्षण वाटत आलं आहे, ते मी सन १९६० च्या डिसेंबर मध्ये इथे कामानिमित्त सुमारे तीन आठवडे मुक्काम केल्यानंतर !

डिसेंबरची साधारण दोन-तीन तारीख असावी. माझ्या थोरल्या बंधूंनी (बा. शं. मोहोळकर) मला विचारले, 'माचणूरला येत्या चंपा षष्ठीपासून एक उत्सव होणार आहे. त्यासाठी तेथील देवळाचे आणि इतर रंगरंगोटीचे काम आणि कार्यक्रमाचे बोर्ड रंगविण्याचे काम आहे. येशील का ? चांगले पंधरा दिवस - तीन आठवडे तिथं राहावे लागेल.' मी त्या वेळी मॅट्रिक होऊन बसलो होतो. पुढे शिक्षण घेण्याची ऐपत नव्हती. मी मोकळाच होतो. नोकरीच्या शोधात होतो. मी लगेच येईन म्हणालो. त्यावेळी प्रथम मी बाबांना (बाबा महाराज आर्वीकर) सोलापुरच्या श्री शुभराय महाराज मठात त्यांनी केलेल्या प्रवचनाचे वेळी पाहिले होते. मी त्यावेळी माझे बंधू, आई, भगिनी समवेत शुभराय मठातच रहात होतो. मी त्यावेळी पाहिलेले बाबा हेच माचणूरचे बाबा आहेत हे मला माहीत नव्हते.

मी माझ्या भावाच्या सांगण्यावरून माचणूरला गेलो. त्यावेळी माचणूरला जायचे म्हणजे होडीने नदी पार करून जावे लागे. नदीला पाणीही भरपूर असे. नदीपार करून मी माचणूरला पोहोचलो. श्रीसिद्धेश्वर मंदिराच्या परिसरात मंडप उभारणीचे काम चालू होते. वर्तमानपत्रातून छापून आलेल्या साहित्य संमेलनाच्या मंडपाच्या उभारणीच्या छायाचित्रांची मला आठवण झाली. मंडपवाले होते सोलापूरचे केळकर. ते ओळखीचे होते. माझ्या मित्राचे वडीलच. मला जरा हायसे वाटले. आपले कोणीतरी इथं आहे. बरं वाटलं. माचणूरला आल्यावर सर्वजण बाबांना नमस्कार करत. म्हणून मीही नमस्कार केला. नमस्कार करताना कुणीतरी बाबांना माझी ओळख करून दिली. 'हा बाळचा भाऊ !' बाळचा भाऊ म्हटल्यावर मी नमस्कार करता करताच बाबांनी माझ्या खांद्याला धरून मला आपल्या शेजारी बसवून घेतले आणि त्याच वेळी बाबा 'माझे' झाले. ईश्वरी साक्षात्कार झालेल्या त्या महान योग्याचा तो स्पर्श होताच माझी काया सोन्याची झाली. बाबा खरंच परीस होते. बाबांचा स्पर्श होताच एक प्रकारचे नवचैतन्यच माझ्या अंगात कुणीतरी ओतले होते. नावेतून उतरल्यावर बाबांच्या आश्रमात येईपर्यंत मला इतकी जबरदस्त तहान लागली होती की, रस्त्यातून येताना एका बाईच्या हातातील तांब्या बघून मी तिला विचारले सुद्धा, 'पाणी असलं तर थोडं मला देता का ?' तशी ती कळवळून मला म्हणाली, 'नाही रे बाळा... हे पाणी नाही दूध आहे... तुला पाणी पाहिजे असलं तर बाबांच्या आश्रमात मिळंल !' त्या बाईच्या एवढ्या गोड बोलण्यानं माझी अर्धी तहान भागली. मी 'ठीक आहे !' म्हणून तशा अवस्थेतही झपाझपा पावलं टाकत आश्रमात आलो. आणि वर सांगितल्याप्रमाणे बाबांचा स्पर्श होताच माझी तहान कुठल्या कुठे पळाली. प्रवासाचा शीणही गेला. मी संकोचानं अंग चोरून बाबांजवळ बसलो होतो. बाबा म्हणाले, 'बाळचा निरोप मिळाला ना ? आता जायचं नाही.' मी 'हो' म्हणालो. 'आता इथं खूप कामं आहेत.' असं बाबा म्हणताच मी लगेच म्हणालो, 'होय बाबा, मी त्याचसाठी तर आलो आहे.'

मग बाबांनी काय काय करायचं ते सांगितलं. माझ्या जोडीला श्री. माधव देशमुख नावाचे बाबांचे एक शिष्य, (आता सध्या जे हनुमान टाकळी येथे) त्यांच्या मार्गदर्शनाखाली मी तिथलं काम सुरू केलं. मी त्यामध्ये स्वतःला झोकून देऊन कामाला लागलो. अगदी सकाळी आठ वाजल्यापासून ते काम सुरू व्हायचं ते संध्याकाळी सातपर्यंत चालू रहायचं. दुपारी जेवणापुरती एक तास सुट्टी असायची. काम इतकं होतं की, काही वेळा, आणलेले रंगही संपून जायचे, पण काम काही संपत नव्हते. मग रंग आणेपर्यंत मी फावल्या वेळात माचणूरच्या सिद्धेश्वर मंदिर परिसरात खूप हिंडलो. औरंगजेबाच्या आधीच्याही काळात बांधलेल्या या सिद्धेश्वर मंदिरानं माझ्या मनात घरच केलं. सोलापूरच्या सिद्धेश्वर मंदिरानंतर हेच एक भव्य मंदिर मी पाहत होतो. सिद्धेश्वर मंदिर पाहून झाल्यानंतर सिद्धेश्वराचं दर्शन घेऊन मी मंदिराच्या घाटद्वारापाशी आलो. सिद्धेश्वराच्या पायथ्याशीच हा भीमेचा संपूर्ण भव्य घाट चिरेबंदी दगडांनी सुबकपणे बांधलेला आहे. द्वारापाशी येताच पंढरपूरची चंद्रभागा इथंही अर्धचंद्रकोरीसारखी वळसा घेऊन सिद्धेश्वराच्या चरणभेटीला आली आहे. म्हणून माचणूरवासी जनही या भीमेला 'चंद्रभागा'च म्हणतात. घाटाचा परिसर अतिशय नयनरम्य आहे. नदीच्या पात्रात असलेलं आणि अर्धं पाण्यात बुडालेलं जटाशंकराचं सुबक ठेंगणं मंदिर चहूबाजूनं पाण्यानं वेढल्यामुळं आणखीन आकर्षक वाटत होतं. बाबांनी आपल्या वास्तव्यासाठी हा परिसर का निवडला याचं प्रत्यंतर आल्यावाचून रहात नाही. बाबांनी हा परिसर निवडण्यामागं अनेक कारणं असतीलही. पण निसर्गानं उदार हस्ते प्रदान केलेल्या सृष्टिसौंदर्याच्या राशी इथं जागोजागी विखुरल्या आहेत. हेही एक कारण त्यामागं निश्चितच असणार यात काही शंका नाही. कारण तिथल्या वास्तव्यात एकदा मला एक बाबांचं अतिशय सुरेख छायाचित्र पहावयास मिळालं. ते असं... बाबा नदीच्या ऐल तीरावर, घाट उतरताना उजव्या बाजूला, पण जरा उंचावर असलेल्या खडकावर मांडी घालून नदीच्या दिशेनं पाहत बसलेले आहेत. खडकाला टेकूनच, पण उठताना हाताला सहज येण्यासारखी त्यांची हातातली काठी उभी आहे. या छायाचित्रावरून त्यांना हा नदीचा परिसर आणि किनारा फार जवळचा वाटत असला पाहिजे.

इथं आल्याचं फार सार्थक झालं असं वाटलं. सारं काही माझ्या आवडीचं. काम आवडीचं. आणि वातावरणही आवडीचं पाहून मी मनोमन सुखावलो आणि या सुखाबरोबरच माचणूर या गावानं माझं मनच जिंकलं. आणि खरोखर याला कारण होतं बाबा महाराज आर्वीकर ! त्यांच्या पुनीत वास्तव्यानं सिद्ध झालेली ही माचणूरची तपोभूमी भाविकांना आणि साधकांना 'मोक्षधाम' न वाटली तरच नवल होतं. बाबांनी या तपोभूमीचं नामही 'मोक्षधाम' करून टाकलं होतं. किती यथोचित नाम ! साधकाला मोक्षाप्रत नेणारे जे धाम ते मोक्षधाम ! नामाचं उच्चारण होताक्षणीच मोक्षाची पाऊलवाट डोळ्यांना भुरळ घातल्याशिवाय राहील काय ? तुकोबांनी देहू, माऊलीनं आळंदी, नाथांनी पैठण अशा महाराष्ट्रातील अनेक संतांनी

स्वतः वास्तव्य केलेल्या आपल्या स्थित भूमीमध्ये मोक्षधाम निर्माण केली. त्याचप्रमाणे बाबांनी माचणूरला 'मोक्षधाम' केलं. त्यामुळं बाबांची मोक्षधाम आश्रमाची कल्पना प्रत्यक्षात अवतरली. या भूमीत बाबांच्या नेतृत्वाखाली संपन्न झालेले साधना सप्ताह महोत्सव साधकांनी एक आध्यात्मिक केंद्र आणि खऱ्याखुऱ्या मोक्षधामाप्रती नेऊन सोडणारे सोपान ठरले ! माचणूरला बाबांच्या आकर्षणाने आलेल्या प्रत्येक साधकाला बाबांकडून जे पाहिजे होते ते भरभरून मिळालं. प्रत्येक साधक तृप्त झाला. बाबांची प्रवचनाच्या वेळची आणि दैनंदिन 'सत्संग' कार्यक्रमाच्या वेळची अमोघ वाणी ज्यांनी प्रत्यक्ष ऐकली ते फार मोठे भाग्यवान म्हटले पाहिजेत. आणि असं भाग्य मला प्रथमच १९६० च्या डिसेंबरमध्ये मिळालं.

साधना सप्ताहाच्या निमित्ताने बाबांनी महाराष्ट्रातील आणि महाराष्ट्राबाहेरही जागोजागी विखुरलेल्या पुणे, मुंबई, सोलापूर, कोल्हापूर, चुये, हुपरी, बडोदा आदी शहरांतून हजारो साधक एकत्र आणले आणि माचणूरच्या उघड्या माळरानावर बाबांनी मोक्षधामाच्या रूपाने एक 'धर्मपीठ' आकारास आणले. चंद्रभागेचा तो पावन प्रवाह आणि तिच्या तीरावरील श्रीसिद्धेश्वर महादेवाचं भव्य मंदिर आणि त्याला लागूनच पण उंचावर असलेला सिद्धेश्वराच्या मुकुटासारखा भासणारा बाबांचा मोक्षधाम आश्रम या सर्वांचे रमणीय आणि पावन दर्शन म्हणजे साधकांना लाभलेले एक बलदंड आध्यात्मिक तीर्थक्षेत्र होय ! आणि म्हणूनच मी म्हणतो, माझ्या बंधूंच्या सांगण्यावरून मी माचणूरला येताच एका सूक्ष्म अननुभूत अशा चिरंतन सौख्याचा अमृतघट माझ्या हाती लागला, तो केवळ प. पू. बाबांच्या पावन स्पर्शानं पुनीत झालेल्या, माझ्या मनात कोरलेल्या माचणूरच्या मातीमुळेच !

अशी ही माचणूरच्या मातीची जादू ! या जादुई भूमीचे जादूगार होते प. पू. बाबा महाराज आर्वीकर ! या जादुई भूमीत या जादुगारानं 'साधना सप्ताह महोत्सव' या नावाचे प्रत्येक वर्षी 'जादूचे प्रयोग' सादर केले. आणि साधकानेही ज्याला जी कला भावली त्यानं ती अंगीकारली आणि जीवनाचे सार्थक करून घेतले.

माचणूरमध्ये अजून बरेच काही आहे. खूप आहे ! अनंत आहे. आणि जे काही आहे त्याचा अनुभव घ्या. अंगीकार करा, मनन करा, चिंतन करा. असे बाबा आपल्या 'माचणूरचे हृदगत' या ग्रंथात लिहितात आणि म्हणूनच 'एक तरी ओवी अनुभवावी' या उक्तीप्रमाणे बाबांनी सांगितलेल्या अनेक सद्विचारांतील 'एक तरी विचार अंगीकारावा' असे म्हणावेसे वाटते.

**श्री. द. शं. मोहोळकर**
१५७ दक्षिण कसबा, श्रीशुभराय मनोरा,
२ रा मजला, सोलापूर ४१३ ००७

---

## साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ।

१९६४ सालातील माझ्या दृष्टीने ही अविस्मरणीय घटना आहे ! आम्ही सोलापुरात रेल्वेस्टेशनजवळील रेल्वे कॉलनीत रहात होतो. चार खोल्यांचे प्रशस्त घर होते. पाहुणे मंडळी आली तरी जागेची कमतरता नव्हती. पंधरा-वीस माणसे आली तरी सहज खपून जायची ! आम्ही सर्वसामान्य माणसं ! आमच्या घरी नातेवाईकांशिवाय कुणाचाच वावर नव्हता ! परंतु एक दिवस असा आला आणि सारा मोहरा फिरून गेला ! पूजनीय बाबा महाराजांचे चरण कमल आमच्या वास्तूला लागले. आमची वास्तू आणि आम्ही पावन झालो. रोजच्या प्रमाणे मी एके दिवशी दुपारी १२ वाजण्याच्या सुमारास जेवायला बसले. घास घेणार इतक्यात दारावर थाप आली आणि बाहेरून आवाज आला, 'एन्. व्ही. के. आहेत का ?' मी दार उघडले तो माझ्या डोळ्यांवर माझा विश्वासच बसेना ! साक्षात बाबा महाराज समोर होते ! लगेच खाली वाकून मी त्यांना नमस्कार केला आणि आत येण्याची विनंती केली ! त्यांनी घरात प्रवेश केला व आसनस्थ झाले. त्यांच्याबरोबर पंधरा-वीस साधक मंडळी होती. बाबा महाराजांच्या अचानक येण्याने मी पार गोंधळून गेले, काय करावे सुचेना ? घरात मी एकटीच हे लाईन ड्युटीवर गेलेले. पोरं शाळेत गेलेली. मी विचारात पडले अशा स्थितीत बाबा म्हणाले, 'हे बघ, आम्ही सर्वजण जेवणार आहोत. जेवढ्या लवकर होईल तेवढ्या लवकर जेवण तयार कर !' ते स्वयंपाक घरात आले आणि म्हणाले, 'तू गोंधळून गेलीस ना, आम्ही आहोत ना मदतीला !' बाबांच्या या वाक्याने मला धीर आला. लगेच घरातले स्वयंपाकाचे जिन्नस बघितले. कमी असलेले शेजाऱ्यापाजाऱ्यांकडून जमा केले. चार बायका स्वयंपाकाच्या कामाला लागल्या. पण भाजीचा प्रश्न होता ? रोज दहा वाजता येऊन जाणारा भाजीवाला आज नेमका उशीरा आला आणि देवासारखा माझ्या मदतीला धावून आला ! मी त्याला शतशः धन्यवाद दिले आणि त्याच्याकडील सर्व भाजी घेतली ! बाईसाहेब उशीर झाला म्हणून मी येणारच नव्हतो पण माझं मन मला स्वस्थ बसू देईना, म्हणून आलो ! बाबा महाराजांनीच त्याला येण्याची बुद्धी दिली हे मी ताडले ! तासाभरात सर्व स्वयंपाक तयार झाला. बाबा महाराजांसहित सर्व मंडळी जेवली आणि थोडक्या विश्रांतीनंतर तुळजापूरला देवीच्या दर्शनासाठी रवाना झाली. जाताना त्यांनी रात्री आम्ही जेवायला आणि मुक्कामाला आहोत असे सांगितले. तुळजापूरहून संध्याकाळी सर्वजण परत आले. चहापाणी झाले. सर्वजण गप्पा मारत बसले. आसपासची मंडळी, गावातील मंडळी दर्शनाला येऊन गेली. रात्री नऊ वाजता सर्वांची जेवणं झाली. पहाटे पाच वाजता हे लाईनड्यूटीवरून परत आले. माणसांची वर्दळ पाहून त्यांना घर चुकल्यासारखे वाटले आणि ते परत निघाले. त्यांना पाहून मी म्हणाले, 'अहो आपलंच घर आहे, या ! बाबा महाराज आलेत !' हे ऐकून त्यांना अत्यानंद झाला ! आमचे बोलणे चालू असतानाच बाबामहाराज उठले. ह्यांनी बाबांचे दर्शन घेतले. प्रातःस्मरण व प्रार्थनेचे विधी झाले. चहा नाष्टा झाला. सकाळी दहा वाजता बाबामहाराजांनी पुढच्या प्रवासासाठी प्रस्थान केले. आम्हाला सर्वांना आशीर्वाद दिले. मी मनोमन हात जोडून म्हणाले,

*'तुझे संगतीचा सदा योग व्हावा । जगी वागता मोकळा भाव यावा ।'*

दोन दिवसांच्या संत सहवासाने आम्ही कृतकृत्य झालो. पूर्वसंचित म्हणूनच हा संयोग घडून आला. अक्षरशः दिवाळी आणि दसरा साजरा केल्याचा आनंदच आमच्या चेहऱ्यावर ओसंडून वहात होता.

●●●

***केलेली सेवा, दिलेले दान व मानलेले नाते सांभाळा. या धर्मांच्या विरोधात आचरण तर राहोच पण उद्गारही उठू देऊ नका. कारण तसे होताच सेवाच स्वार्थ होय, दानच भोग होय व नाते मानणेच व्यभिचार होय. यानेच व्यक्तिसुख व समष्टीच्या पावित्र्याचाही नाश होतो.***

## आठवणी
### श्री. व सौ. ठकार

प. पू. संत श्रीबाबामहाराज आर्वीकर यांच्या आठवणी आम्ही उभयतांनी लिहाव्यात अशी आज्ञा ओंकार ट्रस्टचे एक आदरणीय विश्वस्त यांनी केली. प. पू. बाबांची आठवण आजही झाली तरी डोळे पाणावतात व हे तर हुंदकेही येतात. तरी पण आम्ही उभयता प्रयत्न करत आहोत. माझा आणि प. पू. बाबांचा सहवास फक्त ५/६ वर्षांचा. परंतु माझ्या सौ.ला त्यांचा सहवास १५/१६ वर्षांचा. मला प. पू. बाबांचे दर्शन दि. १३/६/१९६६ ला झाले तर अन्त्य दर्शन ३/१२/१९७१ ला झाले. प. पू. बाबांचा सहवास लाभण्याचा योग खर्डीकर कुटुंबियांमुळे आला. ते सर्व कुटुंबच बाबामय झालेले होते.

१) माझी पहिली आठवण अशी आहे की, मी १९६६ साली दसऱ्याच्या सणासाठी पंढरपूरला गेलो होतो. त्या दिवशी संध्याकाळी प. पू. बाबा खर्डीकरांचे घरी आले होते. घरात नव्या जावयाला संध्याकाळी औक्षवण करण्याचा कार्यक्रम होता. आमचे भाचेजावईपण त्यांचाही पहिला दसरा असल्यामुळे तिथे आले होते. ओवाळणीच्या कार्यक्रमात काहीतरी गडबड झाली व तबकातील लावलेला दिवा खाली पडला व विझला. असा दिवा पडून विझणे अशुभ असते. त्या वेळी पूज्य बाबा पण हा प्रकार पाहताच ध्यानस्थ बसले होते. घरातील गडबडगोंधळ पाहून प. पू. बाबा एकदम ओरडले, 'त्याचे काम झाले आहे' आणि खरोखरच त्यांचे वाक्य खरे झाले आणि त्यानंतर १५/१६ वर्षे त्या घरात काहीही अशुभ घडले नाही.

खरोखरच प. पू. बाबा परमेश्वरी अवतार होते.

२) एकदा मला मे महिन्यात शासकीय कामासाठी मुंबईला जायचे होते. पूज्य बाबापण मुंबईतच आहेत असे आम्हाला समजले होते. आपण दोघांनीपण मुंबईस जाऊन पूज्य बाबांना भेटून यावे म्हणून आम्ही पुण्यात आमच्या घरी आलो. दुसऱ्या दिवशी आम्ही मुंबईला जाणार होतो. मला माझी आई म्हणाली बरे झाले तू सौ.ला घेवून आलास. मला रविवारी कोकणात जायचे आहे. मला कामासाठी तिची मदत होईल. तिच्या सांगण्यावरून मला सौ. ला मुंबईला नेता आले नाही. ठरल्याप्रमाणे मी मुंबईला गेलो. काम आटोपल्यानंतर मी पूज्य बाबांना भेटायला काकुमौंच्या घरी गेलो. बरेच वेळ बोलणे झाले आणि मी निघताना पूज्य बाबा मला म्हणाले, मनोहरपंत मला इंदाची आठवण झाली आहे. आणि मी दोन-चार दिवसांत यात्रेला जाणार आहे. तरी बघा तिला घेवून येतायेत असेल तर ?

हे वाक्य ऐकून काय करावे असा प्रश्न पडला. घरी आल्यावर सर्व विचार करून आम्ही दोघे परत पूज्य बाबांना भेटायला गेलो.

कोठे मुंबई, कोठे पुणे तरी बाबांना मी सौ. ला घेवून मुंबईला येणार होतो हे कळाले. याला आपण काय म्हणाल, प. पू. बाबा फार मोठे ज्ञानी व्यक्ती होते. पुढे काय होणार या बाबात ते सर्वज्ञ होते. याचा प्रत्यय फार भक्तजनांना झालेला आहे.

३) सौ. ठकार – एकदा पूज्य बाबा पंढरपूरला आमच्या घरी आले होते. बरोबर त्यांच्या पूज्य आई व सौ. काकूमौं पण होत्या. सर्वजण संध्याकाळी श्री दासगणू महाराजांच्या मठांत पूज्य अनंतराव आठवले (अप्पा) यांचे कीर्तन ऐकायला निघाले. मीपण त्यांच्याबरोबर गेले. पूज्य अप्पा संत मीराबाईचे आख्यान सांगत होते. त्यांचे ते सद्‌गतीत होवून सांगितलेले रसभरीत आख्यान ऐकून मी फार भारावून गेले. मला काहीच सुचत नव्हते. कीर्तन संपल्यावर आम्ही सर्वजण घरी आलो.

घरी आल्यावर पाच सहा लोकांना जेवण वाढायचे काम माझ्याकडे होते. पण मला वाढायचे पण सुचत नव्हते. हे बाबांच्या पण लक्षात आले व मी पूज्य बाबांना म्हणाले, मीराबाईचे कीर्तन ऐकल्यापासून मला काही सुचत नाही. समोरची वस्तू पण मला नीट दिसत नाही. तेव्हा हसून पूज्य बाबा मला म्हणाले, 'अगं बाई, ते असं मनात ठेवायचं असतं. मन आवरायचं असतं. उद्या आपण पुन्हा कीर्तनाला गेलो व त्यांनी वीररस पूर्ण शिवचरित्र वर्णन केलं तर तू काय लढाईवर जाशील काय ?'

त्यावेळी माझे मन थोडे शांत झाले.

●●●

***मानवामध्ये असलेल्या मन, बुद्धी व चित्त या तीन सुप्त शक्तींची सुव्यवस्था लावून, त्यांचा विकास साधणारा उपाय म्हणजे धर्म होय. धर्मशीलतेने, धर्मशक्तीने मानवाच्या ईश्वरदत्त सर्व आंतरिक शक्ती एका सुसूत्र व्यवस्थेत येतात. मानवांतील भेद केवळ या तीन शक्तींच्या कमी-अधिक अशा सुसंवादित्वामुळेच असतात.***

# श्रीबाबा महाराजांचे विचार

माझ्या जीवा ! त्या परमतत्त्वाचा लगेच अनुभव येणे सुलभ आहे असे का वाटते तुला ? सारेच हळूहळू होईल. मनाचा उद्रेक सांभाळावा; खेद वा हर्ष यांपासून वेगळे व साक्षी असावे. नित्य प्रसन्न व निरपेक्ष असावे. निरपेक्ष होऊन विहार करण्यातच सुख व समाधान आहे. नियमित साधना (स्मरण, ध्यान आदि) करावी; हताश व अभिलाषासक्त मन ठेवू नये; आपलाच आपण विचार करावा; कोणतेही काम विवेकहीन होऊन नये. तडफ असावी पण नियमीत व विवेकी. आपलेपणा सहज असतो पण तो आपण जेव्हा निर्माण करतो तेव्हा त्यामध्येच बाधा येते. बुद्धि पुरस्पर प्रेम करू नये. ते स्वभावशील आहे. सर्वांचे लक्ष आपल्याकडे असावे वा आपलेकडे आहे असे दिसावे असा व्यवहार्य व विनाशी विचार मनी ठेवू नये. कारण ते नाटकच होईल. आपण दुर्लक्ष केले की स्वभावाने सर्वांचे लक्ष आपलेकडे येते. व्यवहार अलिप्तपणे साधावा. सर्वांशी स्वाभाविक जिव्हाळ्याने वागावे. आपण काही विशेष करतो आहोत असे वाटू नये व प्रकट करू नये. आपले क्रियाशीलत्व, सद्गुण व सेवा झाकून घेता येईल तेवढी चांगली; पण झाकताना मनाला अभिमान होऊ देऊ नये.

**श्रीबाबा - पत्रपारिजात**

मानवी मत हे गंधर्व नगरीचे राज्य चालविणारे राज्य असते. अनंत कल्पना साकार करण्यास्तवच त्याची धडपड असते. अर्थातच ह्या कल्पनांचा कुठे दिव्यधर्म तर कुठे विनाशी व अदिव्य धर्म असेल. पण हा दिव्य-अदिव्य भेद मानवी मनाच्या अज्ञातांत प्रसवतो. वास्तविक यथार्थाने सत्य हे शाश्वतच होय. या सत्याचेच ज्ञान प्रत्येकाला होते. पण इंद्रियांच्या माध्यमांतून होणारे विकारनिष्ठा ज्ञानच अज्ञात म्हणून गणले जाते. तर इंद्रियांच्या सूक्ष्मतम धर्माने पदार्थांचेही सूक्ष्मतम ज्ञान जीव प्राप्त करून घेतो. वास्तविक याच न्यायाने अज्ञान हे नसून माध्यमाच्या बऱ्या-वाईट संबंधाने घडणारे सत्य व असत्य भेदाश्रित असे ज्ञानच असते. म्हणून जो इंद्रियांच्या सूक्ष्म धर्माने जगाचे ज्ञान करून घेतो, तो जगात ज्ञानी समजला जातो. हे इंद्रियांचे सूक्ष्मपण उत्तरोत्तर प्रगतशील व निर्विकार स्वभावानेच मापावयाचे असते. देवाने आपल्याला ही स्वभावतःच देण दिलेली आहे. एखाद्या पाषाणाच्या पोटात शिरून पाहणारे स्पर्शज्ञान जसे पाथरवटाला प्राप्त असते. वास्तविक बाह्येंद्रियाने तो ते उमगू शकत नाही. पण अंतःस्फुरणेत ते त्याला आरशासारखे स्पष्ट असते. बाह्यतः आई व पत्नी दोघीही स्त्रियाच ! पण दोघींचे इंद्रियांना होणारे ज्ञान केवळ स्त्रीचे होत नाही. तर आईच्या आकारातील स्त्रीचे ज्ञान होताच मन मातृप्रेमाने भरून जाते व पत्नीचे ज्ञान होताच सांसारिक सुखानुभूतीचा स्पंद निर्माण होतो. हे ज्ञान इंद्रियांच्या माध्यमांतूनच मिळाले. पण प्रत्येक वेळी इंद्रियांच्या आंत खेळणारी प्राणाची स्फुरणा वेगवेगळ्या भावशक्तींनी स्फुरीत करून, हे सुखाचे सूक्ष्मपण भेदाने इंद्रिये जाणू शकतील अशी धारणा स्थिर केली. परमार्थाचा विचार असाच आहे. भगवंताच्या प्रेममय स्फुरणेने शरीरात प्राण खेळविता आले म्हणजे जगाचे भेद मालवतात व सर्व दर्शनांत एका लीलामय भगवंताचेच मंगल दर्शनसुख प्राप्त होते.

**श्रीबाबा - पत्रबोधामृत**

## मोठेपणा म्हणजे काय ?

मोठेपणा मापण्याचे माप कोणते हेच कळत नाही ! उत्तम गुणांची खाण म्हणजे मोठेपणा म्हणावे. तर सारे उत्तम गुण दगड-धोंडे, झाडे-डोंगर, नद्या, सूर्य, तारे, फुले, फळे, पशु व पक्षी यांच्याच वाट्याला गेलेले दिसतात. माणसात मात्र त्याची उणीव भासते. त्यामुळे असा प्रश्न पडतो की, मोठे व्हावयास - उत्तम व्हावयास मानवी सृष्टीच्या अलीकडची जी जडसृष्टी ती होणे की काय ! मानवजात ही जगाची विकसित अवस्था आहे. पण उत्तम गुण तर जडसृष्टीतच दिसतात. साहित्यिक नेहमी पृथ्वीची तितीक्षा, गंगेची निर्मलता, पर्वतांची अचलता, वृक्षाची परोपकारता, सूर्याची निष्काम कर्मण्यता, चंद्राची सुखप्रसन्नता, पक्षांची अलिप्तता या सर्व चांगल्या गुणांच्या उपमा म्हणून वापरतात. आता हे जड जीवन जर चांगलेच असेल तर मानव ही जगाची विकसित दशा हे तरी कसे मानले ? संगीताच्या जगातही पशु-पक्ष्यांच्याच गुणवत्तेला स्थान आहे. इमानदारीत अश्वाचे मूल्य करतात, मित्र म्हणून श्वानाचे गोडवे गातात.

मोठेपणा ठरविण्याचा बिकट प्रश्नाचा जेव्हा मी खूप विचार करतो तेव्हा असे कळून येते की, 'माझे' किंवा 'आपले' नसणेपणाच्या अवस्थेतच जग मोठेपणा देत असावे. कारण जगात जेवढे दोष आहेत ते सर्व 'मी' पणाच्या पाठीवरचे गांठोड्यांतच आहेत. हा 'मी' पणा कमी कमी होणे हेच मोठेपण ! आपण स्वतः संकल्पिलेले मोठेपण म्हणजे गुण-संग्रह हे लौकिक दर्शनच ठरते. पण मी पण कमी कमी होत राहिले की, मीपणाच्या मोकळ्या झालेल्या बाटलीत स्वभावेच देवाचे मोठेपण भरले जात असावे. मोठेपणासाठी मीपणाचा त्याग असेच समीकरण असावे. मीपणाचा त्याग म्हणजे देवपणाच्या पात्रांत मीपणा विरघळण्यासारखा आहे. मी हे मीठ व देव हा सागर. मीठ सागरात गेले की सागरच होते. सद्गुणांचे मोठेपण पुष्कळ मिठासारखे आहे व मीपणा सोडून येणारे मोठेपण हे सागरासारखे आहे. मिठाचा डोंगर होण्यात जे मोठेपण ते गुणांचे मोठेपण व सागर होण्यात जे मोठेपण ते मूळ स्वरूपाचे मोठेपण होय. डोंगर हे लौकिकाचे दर्शन तर मीपण मूळ रूपात विलीन होणे हे अलौकिक दर्शन. अलौकिक होणे हाच खरा मोठेपणा !!

**पत्र श्रीबाबा बोधामृत**

## साधना पाथेय

विवेक व वैराग्य यांची जोड घेऊन प्रेममय साधना साधावी. जेव्हा प्रेमच वर्तू लागेल तेव्हा स्वभावशील विवेक व वैराग्य घडते. पण प्रथम याची जोड आवश्यक आहे. वैराग्य हे नीट समजून असावे. वैराग्यात त्याग घडतो पण कशाचा ? भोगात्मक प्रेरणेचा. याचा अर्थ जगाचे दृश्य रूपाचा जो भास (भाती) त्याचे प्रेम नाश पावून हरिरूपाने वृत्ति नटू लागते. यामुळे जे जडपण वृत्तीचे तेच चैतन्यांकित होऊन विश्वाभासच चैतन्याचे स्वरूपात रूपांतरीत होऊ लागतो. तसेच विवेक हाही धर्म चैतन्य-चिंतनाचा आहे; जड त्यागाचा नव्हे हे यथार्थाने ओळखून चालावे.

**श्रीबाबा - पत्रपारिजात**

## ब्रह्मज्ञान

ब्रह्मज्ञान होते तेव्हां....।
माणसे लौकिका पासून...।
दूर जातात... ॥ १ ॥

ब्रह्मज्ञान होते तेव्हा.... ।
जीवनाचे अर्थच.... ।
कळून येतात.... ॥ २ ॥

ब्रह्मज्ञान होते तेव्हा... ।
ईश्वर शक्ति अस्तित्व... ।
दिसून येतात.... ॥ ३ ॥

ब्रह्मज्ञान होते तेव्हा... ।
नवे नवे अनुभव.... ।
मनचक्षु समोर येतात.... ॥ ४ ॥

ब्रह्मज्ञान माणसाला....।
सहजपणे मग.... ।
ईश्वराकडे घेऊन जातात.... ॥ ५ ॥

**पंडित हिंगे,**
साहित्यिक / ज्योतिषी / पत्रकार,
अमरबाग, हडपसर, पुणे २८.

### धर्मकार्यातील नीति

धर्मजागृतीचे कार्य करणारा कार्यकर्ता व त्या कार्याला अर्थसहकार देणारे लोक यांच्यांत खूप मोठा भेद आहे. केवळ अर्थवान लोकांच्या भरवशांवर कार्य होतच नसते. तसले कार्य एक दिखाऊ ढोंग मात्र असते. अर्थसहकार करणे हे अर्थवानांचे एक पवित्र कर्म आहे; व ते त्यांचे कर्तव्य आहे, हीच जाणीव त्या सर्वांमध्ये स्थिर असली पाहिजे. कार्यकर्ता निष्ठावान, तळमळीचा, समंजस व स्थिरमति असावा. तो धनिक असावाच असे नाही. त्याने लोभ किंवा लांच दाखवून अर्थवानांचे अर्थसहकार्य कधीही घेऊ नये. ही नीति न सांभाळली तर सत्कार्याच्या नावाखाली द्रव्य व चैन आणि कालव्यय यांचेच आवागमन घडते. कार्य होत नाही. कार्यात पावित्र्य व गांभीर्य उरत नाही. फक्त कार्याचा देखावा होतो. धनिकांची स्तोत्रे गाणे व त्यांना अनाठायी प्रतिष्ठा देणे धर्मकार्यात गैर आहे. धनिकांवर देवाचा एक भक्त या नात्याने निर्व्याज प्रेम करावे व त्याच्याकडून देवाची व धर्माची सेवा करवून घ्यावी. यासाठी प्रलोभन वा प्रतिष्ठा विरहित कर्तव्यनिष्ठा चेतवून त्याला कार्यप्रवृत्त करावे. जगात देवभक्ताशिवाय मोठे कोण आहे ? देवाला सोडून जगाच्या कोणत्याही वैभवाला मोठे म्हणणे हे धर्मतः पाप आहे. धनिक आहे व देवभक्तही आहे. असे जेव्हा असते, तेव्हा त्याचे द्रव्य मिळो वा न मिळो पण त्याच्या भक्तिभावाला उधाण कसे आणता येईल याचाच विचार कार्यतः केला पाहिजे. धनिकांना खोटा सन्मान न देता हरीच्या दासाचाच सन्मान व्हावा ही कार्यकर्त्याची धारणा पाहिजे. सर्वच भावभक्तीचा सुखसोहळा नांदावा यासाठी अभिमानविरहित होऊन खरे व भरीव स्वरूपाचे कार्य आकारावे, यासाठीच सर्वथा प्रयत्नशील असणे हीच धर्मकार्यातील नीति आहे.

**पत्र श्रीबाबा**

# ॥ आर्तवाणी ॥

अतां मागणे एवढे एक आहे ।
झिजावी तनू आंस ही पोटी राहे ।
तुझे कारणी चिंतनी काळ जावो ।
सदासर्वदा त्वत् कृपालाभ होवो ॥१॥

तुझे संगतीचा सदा योग व्हावा ।
जगी वागता मोकळा भाव यावा ।
असे रंजले गांजले ते सुखी हो ।
समस्तांस देवा तुझे प्रेम लाहो ॥२॥

तुझा धर्म तो नित्य नांदो जगात ।
जना आकळो कोमला सर्व हेत ।
सदा सज्जना सात्विके वागतांना ।
तयांना न हो दुःख क्लेशादि नाना ॥३॥

मती दुर्जनांची बहू शुद्ध होवो ।
अधर्मांतरी जीव ना कोणी राहो ।
बहूतां मता एकता यावी लोकी ।
असंख्यात जे जीव होवो विवेकी ॥४॥

घडो एकता संप्रदायी मतांची ।
जडो प्रेमभावे स्मृती साधनेची ।
झडो द्वेष रागादिके आत्मभावे ।
सदासर्वदा सौख्य लोकी असावे ॥५॥

– श्रीसंत बाबामहाराज